चित्र ३



चित्र ४


१४ ब्रम्हरंध्र चक्रम्. मूर्धा.
१३ ब्रम्हद्वार चक्रम्. ललाटोर्ध्व भाग.
१२ अमृतचक्र ललाट.
११ आज्ञाचक्रं भ्रूमध्य.
परमहंस
१० बलवान चक्रम्. ब्रम्हा, विष्णू, महेश, नासिका.
९ तालुका दशम द्वार मार्ग.
८ विशुध्द चक्रम्. कंठ.
७ मनश्चक्रं हृत्कंठमध्य
६ अनाहतचक्रं हृदय.
मणीपूरचक्रं नाभि.
४ विराट कुंडलिनी चं. फडी
३ स्वाधिष्टान चक्रम्. पुलिंग
३ महोपद्म चक्रम्. अग्नि स्त्री योनि.
२ ब्रम्हचक्रं. सीवनी.
आंधार चक्रम्. गुदा.
गणेश

ॐ तत्सत्परमात्मने नमः ।

# पातञ्जलयोगशास्त्राचाअभिप्राय.

## स्वरोदय, पवनविजय, हठयोग, लययोग, राजयोग, (सहजसमाधि) इत्यादि

अनेक प्राचीन ग्रंथांच्या आधारानें

व

महात्मा योगेश्वरांच्या प्रसादानें, हा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे.

योगाभ्यासोपयोग्यनेकविषयकमहाराष्ट्रभाषोपनिबद्धटिप्पणीसहित

हें पुस्तक

"नानाभाई सदानंदजी रेळे ऊर्फ हेमाडपंत"

यांनीं भाषांतर करून

मुंबईंत

'युनिव्हर्सल' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

शके १८१९, सन १८९७.

किंमत तीन रुपये.

---

नानाभाई सदानंदजी रेळे, ऊर्फ हेमाडपंत,

पत्ताः—लोहारचाळ, दगडीहवेलीचे मालक—मुंबई.

किंवा

नानाभाई सदानंदजीचे बंगल्यांत, कोळसेवाडी,

कल्याण,

जि० ठाणे.

# प्रस्तावना.

नत्वाहिरण्य गर्भादीन्योगशास्त्रप्रवर्तकान् ॥
वस्तु प्रस्तूयते सम्यक् कैवल्यानुप्रदायकम् ॥ १ ॥

या सृष्टीकडे विचारदृष्टिपूर्वक अवलोकन करून पाहिलें असतां असें ध्यानांत येतें कीं, प्रत्येक प्राण्याचे सुखप्राप्तीच्या साधनाविषयीं सर्व व्यापार सुरू आहेत; त्यांत स्वर्गादि सर्व सुखें अनित्य व परिणामीं दुःखमयच आहेत; खरें व अक्षय सुख ह्मटलें ह्मणजे कैवल्य ( मोक्ष ) हेंच मुख्य सुख होय. तें मोक्षसुख प्राप्त व्हावें याकरितांच सर्व श्रुति, स्मृति, पुराण, इतिहास इत्याद्यनेक साधनें भक्तवत्सल परमेश्वरानें निर्माण करून ठेविलीं आहेत. श्रुत्यादिकांचें प्रमेय व तत्प्राप्य एकच आहे खरें, परंतु अधिकारिभेदानें अनेक मार्ग सांगितलीं. साधनानें साध्य ( कार्य ) कांहीं प्रतिबंध नसेल तर अवश्य सिद्ध झालें पाहिजे. कार्यास प्रतिबंधक आहे किंवा नाहीं याचें ज्ञान उत्तम ज्ञानावांचून होणार नाहीं. यद्य कदाचित् तसें ज्ञान प्राप्त झालें तथापि या जन्मांतच तें साध्य ( मोक्षरूप कार्य ) सिद्ध होईल असें साधन प्रायः योगावांचून दुसरें नाहीं; कारण, योगी संसारबंधाला जें कारण प्रारब्धकर्म, त्याचा उपभोगानें क्षय करण्याकरितां या जन्मांतच योगप्रभावानें अनेक देह धारण करून सर्व प्रारब्धकर्म उपभोगानें सारून संसारबंधांतून मुक्त होतो, असें सामर्थ्य इतरांत नाहीं. ह्मणूनच भगवद्गीतेंत ' तपस्वी, ज्ञानी व कर्मनिष्ठ या सर्वांपेक्षां योगी श्रेष्ठ आहे; ह्मणून हे अर्जुना ! तूं योगी हो ' असें श्रीकृष्णानें अर्जुनास सांगितलें. पण संस्कृतभाषेंतले ग्रंथ फारच थोड्यांना समजतात तथापि हल्लीं संस्कृतभाषेचें ज्ञान जरी विशेष नसलें तरी स्वभाषेंत भाषांतर करण्याची पद्धति जिकडे तिकडे सुरू झाल्यापासून तत्तद्भाषातत्त्वज्ञास बहुतकरून अडचण राहिली नाहीं. हीच पद्धति पाहून आह्मींही पतंजलिकृत योगसूत्र व त्यावरील श्रीवेदव्यासप्रणीत भाष्य यांचें मराठी सरळ भाषेंत भाषांतर केलें, परंतु भाष्यांतील विषय गहन असल्यामुळें योगाभ्यासास अत्यंतोपयोगी अन्य ग्रंथांतील विषय आह्मांस स्वतंत्र द्यावयाचे मनांत असल्यामुळें ' पातंजलयोगशास्त्राचा अभिप्राय' ह्या नांवानें केवळ मराठी भाषेंत हा ग्रंथ रचून त्याखालीं टिप्पणीरूपानें अनेक ग्रंथांतील सर्व विषय निर्दिष्ट केले. त्यांत स्वरोदय ( पवनविजय ), हटयोग, लययोग, राजयोग ( सहजसमाधि ) इत्यादि अनेक प्राचीन ग्रंथांचे विषय पुष्कळ विस्तारानें प्रतिपादन केले आहेत. अभिप्रायांतील विषय मननपूर्वक वाचल्यावर मग भाष्यांतील विषय मुळींच गहन वाटणार नाहीं हें अनुभवानें कळेल. याप्रमाणें ग्रंथप्रसिद्धकर्त्यानें जे अपरिमित परिश्रम केले आहेत त्याचें सार्थक्य योगाभ्यासप्रिय लोक या ग्रंथाचा संग्रह करून त्यांतील प्रमेय जाणून त्याप्रमाणें योगाभ्यासाचा व्यासंग करतील अशी आशा आहे.

ग्रंथकर्ता.

ॐ तत्सत्परमात्मने नमः ।

# अथ पातञ्जलयोगशास्त्राभिप्रायानुक्रमणिका ।



१ असा मोठा टाईप जेथें असेल तो विषय त्या सूत्राच्या टिप्पणींत आहे असें समजावें.

**इति समाधिपादः ॥ १ ॥**

---

**अथ साधनपादः ॥ २ ॥**

## इति विभूतिपादः ॥ ३ ॥

---

## अथ कैवल्यपादः ॥ ४ ॥

| सूत्रांक. | विषय. | पृष्ठांक. |
|---|---|---|



इति कैवल्यपादः ॥ ४ ॥

## इति श्रीपातञ्जलयोगशास्त्राभिप्रायानुक्रमणिका संपूर्णा ॥

ॐतत्सत्परमात्मने नमः ।

# पातञ्जलयोगशास्त्राचा अभिप्राय.

समाधिपादः ॥ १ ॥

सूत्रम्—ॐ अथ योगानुशासनम् ॥ १ ॥

## मङ्गलाचरणम् ।

नमोऽस्तु केशवायादिमूर्तये स्थितिहेतवे ॥ रमेशाय नृसिंहाय कैवल्यपतये सदा ॥१॥ यदनुस्मरणान्नृणां दुःखजातमपि त्रिधाम् ॥ आशु प्रयाति विलयं स श्रेयांसि तनोतु वः ॥ २ ॥ पूज्यत्वाद्धि पतन्त्यस्मिन्नञ्जसाऽञ्जलयः सताम् ॥ योगाचार्याय मुनये तस्मै फणिनुते नमः ॥ ३ ॥ येनाभाणि समस्तसारनिचयो मोक्षैकहेतुः सतां क्लेशानामशनिर्नृणां सुखकरः सिद्धिप्रदो भाविनाम् ॥ यद्वाचोऽतिनिगूढवाच्यपदवीभाजो विराजोऽस्तुवन् यत्र प्रकृतिपूरुषप्रविरहो योगो हितोऽभीहितः ॥ ४ ॥ तत्कृतेर्योगशास्त्रस्य ह्यभिप्रायाभिकीर्तने ॥ प्रयते जनसंतुष्ट्यै श्राकृष्णैककृपालवात् ॥ ५ ॥

**अभिप्रायः**—या सूत्रांत 'अथ' व 'योगानुशासन' अशीं दोन पदें आहेत; त्यांत अथशब्द येथें प्रारंभार्थक व उच्चारणमात्रेंकरून मंगलबोधक आहे. योगाचें अनुशासन, योगानुशासन. योगशब्दाचा अर्थ समाधि. (त्याचें हिरण्यगर्भानें विस्तारानें प्रणीत जें योगशास्त्र) त्यास अनु ह्मणजे अनुलक्षून संक्षिप्तरीतीनें शासन ह्मणजे शास्त्र आरंभिलें असें जाणावें.

**योगश्चित्तवृत्तिनिरोधः ॥ २ ॥**

अंतःकरणाच्या वृत्ती आंवरून धरणें ह्मणजे ज्या वस्तूवर आपल्या चित्ताची धारणा[1] करावयाची आहे त्यावांचून इतरवस्तूंवर चित्ताच्या वृत्ती न फांकूं देणें; यास योग ह्मणतात.

**तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम् ॥ ३ ॥**

जसा स्फटिकमणि हा स्वभावतःच पांढरा व स्वच्छ आहे; परंतु तो लाल, पिंवळा, काळा इत्यादि रंगांच्या फुलांवर ठेवला असतां लाल, पिंवळा, काळा इत्यादि रंगांचा दिसूं लागतो. पुढें तो त्या फुलांवरून दूर केला असतां पुनः पूर्वीप्रमाणें पांढरा दिसूं लागतो.

---

सूत्र २ टीपः—१ चित्त दुसऱ्या विषयांवरील काढून नाभिचक्र, ब्रह्मरंध्र कंठकूप इत्यादि ठिकाणीं स्थिर करणें; यास धारणा ह्मणतात.

तसा, जेव्हां चित्तामध्यें शांत, घोर व मूढ अशा सर्व वृत्तींचा लय होऊन जातो; तेव्हां तो साक्षी चिदात्मा पुरुष आपल्या स्वाभाविकरूपाला पावतो. पुरुषाचा (आत्म्याचा) स्वभाव तर फक्त चैतन्य ह्मणजे स्वप्रकाशता मात्र आहे, वृत्ति हा त्याचा स्वभाव नाहीं; ह्मणून निरोधकाळीं (ज्या वेळीं योग सिद्ध होतो त्या वेळीं) आत्मा केवळ चिन्मात्र अशा स्वरूपानें असतो.

**वृत्तिसारूप्यमितरत्र ॥ ४ ॥**

इतरदशेंत ह्मणजे जेव्हां चित्ताच्या वृत्तींचा निरोध झालेला नसतो त्या वेळेस आत्म्याचें स्वरूप चित्ताच्या ज्या शांतादि वृत्ती त्यांच्या सारखें असतें. म्हणजे 'मी सुखी आहें,' 'मी दुःखी आहें,' 'मी मूढ आहें,' अशा अनुभवावरून अज्ञान लोक ह्या आत्म्याच्याच वृत्ती आहेत असें समजतात.

**वृत्तयः पञ्चतय्यः क्लिष्टा अक्लिष्टाः ॥ ५ ॥**

चित्ताच्या वृत्ती पांच प्रकारच्या आहेत. त्या पुनः क्लिष्ट (परिणामीं दुःख देणाऱ्या) व अक्लिष्ट (परिणामीं सुख देणाऱ्या) अशा दोन प्रकारच्या आहेत. हे दोन प्रकार येथें सांगण्याचें कारण असें कीं, अभ्यास व वैराग्य यांच्या साहाय्यानें अक्लिष्ट वृत्तींनीं क्लिष्ट वृत्ती घालवाव्या; व त्यांच्याच साहाय्यानें परवैराग्य[1] उत्पन्न झालें ह्मणजे त्यानें त्या अक्लिष्ट वृत्तींचाही लय करावा.

**प्रमाणविपर्ययविकल्पनिद्रास्मृतयः ॥ ६ ॥**

त्या वृत्ती १ प्रमाण, २ विपर्यय, ३ विकल्प, ४ निद्रा व ५ स्मृति, याप्रमाणें पांच आहेत.

**प्रत्यक्षानुमानागमाः प्रमाणानि ॥ ७ ॥**

प्रमाणवृत्ति १ प्रत्यक्ष, २ अनुमान व ३ आगम, याप्रमाणें तीन आहेत. (अर्थात् बाकींच्या विपर्ययादि चार वृत्ती अप्रमाण असें सिद्ध झालें.) त्यांत १ प्रत्यक्ष प्रमाण ह्मणजे, पूर्वी माहित नसलेल्या पदार्थाविषयीं इंद्रियांचा संबंध होऊन जी निश्चयरूप चित्ताची वृत्ति होते. ती. २ अनुमान प्रमाण,– 'जेथें धूर असतो, तेथें नियमानें अग्नि असतोच,' अशा प्रकारचें जें व्याप्तिज्ञान, त्या ज्ञानाचें पर्वत इत्यादि ठिकाणीं धूर पाहिला असतां स्मरण होऊन 'येथें अग्नि असला,' असा निश्चय होण्यास कारण जी चित्ताची वृत्ति ती. ३ आगम प्रमाण,– खरें बोलणाराच्या शब्दांपासून जी चित्ताची वृत्ति होते, ती.

**विपर्ययो मिथ्याज्ञानमतद्रूपप्रतिष्ठम् ॥ ८ ॥**

ज्या पदार्थाचें जें मूळचें रूप, तें त्या ठिकाणीं न दिसतां, त्या ठिकाणीं दुसऱ्याच

**सूत्र ५ टीपः**–१ ह्या परवैराग्याचें लक्षण पुढें (स० सू० १६ त) सांगणार आहेत.

वस्तूचें ज्ञान होणें; जसें, शिंप ही वस्तुतः रुपें नसून ती उजेडांत पडली असतां भ्रमानें ती रुपें आहे असा भास होतो. इत्यादिप्रकारच्या खोट्या ज्ञानास विपर्यय म्हणतात. तसाच, झाडाचा बुंधा पाहून 'हा पुरुष आहे, कां झाडाचा बुंधा आहे?' हा संशय, व डोळ्यांत बोट घातलें असतां दोन पदार्थ दिसणें, इत्यादि हीं सर्व विपर्ययवृत्तीचींच उदाहरणें आहेत. (विपर्ययज्ञानाचा कांहीं प्रमाणांनीं पुढें बाध होतो म्हणून हा प्रमाण नव्हे.)

**शब्दज्ञानानुपाती वस्तुशून्यो विकल्पः ॥ ९ ॥**

ज्यांचा शब्दांपासून तर मनाला बोध होतो परंतु तशा वस्तु कोठें असत नाहींत; अशा वेळीं जी मनाची वृत्ति, तिला विकल्प म्हणतात. उदाहरणें,–सशाचें शिंग, पुरुषाचें चैतन्य, वंध्येचा पुत्र. या सर्व उदाहरणांतील वस्तु कोठें नसल्यामुळें ह्यांना प्रमाण म्हणतां येत नाहीं; व ह्यांचा प्रमाणानें बाध आला तरी ह्या शाब्दबोधांत राहतात म्हणून ह्या वृत्तीस विपर्ययही म्हणतां येत नाहीं.

**अभावप्रत्ययालम्बना वृत्तिर्निद्रा ॥ १० ॥**

जींत कोणत्याही पदार्थाचें भान होत नाहीं, अशी जी चित्ताची वृत्ति तिला निद्रा (गाढ झोंप) म्हणतात. जशा मोठ्या काळोखांत कांहीं वस्तु दिसत नाहींत, तसें गाढ झोंपेंत प्रथम कोणत्याही वस्तूचें ज्ञान नसतें खरें, परंतु पुढें प्राणी जागा झाल्यावर 'मी मोठ्या सुखानें निजलों होतों' असा अनुभव स्मरतो; यावरून निद्रा ही एक प्रकारची वृत्तिच आहे असें सिद्ध होतें.

**अनुभूतविषयाऽसंप्रमोषः स्मृतिः ॥ ११ ॥**

जेवढा विषय पूर्वी अनुभवलेला असेल तेवढ्याच विषयाची आठवण होणें, इतर विषयाची नाहीं; अशा चित्ताच्या वृत्तीस स्मृति (आठवण) म्हणतात. (स्मृति होण्यास प्रमाण, विपर्यय, विकल्प व निद्रा अशीं चार कारणें आहेत.)

**अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः ॥ १२ ॥**

अभ्यास व वैराग्य यांचें लक्षण सूत्रकार पुढें सांगणार आहेत. त्या अभ्यास व वैराग्यानें चित्ताच्या वृत्तींचा निरोध करावा; म्हणजे इतरविषयांकडे त्यांना जाऊं देऊं नये. तात्पर्य, चित्ताच्या वृत्ती ज्या बाहेरील विषयांत गुंतलेल्या असतात त्या, त्यांवरून काढून चित्तांतच त्यांना अभ्यासानें वरचेवर रोंकून धरितां येतें; व विषयांमध्यें अनेक दुःखें आहेत अशा दोषदृष्टीनें विषयांचा वीट येऊन विषयांवर त्यांची प्रवृत्ति होत नाहीं.

**तत्र स्थितौ यत्नोऽभ्यासः ॥ १३ ॥**

राजस व तामस वृत्ती खेरीज करून केवळ शुद्धसात्विक अशी जी वृत्तिधारा (एका-

ग्रता ) तीस स्थिति ह्मणतात. त्या स्थितीविषयीं जी उत्सुकता, ती संपादन करण्याच्या इच्छेनें जें श्रद्धा, वीर्य ( उत्साह ) इत्यादि साधनांचें वारंवार अनुष्ठान त्यास अभ्यास ह्मणतात.

**स तु दीर्घकालनैरन्तर्यसत्कारासेवितो दृढभूमिः ॥ १४ ॥**

तो अभ्यास जर बहुत काळपर्यंत मोठ्या श्रद्धेनें एकसारखा चालविला तर चित्ताची वृत्ति दृढ होते.' ह्मणजे पुनः पुनः बाहेर निघूं पाहणाऱ्या ज्या राजस व तामस वृत्ती त्यांच्या संस्कारांनी पराभव न पावतां, स्थितिच आहे विषय जिचा अशी चित्ताची एकाग्रता होते.

**दृष्टानुश्रविकविषयवितृष्णस्य वशीकारसंज्ञा वैराग्यम् ॥ १५ ॥**

विषय दोन प्रकारचे आहेत; १ दृष्ट आणि २ आनुश्रविक. त्यांत स्त्रिया, खाणेंपिणें, ऐश्वर्य इत्यादि जे ह्या लोकींच साक्षात् दिसणारे व प्राप्त होणारे, ते दृष्ट विषय; व वेद, शास्त्रें, पुराणें इत्यादिकांतून ऐकिलेले जे स्वर्ग, विदेहत्व, प्रकृतिलीनत्व इत्यादि विषय, ते आनुश्रविक होत. या दोन्ही विषयांची आादीं उपेक्षा करणें, किंवा हे दोन्ही विषय परिणामीं वीट आणणारे आहेत असें पाहून त्यांच्या स्वाधीन आपण न राहतां उलट त्यांनाच आपल्या स्वाधीन ठेवणें, याला वशीकारसंज्ञा वैराग्य ह्मणतात.

**तत्परं पुरुषख्यातेर्गुणवैतृष्ण्यम् ॥ १६ ॥**

वैराग्य दोन प्रकारचें: एक विषयांविषयी व दुसरें गुणांविषयीं. त्यांत विषयांविषयींचें वैराग्य पूर्वसूत्रांत सांगितलें; आतां गुणांविषयीं वैराग्य असें,—वारंवार साक्षात्कारानें, पुरुष हा शुद्ध, अनंत व अपरिणामी असा, व सत्व, रज व तम हे तीन गुण त्याहून विपरीत ह्मणजे अशुद्ध, नाश पावणारे व परिणामी असे आहेत; असें विवेचन केल्यामुळें जें गुणांविषयीं वैराग्य उत्पन्न होतें तें उत्कृष्ट वैराग्य आहे; कारण, तें निरोधसमाधीला अत्यंत उपयोगी पडणारें आहे.

**वितर्कविचारानन्दास्मितारूपानुगमात्संप्रज्ञातः ॥ १७ ॥**

समाधि दोन प्रकारचा; एक संप्रज्ञात व दुसरा असंप्रज्ञात. त्यांत असंप्रज्ञातसमाधीचें लक्षण सूत्रकार पुढें सांगणार आहेत. आतां संप्रज्ञातसमाधीचें स्वरूप असें,—भाव्यपदार्थावि-

---

सू० १५ टी०—१ वैराग्य चार प्रकारचें. त्यांत विषयांत इंद्रियांची प्रवृत्ति करविणारे जे काम, क्रोध इत्यादिक चित्तमळ, त्यांचा दाह करण्याकरितां जो प्रयत्न, तें यतमानसंज्ञा वैराग्य. पुढें चित्ताचा थोडासा मळ दग्ध झाल्यावर, 'हा इतका नष्ट झाला व आतां इतका नष्ट होण्याचा बाकी राहिला,' असा स्पष्टपणें दोहोंच्या भेदाचा निश्चय होणें, याला व्यतिरेकसंज्ञा वैराग्य ह्मणतात. इंद्रियें बाह्यविषयांच्या ठिकाणीं प्रवृत्त होण्यास असमर्थ झाल्यामुळें त्यांची केवळ औत्सुक्यमात्रानें मनाच्याच ठिकाणीं स्थिति होणें, याला एकेंद्रियसंज्ञा वैराग्य ह्मणतात. ह्या तीन वैराग्यांपासून चौथें सूत्रकारांनीं सांगितलेलें वशीकारसंज्ञा वैराग्य सिद्ध होतें.

षयीं संशय किंवा खोटें ज्ञान वगैरे कांहीं नसून त्याचें स्वरूप जेणेंकरून उत्तमप्रकारें समजतें, त्यास संप्रज्ञातसमाधि असें ह्मणतात. संप्रज्ञातसमाधींत चित्त अगदीं वृत्तिरहित होत नसून ज्याचें ध्यान करावयाचें त्या पदार्थाविषयीं वृत्ति तशीच कायम राहत असल्यामुळें वृत्तीचें बीज कायम असतें, ह्मणून त्यास सबीज समाधी ह्मणतात. समाधि ह्मणजे ही एक प्रकारची भावना आहे. संप्रज्ञातसमाधीचे चार भेद आहेत; ते असे,– १ सवितर्क, २ सविचार, ३ सानंद आणि ४ सास्मित. ज्या पदार्थाचें चिंतन करावयाचें त्या-वांचून इतर पदार्थ चित्तापुढें न येऊं देतां तोच पदार्थ चित्तापुढें पुनः पुनः ठेवणें, यास भावना ह्मणतात; व ज्या पदार्थाचें चिंतन करावयाचें त्यास भाव्य असें ह्मणतात. भाव्य दोन प्रकारचें; ईश्वर व तत्त्वें. तीं तत्त्वें दोन प्रकारचीं; जड व अजड ह्मणजे चेतन. जड तत्त्वें चोवीस आहेत आणि अजड तत्त्व पुरुष, ते अनंत आहेत. पंच महाभूतें व इंद्रियें हा स्थूल विषय ध्यानास आश्रय ह्मणून घेऊन यांत पूर्वीचा कोण, व मागून उत्पन्न झालेला कोण, आणि शब्दाचा अर्थाशीं काय संबंध, या प्रकारचा विचार जेव्हां चालतो तेव्हां त्यास सवितर्क समाधि ह्मणतात. आणि याच पदार्थाविषयीं पूर्वीचा कोण व मागाहूनचा कोण वगैरे शब्दांचा उल्लेख न करितां जेव्हां भावना चालते, तेव्हां त्यास निर्वितर्क समाधि ह्मणतात. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हीं पांच तन्मात्रें होत. हीं व अंतःकरण अशा सूक्ष्मवि-षयांस ध्यानास आश्रय करून त्यांची देश, काल व धर्म ह्या संबंधानें जेव्हां भावना चालते तेव्हां त्यास सविचार समाधि ह्मणतात. व याच सूक्ष्मपदार्थाविषयीं जेव्हां देश, काल व धर्म यांचा कांहीं उल्लेख न करितां केवल धर्मीविषयींच भावना चालते, तेव्हां त्यास निर्वि-चार समाधि ह्मणतात. ज्या वेळेस रजोगुण व तमोगुणाच्या यत्किंचित् लेशानें युक्त झालेल्या अशा बुद्धिसत्त्वाची भावना चालते तेव्हां चितिशक्तीला गौणता असल्यामुळें व सुख उत्पन्न करणारा जो सत्वगुण, त्याचा विशेष उत्कर्ष झाल्यामुळें हा सानंद समाधि होतो. त्यानंतर रजाचा व तमाचा ज्यांत यत्किंचितूही लेश नाहीं अशा शुद्धसत्त्वगुणास ध्यानास आश्रय करून जी भावना चालते, तिच्यांत भाव्य जो सत्त्वगुण तो दुर्बल होऊन चितिशक्तीचें प्रा-बल्य आल्यामुळें त्याला त्या वेळेस केवळ सत्तेचें मात्र भान होत असतें ह्मणून त्याला सास्मित समाधि असें ह्मणतात. कोणी अहंकार व अस्मिता हीं दोन्ही एकच मानितात; परंतु ज्या ठिकाणीं अंतःकरण ' मी ' अशा भावानें विषयांस समजतें ह्मणजे अंतःकरणाची विषयत-दाकारता झाली असते त्यास अहंकार ह्मणतात; आणि जेथें बाह्यविषयांकडे न जातां उलट्-दिशेनें चित्त आंत फिरून प्रकृतींत लय पावलें असतां जें त्यास केवळ अस्तित्वाचें भान होतें त्यास अस्मिता ह्मणतात; असा त्यांमध्यें अगदीं भेद असल्यामुळें अहंकार व अस्मिता एक मानणें बरोबर नाहीं.

**विरामप्रत्ययाभ्यासपूर्वः संस्कारशेषोऽन्यः ॥ १८ ॥**

सर्ववृत्तींचा प्रकृतींत लय होऊन ज्यांत संस्कार मात्र बाकी राहिला असतो असा जो चित्ताचा निरोध त्यास असंप्रज्ञात समाधि ह्मणतात. असंप्रज्ञातास मुख्य साधन ह्मटलें ह्मणजे पूर्वी सांगितलेल्या परवैराग्याचा सतत अभ्यास हें होय. कारण, परवैराग्यांत कांहीं चिंतनीय वस्तु नसते; व या असंप्रज्ञातसमाधींतही कांहीं भाव्य वस्तु नसते. वैराग्याभ्यासानें चित्त निर्विषय होऊन वृत्तिरूप कार्यें करीत नसल्यामुळें मृताप्रमाणें होतें; व संस्कारनांवाचें जें संसाराचें बीज तें यांत अगदीं नाश पावतें ह्मणून यास निर्बीज समाधि ह्मणतात. तो असंप्रज्ञात योग दोन प्रकारचा; एक उपायप्रत्यय व दुसरा भवप्रत्यय. त्यांतील पहिला असंप्रज्ञात समाधि हा ह्या लोकीं व ह्याच जन्मांत साध्य होणारा ह्मणून त्याविषयींच मुमुक्षूंनीं प्रयत्न करावा.

**भवप्रत्ययो विदेहप्रकृतिलयानाम् ॥ १९ ॥**

दुसरा असंप्रज्ञात समाधि ह्मणून जो सांगितला तो विदेह देव व प्रकृतींत लय पावलेले जे योगी त्यांना अन्यसाधनांवांचूनच दुसरा जन्म प्राप्त झाल्याबरोबर सिद्ध होतो.

**श्रद्धावीर्यस्मृतिसमाधिप्रज्ञापूर्वक इतरेषाम् ॥ २० ॥**

पूर्वी जो उपायप्रत्यय असंप्रज्ञात समाधि ह्मणून ह्मटला; त्याचें लक्षण व त्याचे अधिकारी सांगतात,--विदेह व प्रकृतिलय या दोघांहून इतर योग्यांना समाधीच्या पूर्वी श्रद्धा, वीर्य, स्मृति, समाधि व प्रज्ञा हीं साधनें अवश्य असावीं लागतात. श्रद्धा ह्मणजे योगाविषयीं पूर्ण विश्वास; वीर्य ह्मणजे झटण्याविषयीं उमेद; स्मृति ह्मणजे अनुभवलेला विषय चित्तांतून न जाऊं देणें; समाधि ह्मणजे चित्ताची एकाग्रता; व प्रज्ञा ह्मणजे जें जाणावयाचें त्याचा पूर्ण विचार. त्यांत ज्याला योगाविषयीं श्रद्धा असते त्याला योग्याचें साधन करण्याविषयीं उमेद येते. ज्याला उमेद असते त्याला पाठीमागील अनुभवलेल्या विषयांचें स्मरण होतें. त्या स्मरणापासून चित्त एकाग्र होतें. चित्त एकाग्र झालें असतां ज्याचें ध्यान करावयाचें त्याला योगी चांगल्या रीतीनें जाणतो. याप्रमाणें हे सर्व संप्रज्ञातसमाधीचे उपाय सांगितले. या संप्रज्ञातसमाधीच्या अभ्यासापासून व परवैराग्यापासून असंप्रज्ञात समाधि सिद्ध होतो.

**तीव्रसंवेगानामासन्नः ॥ २१ ॥**

पूर्वी जे श्रद्धा इत्यादि उपाय सांगितले, ते उपाय करण्यांत जो अतिशय झटत आहे; व ज्याला अतिशय कडकडीत वैराग्य प्राप्त झालें आहे; त्याला समाधीचें फळ फारच लवकर प्राप्त होतें.

**मृदुमध्याधिमात्रत्वात्ततोऽपि विशेषः ॥ २२ ॥**

उपाय तीन प्रकारचे आहेत; १ मृदु, २ मध्य व ३ अधिमात्र ( तीव्र ). त्यांत मृदु ह्मणजे थोडा, मध्य ह्मणजे त्यापेक्षां अधिक; आणि अधिमात्र ( तीव्र ) ह्मणजे त्यापेक्षां फार अधिक. ह्या तीन उपायांमुळें ते योगीही प्रत्येक १ मृदूपाय, २ मध्योपाय व तीव्रोपाय असे तीन प्रकारचे आहेत. त्यांत पुनः प्रत्येकाच्या संवेगाचे ह्मणजे वैराग्याचे मृदु, मध्य व तीव्र असे तीन प्रकार असल्यामुळें मृदूपाय योगी, १ मृदुसंवेग २ मध्यसंवेग व ३ तीव्रसंवेग असे तीन प्रकारचे; मध्योपाय योगी, १ मृदुसंवेग, २ मध्यसंवेग व ३ तीव्रसंवेग असे तीन प्रकारचे; आणि तीव्रोपाय योगी, १ मृदुसंवेग, २ मध्यसंवेग व ३ तीव्रसंवेग असे तीन प्रकारचे. याप्रमाणें नऊ प्रकारचे योगी झाले. त्यांत शेवटचा जो नववा तीव्रोपाय तीव्रसंवेग ( ह्मणजे सर्वांपेक्षां उपायांविषयीं फार अधिक झटत असून वैराग्यही ज्याचें सर्वांपेक्षां फार कडकडीत आहे अशा ) योग्यास समाधीची प्राप्ति सर्वांपेक्षां फारच जलद होते. हे सर्व भेद सांगण्याचें तात्पर्य एवढेंच आहे कीं, समाधि लवकर सिद्ध होण्याकरितां तीव्र उपाय योजण्याविषयीं व तीव्र ( कडकडीत ) वैराग्य प्राप्त होण्याविषयीं मोठा प्रयत्न केला पाहिजे.

**ईश्वरप्रणिधानाद्वा ॥ २३ ॥**

ईश्वराचें लक्षण पुढील सूत्रांत सांगणार आहेत. त्या परमेश्वराची दृढ भक्ति केली असतां समाधि फार लवकर सिद्ध होतो. तो भक्तिप्रकार असा कीं, 'सर्व काम्यकर्मांचा त्याग करून नित्य व नैमित्तिक कर्में निष्कामबुद्धीनें करून त्यांचें सर्व फल ईश्वरास अर्पण करावें; अथवा कर्म करितांना त्यांच्या फलांची अभिसंधि ह्मणजे इच्छा बिलकुल धरूं नये.'

**क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेष ईश्वरः ॥ २४ ॥**

अविद्या इत्यादि क्लेश, कुशल व अकुशल हीं कर्में, कर्मांचीं फलें जीं जाति, आयुष्य आणि भोग, व चित्तांत असणाऱ्या वासना; ह्यांचा तिन्ही कालांतही ज्याला कधीं बिलकुल संबंध होत नाहीं असा सर्व अन्यपुरुषांपेक्षां परमसमर्थ ह्मणजे केवळ इच्छामात्रेंकरूनच सर्व जगत् उद्धरण्याविषयीं समर्थ असा ईश्वर आहे.

**तत्र निरतिशयं सर्वज्ञबीजम् ॥ २५ ॥**

जैशी परमाणूच्या ठिकाणीं अल्पत्वाची व आकाशाच्या ठिकाणीं परममहत्त्वाची परममर्यादा झाली असते; तशी, चित्तधर्म जे ज्ञानादिक हे कोठें थोडे, कोठें अधिक, असे कमीजास्तपणानें दिसतात; तेव्हां यांची सुद्धां कोठें परममर्यादा असलीच पाहिजे. त्या ज्ञानादिकांची जेथें पराकाष्ठा झाली असते तो ईश्वर होय.

**स पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात् ॥ २६ ॥**

सृष्टीच्या आरंभीं उत्पन्न झालेले जे ब्रह्मादिक पुरुष, त्यांचाही तो ज्ञानोपदेश कर-

णारा व धनी आहे. कारण, ब्रह्मादिकांचें आयुष्य फार तर पुराणादिकांवरून दोन परार्ध इत्यादि आहे असें समजतें आणि त्याच्या ( ईश्वराच्या ) अवस्थेचें मान कालानें मोजलें आहे असें कोणत्याही प्रमाणानें समजत नाहीं; यावरून त्यांच्यापेक्षां तो फार प्राचीन आहे.

**तस्य वाचकः प्रणवः ॥ २७ ॥**

त्या ईश्वराचा वाचक ह्मणजे नांव प्रणव (ॐकार) आहे; व ईश्वर हा त्याचा (प्रणवाचा) वाच्य ( अर्थ ) आहे. हा वाच्यवाचकसंबंध नित्य आहे, ह्मणजे आहे तोच लोकामध्यें फक्त संकेतानें दाखविला जातो: नवीन कोणीं उत्पन्न केला असें नाहीं.

**सू० २७ टीपः**—१ अथर्ववेदांतील मांडूक्योपनिषदांत असें सांगितलें आहे कीं,—'ॐ' हें अक्षर जें सर्वमय आहे त्याचें उपव्याख्यान करितोः—हा जो सर्व प्रपंच आहे, तो ॐकाररूप आहे. भूत, वर्तमान व भविष्य हें सर्व ॐकाररूप आहे; आणि जें कांहीं ह्या त्रिकालांवांचून आहे तें सुद्धां ॐकाररूप आहे ॥ १ ॥ हें सर्व ब्रह्मरूप आहे, हा आत्मा पण ब्रह्मरूप आहे. या आत्म्याचे चार पाद आहेत ॥ २ ॥ जागृतस्थान, बाह्य पदार्थांचें जाणणें, सात अंगें, एकोणवीस मुखें, स्थूलभोगाचा भोक्ता आणि वैश्वानर, हा प्रथम पाद आहे. मूर्धा, नेत्र, प्राण, धड, मूत्रस्थान, पाय व मुख हीं सात अंगें, आणि पांच प्राण, पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें व चार अंतःकरणभेद हीं एकोणीस मुखें होत. हीं एकोणवीस, भोगांला साधन असल्यामुळें ह्यांस मुखें ह्मणतात. ह्या मुखांनींच स्थूलशब्दादिकांचा बाह्यवृत्तीनें जागृदवस्थेंत भोग होतो ॥३॥ स्वप्नावस्था, अंतःप्रज्ञ (तैजस अंतःकरणाची वृत्ति बाहेर न जातां आंतले आंतच ज्ञानाकारपरिणामास पावते; आणि विश्वाची बाहेर जाते, ह्मणून तैजस अंतःकरणास अंतःप्रज्ञ व विश्वास बहिष्प्रज्ञ असें ह्मणतात ). सात अंगवाला ( हीं अंगें मनोमय आहेत ), एकोणवीस मुखवाला ( हीं मुखेंही मनोमयच आहेत ), सूक्ष्म ( वासनामय ) भोगांचा भोक्ता, आणि तैजस, हा आत्म्याचा द्वितीय पाद आहे ॥ ४ ॥ ज्या वेळेस निद्रावश होऊन कांहींएक इच्छित नाहीं, व कांहींएक स्वप्न पाहत नाहीं, त्या वेळेस त्याला सुषुप्त (सुषुप्त्यवस्थेस प्राप्त झालेला) असें ह्मणतात. सुषुप्त्यवस्था, एकीभूत, प्रज्ञानघन (जागृदवस्थेचें व स्वप्नावस्थेचें ज्ञान, हें घन ह्मणजे ज्यांत एक अविद्यारूप होऊन गेलें असतें तें), आनंदमय, आनंदभोक्ता, चेतोमुख आणि प्राज्ञ, हा आत्म्याचा तृतीय पाद आहे ॥ ५ ॥ हाच सर्वेश्वर, हाच सर्वज्ञ, हाच सर्वांचा अंतर्यामी, हाच सर्वांचें उत्पत्तिस्थान, व हाच सर्वभूतांचा स्वामी आहे ॥ ६ ॥ जो अंतःप्रज्ञ, बहिष्प्रज्ञ, उभयतःप्रज्ञ, प्रज्ञानघन, प्रज्ञ व अप्रज्ञही नाहीं; जो अदृष्ट, अव्यवहार्य, अग्राह्य, अलक्षण, अचिंत्य, अव्यपदेश्य, ऐकात्म्य, प्रत्ययसार, प्रपंचोपशम, शांत, शिव व अद्वैत असा आहे. हा आत्म्याचा चतुर्थ पाद मानितात. तोच आत्मा व तोच जाणण्यास योग्य आहे ॥ ७ ॥ तो हा आत्मा ॐकार अक्षररूप

टीपः—आहे. प्रणवाच्या ( ॐकाराच्या ) मात्रा आत्म्याचे पाद आहेत, व आत्म्याचे पाद प्रणवाच्या मात्रा आहेत. अकार, उकार व मकार हे प्रणवाच्या तीन मात्रा आहेत ॥ ८ ॥ जागरितस्थान वैश्वानर हा अकार आहे. जसा अकार ॐकाराची प्रथम मात्रा आहे, तसा वैश्वानर हा आत्म्याचा प्रथम पाद आहे. ह्या दोघांचें जो अभेदानें चिंतन करितो, त्याच्या सर्व कामना पूर्ण होतात, आणि तो सर्वांत मुख्य होतो ॥ ९ ॥ स्वप्नस्थान तैजस हा उकार आहे. हा उकार प्रणवाची द्वितीय मात्रा आहे. उत्कर्षामुळें ( अकारापेक्षां मकाराच्या अगदीं समीप राहतो ह्मणून ) व उभयपणामुळें ( अकार व मकार ह्या दोहोंच्या मध्यें राहतो ह्मणून ) तो आपल्या उपासकाच्या ( तैजस व उकार ह्या दोहोंचें अभेदानें चिंतन करणाराच्या ) ज्ञानाचा उत्कर्ष करितो, त्यामुळें त्या उपासकाची समदृष्टि होते; व पुनः त्याच्या कुळांत ब्रह्मज्ञानरहित असा कोणी होत नाहीं ॥ १०॥ सुषुप्तस्थान प्राज्ञ मकार आहे. मकार हा ॐकाराची तृतीय मात्रा आहे. हा मकार, अकार व उकाराचें उत्पत्ति व लयस्थान आहे. मकाराच्या बरोबर प्राज्ञाचें अभेदानें चिंतन करणारा ईश्वराशीं ऐक्य पावतो ॥ ११ ॥ अमात्र हा ॐकाराची चौथी मात्रा आहे. तो अव्यवहार्य, प्रपंचोपशम, शिव व अद्वैत असा आहे. ह्याप्रमाणें हा ॐकार आत्म्याचें रूप आहे. हा अमात्र व आत्मा यांचा अभेद चिंतन करणारा ब्रह्मरूप होतो ॥ १२ ॥ इति माण्डूक्योपनिषद्भाषांतरं समाप्तम् ॥

**ओम्**—**अ**, **उ**, **म्** हीं तीन अक्षरें मिळून हा ॐकार झाला आहे.

**अ**—विराट्, अग्नि, विश्व. **उ**—हिरण्यगर्भ, वायु, तेज. **म्**—ईश्वर, आदित्य, प्राज्ञ.

**अ**
- **विराट्**—तो परमात्मा नानाप्रकारच्या जगतांस करणारा आहे.
- **अग्नि**—तो परमात्मा ज्ञानस्वरूपी आणि सर्वव्यापक आहे.
- **विश्व**—ज्यामध्यें सर्व जगत् प्रवेश करून राहिलें आहे आणि जो सर्वांत श्रेष्ठ आहे.

**उ**
- **हिरण्यगर्भः**—हिरण्यगर्भ जो परमात्मा सूर्यादिलोकांस प्रकाश करणारा आहे ह्मणजे सूर्यादिलोक जे प्रकाश करणारे आहेत त्यांस तो परमात्मा उत्पन्न करणारा आहे.
- **वायुः**—तो परमात्मा बलवान् आणि सर्व जगताचें धारण करणारा आहे.
- **तैजसः**—तो परमात्मा प्रकाशस्वरूप आणि सर्व जगतास प्रकाशक आहे.

**म्**
- **ईश्वरः**—तो परमात्मा सर्व जगतांचा उत्पन्न करणारा, सर्वशक्तिमान्, धनी आणि न्यायकारी आहे.
- **आदित्यः**—तो परमात्मा नाशरहित आहे.
- **प्राज्ञः**—तो परमात्मा ज्ञानस्वरूपी सर्वज्ञ आहे.

**तज्जपस्तदर्थभावनम् ॥ २८ ॥**

'चित्त एकाग्र झालें असतां समाधि सिद्ध होतो' असें ( स० सू० २० त ) सांगितलें; त्यांत प्रणवाचा जप करून व ईश्वराला पुनःपुनः चित्तामध्यें आणून त्याचें चिंतन केलें असतां चित्त एकाग्र होतें.

**ततः प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यन्तरायाभावश्च ॥ २९ ॥**

त्या प्रणवाचा जप व त्याचा अर्थ जो ईश्वर त्याची भावना ( चिंतन ) केल्यानें परमात्म्यासंबंधी ज्ञान प्राप्त होऊन पुढें सांगावयाचीं जीं विघ्नें तीं सर्व दूर होतात.

**व्याधिस्त्यानसंशयप्रमादालस्याविरतिभ्रान्तिदर्शनालब्धभूमिकत्वानवस्थितत्वानि चित्तविक्षेपास्तेऽन्तरायाः ॥ ३० ॥**

योगाभ्यास करितांना कोणतीं विघ्नें येतात तीं सांगतात,—१ व्याधि ह्मणजे धातु बिघडल्यापासून उत्पन्न होणारे ज्वर इत्यादि रोग. २ स्त्यान ह्मणजे योगाविषयीं चित्त उत्सुक असलें तरी देश, काल इत्यादिक विरुद्ध असल्यामुळें करण्याची गैरसोय. ३ संशय ह्मणजे 'मला योग सिद्ध होईल किंवा नाहीं' अशा प्रकारचा. ४ प्रमाद ह्मणजे यम, नियम इत्यादि योगांगांचें अनुष्ठान न करणें. ५ आलस्य ( आळस ) ह्मणजे शरीर जड झाल्यामुळें योगाविषयीं चित्ताची प्रवृत्ति न होणें. ६ अविरति ह्मणजे विषयसुखांचा उपभोग घेण्याविषयीं अतिशय उत्कट इच्छा. ७ भ्रान्तिदर्शन ह्मणजे वस्तु एकप्रकारची असून तिच्याविषयीं वेगळ्याच प्रकारानें ज्ञान होणें, जसें शिंपेवर रुप्याचा भास होणें. ८ अलब्धभूमिकत्व ह्मणजे कोणत्या तरी कारणानें समाधीच्या अवस्थांची प्राप्ति न होणें. ९ अनवस्थितत्व ह्मणजे समाधि लागला असतांही त्या वेळेस चित्ताची स्थिरता न राहिल्यामुळें ती न टिकणें. हे नऊ चित्ताला विक्षेप करणारे ह्मणजे समाधीला अडथळे आणणारे आहेत; ह्मणून यांना अंतराय ह्मणजे विघ्नें असें ह्मणतात.

**दुःखदौर्मनस्याङ्गमेजयत्वश्वासप्रश्वासा विक्षेपसहभुवः ॥ ३१ ॥**

दुःखें तीन प्रकारचीं; आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक. त्यांत आध्यात्मिक दुःखें दोन प्रकारचीं; शारीर आणि मानस. त्यांत व्याधींपासून उत्पन्न होणारें तें शारीर दुःख; व काम, क्रोध इत्यादिकांपासून उत्पन्न होणारें तें मानस. व्याघ्र इत्यादि प्राण्यांपासून होणारें तें आधिभौतिक; आणि ग्रहपीडा वगैरेनें आलेलें आधिदैविक. असें तीन प्रकारचें १ दुःख. २ दौर्मनस्य ह्मणजे इष्ट विषय प्राप्त न झाल्यामुळें चित्ताचा चंचलपणा होणें. ३ अंगमेजयत्व ह्मणजे शरीरास कंप सुटणें. ४ श्वास ह्मणजे बाहेरील वायु आंत घेण्याची इच्छा नसतांना त्याचा आंत प्रवेश होणें. ५ प्रश्वास ह्मणजे फुप्फुसांतील वायु बाहेर सोडण्याची इच्छा नसतांना त्याचें बाहेर जाणें. हीं आणिक विघ्नें, पूर्वी सांगितले जे विक्षेप यांच्याबरोबर उत्पन्न होतात.

**तत्प्रतिषेधार्थमेकतत्त्वाभ्यासः ॥ ३२ ॥**

तीं पूर्वीं सांगितलेलीं विघ्नें व विक्षेप यांच्या निवारणाकरितां कोणत्या तरी एका तत्त्वाविषयीं अभ्यास करावा ह्मणजे चित्ताची एकाग्रता करितांना जे अडथळे येतात ते दूर करण्याकरितां चित्तापुढें आपणांस वाटेल ती वस्तु पुनःपुनः आणावी.

**मैत्रीकरुणामुदितोपेक्षाणां सुखदुःखपुण्यापुण्यविषयाणां भावनातश्चित्तप्रसादनम् ॥ ३३ ॥**

जो सुखी असेल त्याच्याशीं मैत्री ह्मणजे स्नेह करावा; जो दुःखी असेल त्याला पाहून त्यावर दया करावी; जो पुण्यवान् असेल त्याला पाहून मनास आनंद व्हावा; आणि जो पापी असेल त्याची उपेक्षा करणें ह्मणजे त्याविषयीं उदासीन असणें. अशा प्रकारें नेहमीं चित्तवृत्ति ठेविली असतां चित्त प्रसन्न होतें व समाधि लवकर सिद्ध होतो. याला मैत्र्यादिभावना ह्मणतात.

**प्रच्छर्दनविधारणाभ्यां वा प्राणस्य ॥ ३४ ॥**

प्रच्छर्दन ह्मणजे दोन्ही नाकपुड्यांवाटें प्राणवायु बाहेर सोडणें (याला रेचक ह्मणतात;) व विधारण ह्मणजे एका नाकपुडीनें बाहेरील वायूचें आकर्षण करून त्याची गति कांहीं नियमित काळपर्यंत थांबविणें ( याला कुंभक ह्मणतात. ) हे दोन उपाय आपल्या शक्तीप्रमाणें नेहमीं करीत गेले असतां चित्ताची चंचलता जाऊन तें एका लक्ष्यावर स्थिर राहील. प्राणायामाचा विचार पुढें साधनपादांत प्राणायामप्रकरणीं पुष्कळ विस्तरानें केला आहे तो पहावा.

**विषयवती वा प्रवृत्तिरुत्पन्ना मनसः स्थितिनिबन्धिनी ॥ ३५ ॥**

नाकाच्या शेंड्यावर चित्तनिरोध केल्यानें दिव्य सुगंध येऊं लागतो; जिभेच्या शेंड्यावर चित्तसंयम केल्यानें दिव्यरसाचें ज्ञान होतें; तालूच्या ठिकाणीं चित्त ठेविलें असतां रूपाचें ज्ञान होतें; जिभेच्या मध्यभागीं चित्त ठेविलें असतां स्पर्शाचें ज्ञान होतें; आणि जिभेच्या मूळाकडे चित्त लाविलें असतां शब्दाचें ज्ञान होतें. ह्याप्रमाणें त्या त्या इंद्रियाच्या द्वारानें त्या त्या दिव्यविषयाचें ज्ञान होऊं लागलें असतां योगावर लवकर विश्वास उत्पन्न होऊन चित्त एकाग्र होतें.

**विशोका वा ज्योतिष्मती ॥ ३६ ॥**

अथवा, पोट आणि ऊर यांमध्यें खालीं तोंड करून असणारें असें आठ पाकळ्यांचें कमल आहे, तें रेचकप्राणायामानें वरमुख करवून त्या हृदयकमलावर चित्ताचें धारण करणारास जो बुद्धीचा साक्षात्कार होतो, त्यानें सुद्धां चित्त स्थिर होऊन एकाग्र होतें.

**वीतरागविषयं वा चित्तम् ॥ ३७ ॥**

अथवा विषयांविषयीं निरिच्छ असें जें सनकादिकांचें चित्त; त्या ठिकाणीं चित्ताचें धारण केल्यानें तद्रूप झालेलें चित्त विरक्त होऊन समाधीस योग्य होतें

**स्वप्ननिद्राज्ञानालम्बनं वा ॥ ३८ ॥**

अथवा, ज्या वेळीं बाह्य इंद्रियांचे सर्व व्यापार बंद होऊन केवल मनानेंच आत्म्याला भोग प्राप्त होतो त्यास स्वप्न ह्मणतात. निद्रेचें लक्षण पूर्वी सांगितलें आहे. या दोहोंपैकीं एकाच्या ज्ञानाचा आश्रय चित्तास असतां तें स्थिर होतें.

**यथाभिमतध्यानाद्वा ॥ ३९ ॥**

किंवा आपणास जें प्रिय असेल त्या विष्णु इत्यादि वस्तूंविषयीं अथवा शरीरांत नाडीचक्र इत्यादि ठिकाणीं ध्यान केलें असतां चित्त स्थिर होतें.

**परमाणुपरममहत्त्वान्तोऽस्य वशीकारः ॥ ४० ॥**

अति लहान वस्तूच्या ठिकाणीं चित्ताची स्थिरता करणाऱ्या योग्याची परमाणूपर्यंत चित्ताची स्थिरता होते. व अति मोठ्या वस्तूवर चित्त स्थिर करणाऱ्या योग्याचें चित्त, मोठें आहे परिमाण ज्याचें अशा आकाशादिकांपर्यंत स्थिर होतें. याप्रमाणें स्थूल व सूक्ष्मरूप जे दोन पक्ष त्या दोहोंप्रत संचार करणाऱ्या चित्ताचा कोणत्याही प्रकारें प्रतिबंध न होणें यास परवशीकार ह्मणतात.

**क्षीणवृत्तेरभिजातस्येव मणेर्ग्रहीतृग्रहणग्राह्येषु तत्स्थतदञ्जनता समापत्तिः ॥ ४१ ॥**

या सूत्रानें जी समापत्ति ह्मणून सांगणार आहेत, ती सुद्धां एक प्रकारची सात्विक अंतःकरणाची वृत्तिच आहे; ह्मणून त्या समापत्तीवांचून इतर सर्व वृत्ती ज्याच्या क्षीण झाल्या आहेत असें योग्याचें चित्त, जसा शुद्धस्फटिकमणि ज्या रंगाच्या पदार्थांनीं युक्त करावा ह्मणजे तशाच रंगाचा दिसूं लागतो; त्याप्रमाणें समाधींत ग्रहीता ह्मणजे ग्रहण करणारा अर्थात् आत्मा, ग्रहण करण्याचें साधन अर्थात् इंद्रियें आणि ग्राह्य ह्मणजे ग्रहण करण्याला योग्य वस्तु जी स्थूल भूतें, ह्यांपैकीं कोणा एका ठिकाणीं धारण केलें असतां तें एकाग्र होऊन तदाकार होतें; अशी जी चित्ताची तदाकार स्थिति, तिला समापत्ति असें ह्मणतात.

**तत्र शब्दार्थज्ञानविकल्पैः संकीर्णा सवितर्का समापत्तिः ॥ ४२ ॥**

त्या समापत्तीचे मुख्य दोन भेद आहेत; एक सवितर्क ( सविकल्प ) व दुसरा निर्वितर्क ( निर्विकल्प ). त्यांत, कर्णेंद्रियानें ज्याचें ज्ञान होतें व व्याकरणशास्त्रांत ज्याला स्फोट असें ह्मणतात, तो शब्द, अर्थ ह्मणजे जाति इत्यादिक, ज्ञान ह्मणजे सत्वगुण जींत मुख्य असतो अशी बुद्धि, अशा तिन्ही प्रकारांनीं ह्मणजे ' ही गाय भासते ' अशा शब्द, अर्थ व ज्ञान यांच्या ऐक्यभ्रांतीनें तीनही विषय समाधींत येऊं लागले तर त्या विकल्पमिश्रित समापत्तीस सवितर्क समापत्ति असें ह्मणतात. यांत ' गाय ' हा शब्द, गाय ह्मणून जी मूर्तिमंत वस्तु ती गायशब्दाचा अर्थ, व गायीची जाति, गुण वगैरे जाणणें हें ज्ञान होय.

तात्पर्य, ज्या समापत्तीमध्यें शब्द व अर्थ या दोन्ही प्रकारांचें भान होतें ती सवितर्क समापत्ति होय. आतां निर्वितर्क समापत्ति सूत्रकार सांगतात,–

**स्मृतिपरिशुद्धौ स्वरूपशून्येवार्थमात्रनिर्भासा निर्वितर्का ॥ ४३ ॥**

'अमुकास अमुक ह्मणावयाचें,' अशा शब्दसंकेताचें वगैरे स्मरण अगदीं नाहींसें होऊन केवळ शब्दस्वरूपमात्रानेंच मनावर ठसलेला जो अर्थ तेवढ्या अर्थाविषयीं मात्र चित्त तत्पर होऊन शब्दसंकेत वगैरे सोडून देतें; तेव्हां समाधींत शब्द व अर्थ यांविषयीं विकल्प ( शंका ) उत्पन्न होत नाहीं; ह्मणजे जींत शब्दस्वरूपाचें वगैरे भान न होतां केवळ अर्थाचें मात्र भान होतें; तीस निर्वितर्क समापत्ति ह्मणतात.

**एतयैव सविचारा निर्विचारा च सूक्ष्मविषया व्याख्यांता ॥ ४४ ॥**

सवितर्क व निर्वितर्क समापत्तीचें वर्णन करण्यांत सूक्ष्मविषयैक जी सविचार व निर्विचार समापत्ति इचाही निर्णय झाला. ह्मणजे सवितर्क व निर्वितर्क समापत्तींत चित्त स्थिर करण्याला विषय स्थूल असतात आणि सविचार व निर्विचार समापत्तींत विषय, स्थूल पंचभूतांचीं व इंद्रियांचीं सूक्ष्म कारणें जीं तन्मात्रापासून तें प्रकृतीपर्यंत हीं होत. त्यांत ज्या समापत्तीमध्यें देह, काल, धर्म इत्यादिकांनीं युक्त असे सूक्ष्म विषय असतात, ती सविचार समापत्ति; आणि ज्या समापत्तीमध्यें देश, काल, धर्म इत्यादिक नसून, केवळ धर्मीच्या ह्मणजे वस्तूच्या रूपानेंच तन्मात्र व इंद्रियें ह्या सूक्ष्मविषयांचें भान होतें तिला निर्विचार समापत्ति ह्मणतात.

**सूक्ष्मविषयत्वं चालिङ्गपर्यवसानम् ॥ ४५ ॥**

सविचार व निर्विचार समापत्तींमध्यें जो सूक्ष्म विषय ह्मणून सांगितला, तें सूक्ष्मविषयत्व अलिंग ह्मणजे प्रधानापर्यंत आहे. तें असें,–पृथ्वीच्या परमाणूचा गंधतन्मात्र सूक्ष्म विषय, याप्रमाणें उदक, तेज व वायु यांच्या परमाणूंचे रस, रूप व स्पर्श हीं तन्मात्रें सूक्ष्म विषय, व आकाशाच्या अणूचा शब्दतन्मात्र सूक्ष्म विषय होय. या पंचतन्मात्रांचा अहंकार, त्याचा महत्तत्त्व व त्याची प्रकृति सूक्ष्म विषय आहे; प्रकृतीपेक्षां सूक्ष्म विषय कांहीं नाहीं.

**ता एव सबीजः समाधिः ॥ ४६ ॥**

ह्या पूर्वी सांगितलेल्या चार प्रकारच्या समापत्तीच सबीज समाधि होय. त्यांत स्थूलविषयाच्या संबंधानें सवितर्क व निर्वितर्क आणि सूक्ष्मविषयाच्या संबंधानें सविचार व निर्विचार याप्रमाणें चार प्रकारचा सबीज समाधि होतो.

**निर्विचारवैशारद्येऽध्यात्मप्रसादः ॥ ४७ ॥**

ह्या पूर्वी सांगितलेल्या समापत्तींमध्यें निर्विचार समापत्ति सर्वांत श्रेष्ठ आहे; कारण, तिचा उत्कृष्ट अभ्यास केल्यानें निर्मळपणा अर्थात् चित्ताची एकाग्रता होऊन योग्याच्या बुद्धीस प्रसन्नता येते.

**ऋतंभरा तत्र प्रज्ञा ॥ ४८ ॥**

पूर्वी सांगितलेल्या सबीजसमाधींत समाधिस्थ झालेल्या चित्ताची जी प्रज्ञा ( बुद्धि ) तीस ' ऋतंभरा ' अशी संज्ञा आहे. तिला असें नांव पडण्याचें कारण असें कीं, ती प्रज्ञा सत्याचेंच नेहमीं ग्रहण करिते; व विपरीतज्ञानाचा तेथें कधीं लेशही नसतो. या प्रज्ञेपासून पुढें परवैराग्यद्वारानें निर्बीज समाधि प्राप्त होतो.

**श्रुतानुमानप्रज्ञाभ्यामन्यविषया विशेषार्थत्वात् ॥ ४९ ॥**

श्रुत ह्मणजे ऐकून होणारें ज्ञान अर्थात् आगमज्ञान, व अनुमानाचें लक्षण पूर्वी ( स० सू० ७ त ) सांगितलें. ह्या आगम व अनुमानापासून जें ज्ञान होतें तें सामान्य प्रकारचें असतें; कारण, जसें इंद्रियांनीं विशेष प्रकारचें ज्ञान होतें तसें विशेष प्रकारचें ज्ञान प्राप्त करून देण्याचें सामर्थ्य आगम व अनुमान यांच्यामध्यें नाहीं. तर असें विशेष प्रकारचें ज्ञान समाधींत होणारी जी ऋतंभरानांवाची प्रज्ञा तिनें होतें; करितां ती समाधिप्रज्ञा श्रुत व अनुमान या दोहोंपासून होणाऱ्या ज्ञानांपेक्षां विलक्षण आहे. तसेंच सूक्ष्म, व्यवहित ( आड असणाऱ्या ) व दूरच्या वस्तूंचें जेथें लौकिक साधनानें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं, तें या समाधिप्रज्ञेनें होतें. ती समाधिप्रज्ञा योग्यास प्राप्त झाली असतां तीपासून नवीन नवीन संस्कार उत्पन्न होतात.

**तज्जः संस्कारोऽन्यसंस्कारप्रतिबन्धी ॥ ५० ॥**

निर्विचारसमाधिप्रज्ञेपासून उत्पन्न झालेला संस्कार, पुढें व्युत्थानकालीं उत्पन्न होणाऱ्या संस्काराचा प्रतिबंध करितो. व्युत्थानसंस्काराचा नाश झाल्यामुळें त्यापासून उत्पन्न होणारे अनुभव होत नाहींत. अनुभवाच्या अभावीं समाधि सिद्ध होतो. नंतर समाधीपासून प्रज्ञा, तीपासून संस्कार, त्या नवीन संस्कारापासून पुनः प्रज्ञा व तीपासून पुनः संस्कार; याप्रमाणें पुनःपुनः संस्कारांची वृद्धि होऊन सर्वक्लेशांचा नाश होतो. याकरितां निर्विचारसमाधीचा निरंतर अभ्यास करावा.

**तस्याऽपि निरोधे सर्वनिरोधान्निर्बीजः समाधिः ॥ ५१ ॥**

त्या संप्रज्ञातसमाधिप्रज्ञेच्या संस्कारांचाही निरोध ( प्रतिबंध ) झाल्यानें चित्ताच्या सर्व वृत्तींचा आपापल्या कारणांमध्यें लय होऊन निर्बीज ह्मणजे असंप्रज्ञात समाधि सिद्ध होतो. असंप्रज्ञात समाधि साधला असतां आत्मा केवळ आपल्या स्वरूपाचे ठिकाणीं राहतो; ह्मणून पुरुष मुक्त झाला असें ह्मणतात.

**योगस्योद्देशनिर्देशौ तदर्थं वृत्तिलक्षणम् ॥**
**योगोपायाः प्रभेदाश्च पादेऽस्मिन्नुपवर्णिताः ॥ १ ॥**

**इति श्रीपातञ्जलयोगशास्त्राभिप्राये समाधिपादः समाप्तः ॥ १ ॥**

ॐतत्सत्परमात्मने नमः ।

# पातञ्जलयोगशास्त्राचा अभिप्राय.

## साधनपादः ॥ २ ॥

प्रथम पादांत योगारूढचित्त ह्मणजे ज्यास योग पूर्ण (पुरा) सिद्ध झाली अशा उत्तम अधिकाऱ्यास क्रियायोग इत्यादि संपूर्ण अंगांची अपेक्षा न बाळगतां केवल अभ्यास व वैराग्य या दोन साधनांनीच सिद्ध होणारा असा योग ह्मणजे चित्तवृत्तिनिरोध सांगितला. परंतु ज्याचें चित्त वारंवार विक्षिप्त (चंचल) होतें, अशा अधिकाऱ्यासही योग कोणत्या उपायानें साधेल ते उपाय आतां सांगतात,—

**तपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि क्रियायोगः ॥ १ ॥**

ब्रह्मचर्य ह्मणजे कोणत्याही प्रकारें स्त्रीशीं संबंध न ठेवणें, गुरुसेवा ह्मणजे शरीरानें, वाणीनें व मनानें गुरूला संतुष्ट करणें, सत्य व गोड भाषण करणें, अथवा काष्ठ, पाषाण इत्यादिकांप्रमाणें मौन धारण करणें, आपापल्या आश्रमधर्माप्रमाणें वागणें, शीतोष्ण इत्यादि द्वंद्वें सहन करणें, नियमानें खाणेंपिणें ठेवणें वगैरे अशा प्रकारचें तप येथें जाणावें. याच प्रमाणें ज्याला सामर्थ्य असेल त्यानें कृच्छ्र, चांद्रायण इत्यादि धर्मशास्त्रांत सांगितलेलीं व्रतें करावीं; परंतु तीं, योगाविषयीं चित्ताची उत्सुकता जेणेंकरून कायम राहील अशाच बेतानें केलीं पाहिजेत; नाहींतर शरीरांतील धातु कमी जास्ती होऊन योगाचा विघात होईल. स्वाध्याय ह्मणजे पापाचा नाश करणाऱ्या प्रणव, गायत्री, अष्टाक्षर इत्यादिकांचा जप करणें, अथवा ब्रह्मसूत्र इत्यादि मोक्षशास्त्राचा अभ्यास करणें. ईश्वरप्रणिधान ह्मणजे सर्व लौकिक व वैदिक कर्में आपण फलाची इच्छा न धरितां परमेश्वरास समर्पण करणें, ह्यांस क्रियायोग ह्मणतात.

**समाधिभावनार्थः क्लेशतनूकरणार्थश्च ॥ २ ॥**

क्रियायोगापासून एक तर समाधीची प्राप्ति होते व दुसरें क्लेश (पुढील सूत्रांत सांगणार आहेत ते) कमी कमी होत जातात; याकरितां ह्या क्रियायोगाचा पूर्ण अभ्यास करावा. तात्पर्य असें कीं, तप इत्यादिकांचा अभ्यास जसजसा वाढत जाईल तसतशीं चित्तांतील अज्ञान इत्यादिक दुःखें कमी कमी होऊन शेवटीं काहीं प्रतिबंधक न राहिल्यामुळें समाधि अनायासें सिद्ध होईल. ह्मणून क्रियायोग साधण्याविषयीं झटावें.

---

सू० १ टीपः—१ जरी यमादिक क्रियायोगांत आहेत, तरी पुढच्या यमनियमादिकांमध्यें तप वगैरे हीं तीन श्रेष्ठ आहेत; ह्मणजे केवल यांच्या तीव्रतर अनुष्ठानानें सुद्धा योग सिद्ध होतो, हें सुचविण्याकरितां पूर्वीं हीं तीन निराळीं सांगितलीं.

**अविद्याऽस्मितारागद्वेषाभिनिवेशाः क्लेशाः ॥ ३ ॥**

अविद्या,' अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश यांप्रमाणें पांच दुःखें आहेत. यांचें स्वरूप पुढें सूत्रकार सांगणार आहेत. हे, कर्म व कर्माचें फल यांचे प्रेरक होऊन जीवाला क्लेश ( पीडा ) देतात, ह्मणून यांना क्लेश असें ह्मणतात. हे क्लेश कमी करण्याकरितां क्रियायोग साधावा.

**अविद्या क्षेत्रमुत्तरेषां प्रसुप्ततनुविच्छिन्नोदाराणाम् ॥ ४ ॥**

अस्मिता इत्यादि पुढच्या चार क्लेशांचें उत्पत्तिस्थान ( मूळ ) अविद्या आहे. ह्या क्लेशांच्या प्रसुप्त, तनु, विच्छिन्न आणि उदार अशा चार अवस्था आहेत. त्यांत जे क्लेश चित्तांत असून त्यांना उत्तेजक कारण कांहीं नसल्यामुळें ते आपलें कार्य करूं शकत नाहींत ह्मणजे त्यांचा व्यापार प्राण्यावर घडत नाहीं, ते प्रसुप्त ह्मणजे निद्रित क्लेश होत. उदाहरण,–बाळपणीं वासनारूपानें ह्मणजे केवल संस्काररूपानें क्लेश असले तथापि कोणी उत्तेजक नसल्यामुळें ते प्रकट होत नाहींत. जे क्लेश त्यांच्या उलटपक्षाची (क्रियायोगाची) भावना केल्यामुळें त्यांची कार्य करण्याची शक्ति कमी होऊन चित्तांत केवल वासनारूपानें शेष राहतात, व भरपूर साहित्य (साहाय्य) मिळाल्यावांचून आपलें कार्य करूं शकत नाहींत, ते तनु ह्मणजे कृश क्लेश होत. यास प्रत्यक्ष उदाहरण,–क्रियायोगाच्या अभ्यासानें क्लेश अगदीं दुर्बल झाल्यानंतर ते क्लेश त्या योग्यास समाधींत पीडा देऊं शकत नाहींत. ज्या क्लेशांची शक्ति दुसऱ्या एका प्रबळ क्लेशाच्या जोरामुळें पराभूत ( निस्तेज) झाल्यामुळें ते प्रकट होत नाहींत, पुनः शक्ति आली ह्मणजे पूर्वीप्रमाणें थांबून थांबून प्रकट होतात, ते विच्छिन्न ( ह्मणजे थांबून थांबून प्रकट होणारे ) क्लेश होत. उदाहरण,–जेव्हां राग ह्मणजे प्रीति असते तेव्हां क्रोध नसतो, व जेव्हां क्रोध असतो तेव्हां प्रीति नसते. कारण, ते दोघे परस्परविरोधी असल्यामुळें एकेकाच्या वेळीं दुसरा विरुद्ध उत्पन्नच होऊं शकत नाहीं. आणि जे क्लेश आपणांस पूर्ण साहाय्य करणारे मिळाल्यामुळें आपापलें कार्य करूं शकतात, ते उदार क्लेश होत उदाहरण,–व्युत्थानावस्थेंत ह्मणजे ज्या वेळीं चित्तवृत्ती एकाग्र न सून बाहेरच्या विषयांकडे फांकलेल्या असतात तेव्हां ते क्लेश निरंतर आपला व्यापार चालवून योग सिद्ध होऊं देत नाहींत. याप्रमाणें प्रत्येक क्लेश चार चार प्रकारचे झाले. या सर्व क्लेशांना मूळ कारण अविद्या आहे; ह्मणजे जेथें जेथें हे क्लेश असतात तेथें तेथें यांना उत्पन्न होण्याला कारण मूळारंभीं अविद्या असतेच. इतर क्लेश असून अविद्या नसते असें एकही स्थल नाहीं. करितां ह्या विपरीतज्ञानभूत ह्मणजे भलत्याचें भलतेंच भासविण्याच्या अशा अविद्येच्या नाशाविषयीं प्रयत्न केला पाहिजे. ती नष्ट झाली कीं, ते अस्मितादि चार क्लेशही नष्ट होतात.

**अनित्याशुचिदुःखानात्मसु नित्यशुचिसुखात्मख्यातिरविद्या ॥ ५ ॥**

अविद्येचें साधारण लक्षण असें आहे कीं, अमुक एका वस्तूविषयींचें खरें ज्ञान नाश पा-

वून त्याविषयीं त्याहून उलट ज्ञान होणें, याला अर्थात् विपरीतज्ञानाला 'अविद्या' ह्मणतात. याचींच सूत्रांत अनेक उदाहरणें दिलीं आहेत. तीं अशीं,—पृथ्वी इत्यादि अनित्य वस्तूंना नित्य समजणें; अपवित्र व अत्यंत अमंगल अशा देहाला पवित्र समजणें; दुःखकारक पदार्थाला सुखकारक आहे असें मानणें; जो आत्मा नव्हे तो अनात्मा ह्मणजे शरीर, याला आत्मा समजणें; याचप्रमाणें अपुण्यकारक जें हिंसादि कर्म, त्यावर हें संसारांतून मुक्त करील असा विश्वास होणें; व अनर्थकारक जें धनादि यावर अर्थाचा भ्रम होणें; इत्यादि सर्व हें अविद्येचें स्वरूप आहे.

**दृग्दर्शनशक्त्योरेकात्मतैवाऽस्मिता ॥ ६ ॥**

दृक्छक्ति ह्मणजे पाहणारा अर्थात् पुरुष, व. दर्शनशक्ति ह्मणजे पाहण्याचें साधन अर्थात् बुद्धि. ह्या दोन्ही शक्ती परस्पर अगदीं भिन्न आहेत; ह्मणजे दर्शनशक्ति ही भोग्य ह्मणजे उपभोग घेण्याला योग्य असा अचेतन पदार्थ आहे, आणि दृक्छक्ति ही उपभोग घेणारा असा चेतन पदार्थ आहे. अशा रीतीनें ह्या दोन्ही शक्ती परस्पर अगदीं भिन्न असून दोहोंना एकच आहेत असें समजणें ह्यास अस्मिता ह्मणतात. उदाहरण,—' मी कर्ता, मी सुखी, मी दुःखी;' इत्यादि. त्यांत सुख, दुःख इत्यादि भोग, वस्तुतः बुद्धीस असून परंतु अविद्येमुळें पुरुष हा आपणास भोग समजतो. तो भोग बुद्धि व पुरुष यांची एकाकारता झाल्यावांचून संभवत नाहीं. याप्रमाणें ही अविद्येपासून उत्पन्न होणारी व क्लेश देणारी आहे.

**सुखानुशयी रागः ॥ ७ ॥**

कांहीं सुखाचा अनुभव ज्यानें घेतला आहे; त्याला त्या सुखाचें स्मरण झाल्यानंतर त्या सुखाविषयीं अथवा त्याच्या साधनाविषयीं जी अत्यंत उत्कट ( मोठी ) इच्छा वाटते, त्यास राग ह्मणतात. तो अविद्येमुळें उत्पन्न होणारा असून क्लेश ( क्लेशकारक ) आहे.

**दुःखानुशयी द्वेषः ॥ ८ ॥**

कांहीं दुःखाचा अनुभव घेतलेल्या पुरुषास त्या दुःखाचें पूर्वी स्मरण होऊन त्या दुःखाविषयीं अथवा तें दुःख प्राप्त होण्याचीं जीं साधनें त्यांविषयीं जी अरुचि अथवा क्रोध तो द्वेष होय. तो अविद्येमुळें उत्पन्न होणारा व क्लेशरूप आहे.

**स्वरसवाही विदुषोऽपि तथा रूढोऽभिनिवेशः ॥ ९ ॥**

अत्यंत लहान प्राण्यापासून तें थेट ब्रह्मापर्यंत सर्व प्राण्यांला मरणापासून जें स्वाभाविक भय वाटत असतें त्यास अभिनिवेश ह्मणतात. तात्पर्य असें कीं, विद्वान् असो, किंवा मूर्ख असो; प्रत्येक प्राण्याला अशी इच्छा असते कीं, 'मी नेहमीं जीवंत असावें, मला कधींही मरण येऊं नये.' आतां अशा प्रकारची इच्छा, ज्यानें कधीं मरणदुःखाचा अनुभव घेतला नाहीं; त्यास कधीं होणार नाहीं. तेव्हां ज्या अर्थी अशी इच्छा होते त्यावरून पूर्व

जन्म असावा व त्या वेळेस मरणापासून होणाऱ्या दुःखाचा अनुभवही घेतला असावा असें अनुमान होतें. याप्रमाणें शरीराच्या ठिकाणीं जी प्रीति ती अभिनिवेशनांवाचा क्लेश होय. हा अविद्येमुळें उत्पन्न होतो.

**ते प्रतिप्रसवहेयाः सूक्ष्माः ॥ १० ॥**

क्लेशांच्या वृत्ती दोन प्रकारच्या; एक सूक्ष्म व दुसऱ्या स्थूल. त्यांत क्लेशांच्या ज्या सूक्ष्म वृत्ती आहेत त्या नाहींशा होण्याला, अतिदुष्कर असा प्रसंख्यान (ज्ञान) रूप अग्नि व असंप्रज्ञातयोगानें साध्य होणारा जो चित्तनाश, हीं साधनें लागतात. सारांश, जसे जळालेल्या बीजाला अंकूर उत्पन्न होत नाहींत त्याप्रमाणें सूक्ष्मवृत्तींपासून कांहींएक कार्य न होतां त्या, चित्त, आपलें कारण जी अस्मिता हिच्यामध्यें प्रवेश करूं लागलें ह्मणजे त्याबरोबर आपणही प्रवेश करितात ह्मणजे अस्मितेंत चित्ताबरोबर लीन होतात. मग क्लेशांचें मूळच नाहींसें झाल्यावर ते (क्लेश) पुनः मग कोठून उत्पन्न होतील ?

**ध्यानहेयास्तद्वृत्तयः ॥ ११ ॥**

आतां ज्या क्लेशांच्या स्थूल वृत्ती आहेत त्या, प्रथम, पूर्वी सांगितलेल्या क्रियायोगानें अल्प केल्या (ह्मणजे थोड्या बाकी राहिल्या) ह्मणजे मग पुढें समाधींत उत्पन्न होणारी जी प्रज्ञा तिनें समूळ नाहींशा कराव्या. यास दृष्टांत, जसा वस्त्राचा मोठा मोठा मल पूर्वी झटकून टाकिला असतां दूर होतो; आणि नंतर सूक्ष्म (अंगचा) मल जो राहिला असेल तो दगडावर आपटणें वगैरे प्रयत्नानें व रिठे, साबण वगैरे साधनांनीं दूर होतो; त्याप्रमाणें स्थूल वृत्ती, क्रियायोगानें कमी झाल्या ह्मणजे मग पुढें समाधिप्रज्ञेनें अगदीं नाहींशा होतात.

**क्लेशमूलः कर्माशयो दृष्टादृष्टजन्मवेदनीयः ॥ १२ ॥**

कर्माशय ह्मणजे वासनारूप कर्में, यांचें कारण क्लेश आहेत; कारण, क्लेशांमुळेंच शुभ व अशुभ कर्में उत्पन्न होतात. कर्माशय दोन प्रकारचा; एक दृष्टजन्मवेदनीय ( ह्या जन्मांतच भोगला जाणारा ) व दुसरा अदृष्टजन्मवेदनीय ( अन्यजन्मीं भोगला जाणारा ). त्यांत दृष्टजन्मवेदनीय असा,—तीव्रवैराग्यानें व मंत्र, तप व समाधि या साधनांनीं किंवा ईश्वर, गुरु इत्यादिकांच्या सेवेनें संपादन केलेला जो पुण्यकर्माशय, त्यापासून तत्काल फल प्राप्त होतें. तसाच, तीव्रक्लेशामुळें भ्यालेला, व्याधिग्रस्त व दीन यांविषयीं किंवा विश्वास पावलेल्याविषयीं अथवा तपस्वी, साधु यांविषयीं वारंवार केलेला जो अपराध तो पापकर्माशय, त्यापासूनही या जन्मींच फल प्राप्त होतें. यांस दृष्टांत, नंदीश्वर हा बालअवस्थेंत व मनुष्यदेहांतच मनुष्यदेहकारण टाकून देवत्व पावला. तसाच नहुषराजाही देवांचा स्वामी झाला असतांही आपल्या देवशरीरकारणाचा त्याग करून अजगर झाला. ( आतां अदृष्टजन्मवेदनीयकर्माशयाविषयीं कांहीं नियम नाहीं. )

सति मूले तद्विपाको जात्यायुर्भोगाः ॥ १३ ॥

जसें एखाद्या झाडाचें मूळ जोंपर्यंत जमिनींत कायम असतें तोंपर्यंत त्याला अंकुर फुटून पानें फुलें व फळें येतच असतात; त्याप्रमाणें पुण्यकर्म व पापकर्म असे दोन प्रकारचे वृक्ष आहेत; व या दोन वृक्षांचें अविद्यादि पांच क्लेश हे मूळ आहे. हें मूळ चित्तरूप जमिनींत जेथपर्यंत कायम असतें तेथपर्यंत या दोन्ही वृक्षांना जाति, आयुष्य आणि भोग अशा प्रकारचीं फळें येतात. त्यांत पुण्यकर्मे केलीं असतील तर त्या पुण्यकर्मांचें फळ, जाति ह्मणजे उत्तमकुलांत जन्म किंवा देवत्व इत्यादिकांची प्राप्ति; आयुष्य ह्मणजे बहुतकालपर्यंत शरीराशीं संबंध असणें; आणि भोग ह्मणजे इंद्रियद्वारें सुखाचा अनुभव होणें, याप्रमाणें प्राप्त होतें. तशींच पापकर्मे केलीं असतील तर पापकर्मांचें फल अति नीचकुलांत जन्म किंवा नरकवास, अल्पायुषी आणि इंद्रियद्वारें दुःखाचा अनुभव होणें, याप्रमाणें प्राप्त होतें.

ते ह्लादपरितापफलाः पुण्यापुण्यहेतुत्वात् ॥ १४ ॥

मागें जीं कर्मांचीं फळें सांगितलीं त्यांचाच संक्षिप्तार्थ सांगतात,–ते जन्म, आयुष्य व भोग पुण्यकर्मापासून झाले असतां त्यांचें फल सुख प्राप्त होतें; आणि ते पापकर्मापासून झाले असतां त्यांचें फल दुःख प्राप्त होतें.

परिणामतापसंस्कारदुःखैर्गुणवृत्तिविरोधाच्च दुःखमेव सर्वं विवेकिनः ॥ १५ ॥

कर्मांचीं फळें जीं सुख व दुःख अशीं दोन प्रकारचीं सांगितलीं, तीं साधारण अविवेकी प्राण्यांच्या संबंधानें सांगितलीं; परंतु विवेकी ह्मणजे योगी जो आहे त्याला तर सर्वच दुःख (दुःखकारक) आहे असें वाटतें; सुखकारक कांहींच वाटत नाहीं. तें असें,–दुःखाचे परिणामदुःख, तापदुःख व संस्कारदुःख असे तीन प्रकार आहेत. त्यांत, उपभोगाच्या पदार्थांचा जसजसा उपभोग घेत जावा तसतशी त्यांच्याविषयीं इच्छा अधिक वाढत जाते, आणि ते पदार्थ प्राप्त न झाल्यामुळें जें दुःख होतें त्याचा परिहार करितां येत नाहीं, व तें दुसऱ्या दुःखाचें कारण होतें; ह्मणून ते इच्छित (गोड लागणारे) पदार्थ परिणामीं दुःखरूपच आहेत. हें परिणामदुःख होय. सुखकारक पदार्थांचा उपभोग घेतांनाही त्या पदार्थांच्या विरुद्ध जे पदार्थ आहेत, त्यांविषयीं मनांत सर्वदा द्वेष असल्यामुळें सुखाचा उपभोग घेत असतांनाही ती द्वेषबुद्धि टाळतां येत नाहीं; ह्मणून सुखकारक पदार्थांचा उपभोग घेतांनाही तापरूप दुःख होतें. हें तापदुःख होय. त्याचप्रमाणें, आपल्यापुढें आवडणारा किंवा नावडणारा जसा पदार्थ असतो, त्याप्रमाणें सुखाचें किंवा दुःखाचें ज्ञान होतें, त्याचा संस्कार प्रथम आपल्या चित्तावर घडतो, व त्या संस्काराच्या योगानें पुनः तसा ह्मणजे सुखाचा किंवा दुःखाचा अनुभव येतो. ह्याप्रमाणें असंख्यात संस्कार झाल्यामुळें संसार सुटत नाहीं; ह्मणून सर्व संस्कार दुःख-

कारक आहेत. हें संस्कारदुःख होय. आणखी सत्व, रज आणि तम ह्या ज्या तीन गुणांच्या वृत्ती सुख, दुःख व मोह ह्या रूपांनीं दृष्टोत्पत्तीस येतात, त्या परस्परांस पराभूत करणाऱ्या किंवा आपण पराभूत होणाऱ्या असल्यामुळें त्यांचा परस्परांशीं विरोध असतो, ह्याला गुणवृत्तिविरोध ह्मणतात. वर सांगितलेलीं तीन प्रकारचीं दुःखें व हा चवथा गुणवृत्तिविरोध या चार कारणांमुळें योग्यांला सर्वच दुःख-(दुःखकारक) आहे असें वाटतें. सारांश इतकाच कीं, ज्याला दुःखादिकांचा अनुभव आलेला आहे अशा विवेकी मनुष्याच्या आढळांत सुख किंवा दुःख भोगण्याचें जें साधन येतें, तें सर्व त्याला विष कालविलेल्या अन्नाप्रमाणें केवळ दुःखकारक आहे असें वाटतें; कारण, पूर्ण अनुभव घेतलेल्या योग्याला दुःखाच्या लेशानेंही दुःख होतें. जसा लोंकरीच्या एका तंतूचा सुद्धां डोळ्याला नुसता स्पर्श झाला कीं लगेच तो डोळ्याला मनस्वी दुःख देतो; आणि अंगाच्या दुसऱ्या कोणत्याही भागाला त्या तंतूच्या स्पर्शानें तितकें कांहीं दुःख होत नाहीं. तसा जो विवेकी असतो तो अगदीं थोड्या दुःखानेंही विरक्त होतो.

**हेयं दुःखमनागतम् ॥ १६ ॥**

पूर्वीं सांगितलेले क्लेश, वासनारूप कर्में व त्या कर्मांचीं फळें हीं, अविद्येपासून उत्पन्न झालेलीं असून अविद्या ही विपरीतज्ञानरूप असल्यामुळें ती चांगल्या ज्ञानानें नाहींशी होते. आतां तें चांगलें ज्ञान ह्मटलें ह्मणजे, ग्रहण करण्यास योग्य काय व त्याला साधन काय आहे; आणि टाकण्यास योग्य काय व त्याचें साधन काय; हें पूर्णपणें समजणें हें होय. त्यांपैकीं टाकण्यास योग्य काय तें सांगतात,—पाठीमागें जें घडलें असेल तें घडून गेलें, हल्लीं जें घडत आहे तें घडत असतांना त्यास टाळतां येत नाहीं; ह्मणून या दोन दुःखांच्या नाशाचा उपाय करण्याचें कारण नाहीं. आतां जें संसारांतील दुःख पुढें प्राप्त व्हावयाचें असेल त्याच्याच टाळण्याविषयीं प्रयत्न केला पाहिजे.

**द्रष्टृदृश्ययोः संयोगो दृश्यहेतुः ॥ १७ ॥**

टाकण्याजोगें जें दुःख त्याचें कारण सांगतात,—द्रष्टा ह्मणजे ज्ञानस्वरूप आत्मा, व दृश्य ह्मणजे बुद्धिसत्व (चित्त); अर्थात् आत्मा हा भोक्ता व चित्त हें भोग्य आहे. भोक्ता व भोग्य या दोघांचा जो संबंध तो संयोग होय. या दोघांविषयीं तात्विक (बरोबर) विचार न केल्यामुळें मनुष्याला द्रष्टा व दृश्य ह्यांच्या संयोगापासून संसाररूप ( जन्ममरणरूप ) दुःख प्राप्त होतें. तें दुःख, द्रष्टा व दृश्य ह्यांचा संयोग नाहींसा झाला ह्मणजे नाहींसें होऊन जन्ममरणरूप संसार नाहींसा होतो ह्मणजे पुरुष मुक्त होतो.

**प्रकाशक्रियास्थितिशीलं भूतेन्द्रियात्मकं भोगापवर्गार्थं दृश्यम् ॥ १८ ॥**

पूर्वीं द्रष्टा व दृश्य यांचा संयोग दुःखास कारण ह्मणून ह्मटलें, त्यांत प्रथम दृश्याचें

स्वरूप सांगतात,—प्रकाश करणें हा सत्वगुणाचा धर्म, क्रिया ह्मणजे यत्न व हालणें चालणें हा रजोगुणाचा धर्म, व स्थिति ह्मणजे नियमन करणें हा तमोगुणाचा धर्म आहे. याप्रमाणें हे प्रकाश, क्रिया व स्थिति हे दृश्याचे ह्मणजे चित्ताचे स्वाभाविक धर्म आहेत. तसेंच, भूतें दोन प्रकारचीं; स्थूल आणि सूक्ष्म. त्यांत पृथ्वी, आप्, तेज, वायु व आकाश हीं स्थूल भूतें; व या स्थूलभूतांचें कारण जीं पंचतन्मात्रें ह्मणजे गंध, रस, रूप, स्पर्श व शब्द हीं सूक्ष्म भूतें होत. इंद्रियें दोन प्रकारचीं; पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें मिळून दहा आहेत. त्यांत चक्षु, श्रोत्र, घ्राण, रसन व त्वक् हीं ज्ञानेंद्रियें व वाक्, पाणि, पाद, पायु व उपस्थ हीं कर्मेंद्रियें; आणि दहा इंद्रियांचें व्यापार नीट चालावे याकरितां अर्थात् ज्याच्या साहाय्या-वांचून कोणत्याही इंद्रियाचा व्यापार चालत नाहीं असें अकरावें मन. हीं भूतें व इंद्रियें ग्राह्य व ग्रहण या रूपांनीं चित्ताच्या स्वाभाविक वृत्ती असून चित्ताच्या स्वरूपाहून निराळे परिणाम नव्हत. हें चित्ताचें कार्य सांगितलें. भोगाचें लक्षण पूर्वीं ( सा० सू० १३ त ) सांगितलें. अपवर्ग ( मोक्ष ) ह्मणजे आत्मानात्मविचार करून संसारांतून मुक्त होणें. आ-त्म्याला सर्व विषयांचा उपभोग मिळावा व चित्तापासून आत्म्याचा वियोग होऊन मोक्ष मिळावा हें दृश्याचें प्रयोजन आहे. या सूत्रानें दृश्याचा स्वभाव, त्याचें कार्य व त्याचें प्रयोजन हीं तीन सांगितलीं.

**विशेषाविशेषलिङ्गमात्रालिङ्गानि गुणपर्वाणि ॥ १९ ॥**

गुणाच्या ह्मणजे दृश्याच्या, क्रमानेंच चार अवस्था आहेत; विशेष, अविशेष, लिंग-मात्र आणि अलिंग. ह्या योग साधते वेळीं अवश्य जाणाव्या याकरितां यांचा उपदेश आहे. त्यांत पूर्वीं सांगितलेलीं पांच स्थूल भूतें, दहा इंद्रियें व सोळावें मन हे गुणांचे विशेष परि-णाम आहेत. पांच तन्मात्रें व सहावा मूळचा अहंकार हे अविशेष परिणाम आहेत. मह-त्तत्त्व ह्मणजे बुद्धि हा गुणाचा लिंगमात्र परिणाम; व प्रधान ह्मणजे प्रकृति ही अलिंग-परिणाम होय.

**द्रष्टा दृशिमात्रः शुद्धोऽपि प्रत्ययानुपश्यः ॥ २० ॥**

आतां द्रष्ट्याचें स्वरूप सांगतात,—आत्मा हा केवळ ज्ञानस्वरूप आहे ह्मणजे जसें अग्नीचें ज्ञान उष्णस्पर्शानें जरी कदाचित् न झालें तथापि चक्षुरिंद्रियानें त्याचें ग्रहण होतें; तसें आत्म्याचें ग्रहण इतर साधनानें होत नाहीं; तर तो केवळ ज्ञानानेंच ग्राह्य आहे. ह्मणून त्याचें ज्ञान हेंच स्वरूप आहे. आतां तो कांहीं परिणाम पावत नसून आपल्या रूपानेंच नेहमीं असतो खरा, तथापि बुद्धि विषयाकार झाली असतां तो तिच्या जवळ असल्यामुळें, जास्वंदी-च्या फुलावर जसा शुद्ध स्फटिकमणि ठेविला असतां लाल दिसतो, त्याप्रमाणें विषयाकार भासूं लागतो.

**तदर्थ एव दृश्यस्यात्मा ॥ २१ ॥**

दृश्याचें (चित्ताचें) पूर्वी (सा० सू० १८ त) सांगितलें जें स्वरूप तें आत्म्याकारितांच आहे; (ह्मणजे दृश्याचा भोक्ता आत्माच आहे.) बाह्य विषयांचें ज्ञान आत्म्यास व्हावें ह्मणून चित्त आहे; याशिवाय चित्ताला आपलें स्वतांचें कांहीं प्रयोजन नाहीं; कारण, तें अचेतन आहे.

**कृतार्थं प्रति नष्टमप्यनष्टं तदन्यसाधारणत्वात् ॥ २२ ॥**

'प्रकृति ही एक आहे व पुरुष हे अनंत आहेत,' असें अनेकश्रुतिसिद्ध आहे. त्यांत जो पुरुष सकल भोग भोगून मुक्त झाला, त्याप्रत जरी ती प्रकृति नष्ट झाल्यासारखी झाली, तथापि दुसऱ्या आणीक (अकृतार्थ) सर्व पुरुषांला भोग भोगविण्याचें काम तिच्या एकटींवरच असल्यामुळें ती कधींही नष्ट होत नाहीं. यास दृष्टांत, 'जसा एकादा खेळ करणारा मनुष्य खेळ करीत असतां, कांहीं मनुष्यांनीं तो खेळ पुरता पाहिला ह्मणजे ते त्याला सोडून चालते होतात; परंतु दुसरे खेळ पाहणारे तेथें जमलेले असतात किंवा इतर ठिकाणीं असतात त्यामुळें तो (खेळ करून दाखविणारा) ज्यांना त्यांना वरचेवर खेळ करून दाखवितो; त्याचा खेळ आणीक दुसरे पाहणारे असल्यामुळें कधींच संपत नाहीं.'

**स्वस्वामिशक्त्योः स्वरूपोपलब्धिहेतुः संयोगः ॥ २३ ॥**

संयोगाचें कार्य सांगण्याच्या प्रसंगांत त्याचें लक्षणही सांगतात,—जसें एकाद्या पुरुषाजवळ धन असलें ह्मणजे तो त्या धनाचा स्वामी (मालक) व तें धन त्याचें स्व असतें; व त्या दोघांचा स्वस्वामिभाव संबंध असतो; तसें दृश्य हें पुरुषाचें स्व, व पुरुष ह्मणजे द्रष्टा हा त्या दृश्याचा स्वामी. या दोहोंच्या ज्या शक्ती ह्मणजे योग्यता त्यांना स्वशक्ति व स्वामिशक्ति असें ह्मणतात. या स्वशक्तीचा व स्वामिशक्तीचा संयोग झाल्यापासून जी दृश्याच्या स्वरूपाची उपलब्धि ह्मणजे दर्शन किंवा भास, यासच भोग असें ह्मणतात; व जी पुरुषाच्या स्वरूपाची उपलब्धि (दर्शन) तीच अपवर्ग ह्मणजे मोक्ष होय. यांत उभयतांचा संयोग हा पुरुषदर्शनापर्यंत असतो, ह्मणून पुरुषदर्शन हें दृश्याच्या वियोगाला कारण, व पुरुषदर्शन (पुरुषासंबंधी तत्त्वविचार) न होण्याला कारण स्वशक्ति व स्वामिशक्ति या उभयतांचा संयोग हा होय. याकरितां तो संयोग ज्या कारणानें झाला आहे त्या कारणाचा शोध करून त्याच्या नाशाविषयीं प्रयत्न करावा.

**तस्य हेतुरविद्या ॥ २४ ॥**

अविद्येचें लक्षण पूर्वी (सा० सू० ५ त) सांगितलें. पुरुषदर्शन न होण्याला कारण जो संयोग ह्मणून सांगितला त्याचें कारण अविद्या आहे. त्या अविद्येचा नाश प्रथम

क्रियायोगानें करून ती दुर्बल झाल्यावर समाधिप्रज्ञेनें तिचा उच्छेद करावा. मग कारणाचा नाश झाल्यामुळें कार्य जो संयोग तो अनायासेंच नाहींसा होईल.

**तदभावात्संयोगाभावो हानं तद्दृशेः कैवल्यम् ॥ २५ ॥**

त्या अविद्येचा विद्येनें नाश झाल्यानंतर तिचें ( अविद्येचें ) कार्य जो बुद्धि व पुरुषाचा संयोग तो नाहींसा होतो. हें जें नाहींसें होणें यास हान ह्मणतात. आतां 'हान' या शब्दाचा अर्थ 'टाकून देणें' असा आहे; परंतु अविद्येला एकाद्या मूर्तिमंत पदार्थासारखें टाकून देतां येत नाहीं; ह्मणून विवेकज्ञान उत्पन्न झालें ह्मणजे अविवेकापासून उत्पन्न झालेला संयोग आपोआपच नाहींसा होईल. असा येथें अभिप्राय समजावा. संयोगाचें हान ह्मणजे त्याग करणें हीच नित्य व केवळ आत्म्याला मुक्ति होय.

**विवेकख्यातिरविप्लवा हानोपायः ॥ २६ ॥**

प्रकृतिपुरुषांचा संयोग नाहींसा होण्याचा उपाय सांगत असतां मध्यें सहज प्रसंगांत उपादेय ह्मणजे ग्रहण करण्यास जें योग्य त्याचें कारण सांगतात,–'गुण हे निराळे आहेत व आत्मा हा निराळा आहे' अशा प्रकारची विवेकप्रज्ञा ( ज्ञान ) झाली असता तीच ह्या सर्व दुःखरूप दृश्यांचा त्याग करविण्याला कारण होते. आतां ती विवेकख्याति ( विवेकप्रज्ञा ) कशी असली पाहिजे कीं, मध्यें मध्यें जीं व्युत्थानअवस्थेच्या योगानें विघ्नें उत्पन्न होत असतात तीं न झालीं पाहिजे. याचें तात्पर्य असें कीं, प्रतिपक्षभावना ( पुढें सा० सू० ३४ त प्रतिपक्षभावना सांगितली आहे ती ) चित्तांत आणिल्यानें अविद्येचा लय होऊन, मी जाणणारी, मी करणारी, इत्यादि अभिमान जिचा नाहींसा झाला आहे; रजोमलाचा व तमोमलाचा जींत बिलकूल लेश राहिला नाहीं अशा बुद्धीमध्यें जें ज्ञानाचें प्रतिबिंब पडणें, याला विवेकप्रज्ञा असें ह्मणतात. त्या विवेकप्रज्ञेची एकसारखी अखंड प्रवृत्ति झाली असतां दृश्याचा ( प्रकृतीचा ) सर्व व्यापार बंद पडून पुरुषास मोक्ष प्राप्त होतो.

**तस्य सप्तधा प्रान्तभूमिः प्रज्ञा ॥ २७ ॥**

समाधि दोन प्रकारचा; एक सालंबन समाधि व दुसरा निरालंबन समाधि. त्यांत ज्या समाधींत ध्यानास स्थूलवस्तूचा आश्रय असतो तो सालंबन; व ज्यांत केवळ ज्ञानाचा आश्रय असतो तो निरालंबन समाधि. ज्याला विवेकज्ञान उत्पन्न झालें आहे त्याचा सालंबन समाधि पूर्ण सिद्ध होईपर्यंत विवेकप्रज्ञेच्या सात प्रकारच्या अवस्था होतात. त्यांत पहिल्या चार अवस्था कार्याच्या संबंधानें असल्यामुळें त्यांना कार्यविमुक्ति असें ह्मणतात. त्या अशा,–१ जें जाणावयाचें तें मीं जाणलें. २ जाणावयाचें बाकी आतां कांहीं राहिलें नाहीं. ३ ज्ञानप्राप्तीस प्रतिबंध करणारे जे क्लेश ते सर्व क्षीण ह्मणजे नाहींसे झाले; आतां क्षीण करावयाचे कांहीं बाकी राहिले नाहींत. ४ मला ज्ञान प्राप्त झालें, मीं विवेकख्याति

प्राप्त करून घेतली. याप्रमाणें त्या अवस्थांमध्यें आणीक दुसरें कांहीं अनुभवास न येतां अशा प्रकारचें ज्ञान उत्पन्न होतें; हें कार्यसंबंधी असल्यामुळें यास कार्यविमुक्ति असें ह्मणतात. आतां बाकीच्या पुढच्या तीन अवस्था चित्ताच्या संबंधानें असल्यामळें त्यांना चित्तविमुक्ति असें ह्मणतात. त्या अशा,-१ माझी बुद्धि कृतार्थ झाली. २ पर्वताच्या शिखरावरून शिळा खालीं तळाशीं पडल्या असतां त्या जशा पुनः आपल्या ठिकाणीं जात नाहींत; त्याप्रमाणें आपल्या कारणाच्या ठिकाणीं लीन झालेल्या सत्वादि गुणांचा जोर माझ्या ठिकाणीं पुनः चालू होत नाहीं; कारण, त्यांचें मूळकारण जी अविद्या ती नष्ट झाली; तेव्हां आतां कांहीं कारणावांचून त्यांचा पुनः उद्भव कसा होणार ? ३ आणि मला समाधि पुरता साधला; तो साधल्यामुळें आतां मी आपल्या आत्म्याच्या स्वरूपांत रममाण होऊन राहिलों आहें. याप्रमाणें चित्तविमुक्ति सांगितली. याप्रमाणें शेवटच्या अवस्था प्राप्त झाल्या असतां पुरुष मुक्त झाला असें ह्मणतात.

**योगाङ्गानुष्ठानादशुद्धिक्षये ज्ञानदीप्तिरा विवेकख्यातेः ॥ २८ ॥**

योगाचीं अंगें पुढें सांगणार आहेत. त्यांचा ज्ञानपूर्वक अभ्यास केला असतां चित्तसत्वाला ( बुद्धीला ) झांकून टाकणारा जो क्लेशरूप मल तो नाहींसा होतो; त्यामुळें ह्मणजे कोणताही प्रतिबंध न राहिल्यामुळें ज्ञानाची ज्योत प्रदीप्त होतां होतां शेवटीं विवेकख्याति उत्पन्न होते.

**यमनियमासनप्राणायामप्रत्याहारधारणाध्यानसमाधयोऽष्टावङ्गानि ॥ २९ ॥**

यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि याप्रमाणें योगाचीं आठ अंगें आहेत. त्यांत पांच अंगांचें स्वरूप याच पादांत पुढें सांगणार आहेत; व पुढचीं, धारणा इत्यादि तीन अंगें विभूतिपादांत सांगणार आहेत.

---

सूत्र २९ टीपः-१ **योगांगांविषयीं विशेष विचार.**

दान, यज्ञ इत्यादिक जीं बहिरंग साधनें आहेत, त्यांचाही अंतर्भाव ( समावेश ) या आठ अंगांतच समजावयाचा; व सूत्रांत ज्या क्रमानें अंगें पढलीं आहेत त्याप्रमाणेंच अनुष्ठानाचा क्रम समजावयाचा. आतां जें अमृतबिंदु-उपनिषदांत ' प्रत्याहार, ध्यान, प्राणायाम, धारणा, तर्क व समाधि हीं योगाचीं सहा अंगें ' असें सांगितलें आहे, तें अत्यावश्यक लागणाऱ्या अंतरंग अंगांस अनुसरून लिहिलें आहे. ह्मणून तें अत्यावश्यक लागणाऱ्या बहिरंग अंगाचेंही उपलक्षण समजावें.

मंत्रयोग, हठयोग, लययोग व राजयोग, याप्रमाणें योगांतील अवस्थांच्या क्रमानें हे चार भेद आहेत. त्यांत मंत्र, हठ व लय यांनीं योग पूर्ण होतो ह्मणजे हे तीन, योगास साधनें आहेत, व चवथा राजयोग हा समाधीच्या अभ्यासाचें फल आहे.

योगांत प्रथम प्रवृत्ति होण्याला अलौल्य, आरोग्य, निष्ठुरता, सुगंधता, अल्पमूत्रपुरीष, कांति, प्रसाद, स्वरसौम्यता वगैरे चिह्नें होतात; त्याचप्रमाणें उत्साह, साहस, धैर्य, तत्त्वज्ञान, निश्चय व जनसंगपरित्याग या सहा योगांतील प्रथमच्या उपांगांच्या सिद्धतेनें योगांगांच्या अनुष्ठानाची प्रवृत्ति होते; असें योगवासिष्ठांत सांगितलें आहे. त्याचप्रमाणें नित्यानित्यवस्तुविवेक, ह्या लोकांतील व परलोकांतील विषयोपभोगाची विरक्ति, शम, दम, उपरति, तितिक्षा, समाधान व श्रद्धा अशी साधनसंपत्ति व मुमुक्षुत्व हीं असलीं पाहिजेत; कारण, जर हीं साधनें नाहींत तर ज्या वस्तूचें इंद्रियांनीं प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं अशा पदार्थांत एकदम प्रवेश होऊं शकत नाहीं, ह्मणून प्रतिबंधामुळें सिद्धि न झाली असतां साधक व्याकुल होऊन साधनांचा परित्याग करील तर तो दोहींकडून भ्रष्ट होईल; कारण कीं, चांगल्या मार्गांत त्याला सिद्धि न झाल्यामुळें तो नास्तिक होऊन जाणार. ह्मणून श्रद्धा ही अवश्य असली पाहिजे. जर सिद्धि झाली नाहीं तर साधनांतच कांहीं कमीपणा आहे किंवा दुसरा एकादा कांहीं प्रतिबंध आहे असें समजून सावधपणानें निराश न होतां असेल तो कमीपणा व प्रतिबंध दूर करून मोठ्या हौसेनें अभ्यास करावा. त्याप्रमाणेंच अत्याहार, प्रयास, प्रजल्प ( पुष्कळ व्यर्थ बडबड करणें ), नेहमीं पुष्कळ कामनिक व्रतें करणें, जनसंग व विषयांवर मनाची चंचलपणा, इतक्या गोष्टींचा त्याग करावा. तसेंच भय, क्रोध, आळस व पुष्कळ झोंप घेणें व जागणें, अतिशय भोजन करणें व नेहमीं उपवास करणें, ह्या सहा गोष्टी योग्यानें अगदीं सोडून दिल्या पाहिजेत. असें अथर्ववेदांतील अमृतबिंदु-उपनिषदांत सांगितलें आहे.

वारंवार विचार करावा कीं, 'संसार हा पाणी व नाव यांच्या संयोगाप्रमाणें आहे. सर्व आपापला स्वार्थ पाहणारे आहेत. कोणाची स्त्री, आणि कोणाचा पुत्र. पहा! द्रव्य मिळविण्याला किती दुःख असतें? मिळाल्यावर रक्षण करण्यास किती श्रम पडतात? ज्या वेळेस मिळतें किंवा त्याचा खर्च होतो; त्या दोन्ही वेळेस दुःखच असतें. याप्रमाणें द्रव्य कष्टाचें आगर आहे. असेंच स्त्रींत तरी काय चांगलें ह्मणून आहे? पहायाला गेलें तर त्यांत केवळ त्वचा, रक्त, मांस व हाड हींच आहेत. पहा! तिची ती त्वचा, दूर केल्यानंतर मग तीविषयीं इच्छा राहील काय? तर असल्या वस्तूंशीं माझा संबंध कशाला पाहिजे? याप्रमाणें विचार करून जनसंगत्याग करावा. कारण जे संग करितात ते कुटुंबाचे क्लेश आपल्यावर उगीच घेतात. परंतु जे संगत्याग करितात ते क्रमानेंच समाधिसुख मिळवितात. त्याकरितां संगत्याग करणेंच श्रेष्ठ आहे; व तें पुरुषाला मोठें बल आहे. याप्रमाणें विचार करून वैराग्य स्थिर करावें.

**सूत्र २९ टीपः-१** **देशविचार.**

योगाभ्यासास देश चोहोंकडून सपाट व पवित्र असावा. जेथें खडे, अग्नि व वाळू

इत्यादिक नसावेत. तें स्थान शब्द व जलाश्रय इत्यादिकांनीं मनास अनुकूल असें असावें; त्रास होईल असें नसावें. बसावयाच्या जागीं वारा फारसा येत नसावा. त्याप्रमाणेंच ज्याच्या भोंवतालीं कंद, मूल, फल व स्वच्छ विपुल पाण्याची समृद्धि असावी. जेथें वेदनिरत अशा ब्रह्मनिष्ठांचा ब्रह्मघोष ( वेदध्वनि ) ऐकण्यांत येत आहे. जें तपोवन स्वधर्मनिष्ठांनीं सुशोभित झालेलें आहे. सरोवर व पुष्पफलादिकांनीं रम्य अशा वाराणसी वगैरे स्थलीं सुंदर मठ बांधून त्रिकाळसंध्या इत्यादिक नित्य कर्मे करून वेदांत श्रवण करीत योगाभ्यासतत्पर व्हावें.

**हठाभ्यासास योग्य देश:**—जेथें परमधार्मिक राजा व प्रजा असाव्या. जेथें दुष्काळ, चोर, व्याघ्र वगैरेंची भीति नसावी. बसण्याच्या जागेपासून चार हातपर्यंत दगड, अग्नि, पाणी वगैरे नसावे; ह्मणजे त्या योगानें थंडी व उष्णता यांची पीडा होत नाहीं. एकांत स्थल असावें; ह्मणजे कलह वगैरेचा त्रास नसतो. अशा ठिकाणीं लहानशी मठी बांधून हठयोग्यानें हठाभ्यास ( प्राणायाम वगैरेचा अभ्यास ) करावा.

**मठलक्षण:**—ज्याला लहानसें दार असावें. जेथें भिंतीस जाळ्या वगैरे भोंकें आणि जमिनीस खांचखळगे व उंदीर वगैरेंनीं उकीर काढलेले नसावे. जमीन फार उंचसखल नसावी; किंवा मठ टेंकडी वगैरे ठिकाणीं तसाच खोल जागेंत नसावा. माती व गाईच्या शेणानें दाट व चांगल्या रीतीनें सारविलेला असावा. जेथें थोडाही केरकचरा नसावा. जें स्थल ढेंकूण, पिसा, डांस, मत्सर वगैरेंनीं रहित असावें. भिंतींवर मुनि, तीर्थ, नदी, वृक्ष, कमल, पर्वत वगैरे चित्रें असावीं, कीं ज्यांना पाहून योगाभ्यासांत मन लागेल. वैराग्य होण्याला श्मशान, घोर नरक इत्यादिक चित्रें असावीं. मठाच्या बाहेरची बाजू वेलीचे मंडप, उत्तम बसण्याकरितां ओटे, कुवे ( आड ) वगैरे जलाशय इत्यादिकांनीं रमणीय असावी. मठाच्या भोंवतालीं तट ( आवारू ) असावा. अशा मठांत योग्यांनीं सर्व चिंता सोडून देऊन गुरूनें उपदेश केला असेल त्या मार्गानें योगाचा अभ्यास करावा.

कसलेंही भय बाळगूं नये. व मनांत असें पक्कें वागवूं द्यावें कीं प्रारब्धकर्मावांचून सर्प, व्याघ्र इत्यादिक कोणीही प्राणी दुःख किंवा सुख देऊं शकत नाहीं; ह्मणूनच भयंकर पर्वत, वन किंवा नदी यांमध्यें सांपडलेला प्राणी किंवा एकादा वाट चुकून चोर, व्याघ्र, शत्रु इत्यादिकांच्या सपाट्यांत सांपडलेला त्याचें नशीब जर बळकट आहे तर ते पर्वत वगैरेच त्याचें संरक्षण करितात व तेथें त्याला सुख प्राप्त होतें. आणि ज्याचें नशीब हीनबल झालें आहे त्याचें किती जरी चांगल्या रीतीनें रक्षण केलें किंवा त्याला सुरक्षित स्थलीं ठेविलें; तथापि त्याला मरण किंवा दुःख प्राप्त होणें हें कधींही टळत नाहीं. ह्मणून महाभारतांतही सांगितलें आहे कीं, 'तीक्ष्णबाणांनीं जरी शरीर छिन्नभिन्न झालें तथापि वेळेवांचून

**तत्राहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः ॥ ३० ॥**

१ अहिंसा, २ सत्य, ३ अस्तेय, ४ ब्रह्मचर्य व ५ अपरिग्रह, या पांचांस यम असें ह्मणतात. यांचें स्वरूप टिप्पणींत सविस्तर व चांगल्या रीतीनें दाखविलें तें अवश्य पहावें.

---

मरण येत नाहीं. परंतु जर वेळा प्राप्त झाली असेल तर नुसत्या काडीचा स्पर्श झाल्याबरोबर नाश पावतो.'

सारांश, ज्या परमेश्वरानें जन्म देऊन गर्भांत रक्षण केलें; तोच कोठें असलें तरी रक्षण करण्यास समर्थ आहे; असें भगवंताचें चिंतन करावें. अन्नवस्त्रांची चिंता अगदीं सोडून द्यावी.

सू० ३० टीपः–१ **यम.** ( हें योगांतील प्रथमांग होय. ).

त्याचे पांच प्रकार आहेत; ते येणें प्रमाणें:–

**१ अहिंसा, २ सत्य, ३ अस्तेय, ४ ब्रह्मचर्य व ५ अपरिग्रह.**

**१ अहिंसा:**–सर्व प्राण्यांवर दया ठेवून कोणाचा प्राण घेणें याला अहिंसा ह्मणतात.

भाजीपाला वगैरे पदार्थांनीं आपली भूक शांत होत असतां व्यर्थ आपल्या या भयंकर पोटाकरितां कोणाचा जीव घेऊं नये. जसें आपणाला दुःख होतें तसेंच दुसऱ्याला होतें असेल, असें जाणून कोणत्याही प्राण्याला दुःख देऊं नये. ज्याला आपल्या स्वरूपाची जाणण्याची इच्छा असेल, व परमानंद प्राप्त होऊन परमपदास जावें अशी इच्छा असेल, त्यानें अहिंसाधर्म अवश्य पाळला पाहिजे. अज्ञानानें झालेल्या हिंसेचें पाप भगवद्ध्यानानें व मन्वादिस्मृतींत सांगितलेल्या प्रायश्चित्तानें जाळून टाकावें.

**२ सत्य:**–सत्यव्रताचें पाळण करणाऱ्या मनुष्यानें कधींही वचनानें बांधलें जाऊं नये; व वचन द्यावयाचें त्या वेळेस पूर्ण विचार करून आपल्या हातून काम व्हावयाजोगें असल्यास वचन द्यावें. विनाकारण बोलण्याची संवय ठेवूं नये. कोणी पुसल्यावांचून अथवा आपल्याला जरूर लागल्यावांचून व्यर्थ पुष्कळ बोलणें हें सत्यव्रत पुरुषाला अयोग्य आहे.

ज्या गोष्टीविषयीं आपणाला कांहीं माहिती नाहीं, ह्मणजे आपण स्वतः पाहिली नाहीं; किंवा एकाद्या प्रामाणिक मनुष्यापासून ऐकिली नाहीं, किंवा जिचा स्वतः आपल्याला अनुभव नाहीं, अशी गोष्ट बोलूं नये. ' ज्याप्रमाणें बोलावें त्याप्रमाणें आचरण ठेवावें.'

कोणाची खुशामत करण्याची इच्छा ठेवूं नये; कारण, त्याची मर्जी संभाळण्याकरितां नेहमीं खोटें बोलण्याचा प्रसंग येतो.

काम, क्रोध, लोभ, इत्यादि विकारांच्या स्वाधीन होऊं नये. हे विकार ज्या वेळेस आपणाला अनावर होऊन आपलाच पगडा स्थापन करितात त्या वेळेस मन स्वाधीन ठेवून परमेश्वराच्या चिंतनानें विकारांपासून पार पडावें.

जी एकादी गोष्ट कोणाची प्रकट करण्याजोगी नसेल ती कधींही बाहेर प्रकट करूं नये. 'महाभारतांत मोक्षपर्वांत, प्रथम बोलण्यापेक्षां मौनच श्रेष्ठ, दुसरें मौनापेक्षां सत्य भाषण करणें त्यापेक्षां श्रेष्ठ, तिसरें जें सत्य भाषण बोलावयाचें तें धर्मयुक्त असणें त्यापेक्षां श्रेष्ठ, चवथें, तें सत्य व धर्मयुक्त असून कानांला गोड लागणारें असलें तर त्यापेक्षां श्रेष्ठ. याप्रमाणें सत्याची प्रशंसा अधिक केली आहे. मुंडक उपनिषदांत, ' सत्यावांचून आत्मसाक्षात्कार होत नाहीं.' भारतांत 'सत्याची व अश्वमेधाची तुलना केली' तेव्हां सत्याचाच कांटा खालीं वांकला. याकरितां सत्य हेंच स्वर्गास चढून जाण्याची शिडी आहे; व अगाध संसारसमुद्र तरून जाण्याची नाव आहे. सत्यावांचून दुसरा पावन पदार्थ नाहीं. याप्रमाणें सत्य होय.

**३ अस्तेयः**–आपणाला कोठेंही एकादी वस्तु सांपडली तर त्याच्या धण्याचा शोध करून ती त्याच्या स्वाधीन करावी. जर धण्याचा शोध न लागला तर ती वस्तु कोणा एकाद्या योग्य अधिकाऱ्याच्या स्वाधीन करावी. जशी शरीरानें चोरी होते, तशी मनानें सुद्धां होते; याकरितां मनांत सुद्धां दुसऱ्याची वस्तु घेण्याची इच्छा करूं नये. जुगार खेळूं नये; रांडबाजी तसेंच कोणत्याही प्रकारचें व्यसन नसावें; कारण असल्या दुष्ट कामांत एकदा मन लागलें ह्मणजे मग पैशाकरितां चोरी करण्याची इच्छा उत्पन्न होते. विषयाला वाढविणाऱ्या पदार्थांची बिलकूल इच्छा करूं नये.

**४ ब्रह्मचर्यः**–विषयेच्छा वाढविणाऱ्या पदार्थांचा सर्वथा त्याग करावा. जेथें कामोद्दीपक ( विषय वाढविणारे ) पदार्थ असतील तेथें जाण्याची किंवा राहण्याची इच्छा करूं नये. व तसल्या ठिकाणाजवळही राहूं नये. अनीति वाढविणारीं व शृंगारिक गोष्टींचीं पुस्तकें वाचूं नयेत. कारण असल्या गोष्टी ऐकल्यानंतर त्या साक्षात् करण्याची मनाची प्रवृत्ति होते; एवढ्याकरितां असलीं पुस्तकें वाचूं नयेत व ऐकूं नयेत.

त्यागी ( ज्यानें सर्व संग परित्याग केला आहे अशा ) पुरुषानें कोणत्याही स्त्रीबरोबर व गृहस्थानें आपल्या स्त्रीवांचून इतर स्त्रीबरोबर ' १ तिचें मनांत स्मरण करणें, २ तिच्या संबंधाच्या गोष्टी ऐकणें, ३ तिच्या बरोबर भाषण करणें, ४ तिचें दर्शन घेणें, ५ तिच्या बरोबर किंवा तिच्याकडे पाहून हंसणें, ६ तिच्या बरोबर एकांतांत कांहीं मसलत करणें, ७ तिला स्पर्श करणें व ८ तिचा संभोग करणें;' असें आठ प्रकारचें मैथुन करूं नये. व तिच्या उत्पत्तीचा, वगैरे सर्व विचार करून तिच्याविषयीं वासना दूर करावी.

तो विचार असा,– 'स्त्री ही केवळ स्नायु, मज्जा, अस्थि इत्यादि समुदायरूप, स्तनादि मांसग्रंथींनीं युक्त. अशी मांसाची पुतळी आहे. जिचे शरीरावयव यंत्राप्रमाणें चंचळ आहेत. व मुख इत्यादि सर्व अवयव मलांनींच पूर्ण भरलेले आहेत. तेव्हां असल्या मांसपुत-

ळींत त्वचा, मांस, रुधिर व हाड यांवांचून चांगलें तें काय असणार? मग कशाकरितां पुरुष ' अहो! जणू ही शशांकलेखाच आहे कीं काय? किंवा मधु व अमृताच्या• अवयवांनीं खरोखर ही उत्पन्न झाली असावी. ही अमृतमय अशी चंद्रमंडळांतून नुक्तीच निघाली असावी. तशीच कमलपत्राक्षी, हंसगमना, ही सुंदर कन्या हावभावानें युक्त अशा नेत्रानें सर्व प्राण्यांचें समाधान करीत आहे.' इत्यादि मनांत आणून मोहांत पडतो?

स्त्री ही एक अग्नि अथवा विषवल्ली यांहीपेक्षां अधिक आहे. तिला पाहिल्याबरोबर किंवा तिचें स्मरण झाल्याबरोबर सर्व देहास ताप होतो; किंवा कामरूप विष सर्व शरीरांत चढतें. ती विधीची मर्यादा सोडून सेवन केली असतां धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचा नाश करून नरकांत टाकून जीवात्म्याला चौऱ्याशीं लक्ष योनी फिरावयास लावते; म्हणून इंद्रियनियमन करणाऱ्या पुरुषानें तिच्याविषयीं वासना अगदीं सोडून द्यावी.

दुसऱ्याला दाखविण्याकरितां किंवा लोकांत प्रतिष्ठा• मिळविण्याकरितांच नव्हे तर केवळ आपल्या उद्धाराकरितां एकनिष्ठ ब्रह्मचर्यव्रत राखून निष्काम भक्ति करावी.

निजण्याच्या वेळीं बिछान्यावर बसून सर्व विषयांतून मन काढून कांहीं वेळ भगवद्भजनांत निमग्न व्हावें. • नंतर झोंप येतेशी वाटली कीं तत्काल डाव्या कुशीवर निजावें. रात्रीं खुराकाचे पदार्थ फारसे खाऊं नये. फार वेळ निजूं नये; व निजल्यानंतर चांगली एक झोंप झाली कीं लागलेंच उठावें; नंतर पुनः निजूं नये. कारण, पुनः निजल्यानें पुष्कळ वेळां स्वप्नें पडून वीर्यपात होण्याचा संभव आहे.

नाटक, तमाशे वगैरे पाहूं नयेत; कारण त्यांतील नटाच्या हावभावानें मनास विकार उत्पन्न होऊन तत्काळ वीर्यपात होतो.

अतिशय पुष्टिकारक पदार्थ खाण्याविषयीं व अतिशय तिखट, खारट, आंबट इत्यादि राजस व तामस पदार्थांच्या खाण्यापिण्याविषयीं बिलकुल इच्छा करूं नये. शरीर निर्मल ठेवावें; परंतु ज्यापासून मिजास अधिक वाढेल असें होऊं देऊं नये. स्त्रीपुरुषांविषयीं समान दृष्टि ठेवून स्त्रींत व शिळेंत कांहीं अंतर नाहीं इत्यादि विचार करून ब्रह्मचर्य दृढ करावें. सर्व इंद्रियांमध्यें जिव्हेचा जय होणें फार कठीण आहे; करितां तिचा आधीं जय करावा म्हणजे एकनिष्ठ ब्रह्मचर्य सिद्ध होतें.

नेहमीं गैरसावध व दीर्घसूत्री मनुष्य निःसंशय नाश पावतो; व त्याच्या इच्छा सर्व जागच्या जागींच राहून जातात. कनक, कांता व रसस्वाद हे पदार्थ अभ्यासी योग्याच्या चित्ताला त्वरित आपणांकडे आकर्षण करितात. जेथें स्त्रिया बसल्या असतील तेथें तरुण ब्रह्मचाऱ्यानें जाऊं नये, व आपण बसलों आहोंत त्या जागीं जर त्या आल्या तर आपण तत्काळ त्या जागेवरून उठून एकीकडे जावें. जेथें एकांतस्थळीं स्त्रिया न्हात धूंत असतील अथवा आपल्या

अंगास कांहीं चोळीत असतील तेथेंही जाऊं नये. मार्गामध्यें मोठ्या संकटावांचून स्त्रीबरोबर ब्रह्मचाऱ्यानें चालूं नये. ज्या बागेंत वगैरे ठिकाणीं स्त्रिया निजल्या असतील तेथें किंवा त्याच्या आसपासही निजूं नये. सर्व ठिकाणीं परमेश्वर पहात आहे ह्मणून 'कोणी पहात नाहीं' अशा समजुतीनें एकांतस्थळीं वाईट कर्म करण्यास प्रवृत्त होऊं नये. कोणत्याही प्राण्यांचें मैथुन चाललें असतां तिकडे पाहूं नये. सृष्टिविरुद्ध कर्म, हस्तक्रिया, तशीच देवयोनिसंभोगाची इच्छा करूं नये.

गृहस्थ पुरुषानें आपल्या स्त्रीशीं ऋतु प्राप्त झाल्यानंतर शास्त्रोक्त रीतीनें व सांगितलेल्या रात्रींस गमन केलें असतां ब्रह्मचर्य भ्रष्ट होत नाहीं; ऋतुकाळावांचून व विहितरात्रींवांचून एक वेळ गमन केल्यानेंही ब्रह्मचर्य भ्रष्ट होतें.

४ **ब्रह्मचर्य-बिंदुविचार**:–'ब्रह्मचर्यांत सर्व धर्म अंतर्भूत होतात,' असें छांदोग्य उपनिषदांत सांगितलें आहे. त्यांत बिंदुनिरोध तर योगास अत्यंत साधक आहे हें प्रत्यक्ष सिद्ध करितां येतें; पहा,–बिंदु ह्मणजे वीर्य हें चल ह्मणजे स्खलन झालें असतां चित्त चल होतें; आणि त्यापासून वायुही अस्थिर (चल) होतो. त्यामुळेंच प्राणी जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतो यांत संशय नाहीं. व ज्या वेळेस वायु सुषुम्नारूप मध्यमार्गांत प्रवेश करितो; तेव्हां तो स्वस्थ होतो व त्याबरोबर बिंदु व चित्त स्थिर होतात. वायूला जी जी अवस्था प्राप्त होते त्या त्या अवस्थेप्रत बिंदूही प्राप्त होतो. याकरितां वायूच्या साधनाकरितां झटावें ह्मणजे त्यानेंच बिंदूचें साधन होणार आहे. तो मूर्च्छित झाला असतां व्याधि दूर करितो; बद्ध झाला असतां आकाशगमन इत्यादि प्राप्त होतें; लीन झाला असतां सर्व सिद्धि देणारा होतो; व निश्चल झाला असतां मुक्ति देणारा होतो. जशी जशी बिंदूची अवस्था होते तशी तशी चित्ताची अवस्था होत जाते. तात्पर्य, बिंदुनिरोध अवश्य केला पाहिजे. बिंदुनिरोध न केला असतां स्खलनानंतर तत्काल अशक्तता प्राप्त होते हा बहुतेकांस अनुभव आहे. बिंदुनिरोध न केल्यामुळें जरा (वृद्धापकाल) लवकर प्राप्त होते, आणि लवकरच मरण येतें. बिंदुनिरोधानेंच वायुपुत्र श्रीमद्धनुमान् श्रीरामचंद्रप्रभूचें कार्य करून सर्वमुकुटमणि होऊन जो चिरंजीव झाला. तसाच भक्तशिरोमणि भीष्मपितामह बिंदुनिरोधानेंच ज्ञानविज्ञानसंपन्न होऊन रणांत श्रीकृष्णाचीही प्रतिज्ञा भंग करण्यास जो समर्थ झाला; आणि ज्यानें आपल्या इच्छेनें उदगयनांत देहत्याग केला. याप्रमाणेंच उद्दालक, वीतहव्य इत्यादिक स्वेच्छेनें देहत्याग करिते झाले. याकरितां बिंदुनिरोध करणें फार जरुरीचें आहे. जोंपर्यंत अब्रह्मचारी आहे तोंपर्यंत कसलाही यत्न केला असतां योग सिद्ध होणार नाहीं. व बिंदुक्षयानें जरा व मरण प्राप्त होऊन पुनः अनेक योनींत उत्पन्न होणें चुकणार नाहीं.

ब्रह्मचर्यापासून चित्तजय होतो. जसा प्राणाचा चित्ताशीं निकट संबंध आहे तसा या

स्थूलशरीरांतील सारभूत शुक्राशींही आहे. जशी प्राणायामांनीं आयुष्याची वृद्धि होते तशी शुक्रापासून सुद्धां अद्भुत शक्ति प्राप्त होते. जसें, बीजाचें उत्तम रीतीनें रक्षण केलें असतां त्यापासून वृक्ष चांगला जोमदार उत्पन्न होतो, त्याप्रमाणें शुक्राच्या प्रभावानें शरीर स्वस्थ व अचल राहतें. ह्मणून हठयोगप्रदीपिकेंत सांगितलें आहे; कीं,–'बिंदूचें उत्तम रीतीनें रक्षण केलें असतां योगी कालासही जिंकितो. बिंदुपातानें मरण येतें; व बिंदुनिरोधानें जीवन होतें. बिंदुधारण केलें असतां योग्याच्या शरीरास सुगंध येतो. जोंपर्यंत बिंदु स्थिर आहे तेथपर्यंत कालाचें भय कोठून असणार? पुरुषाचें शुक्र चित्ताधीन आहे व शुक्राधीन जीवित आहे. याकरितां शुक्राचें व मनाचें मोठ्या प्रयत्नानें रक्षण करावें.' याप्रमाणें साधुपुरुष उपदेश करीत असतां अविद्येच्या योगानें मोहित झालेला पुरुष दृष्टि असून कुव्यांत पडतो त्यास त्याचें नशीब! परंतु विवेकी पुरुषानें वरील उपदेशाप्रमाणें ऊर्ध्वरेता ( बिंदुनिरोध करणारा ) होणें उत्तम पक्ष आहे. आतां जो ऊर्ध्वरेता राहूं शकत नाहीं अशा मंद अधिकाऱ्याकरितां सुद्धां शास्त्रांत उपाय सांगितले आहेत. ते असे कीं, त्या पुरुषानें शास्त्रविधीप्रमाणें गृहस्थाश्रम करावा. आणि विधीप्रमाणेंच स्त्रीसंगादि केलें असतां कांहीं शुक्राचा नाश होत नाहीं. आणि उत्तमलोकप्राप्ति होते.

पहिल्या पादांत पस्तिसाव्या सूत्रांत विषयवती प्रवृत्तीमध्यें ज्ञानेंद्रियविषयक जे दिव्य भोग सांगितले आहेत, त्यांचा अतिदेश कर्मेंद्रियालाही होऊं शकतो. विषय दोन प्रकारचे आहेत; दिव्य आणि अदिव्य. त्याप्रमाणें सुखभोग सुद्धां दोन प्रकारचा आहे; दिव्यभोग आणि अदिव्यभोग. बाह्यविषयांत आसक्त झाल्यामुळें प्रत्यग् दृष्टि झाली नाहीं ह्मणून जिज्ञासु ( जाणण्याची इच्छा करणारा ) आहे, असा मंद अधिकारी धर्मशास्त्राच्या विधीप्रमाणें गृहस्थाश्रम घेऊन संसारयात्रा करितो, त्याचा भोग अदिव्य आहे; ह्मणजे त्या पुरुषाला तो भोग शास्त्राप्रमाणें असल्यामुळें पापी पुरुषापेक्षां हा भोग प्रशस्त आहे असें वाटून आभ्यंतर दृष्टि नसल्यामुळें खऱ्या तत्त्वाचा अनुभव त्याला येत नाहीं; ह्मणून अदिव्य भोग असें ह्मटलें. ज्या वेळेस आभ्यंतर दृष्टि येते त्या वेळेस तेच भोग दिव्य होतात. याकरितांच हठयोगादिकांत वज्रोली मुद्रा सांगितली आहे; ती येणेप्रमाणें,–

**अथ वज्रोलीः**—'जरी स्वेच्छेनें वागत आहे व योगशास्त्रांत सांगितलेल्या नियमांप्रमाणें बिलकूल वागत नाहीं; तथापि ज्याला वज्रोली मुद्रा माहित आहे; त्या योग्यास योगसिद्धि होते. तीविषयीं दोन पदार्थ मोठे साधक आहेत; ते भाग्यवानांवांचून वाटेल. त्याला मिळणें परम कठीण आहेत. एक तर स्त्रीसंगानंतर दूध पिण्यास; व दुसरा पदार्थ आपल्या मनाप्रमाणें वागणारी स्त्री. वज्रोली मुद्रेचा प्रकार असा,–स्त्रीसंगानंतर ज्यांतून वीर्यपात होतो अशा शिश्नानामक इंद्रियानें मोठ्या प्रयत्नानें वीर्याला वर आक-

र्षण करण्याचा अभ्यास करावा. ह्मणजे इंद्रियाला वर वर आकुंचन करून मोठ्या प्रयत्नानें वीर्य वर ओढून घेण्याचा अभ्यास करावा. याप्रमाणें पुरुषानें अथवा स्त्रीनें कोणींही केलें असतां वज्रोलीसिद्धि होते. (याचा अभिप्राय असा,)—शिश्नाच्या छिद्रांत शिरेल अशी बेताची जाडी शिशाची चवदा बोटें लांबीची गोल अशी एक सळई करवावी. (ती बारा बोटें लांब सारखी असूं द्यावी; व दोन बोटें वळवावी.) तिला कांहीं स्निग्ध पदार्थ लाऊन सरळ बाजूनें दररोज एक एक बोट ती सळई शिश्नाच्या भोंकांत धीरे धीरे घालण्याचा अभ्यास सुरू ठेवावा. ह्मणजे पहिले दिवशीं एक बोट, दुसरे दिवशीं दोन बोट, तिसरे दिवशीं तीन, याप्रमाणें बारा बोटांपर्यंत सळई आंत घालण्याचा अभ्यास करावा. याप्रमाणें केलें असतां शिश्नाचा मार्ग शुद्ध ( खुला ) होतो. त्यानंतर पुनः त्याप्रमाणें ह्मणजे चवदा बोटें लांबीची व तितकीच जाडीची अशी एक चांदीची आरपार पोकळ नळी करवावी. ती बारा बोटें लांब सरळ असूं देऊन दोन बोटें वळवावी. ( वळविलेल्या भागाकडील नळीचें तोंड थोडें मोठें असूं द्यावें ह्मणजे त्यांत पुढें सांगावयाच्या दुसऱ्या नळीचें तोंड आंत थोडेंसें जुळून बसूं शकेल. ) ती तयार करविलेली चांदीची नळी पूर्वीप्रमाणें कांहीं स्निग्ध पदार्थ लाऊन हलकें हलकें शिश्नाच्या भोंकांत बारा बोटें घालावी; बाकीचा दोन बोटें भाग बाहेर ठेवावा. त्यानंतर सोनाराची अग्नीस फुंकण्याची लांब नळी ( फुंकणी ) असते; ( ही नळी दिव्यावर सोन्याचे रवे तयार करतांना फुंकण्याकरितां आपले सोनार लोक प्रायः घेत असतात; गुजराथी वगैरे सोनाराची तर नेहमींच फुंकण्याची अशी नळी असते. तिचें तोंड एकीकडे फार बारीक असतें. ) तिच्याप्रमाणें एक नळी ह्मणजे फुंकणी घेऊन तिचें एक बारीक तोंड शिश्नांत घातलेल्या चांदीच्या नळीच्या दोन बोटें बाहेर असणाऱ्या वांकड्या तोंडांत शिरकवून दुसरें मोठें तोंड आपल्या तोंडाजवळ धरून त्यांत प्रथम अग्नि पेटवितांना जशी हलके हलके फुंक मारितों त्याप्रमाणें फुंकावें. असें केल्यानें इंद्रियमार्ग चांगला शुद्ध होतो. त्यानंतर त्या इंद्रियानें पाणी, दूध वगैरेंस वर ओढून घेण्याचा अभ्यास करावा. पाणी वगैरे वर आकर्षण करतां येऊं लागलें ह्मणजे मग पूर्वी सांगितल्याप्रमाणें रतिसमयीं स्त्रीच्या योनींत पडलेलें वीर्य वर आकर्षण करण्याचा अभ्यास करावा. बिंदु ( वीर्य ) वर आकर्षण करतां येऊं लागला ह्मणजे वज्रोलीमुद्रा सिद्ध झाली असें समजावें. वज्रोली मुद्रा, प्राणजय व खेचरी मुद्रा ह्या दोघांची सिद्धि झाल्यावांचून चांगली सिद्ध होत नाहीं. रतिकालीं स्त्रीच्या योनींत बिंदु पडत आहे तोंच पूर्वी वज्रोली मुद्रेच्या अभ्यासानें तो वर आकर्षण करावा. ही बिंदुपात होण्याच्या पूर्वीच सावधगिरी ठेविली पाहिजे. जर कदाचित् अवधान न राहतां बिंदु पडलाच तर मग पुनः तो वर आकर्षण करून ठिकाणीं स्थापन करावा. याप्रमाणें जो बिंदूचें उत्तमप्रकारें रक्षण करितो, तोच खरें योगाचें तत्त्व जाणणारा मृत्यूला जिंकितो; कारण, वीर्य-

पातानें मरण येतें, व वीर्यरक्षणानें जीवन होतें. याकरितां बिंदूचें रक्षण अत्यावश्यक केलें पाहिजे. वज्रोलीमुद्रेचा अभ्यास करणाऱ्या योग्याच्या शरीराला उत्तम सुवास येऊं लागतो. जोंपर्यंत शरीरांत बिंदु उत्तमरीतीनें स्थिर आहे तोंपर्यंत कालाचें भय कोठून असणार? ( अर्थात् मृत्यूचें भय मुळींच नाहीं. ) चित्ताच्या अधीन पुरुषाचें वीर्य आहे व वीर्याच्या अधीन सर्व जीवित आहे; याकरितां वीर्य व मन या दोहोंचें मोठ्या प्रयत्नानें रक्षण केलें पाहिजे. जिला ऋतु प्राप्त झाला आहे अशा स्त्रीचें रज सुद्धां रतिकालीं आपल्या वीर्या-बरोबर वज्रोलीचा अभ्यास जाणणाऱ्या योग्यानें वर आकर्षण करून पूर्वीप्रमाणें स्थापन करावें. सहजोलि व अमरोलि ह्या दोन मुद्रा वज्रोलीहून कांहीं पृथक् नसून वज्रोलीचाच एक विशेष भेद आहे. वज्रोलीमुद्रेचा अभ्यास करण्याकरितां केलेलें जें मैथुन, त्या मैथुना-नंतर सोडून दिला आहे रतिव्यापार ज्यांनीं व सुखानें बसलेले अशा त्या स्त्रीपुरुषांनीं, गाईच्या शेणाचे गोळे उत्तमरीतीनें वाळवून त्याचें तयार केलेलें भस्म पाण्यांत कालवून मस्तक, कपाळ, डोळे, हृदय, दोन्ही खांदे व दोन्ही हात इत्यादि अंगांस त्याचा लेप करणें; या क्रियेस मत्स्येंद्र इत्यादि योग्यांनीं सहजोलि मुद्रा असें ह्मटलें आहे. योग्यानें हिच्यावर नेहमीं श्रद्धा ठेवण्यास ही योग्य आहे. हा सहजोलि नांवाचा उपाय कल्याणकारक असून भोग भोगीत असतांही मुक्ति देणारा आहे. हा योग जे पुण्यवान्, धैर्यशील, तत्त्ववेत्ते व निर्मत्सर असतील अशा पुरुषांनाच साध्य होणारा आहे; जे दुसऱ्याचा हेवा करणारे व पापी वगैरे असतील त्यांना हा योग साधणारा नव्हे.

**अपरिग्रहः**—शरीररक्षणास लागणाऱ्या अवश्य साधनांपेक्षां अधिक भोगसाधनाचा स्वीकार न करणें यास अपरिग्रह असें ह्मणतात. पहा! भक्तिमान् गृहस्थाश्रमी पुरुष ह्या पृथ्वीवर थोडे आहेत काय? कीं ज्यायोगानें पवित्र भिक्षान्न मिळणार नाहीं, ह्मणून धन व धान्य इत्यादिकांचा संचय करून ठेविला पाहिजे. दोन हातांची अंजलि ( ओंजळ ) जवळ असतां पात्राची काय गरज आहे? मोठमोठ्या शिला मोकळ्या पडल्या असतां व आपले भुज जवळ असतां गादी, उशा वगैरेंची काय गरज आहे? उत्तम प्रकारचीं मोठालीं पत्रें व वल्कलें शरीर झांकण्यास असतां वस्त्राची काय गरज आहे? पर्वताच्या गुहा वगैरे असतां राहण्यास घर कशाकरितां बांधलें पाहिजे? कारण ह्या सर्वांचा जों जों संग्रह जास्ती करीत जावा, तसतसा अधिकच त्यांपासून संताप प्राप्त होतो. जे अपरिग्रह ह्मणजे कोणत्याही वस्तूचा संचय न करितां वर सांगितलेल्या पदार्थांवर निर्वाह करितात ते मोठ्या आनंदानें असतात. याकरितां अपरिग्रहाचा अभ्यास सतत करावा.

**यमांविषयीं विशेष विचारः**—आतां हठयोगप्रदीपिका इत्यादिग्रंथांत '१ अहिंसा, २ सत्य, ३ अस्तेय, ४ ब्रह्मचर्य, ५ क्षमा, ६ धृति (धैर्य), ७ दया, ८ आर्जव, ९ मिताहार

व १० शौच;' याप्रमाणें यम दहा सांगितले आहेत; आणि अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, हे चार येथें यमांत सांगितले आहेत; व शौच पुढें नियमांत सांगितलें आहे. बाकी १ क्षमा, २ धृति, ३ दया, ४ आर्जव व ५ मिताहार हे पांच राहिले; यामुळें सूत्राला कमीपणा आला असें मुळींच समजूं नये; कारण, या पांचांचा प्रायः अहिंसा इत्यादिकांतच समावेश होऊं शकतो. तथापि थोडक्यांत त्यांचें येथें पृथक् विवेचन करितों,–

१ **क्षमाः**–ज्ञानी लोकांचें क्षमा हें मोठें भूषण आहे. दुसऱ्यानें वाईट भाषण केलें असतां तें सहन करणें हाच ज्ञानी पुरुषास परमधर्म आहे. कोणीं उपहास (थट्टा) केला असतां क्रोध येऊन क्षमा सोडून देऊं नये. ज्यानें धर्माचें पाळण केलें त्याचें, तो रक्षित ( पाळलेला ) धर्मच रक्षण करितो. व धर्म सोडला असतां तो सोडलेला धर्मच त्याचा नाश करितो. क्षमा राखून नेहमीं शांत राहण्यानेंच सत्यसुखाचा अनुभव प्राप्त होतो. प्रत्येक प्राण्याच्या हृदयांत परमेश्वर अंतर्यामिपणानें वास करितो असें समजून कोणावर कधीं रागावूं नये; नेहमीं क्षमाच करावी. अज्ञानी लोकांनीं केलेला उपहास, त्यांनीं केलेलें दुष्ट भाषण व त्यांनीं दिलेलें दुःख ह्यांस ज्ञानी लोक क्षमेचा नेहमीं अभ्यास केल्यामुळें मुळींच जुमानीत नाहींत; व त्यांच्यावर क्रोध करीत नाहींत. क्षमा हीच, ब्रह्माच्या ठिकाणीं रममाण झालेल्या साधूंना शोभविणारें भूषण आहे.

२ **धृतिः**–विचारी पुरुष संकटांत घाबरून धीर सोडीत नाहींत. वैष्णव लोक संकटांत सुख मानितात. ह्या लोकच्या क्षणिक सुखाकरितां धैर्य सोडून देऊन त्या सुखांत आसक्त होणें, हें अविचारी पुरुषाचें काम आहे. नेहमीं इंद्रियें, मन इत्यादिकांच्या विकारास जिंकण्यास सावध असावें; धैर्य सोडूं नये. ते विकार आपल्यावर अंमल चालवूं लागले असतां त्यांच्या स्वाधीन आपण होऊं नये. जे धैर्य धरून विकारांच्या लढाईंत टिकाव धरितात, तेच ईश्वराच्या कृपेस पात्र होतात. पाहिजे तसें दुष्टलोकांकडून दुःख प्राप्त होवो; किंबहुना आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक दुःखांचा पर्वत जरी आपल्यावर कोसळला, तथापि शांतिमान् पुरुषानें धैर्य ह्मणून कधीं सोडूं नये.

३ **दयाः**–गरीब प्राण्यावर त्याचें दुःख व त्याची गरिबी पाहून ममता करणें याला दया ह्मणतात. जर कदाचित् आपल्याजवळ दान देण्याला द्रव्य नाहीं तर सर्व प्राण्यांवर आपल्या मनांत ममता ठेवून त्याप्रमाणें नेहमीं वर्तन ठेवावें. ज्या वेळेस परस्परांत कलह होऊन क्रोध उभयतांस जाळूं लागतो, त्या वेळेस दया ही दोघांसही थंड करून उभयतांच्या ज्ञानवृक्षास वाढविते.

४ **आर्जवः**–अहंपणाचा त्याग करून सर्वांशीं गरिबीनें वागणें याला आर्जव ह्मणतात. परमहंस पुरुष नेहमीं अहंमतीचा त्याग करून 'आत्म्याला कोणी ओळखीत नाहींत,' असें

**जातिदेशकालसमयानवच्छिन्नाः सार्वभौमा महाव्रतम् ॥ ३१ ॥**

ब्राह्मणत्व वगैरे जाति, तीर्थ इत्यादि देश, चतुर्दशी इत्यादि काल व ब्राह्मणप्रयोजन इत्यादि संकेत, ह्यांच्या संबंधाचा कांहीं विचार न करितां अहिंसादिकांचें एकसारखें

---

जाणून कोणी निंदा अथवा स्तुति केली असतां कांहींच मनास आणीत नाहींत. रागादि दोष ज्यानें जिंकिले आहेत असा योगी आपण श्रेष्ठ असूनही सर्वांला वंदन करितो; व 'मी मोठा आहें' असा अभिमान कधींही बाळगीत नाहीं. लहानांत लहान झाल्यानेंच मोठ्यांत मोठा होतो. असें हें ज्ञानाचें तत्त्व जाणून स्वादादिक विकारांला जिंकिलें आहे ज्यांनीं असे साधु पुरुष नेहमींच नम्रता धारण करितात. दृश्य वस्तूंवरची ज्यांची प्रीति नष्ट झाली आहे व चेतनांविषयीं ज्यांचें मन लीन झालें आहे, अशा साधु पुरुषांचें चित्त परमेश्वराचे ठिकाणीं लीन होतें. मान व अपमान यांविषयीं ज्याची चित्तवृत्ति समान झाली आहे, अशा यतीची नेहमीं निर्मान ( अभिमानरहित ) अशीच वृत्ति राहते. हृदय, वाणी आणि मन यांच्यांत कोमलता किंवा सरलता राखणें यालाच आर्जव ह्मणतात.

९ **मिताहारः**—धष्टपुष्ट होण्याकरितां किंवा हौसेकरितां नव्हे, तर केवळ क्षुधेचा नाश व्हावा याकारितां भगवंताला निवेदन केलेल्या अन्नांतून औषधमाफक प्राण वांचावा ह्मणून सूक्ष्म आहार ( पदार्थांचें भक्षण ) करणें ह्याला मिताहार ह्मणतात. खाण्याचे पदार्थ व पिण्याचे पदार्थ अनियमितपणानें सेवन केले असतां रोगाची उत्पत्ति होऊन शांतीचा भंग होतो. खुराकाचे पदार्थ जेवढे सहज पचन होतील, तेवढेच बेतानें खावेत. दोन भाग अन्न व एक भाग पाणी सेवन करून एक भाग वायूकरितां रिकामा ठेवावा. खाण्याचें मान सकाळीं अमुक घास व संध्याकाळीं अमुक घास असें ठरविलें असेल किंवा दुसऱ्या कोणत्या तरी एकाद्या रीतीनें बांधलेलें असेल तर फार चांगलें.

**अथ पथ्यविचारः**—गहूं, तांदूळ, जव, साठी (साठ दिवसांत तयार होणारे भात), सावे, राळे, दूध, तूप, लोणीं, सुंठ, सैंधव, सुरण, राताळीं कंद, फणस, मूग, तुरीची दाळ, साखर, खडीसाखर इत्यादि व धर्मशास्त्रांत सांगितलेले श्राद्धप्रकरणांतील सर्व सात्विक पदार्थ खाण्यास योग्य आहेत. तुपाचा व दुधाचा उपयोग विशेष बेतानेंच करावा.

**अपथ्यविचारः**—अतिशय आंबट, तुरट, कडू, तिखट, तेलकट, खारट, दहीं, ताक, कांजी, तीळ, मोहऱ्या, शिळें अन्न, पुनः ऊन केलेलें अन्न, असे राजस पदार्थ अगदीं खाऊं पिऊं नयेत. तसेच लसून, कांदे, मुळे, गाजरें, हुलगे, पालाभाजी, ओल्या भाज्या, तेल, हिंग, उडीद, हे पदार्थ योग्यानें सर्वथा वर्ज्य करावे. मत्स्य, मांस, मद्य, अफू, गांजा वगैरे कैफी पदार्थ, सुपारी, ऊन पाणी इत्यादिक तसेच धर्मशास्त्रांत निषिद्ध केलेले आणखी अन्य पदार्थ सर्व वर्ज्य करावे. फार भोजन, अति निद्रा, अति बोलणें, भूक लागल्यावांचून खाणें, चंचलता,

सतत पाळण करणें हें योगाचें महाव्रत आहे. तात्पर्य, ' ब्राह्मणाला मारणार नाहीं ' असाच केवळ नियम पाळण करावयाचा आणि बाकीच्याविषयीं नाहीं; असा विचार न करितां एकसारखें सतत अहिंसा इत्यादि पाळलें असतां लवकर योग सिद्ध होतो. याविषयीं विशेष विस्तार याच सूत्रावरच्या भाष्यांत केला आहे तो पहावा.

**शौचसंतोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः ॥ ३२ ॥**

शौच ह्मणजे शुद्धि, ती दोन प्रकारची; बाह्य ( बाहेरील ) व आभ्यंतर (आंतील). त्यांत मृत्तिका, पाणी इत्यादिकांनीं शरीर इत्यादिकांचें धुऊन स्वच्छ ठेवणें ही बाह्य शुद्धि; व मैत्री इत्यादि भावनांनीं द्वेष इत्यादिक चित्ताचा मल दूर करणें याला आभ्यंतर शुद्धि ह्मणतात. संतोष ह्मणजे तुष्टि ( तृप्ति ). तप, संतोष व ईश्वरप्रणिधान या तिघांचें स्वरूप पूर्वी ( सा० सू० १ त ) सांगितलें. याप्रमाणें शौच ( शुद्धि ) इत्यादि पांचांस नियम असें ह्मणतात.

---

अति व्यायाम, अति मैथुन, अति मार्गक्रमण, दुर्जनसंगति, अग्नीजवळ शेकत बसणें, धांवत चालणें इत्यादि सर्व अपथ्य होय.

सूत्र ३२ टीपः-१ **नियम** ( हें योगांतील द्वितीयाङ्ग होय )

१ शौच, २ संतोष, ३ तप, ४ स्वाध्याय व ५ ईश्वरप्रणिधान असे ५ पांच नियम आहेत; ते येणेंप्रमाण,–

१ **शौचः**–बाह्य व आभ्यन्तर असें दोन प्रकारचें शौच आहे. मृत्तिका व पाणी यांनीं होणारी शुद्धि बाह्य शौच; व अंतःशुद्धि हें आभ्यंतर शौच होय. वृद्धगौतमस्मृतींत 'मनःशौच ( अंतःकरणशुद्धि), कर्मशौच ( नित्यनैमित्तिककर्मांनीं होणारी शुद्धि ), कुलशौच ( चांगल्या कुळांत जन्म असल्यामुळें शुद्धि ), शरीरशौच ( मृत्तिका व पाणी यांनीं होणारी शरीराची शुद्धि ), वाक्छौच ( तोंडानें सत्य व प्रिय भाषण करणें ), असें पांच प्रकारचें शौच सांगितलें आहे. या सर्वांचा अंतर्भाव या दोहोंत होतो. या दोहोंपैकीं आभ्यंतर शौच मुख्य आहे; कारण, सत्वशुद्धीवांचून ( अंतःकरणशुद्धीवांचून ) बाह्यशौचाचा कांहींएक उपयोग होत नाहीं. ह्मणूनच सांगितलें आहे कीं, ' जर एक अंतःकरण निर्मल नाहीं तर, त्रिदंडी संन्यास, मौन, जटा वाढविणें, किंवा केश मुंडून टाकणें, वल्कलें व कृष्णाजिन धारण करणें, कडकडीत व्रतें करणें, तीर्थादिकांचीं स्नानें करणें, अग्निहोत्र घेणें, अरण्यांत राहणें, वेदाध्ययन करणें, ध्यान करीत बसणें, इत्यादि सर्व कर्में व्यर्थ आहेत. '

आरोग्य, वायूचें इष्टस्थलीं अवधारण, अग्नीची प्रदीप्ति, व नादाभिव्यक्ति ह्या सर्व गोष्टी नाडीच्या शोधनानें होतात. ह्मणून अंतःशरीरशुद्धीकरितां साधकांना कितीएक सत्पुरुष ' १ धौति, २ बस्ति, ३ नेति, ४ त्राटक, ५ नौलि व ६ कपालभाति' या सहा कर्मांचा उपदेश करिताहेत. त्यांचें स्वरूप हठयोगप्रदीपिकेंत सांगितलें आहे; तें असें,–

**अथ धौतिः**—सुमारें चार बोटें रुंद, पंधरा हात लांब असें नवें बारीक जगन्नाथीचें स्वच्छ वस्त्र घेऊन दोन चार वेळां ऊन पाण्यांत धुऊन गुरूनें सांगितल्या रीतीप्रमाणें ऊन पाणी अथवा दूध यानें थोडें भिजवून हलके हलके तोंडांत घालून तें भोजनाप्रमाणें गिळावें. नंतर या तऱ्हेचें धौतिकर्म करून पुनः तें वस्त्र बाहेर काढावें. त्यांत पहिले दिवशीं एक हात वस्त्र गिळून बाहेर काढावें, दुसरे दिवशीं दोन हात, तिसरे दिवशीं तीन हात, याप्रमाणें दररोज अभ्यास वाढवीत वाढवीत पंधरा दिवसांत पंधरा हात गिळावें. ज्या वेळेस पंधरा हात वस्त्र गिळलें जाईल तेव्हां त्या वस्त्राचा शेवट दांतांत धरून नौलिकर्म केल्यानंतर तोंड उघडून हलके हलके पुनः तें वस्त्र बाहेर काढावें. या धौतिकर्माचा रोज एकसारखा अभ्यास केला असतां कास, श्वास, प्लीहा, जलोदर, कुष्ठ इत्यादिक कफापासून उत्पन्न होणारे वीस प्रकारचे रोग दूर होतात.

**अथ बस्तिः**—नदी इत्यादिकांच्या बेंबी इतक्या स्वच्छ पाण्यांत प्रवेश करून करांगुळी ( करंगळी ) मावेल अशा बेताची पोकळ सहा बोटें लांबीची कोंवळ्या वेळूची नळी घेऊन गुदद्वारांत ( मलद्वारांत ) चार बोटें घालावी व दोन बोटें बाहेर ठेवावी. त्यानंतर उत्कटासन करून ( पायांच्या चवड्यांवर अर्घ्यप्रदानासारखें बसून ) नौलिक्रियेनें पोटांत असणाऱ्या वेळूच्या नळीस उत्थापन करून अपानवायूच्या वर आकर्षणानें नौलिकर्म करून सर्व पाणी सोडून द्यावें. नंतर जें कांहीं पाणी पोटांत बाकी राहिलें असेल तें मयूरासन करून काढून टाकावें. याप्रमाणें कांहीं दिवस अभ्यास करितां करितां पुढें नळीवांचून पाण्याचें आकर्षण करितां येतें. या बस्तिकर्मानें वात, पित्त व कफ यांपासून उत्पन्न होणारे जितके गुल्म, प्लीह, अजीर्ण आदि रोग आहेत, त्यांचा नाश होतो; धातूची वृद्धि होते; इंद्रियांची व मनाची स्वस्थता, शरीराची उत्तम कांति, व जठराग्नि प्रदीप्त होतो.

**अथ नेतिः**—ज्याला कोठें गांठी नाहींत असें नवें, स्वच्छ व बारीक तीन चार विती लांबीचें सूत घेऊन तें नाकाच्या आंतील भोंकांत मावेल या बेताचें दहापट, वीसपट अथवा पंचवीसपट करून पुढें सुमारें एक वीतभर भागास पीळ घालावा; व बाकीचा भाग तसाच राहूं द्यावा. याप्रमाणें ती दोरी तयार झाल्यावर गुंफलेल्या भागाचा शेवट धरून एका नाकपुडींत हलके हलके खुपसावा; तो शेवट तोंडांत पडजिभेच्या पुढें आला म्हणजे तोंडांत बोटें घालून शेवट धरून बाहेर हलके हलके ओढावा. अथवा पीळ घातल्यावांचूनच पूर्वीचें दहावीसपट केलेलें सूत एका नाकपुडींत घालून दुसरी नाकपुडी बोटानें बंद करून पूरक करावें ( बाहेरचा वायु आंत ओढावा ), नंतर तोंड उघडावें; पुनः पूरक करून तोंडावाटें वायु सोडावा. याप्रमाणें वरचेवर केलें असतां दोऱ्याचा शेवट पडजिभेजवळ येईल; तो बोटानें धरून बाहेर ओढून काढावा. यानंतर नाकाच्या भोंकाबाहेर राहिलेला शेवट एका

हातानें व तोंडांतून बाहेर आलेला शेवट दुसऱ्या हातानें धरून दोन्ही हातांनीं काढघाल हलके हलके करावी. याप्रमाणें विधि एका नाकपुडीचा झाला ह्मणजे दुसऱ्या नाकपुडींत दोरा घालून पूर्वीप्रमाणें सर्व प्रकार करावा. याचप्रमाणें एका नाकपुडींत सूत घालून दुसरी नाकपुडी बोटानें दाबून श्वास आंत ओढून पूर्वी बंद केलेल्या दुसऱ्या नाकपुडीवाटे बाहेर सोडावा; असें वरचेवर करावें ह्मणजे दुसऱ्या नाकपुडीवाटेच सूत बाहेर येईल; नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें दोन्ही शेंडे धरून काढघाल करावी. याप्रमाणें तीन चार वेळां करावें. हा प्रकार जेव्हां पुष्कळ वेळां करावा तेव्हां कदाचित् साधतो. याला मोठमोठे सिद्ध 'नेतिक्रिया' असें ह्मणतात. या क्रियेच्या अभ्यासापासून कपाळाची शुद्धि व नेत्राची दृष्टि अतिसूक्ष्म होते ( दृष्टीनें अतिसूक्ष्म पदार्थ दिसूं लागतो ). मस्तकरोग, नेत्ररोग, याप्रमाणेंच कंठाच्या वरच्या भागास जेवढे ह्मणून होणारे रोग आहेत तेवढे सर्व रोग या नेतिकर्मानें बरे होतात.

**अथ त्राटकः**—डोळे चांगले उघडे ठेवून एका पदार्थाकडे ( नाकाच्या शेंड्याकडे किंवा शालग्रामाकडे ) एकसारखी दृष्टि ( नजर ) ठेवावी; ती इतका वेळ कीं, जेथपर्यंत डोळ्यांला पाणी येईल तेथपर्यंत. या क्रियेला मत्स्येंद्रादि योग्यांनीं 'त्राटक' असें ह्मटलें आहे. या त्राटकक्रियेपासून नेत्राचे सर्व रोग जातात, दृष्टि सूक्ष्म होते, आळस, निद्रा इत्यादिक सर्व दूर होतात. जसा सुवर्णाचा पेटारा जतन करून ठेवतात याप्रमाणें हें त्राटक चांगलें जतन करून ठेवावें.

**अथ नौलिः**—दोन्ही खांदे खालीं वांकवून व दोन्ही हात जांघेवर ( जांघाडावर ) ठेवून मोठ्या वेगाच्या पाण्यांतील भोंवऱ्याप्रमाणें आपलें पोट उजवीकडून डावीकडे व डावीकडून उजवीकडे याप्रमाणें एकसारखें फिरवावें ( हलवावें ); याला 'नौलिक्रिया' ह्मणतात. या नौलिक्रियेच्या अभ्यासानें जठराग्नि प्रदीप्त होतो ( वाढतो ); आणि पोटांतील सर्व रोग दूर होतात. आणीक दुसरें असें कीं, या नौलिक्रियेच्या योगानें धौति व बस्ति ह्या क्रिया लवकर साध्य होतात.

**अथ कपालभातिः**—लोहार, तांबट यांच्या भात्याप्रमाणें फार लवकर लवकर जें प्राणवायूचें रेचक व पूरक करणें, याला 'कपालभाति' क्रिया ह्मणतात. या क्रियेच्या अभ्यासानें कफापासून उत्पन्न होणारे सर्व रोग दूर होतात. ह्या क्रिया केल्या असतां शरीराची शुद्धि होते; आणि शरीरास हलकेपणा वाटतो; ज्या योगानें मलानें व्याप्त झालेल्या नाड्या मोकळ्या होतात; प्राणवायूचा संचार बिनहरकत एकसारखा चालतो; प्राणायामाचा अभ्यास करण्यास सोपें पडतें; ह्मणून ज्या पुरुषांना कफ, मेद, स्थौल्य इत्यादि विकार असतील त्यांनीं ह्या धौति इत्यादिक सहा क्रिया अवश्य केल्या पाहिजेत. आणि ज्यांचे वात, पित्त व कफ हे दोष समान असतील त्यांना करण्याची आवश्यकता नाहीं; कारण, कदाचित् ह्या सहा क्रिया केल्यानें उलट वातादिक दोष कंमी जास्ती होतील.

२ संतोषः—कोणाजवळ याचना न करितां मिळालेल्या अन्नादिक पदार्थांवरच तृप्त असणें यास संतोष ह्मणतात. यापासूनच खरोखर सुख प्राप्त होतें; कारण सुखाचें मूळ संतोष आहे; व दुःखाचें मूळ तृष्णा (अतिशय आशा) आहे. ह्मणूनच 'तृष्णारहित होऊन आपल्या प्रारब्धानें आपणास जे भोग प्राप्त होतील त्यांतच तृप्त असावें;' असें भगवान् मनूनें सांगितलें आहे. तसेंच 'संतोषरूप ऐश्वर्यानें जे सुखी आहेत ते सार्वभौमराज्यालाही कसपटाप्रमाणें समजतात;' असें योगवासिष्ठांत सांगितलें आहे. प्राणी जर तृष्णा सोडून देईल तर सुखी होईल. तृष्णाच रजाचा गज करिते. पहा, या शरीरादिकाच्या रक्षणाकरितां कांहीं पुष्कळ प्रपंचाची गरज आहे असें नाहीं; कारण सर्प हे वायु भक्षून राहतात ह्मणून ते कां दुबळे आहेत ? एवढा मोठा हत्ती नुसत्या वाळल्या गवतावरच आपला निर्वाह करितो; त्याला दुसरी कशाची गरज लागते ? परंतु त्याच्या पेक्षां बलवान् दुसरा कोणी आहे काय ? आणि कंद, मूल इत्यादिकांवर मोठमोठे ऋषि आपला निर्वाह करून काळ घालवीत नाहींत काय ? गंगातरंगाच्या योगानें शीतल व विद्याधर इत्यादिकांच्या योगानें विभूषित असा हिमालयाचा पृष्ठभाग काय अगदीं नाहींसा होऊन गेला ? मग उगीच कां मनुष्य प्राण्याली पीडा देतात ? अहो! पृथ्वीसारखी विस्तीर्ण शय्या असतांना दुसऱ्या पलंगाची काय जरूर आहे ? आपले हात चांगले असतांना मग उशीची गरज कशाकरितां आहे ? आपल्या दोन्ही हातांची ओंजळ जवळ असतां कलशादिक पात्रांचें काय कारण आहे ? दिग्वल्कल असतांना धोतर वगैरे वस्त्रांची गरज काय आहे ? वास्तविक कांहींच गरज नाहीं; परंतु तृष्णेचें उल्लंघन कोणाला करवतें !

संतोषी पुरुष जे असतात त्यांना कालाचें भय मुळींच नसतें. ते जगतावर मुळींच अवलंबून नसतात; सर्व भरंवसा ते ईश्वरावरच ठेवतात. ते असें ह्मणतात कीं, 'परमेश्वर परम कृपाळु आहे; तो आपलें भजन न करणाऱ्याचें सुद्धां पोषण करितो तर आह्मां भक्तांची तो उपेक्षा करील किंवा आह्मांला विसरून जाईल काय ? तर कधींही विसरणार नाहीं व आमचें पालनपोषण अवश्य करील.' हे प्राण्या ! त्याचा दृढ आश्रय तूं कर, तो तुला मदत केल्यावांचून कधीं राहणार नाहीं. तृष्णा ज्या वेळेस पीडा देऊं लागेल तेव्हां आत्मनिष्ठपणाचें बळ राखून विषयांला असार तसेंच अनित्य जाणून मोठ्या प्रेमानें ईश्वराचें भजन करणें; त्याच्या कृपारूपी अमृताचें पान करणें; आणि प्रारब्धकर्मानें जें प्राप्त होईल त्यांतच खुष राहणें याचें नांव संतोष.

३ तपः—शीतोष्णादि द्वंद्वें सहन करून आपल्या शक्तीप्रमाणें कृच्छ्रचांद्रायणादिकांचें अनुष्ठान करणें यास तप ह्मणतात. भगवान् याज्ञवल्क्यांनीं व भगवद्गीतेंत असेंच सांगितलें आहे कीं, 'शास्त्रांत सांगितलेल्या विधीप्रमाणें कृच्छ्रचांद्रायण, उपवास इत्यादिकांनीं शरी-

रास कृश करणें हें सर्व तपांत उत्तम तप होय. ग्रीष्मऋतूंत भोंवतालीं चार अग्नि व मस्तकावर आलेला सूर्य हा पांचवा अग्नि अशा पांच अग्नींचा ताप सहन करणें, शरदृऋतूंत गळ्या इतक्या पाण्यांत उभे राहणें, पावसाळ्यात उघड्या मैदानांत पडून राहून पावसाचा त्रास सोसणें, इत्यादि सर्व, तपांतच अंतर्भूत होतात.

'तप केल्यावांचून योगाची सिद्धि होत नाहीं,' असें भाष्यकार भगवान् व्यासांनीं सांगितलें आहे. 'रसायनादिक औषधें, शरीराची आरोग्यता, वेदादिक विद्या, आकाशगमन, अमृतप्राशन, वगैरे दैवीस्थिति तपावांचून सिद्ध होत नाहीं; कारण, तप त्यांचें साधन आहे.' असें भगवान् मनूनें अकराव्या अध्यायांत सांगितलें आहे. ह्मणूनच भगवान् विष्णूनें पृथ्वीप्रत ह्मटलें आहे कीं, 'हे देवि! पर्वतादिक जीं दुर्गम स्थानें आहेत, आकाशगमनादि ज्या दुष्प्राप (मिळण्यास कठिन) सिद्धि आहेत, सुमेरु आदि जे दूर देश आहेत, व समुद्रयानादिक जीं दुष्कर (करण्यास कठिन) कर्मे आहेत; तीं सर्व तपानें सिद्ध होतात. ह्मणूनच श्रीमद्भागवताच्या द्वितीयस्कंधांत 'भगवान् विष्णूच्या नाभिकमलांतून प्रकट झालेला ब्रह्मा ज्या वेळेस जगताची रचना करण्याविषयीं विचार करूं लागला त्या वेळेस त्यानें 'तप कर, तप कर' अशी आकाशवाणी ऐकिली; नंतर तो तप करून जगताची रचना करण्यास समर्थ झाला.' असें सांगितलें आहे.

तप सात्विक, राजस व तामस असें तीन प्रकारचें आहे. या तिघांचें लक्षण श्रीमद्भगवद्गीतेंत सतराव्या अध्यायांत सांगितलें आहे; तें असें, 'जें तप मोठ्या श्रद्धेनें व फलाचें अभिसंधान (इच्छा) बिलकुल न करितां केलें असेल त्याला सात्विक तप ह्मणतात. जें सत्कार, मान, पूजा, इत्यादिक प्राप्त व्हावें याकरितां किंवा जें ढोंगानें केलें असेल तें राजस तप; हें चल व अनित्य आहे. व जें मूर्खपणानें विधीवांचून व्यर्थ शरीराला पीडा देऊन केलेलें किंवा जें दुसऱ्याचा नाश होण्याकरितां केलेलें तें तामस (नरकांत घालविणारें) तप होय.

शरीर, मन व वाणी यांना जो दंड सांगितला आहे तोच त्रिदंडी संन्यास घेतांना मुख्य तप आहे.

४ **स्वाध्यायः**—ईश्वरगीतेंत स्वाध्यायाचें लक्षण असेंच सांगितलें आहे; 'वेदांत, शतरुद्रिय, प्रणव इत्यादिकांचा जप करणें यालाच पंडितजन स्वाध्याय ह्मणतात. पुरुषांच्या सत्वशुद्धीला हाच उपाय मुख्य सांगितला आहे.' या स्वाध्यायांत श्रवण व मनन यांचा समावेश होतो.

जप दोन प्रकारचा; १ वाचिक व २ मानस. त्यांत वाचिक जप पुनः दोन प्रकारचा; एक मोठ्यानें उच्चार करून करणें, व दुसरा कोणास ऐकूं न येईल असा हलकेच ह्मणणें. मानसिक जपही दोन प्रकारचा आहे; १ ध्यानरहितजप, व २ ध्यानसहितजप. या सर्व चार

प्रकारच्या जपांत शेवटचा जो ध्यानसहितमानस जप हा उत्तम आहे. ह्मणूनच भगवान् याज्ञवल्क्यांनीं सांगितलें आहे कीं, 'मोठ्यानें उच्चारण करून जप करण्यापेक्षां कोणास ऐकू न येईल असा हलकेच जप करण्यांत हजारपट अधिक फल प्राप्त होतें; हलके उच्चारण करून करण्यापेक्षां मानस जप हजारपट फल देणारा आहे; व ध्यानरहित मानसजपापेक्षां ध्यानयुक्त मानसजपांत हजारपट फल आहे.

५ **ईश्वरप्रणिधानः**—' श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य, आत्मनिवेदन;' याप्रमाणें नऊ प्रकारचें ईश्वरप्रणिधान ( ईश्वरभक्ति ) आहे; हें सर्व ईश्वराचें पूजन होय. त्यांत भगवद्गुणानुवाद ऐकणें, त्याच्याच गुणांचें कीर्तन करणें, त्याच्याच नामाचें स्मरण करणें, त्याच्या पायांवर नित्य नम्र होणें, त्याच्या प्रतिमेचें पूजन करणें, त्याला साष्टांग नमस्कार करणें, त्याचाच दास होणें, त्याशींच मैत्री करणें व आपलें तनु, मन, धन वगैरे सर्व परमेश्वरास अर्पण करणें; याप्रमाणें क्रमानेंच भक्तीचे नऊ प्रकार समजावे. तात्पर्य, परमेश्वराचें माहात्म्य पूर्ण जाणून परमेश्वरावर अत्यंत दृढ प्रेम असणें हें भक्तीचें मुख्य तत्त्व आहे.

याप्रमाणें नियम पांच प्रकारचे सांगितले. आतां हठयोगप्रदीपिका इत्यादि ग्रंथांत '१ तप, २ संतोष, ३ आस्तिक्य, ४ दान, ५ ईश्वरपूजन, ६ सिद्धांतवाक्यश्रवण, ७ लज्जा, ८ मति, ९ जप व १० होम;' याप्रमाणें दहा नियम सांगितले आहेत; यांपैकीं १ तप, २ संतोष, ३ ईश्वरपूजन व ४ जप हे चार तर सूत्रकारांनीं सांगितले आहेत; बाकी सहा नियम राहिले त्यांचा अंतर्भाव या पांच नियमांतच होतो; यामुळें सूत्रास न्यूनता नाहीं. तथापि थोडेंसें त्या सहांचें येथें विवेचन करितों,—

१ **आस्तिक्यः**—ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल जो दृढ निश्चय, त्याला आस्तिक्य ह्मणतात. पहा, उंच पर्वतांचीं शिखरें, मोठमोठे वृक्ष, जणूं परमेश्वराकडे बोट दाखवून ईश्वराचें अस्तित्व स्पष्ट करिताहेत. सर्पाप्रमाणें नद्या धांवत असतां धबधब्याचे ठिकाणीं होणारा त्यांचा शब्द, समुद्राची गंभीर गर्जना, तसाच पावसाळ्यांत होणारा मेघांचा गडगडाट इत्यादि हे बहिऱ्या झालेल्या नास्तिक लोकांच्या कानांत दौंडी पिटवून प्रभूचें अस्तित्व जाहीर करिताहेत. विस्तीर्ण आकाशांत प्रकाशित असणारे असे चंद्र, सूर्य, तारे इत्यादि, आपणांस निर्माण करणाऱ्या कारागिराचें कुशलत्व व अस्तित्व स्पष्ट प्रकाशित करिताहेत. मातेच्या गर्भांत असणाऱ्या प्राण्याचें पोषण करण्यानें व उत्पन्न झाल्याबरोबर त्याला पिण्याकरितां दुधाची तयारी करून ठेवण्यानें भगवंताचें अस्तित्व सहज एखाद्या अज्ञ प्राण्याच्या देखील ध्यानांत येण्याजोगें आहे. याप्रमाणें 'परमेश्वर सर्वत्र आहे' अशा दृढ निश्चयास आस्तिक्य ह्मणतात. हें ईश्वरभक्तीनें होतें.

२ **दानः**—गरीब मनुष्याला आपल्या शक्तीप्रमाणें अन्नवस्त्र देणें यास दान ह्मणतात.

**वितर्कबाधने प्रतिपक्षभावनम् ॥ ३३ ॥**

योगाला साधक जे अहिंसा इत्यादि, त्यांस तर्क ह्मणतात. आणि त्यांच्या विरुद्ध ( प्रतिकूल ) जे हिंसा इत्यादिक, त्यांस वितर्क ह्मणतात. या हिंसा इत्यादिक वितर्कांची पीडा होऊं लागली ह्मणजे यांचे प्रतिपक्षी जे अहिंसा इत्यादिक, त्यांची चित्तांत भावना करावी ह्मणजे त्या हिंसादि वितर्कांपासून कांहीं पीडा न होतां योग त्वकर सिद्ध होतो.

**वितर्का हिंसादयः कृतकारितानुमोदिता लोभक्रोधमोहपूर्वका मृदुमध्याधिमात्रा दुःखाज्ञानानन्तफला इति प्रतिपक्षभावनम् ॥ ३४ ॥**

पूर्वी सांगितलेले हिंसादिक वितर्क हे प्रथम १ स्वतः केलेले, २ दुसऱ्याकडून ' कर, कर ' असें ह्मणून करविलेले व ३ दुसरा करीत असतां त्याला ' बरें आहे, बरें आहे' असें संमत देऊन झालेले, याप्रमाणें तीन प्रकारचे आहेत. पुनः ते तीन प्रकारचे वितर्क लोभ, क्रोध व मोह ह्या तीन कारणांनीं प्रत्येक तीन तीन प्रकारचे होतात. ह्मणजे मांस, चामडें वगैरेंच्या लोभानें, 'ह्यानें माझा अपराध केला' असें समजून क्रोधानें व 'देवता इत्यादिकांची तृप्ति झाली असतां मला मोठा धर्म घडेल' असें समजून मोहानें, हिंसादिक तीन तीन प्रकारचे होतात.

---

जें ह्या ठिकाणीं सत्पात्रास दिलें असेल तोच धर्म परलोकीं उपगोगी पडेल. आपण स्वतः क्लेश भोगून अतिथि अभ्यागताचा सत्कार करावा, कधींही विन्मुख जाऊं देऊं नये. सर्व प्राण्यांला आपणापासून अभय असणें, हें सर्वांत मुख्य दान आहे. अभयदानाची बरोबरी कोणतींही दानें करूं शकत नाहींत. हें अहिंसाव्रतानें होतें.

३ **सिद्धांतवाक्यश्रवणः**–'देह आणि जगत् अनित्य व क्षणभंगुर आहेत; आणि परमात्मा नित्य व अविनाशी आहे.' या अभंग सिद्धांताचा अपरोक्ष बोध अंतःकरणांत पूर्ण ठसूं देणें; हें सिद्धांतवाक्यश्रवणाचें रहस्य आहे. हें श्रवणभक्तीनें होतें.

४ **मतिः**–अनेक प्रकारच्या सांसारिक सुखमय पदार्थांत तसेंच स्वर्गादि वैभवांत लोभ न ठेवणें, तशीच मनाची चंचलता सोडून देऊन जनाचा उपहास धीरानें सहन करून कल्पनारहित होणें. अशा बुद्धीस मति ह्मणतात. हें अपरिग्रह वगैरेंपासून होतें.

**लज्जाः**–उगीच लोकांच्या लाजेनें जे पुरुष साधूची व गुरूची श्रद्धापूर्वक भक्ति करीत नाहींत त्यांना निर्लज्ज मनुष्य ह्मणावें अर्थात् वाईट गोष्टींविषयीं लाज धरणें व चांगल्या गोष्टी-विषयीं कोणाचीही लाज न बाळगणें. हें ईश्वरभक्तीनें होतें.

**होमः**–मनासुद्धां अकरा इंद्रियांची प्रवृत्ति त्यांच्या विषयांच्या ठिकाणीं न होऊं देतां ब्रह्माकडे करणें याला सात्विक होम ह्मणतात. राजस वृत्तीचे पुरुष पशूंचा व फळादि-कांचा होम करितात; परंतु ज्ञानी लोक अंतर्दृष्टि करून विषयांचा इंद्रियाच्या ठिकाणीं, व त्यांचा अंतःकरणांच्या ठिकाणीं होम करितात, हें सर्व स्वाध्यायानें होतें.

ते हिंसादि वितर्क पुनः आणखी मृदु, मध्य व अधिमात्र ( तीव्र ) अशा अवस्थाभेदांनीं प्रत्येक तीन तीन प्रकारचे आहेत; याप्रमाणें यांचे अनेक भेद आहेत. 'या वितर्कांपासून परिणामीं फल ह्मटलें ह्मणजे अपरिमित नरकादि दुःख व अपरिमित भ्रांति व संशयरूप अज्ञान हें प्राप्त होणारें आहे.' याप्रमाणें वितर्कांचें स्वरूप, कारण व फल वगैरे भेद जाणून त्यांमध्यें असणाऱ्या दोषाचें मनांत वारंवार चिंतन करणें याला प्रतिपक्षभावना असें ह्मणतात. या प्रतिपक्षभावनेनें 'हिंसादि हे अगदीं त्याज्य आहेत' असा पक्का बुद्धीचा निश्चय होऊन ते नाहींतसे होतील. ते नाहींतसे झाले ह्मणजे अहिंसा इत्यादिक निर्विघ्नपणें सिद्ध होतात.

**अहिंसाप्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः ॥ ३५ ॥**

अहिंसा इत्यादिकांचें फल सांगतात,—त्यांत जो हिंसा न करण्याचा अभ्यास करितो, त्याचा अभ्यास पूर्ण झाला ह्मणजे मग त्याजवळ असणारे जे सर्प, नकुळ इत्यादिक परस्पर स्वभावतांच द्वेषी असणारे खरे परंतु त्यांचा सुद्धां मनांतील वैरभाव नाहींसा होतो.

**सत्यप्रतिष्ठायां क्रियाफलाश्रयित्वम् ॥ ३६ ॥**

सत्याच्या अभ्यासानें सत्याची सिद्धि झाली असतां वाचासिद्धि प्राप्त होते; ह्मणजे यज्ञ, याग इत्यादि कर्मांचें फल, तीं केल्यावांचून सुद्धां केवळ त्याच्या भाषणानें ( आशीर्वादानें ) दुसऱ्यास प्राप्त होतें; मग त्याला प्राप्त होईल यांत नवल नाहीं.

**अस्तेयप्रतिष्ठायां सर्वरत्नोपस्थानम् ॥ ३७ ॥**

चोरी न करण्याचा दृढ निश्चय करणाऱ्या योग्याला इच्छामात्रेंकरून सर्व दिव्यरत्नांची प्राप्ति होते.

**ब्रह्मचर्यप्रतिष्ठायां वीर्यलाभः ॥ ३८ ॥**

जो ब्रह्मचर्य राखण्याचा दृढ अभ्यास करितो त्याला त्यापासून सिद्धि झाली असतां मोठें विलक्षण सामर्थ्य प्राप्त होतें; ह्मणजे अणिमादि सिद्धि प्राप्त झाल्यामुळें त्यानें शिष्याला उपदेश केला असतां तत्काल फलद्रूप होतो.

**अपरिग्रहस्थैर्ये जन्मकथंतासंबोधः ॥ ३९ ॥**

कोणत्याही वस्तूचा संग्रह करावयाचा नाहीं, असा जो दृढ अभ्यास करितो त्याला त्यापासून सिद्धि झाली असतां त्या योग्याला भूत, भविष्य व वर्तमान असें सर्व प्रकारचें ज्ञान प्राप्त होतें; आणि 'पूर्वजन्मीं मी कोण होतों, कोणत्या स्थितींत होतों, म्यां काय केलें' इत्यादि जाणण्याची त्याला इच्छा झाल्यास तें सर्व त्याला चांगल्या रीतीनें समजतें.

**शौचात्स्वाङ्गजुगुप्सा परैरसंसर्गः ॥ ४० ॥**

याप्रमाणें यमांच्या सिद्धी सांगितल्या; आतां नियमांच्या सिद्धी सांगतात,—जो बाह्य-

शुद्धि ( स्वच्छता ) राखण्याचा नित्य दृढ अभ्यास करितो, त्या योग्यानें आपल्या शरीराच्या कारणाचा व स्वरूपाचा विचार केला असतां त्याला आपल्या स्वतांच्याच अवयवांचा वीट येतो; मग तो दुसऱ्याच्या शरीराशीं संबंध कोठून ठेवणार !

**सत्वशुद्धिसौमनस्यैकाग्रतेन्द्रियजयात्मदर्शनयोग्यत्वानि च ॥ ४१ ॥**

आभ्यंतरशुद्धीचा पूर्ण अभ्यास केल्यापासून चित्ताच्या ठिकाणीं असणाऱ्या रजोमलाचा व तमोमलाचा नाश होऊन अंतःकरण निर्मल होतें. याचप्रमाणें मनाची प्रसन्नता ह्मणजे सत्वांशाचा उत्कर्ष होतो; पुढें क्रमानेंच चित्ताच्या वृत्ती इकडे तिकडे न फांकतां तें एकाग्र होतें; इंद्रियांस आपल्या विषयांकडे जाऊं न देतां ठिकाणीं आवरून धरितां येतें. इतक्या गोष्टींचें साधन झाल्यामुळें "आत्मा कोणता व अनात्मा कोणता' अशी विचार करण्याची योग्यता ( शक्ति ) येते.

**संतोषादनुत्तमसुखलाभः ॥ ४२ ॥**

जो नेहमीं संतोषवृत्तीनें राहण्याचा दृढ अभ्यास करितो त्याच्या सर्व प्रकारच्या तृष्णा ( आशा ) क्षीण होऊन सत्वाचा उत्कर्ष झाल्यामुळें त्याला पराकाष्ठेचें सुख[१] प्राप्त होतें; तें इतकें कीं, त्या सुखापुढें स्वर्गसुख, किंबहुना इंद्रपद इत्यादि सुद्धां तुच्छ आहे असें त्याला वाटतें.

**कायेन्द्रियसिद्धिरशुद्धिक्षयात्तपसः ॥ ४३ ॥**

तपाचें उत्तम रीतीनें अनुष्ठान करणाऱ्या योगाच्या चित्ताचा अविद्या इत्यादि क्लेशरूपी मल धुऊन जाऊन शरीराला अणिमादिसिद्धि व इंद्रियांना दूरचा व अत्यंत सूक्ष्म पदार्थ ग्रहण करितां यावा अशी सिद्धि प्राप्त होते.

**स्वाध्यायादिष्टदेवतासंप्रयोगः ॥ ४४ ॥**

ज्यानें स्वाध्यायाचा अभ्यास पूर्ण केला आहे अशा योग्यानें आपल्या मनास वाटेल

---

सू० ४२ टी०-१

बुद्धिसत्व हें स्वाभाविक सात्विक आहे, ह्मणून सुख हें ह्याचा स्वभावच आहे; करितां ज्या वेळेस तें तमोमलानें आच्छादित होतें त्या वेळेस त्याचा स्पष्टपणा होत नाहीं. संतोषनियमाचें नीटरीतीनें पालन केलें असतां तृष्णाक्षय सिद्ध होतो. ज्यायोगानें तमोमल दूर होऊन बुद्धिसत्वाचें स्वाभाविक शांतिसुख प्रकट होतें. तें विषयरहित असतें; कारण, त्या सुखाची सिद्धि विषयांच्या स्वाधीन नाहीं. ह्मणूनच हा असा शांतिसुखाचा स्वाभाविक उत्कर्ष पाहून महाभारतांत महाराज ययातीनें ह्मटलें आहे,–' जें कांहीं विषयांपासून होणारें सुख आहे व जें कांहीं मोठें दिव्य सुख आहे; तें तृष्णाक्षयापासून होणाऱ्या सुखाची सोळाव्या हिश्शानेंही बरोबरी करूं शकत नाहीं.

त्या इष्टदेवतेच्या मंत्राच्या जप विधीप्रमाणें केला असतां त्यापासून तीं इष्टदेवता त्याला प्रसन्न होऊन प्रत्यक्ष दर्शन देते; व तिच्याबरोबर त्या योग्याचें संभाषण वगैरे होतें.

**समाधिसिद्धिरीश्वरप्रणिधानात् ॥ ४५ ॥**

ईश्वरप्रणिधानाचें स्वरूप पूर्वी (स० सू० २३ त) सांगितलें आहे; त्या रीतीनें ईश्वराची निस्सीम भक्ति केल्यानें समाधि सिद्ध होतो. याप्रमाणें ह्या नियमांच्या सिद्धि होत. हीं फलें सांगण्याचें कारण असें कीं, या यमनियमांचा अभ्यास उत्तमरीतीनें अवश्य केला पाहिजे; नाहींतर योगसिद्धि होणार नाहीं.

**स्थिरसुखमासनम् ॥ ४६ ॥**

ज्यायोगानें स्थिरता प्राप्त होऊन मनास सुख वाटतें अशा बसण्यास आसन ह्मणतात. तें पद्मासन वगैरे भेदांनीं अनेक प्रकारचें आहे. तात्पर्य, जेव्हां आसन न हालणारें व सुखकारक होतें तेव्हां ते योगाचें अंग होतें.

---

सू० ४५ टीपः-१

ईश्वराचे ठिकाणीं आवेशित आहे चित्त ज्याचें अशी योग्याला केवळ भक्तीनेंच योगसिद्धि होते. याचें कारण स्पष्टच आहे; कारण कीं, जशी ध्यानांत प्रत्ययाची एकतानता होते, त्याप्रमाणें भक्तीमध्यें सुद्धां एकवस्तुविषयता असल्यामुळें समाधिसिद्धि होऊं शकते. भक्तिप्रधान वादी असें ह्मणतात कीं, 'सुख पुरुषार्थ असल्यामुळें दुःखानें अगदीं रहित व जिला कांहीं मर्यादा नाहीं अशी सुखधारारूप प्रेमभक्तिच पुरुषार्थ आहे.

**आसन.** ( हें योगांतील तृतीयाङ्ग होय. )

सू० ४६ टीपः-१

**बाह्यासनविवरणः**—बाह्यासनाचे नियम असे आहेत कीं, सर्वांखालीं प्रथम दर्भासन, त्यावर मृगासन, त्यावर कंबलासन असें असावें. तें अति उंच नसावें व अति नीच नसावें. पुनः चाळविण्याचा प्रसंग येऊं नये असें स्थापावें. शरीर सरळ करून बसावें. नजरेसमोर कोणताही अन्य पदार्थ नसावा. छाती, मान व डोकें हे तीन भाग ज्याचें उन्नत असें शरीर समतोल आसनावर ठेवून मनासहवर्तमान आपलीं इंद्रियें एकाग्र करून नेहमीं एकांतीं एकटेंच बसून निराकांक्ष आपले मनोव्यापार निःसंग निराहार ह्मणजे इंद्रियव्यापार जिंकून अंतःकरणाच्या शुद्धीकरितां योगाभ्यास करावा. दृढ प्रयत्नानें इकडे तिकडे न पाहतां डोळे अर्धे मिटून नासिकेच्या अग्रभागीं दृष्टि ठेवावी. आपलें मन आत्मैकनिष्ठ करावें; ह्मणजे मनासहवर्तमान इंद्रियें एकाग्र करून ओंकाररूपी नौकेंत बसून मध्यें मध्यें भय उत्पन्न करणाऱ्या (योनिरूपी) नद्या विद्वानानें तरून जाव्या.

हठयोगाचा 'आसन, कुंभक, चित्र, मुद्राकरण व नादानुसंधान याप्रमाणें अभ्यासाचा क्रम समजावा.

ज्याच्या योगानें शरीर स्थिर राहून सुख प्राप्त होतें अशा बसण्यास आसन ह्मणतात. तीं दोन प्रकारचीं आहेत; शारीर आणि बाह्य. त्यांत शारीर आसनेंही जितक्या प्रा-

ण्यांच्या जाती आहेत तितक्या प्रकारचीं अर्थात् ८४ चौऱ्याशीं लक्ष आहेत. त्या सर्वांचे भेद एक भगवान् शिव जाणतात. त्यांतून मनुष्याला साधण्याजोगीं अशीं ८४ चौऱ्याशीं आसनें शिवांनीं सांगितलीं आहेत. त्यांचा अनुवाद आसनप्रकरणांत हठयोगप्रदीपिका वगैरे ग्रंथांनीं चांगला केला आहे. या चौऱ्याशीं आसनांत सुद्धां १ सिद्धासन, २ पद्मासन, ३ सिंहासन व ४ भद्रासन, हीं चार; तशींच १ वीरासन, व स्वस्तिकासन हीं दोन मिळून सहा आसनें मुख्य आहेत. त्यांचें स्वरूप येणेंप्रमाणें,—

**१ सिद्धासनः**—डाव्या पायाची टाच गुदा आणि लिंग यांच्या मधल्या भागांत ठेवून व उजव्या पायाची टाच लिंगाच्या वरच्या भागावर ठेवून आपली हनुवटी हृदयाजवळ धरून दृष्टि भुवयांच्या मध्यभागीं ठेवावी. जसा झाडाचा नुसता सोट निश्चल असतो त्याप्रमाणें सर्व इंद्रियांना वश ठेवून अगदीं स्थिर राहावें; याला सिद्धासन ह्मणतात. 'हें मोक्षाचें द्वार खुलें करणारें आहे' असें योगी लोक सांगतात. अशा बसण्यानें शरीर समतोल राहतें, श्वासोच्छ्वास बरोबर चालतात; देहाला श्रम न होतां पुष्कळ वेळपर्यंत बसवलें जातें. वृत्ति स्थिर राहते आणि रक्ताभिसरण सारखें झाल्यानें शरीर निरोगी राहतें. यालाच कांहीं संस्थाभेदानें कोणी वज्रासन, कोणी मुक्तासन व कोणी गुप्तासन असेंही ह्मणतात.

**२ पद्मासनः**—दोन्ही मांड्यांवर दोन्ही पावलें ठेवून उजव्या हातानें उजव्या पायाचा आंगठा व डाव्या हातानें डाव्या पायाचा आंगठा बळकट धरून व हृदयाजवळ हनुवटी लाऊन नाकाच्या शेंड्यावर स्थिर दृष्टि ठेवावी. याला पद्मासन ह्मणतात. हें सर्वमान्य आहे. यायोगानें झोंप येत नाहीं आणि शरीर सारखें राहिल्यामुळें श्वास बरोबर चालतो; व वृत्ति स्थिर होऊन शरीरांत रक्ताचा प्रवाह बरोबर चालत असल्यामुळें शरीर निरोगी राहून आळस येत नाहीं.

**३ सिंहासनः**—अंडाच्या खालीं शिवण असते तिच्या डावीकडे उजव्या पायाचा घोंटा व तिच्या उजवीकडे डाव्या पायाचा घोंटा ठेवून दोन्ही मांड्यांवर दोन्ही हात, बोटें पसरून ठेवावे. आणि तोंड उघडें ठेवून जीभ बाहेर काढावी. तसेंच मोठ्या सावधपणानें दृष्टि नासिकाग्रीं ठेवावी. यास सिंहासन ह्मणतात. हें सर्व योग्यांला मान्य आहे.

**४ भद्रासनः**—अंडाच्या खालीं शिवणीच्या डावीकडे डाव्या पायाचा घोंटा व तिच्या उजवीकडे उजव्या पायाचा घोंटा ठेवून तशींच जवळ आलेलीं दोन्ही पावलें दोन्ही हातांनीं बळकट जुळून धरून ठेवावीं. याला भद्रासन ह्मणतात. यापासून सर्व व्याधि दूर होतात.

**५ वीरासनः**—एक पाय एका मांडीवर ठेवून दुसरा पाय दुसऱ्या मांडीवर ठेवला असतां वीरासन होतें. ह्याचेंच अर्धें केलें ह्मणजे अर्धासन होतें. यायोगानें दृष्टि स्थिर होते. पहिलवान् लोकांना एकदम हत्यारबंद होण्यास ह्या आसनानें मोठा जोर सांपडतो.

**६ स्वस्तिकासनः**—जांघ ( जांघाड ) व मांड्या यांच्यांमध्यें दोन्ही पावलें ठेवून शरीर सरळ करून सुखानें बसणें ह्याला स्वस्तिकासन ह्मणतात.

**प्रयत्नशैथिल्यानन्तसमापत्तिभ्याम् ॥ ४७ ॥**

शरीराचा जो स्वभावतां व्यापार चालत असतो तो प्रयत्न होय. तो प्रयत्न सैल सोडला असतां ह्मणजे आसनांतील व्यापारावांचून इतर हात, पाय इत्यादिकाचें हालणें चालणें वगैरे बंद ठेवण्याचा अभ्यास केला असतां आणि ज्यानें मस्तकावर पृथ्वी धारण केली आहे अशा अत्यंत स्थिर अनंतप्रभूचे ( शेषाचे ) ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां तदाकार वृत्ति होते व त्यायोगानें देहाभिमान सुटून आसनापासून कांहीं क्लेश वाटत नाहींत. व तेंच आसन योगाच्या उपयोगी पडतें.

**ततो द्वन्द्वानभिघातः ॥ ४८ ॥**

आसनाचा जय झाला असतां त्यापासून, शीत उष्ण, भूक तहान, इत्यादि जीं दोन-दोनांचीं जोडपीं ( जुळीं ) आहेत त्यांपासून पीडा होत नाहीं.

**तस्मिन्सति श्वासप्रश्वासयोर्गतिविच्छेदः प्राणायामः ॥ ४९ ॥**

आसन स्थिर व सुखकारक झाल्यानंतर समाधीच्या अभ्यासास आरंभ करावा. त्याला मुख्य साधन प्राणायाम आहे. प्राणायामाचें साधारण स्वरूप ह्मटलें ह्मणजे बाहेरच्या वायूची आंत ( पोटांत ) जाण्याची गति रोंकून धरणें व पोटांतील वायूच्या बाहेर जाणाच्या गतीस प्रतिबंध करणें याप्रमाणें आहे. प्राणायामशब्दाचा अर्थ, प्राणवायूला स्वाधीन ठेवणें असा आहे.

**बाह्याभ्यन्तरस्तम्भवृत्तिर्देशकालसंख्याभिः परिदृष्टो दीर्घसूक्ष्मः ॥ ५० ॥**

पूर्वसूत्रांत प्राणायामाचें सामान्य लक्षण सांगितलें. आतां उघड समजण्याकरितां प्राणायामाचे विभाग करून दाखवितात,—पोटांतील वायु बाहेर सोडणें याला श्वास व रेचक असें ह्मणतात; तसाच बाहेरचा वायु आकर्षण करून पोटांत सांठविणें याला प्रश्वास व पूरक असें ह्मणतात; आणि वायु आंत कोंडून ठेवणें यास कुंभक असें ह्मणतात; कारण तो कुंभांत ( घागरींत ) भरलेल्या पाण्यासारखा शरीरांत शांत व निश्चल राहतो ह्मणून. याप्रमाणें श्वास, प्रश्वास व कुंभक या तीन भेदांनीं प्राणायाम तीन प्रकारचा झाला. पुनः हा तीन प्रकारचा प्राणायाम देश, काल व संख्या यांच्या संबंधानें दीर्घ असून सूक्ष्म होतो असा दृष्ट आहे. तो कालादिकांच्या संबंधानें विचार असा,—श्वासोच्छ्वास सोडतांना जो वायूचा प्रवाह चालत असतो तो नाकापासून बारा बोटांपर्यंत वगैरे रीतीनें चालावा; एका काडीच्या टोंकास कापूस अडकवून ती काडी नाकापुढें धरावी. ह्मणजे जेथपर्यंत श्वासाची गति चालत असेल तेथपर्यंत कापूस हालेल 'पुढें हालणार नाहीं; व त्यावरून तो किती चालत आहे हें समजेल. हा बाह्य वायूचा देशविचार झाला. आतां पूरक व कुंभक यांचा तर शरीराच्या आंतच पायांपासून मस्तकापर्यंत देश आहे; तेथें मुंगीच्या स्पर्शाप्रमाणें स्पर्श

होतो; त्यावरून त्याच्या देशाविषयीं अनुमान होतें. ह्रस्व स्वर उच्चारण्यास जो काल लागतो त्यास मात्रा असें ह्मणतात. श्वास किंवा प्रश्वास हा छत्तीस मात्रांपर्यंत चालवावा; हा कालविचार होय. आणि प्राणायाम अमुक इतक्या वेळा केला; हे श्वासप्रश्वास मिळून पहिला उद्घात झाला. याप्रमाणें उद्घात मोजण्यांत जो संख्येचा उपयोग करावयाचा तो संख्या-विचार समजावा. उद्घात ह्मणजे बेंबीच्या देंठापासून वायूला प्रेरणा होऊन त्याचें मस्तकास जाऊन आपटणें. याप्रमाणें देश, काल व संख्या ह्यांस प्राणायाम अधिकाधिक व्यापूं लागला ह्मणजे तो दीर्घ व त्याची व्याप्ति कमी कमी होऊं लागली ह्मणजे तो सूक्ष्म समजावा.

---

सू० ५० टीपः-१

## प्राणायाम. ( हें योगांतील चतुर्थाङ्ग होय. )

## स्वरोदय ( नाडीवर्णन ).

'या शरीरांत प्राण हा मुख्य आहे;' असें भगवान् व्यासानेंही ब्रह्मसूत्रांत दुसऱ्या अध्यायाच्या चौथ्या पादांत सांगितलें आहे. ह्मणूनच शिवस्वरोदयांत देवी पार्वतीनें भगवान् शिवास प्रश्न केला कीं, 'हे देवदेव, महादेव! या संसारसागरांतून तरून जाण्यास साहाय्य करणारें व सर्व कार्यसिद्धि करणारें असें कोणतें साधन आहे?' त्याचें उत्तर शिवानें असें दिलें कीं, 'हे देवि! प्राणच मुख्य साधन आहे. प्राण हाच सर्वांचा मित्र व सखा आहे. प्राणासारखा दुसरा बंधु खरोखर कोणी नाहीं' इत्यादि.

या शरीरांत धार्यादिक ( शरीराचें रक्षण करणें इत्यादिक ) जे व्यापार चालतात ते सर्व प्राणाच्या स्वाधीन आहेत. जसा जीवंत असतांना तसा मरणानंतर सुद्धां गमनागमनांत प्राण अतिवाहक होतो. ही प्राणापानरूप जीवत्‍नांवाची समस्त इंद्रियांची वृत्ति आहे. याच-प्रमाणें सांख्यकारिकेंत ईश्वरकृष्णानें सांगितलें आहे.

प्राण, अपान, व्यान, उदान व समान असे पांच, यांची अधिष्ठानदेवता वायु अस-ल्यामुळें प्राण इत्यादिकांसही वायुच ह्मणतात. हे मुख्य प्राणाचें वैशेषिक कार्य आहे, ज्या योगानें प्राण पंचवृत्ति असा स्मृतींत व्यवहार केला आहे. हा वृत्तिभेद कार्यभेदामुळें आहे. प्राग्वृत्ति उच्छ्वासादि करणारा तो प्राण; अर्वाग्वृत्ति निःश्वासादि करणारा तो अपान; या ( प्राण आणि अपान या ) दोहोंच्या संधीमध्यें राहणारा व वीर्यवत्कर्महेतु तो व्यान; ऊर्ध्ववृत्ति उत्क्रांत्यादिहेतु जो उदान; आणि समरस करणार तो समान. याप्रमाणें मनो-वत् प्राण पंचवृत्ति आहे. 'मनुष्याच्या नाभिस्थानाच्या जवळ मूलकंद आहे तेथून बहात्तर हजार नाड्या निघून सर्व देहांत व्यवस्थेनें पसरल्या आहेत.' याप्रमाणें अथर्ववेदाच्या प्रश्नो-पनिषदांत सांगितलें आहे. त्यांत भगवती कुंडली शक्ति जी सर्पाकार (सर्पाप्रमाणें वेढा घालून)

बसली आहे तिच्यावर दहा आणि तिच्या खालीं दहा अशा मुख्य नाड्या स्थित आहेत; व दोन दोन आडव्या गेल्या आहेत. याप्रमाणें मुख्य चोवीस नाड्या झाल्या; त्यांत दहा प्राणवाहक आहेत त्या प्रधान आहेत. त्यांचीं १ इडा, २ पिंगला, ३ सुषुम्ना, ४ गांधारी, ५ हस्तिजिह्वा, ६ पूषा, ७ यशस्विनी, ८ अलंबुषा, ९ कुहू आणि १०. शंखिनी; अशीं नांवें आहेत. त्यांत पहिल्या तीन अगदीं मुख्य आहेत. त्यांत इडा वाम (डाव्या) भागांत, पिंगला दक्षिण- (उजव्या) भागांत व मध्यदेशांत सुषुम्ना आहे; ती तालूचा भेद करून ब्रह्मद्वारांत जाऊन पोहोंचली आहे. गांधारी डाव्या डोळ्यांत, हस्तिजिह्वा उजव्या डोळ्यांत, पूषा उजव्या कानांत, यशस्विनी डाव्या कानांत; अलंबुषा तोंडांत, कुहू लिंगांत आणि शंखिनी मूलस्थानांत आहे. याप्रमाणें शरीराच्या द्वारांचा आश्रय करून दहा नाड्या राहिल्या आहेत. त्यांत इडा, पिंगला व सुषुम्ना ह्या प्राणमार्गाचा आश्रय करून राहिल्या आहेत. ते प्राण वर सांगितल्याप्रमाणें प्राण, अपान, व्यान, उदान व समान असे पांच आहेत. तसेच नाग, कूर्म, कृकल, देवदत्त आणि धनंजय हे पांच उपप्राण आहेत. त्यांत प्राण हृदयांत राहतो; अपान गुदस्थानांत, समान नाभिस्थानांत, उदान कंठस्थानांत आणि व्यान सर्व शरीरांत आहे. नागवायूनें उद्गार (ढेंकर) येतात. कूर्म नेत्रांचें उन्मीलन (उघडणें) करितो, शिंका आणणारा कृकल आणि जांभई आणणारा देवदत्त आहे. धनंजय हा सर्व शरीरांत व्यापलेला आहे; तो मरणानंतर सुद्धां कांहीं वेळ शरीर सोडीत नाहीं.

शमदमयुक्त पुरुषानें जो प्राणसंचार होतो तो इडा, पिंगला व सुषुम्ना यांनीं होतो असें समजावें. इडा वामभागांत आहे व तिच्यांत चंद्र आहे. पिंगला दक्षिणभागांत आहे आणि तिच्यांत सूर्य आहे; आणि सुषुम्नेंत हंस व साक्षात् भगवान् शिव वास करितो.

कंदाच्या अग्रापासून मोठ्या वेगानें निघालेला प्राण हृदयगत जीवास आश्वासन देऊन इडा व पिंगला यांच्या मार्गांनीं जेव्हां बाहेर निघतो त्या वेळेस 'ह' असा ध्वनि होतो. तो हकार शिवरूप सूर्य आहे; आणि सकार हा शक्तिरूप चंद्र आहे ह्मणून शहाण्यानें सौम्य कार्य चंद्रस्वरावर, उग्र कार्य सूर्यस्वरावर व भक्तिमुक्तिफल देणारें कर्म सुषुम्नेमध्यें करावें.

शुक्लपक्षांत आधीं चंद्र आणि कृष्णपक्षांत आधीं सूर्य अशा क्रमानें प्रतिपदेपासून तीन तीन दिवस चंद्र व सूर्य यांचा उदय बलिष्ठ होतो. चंद्र आणि सूर्यस्वर क्रमानें शुक्ल व कृष्णपक्षांत प्रत्येक अडीच घटिका वाहतात. याप्रमाणें चोवीस आवृत्त्या साठ घटिकांत (एक अहोरात्रांत) होतात. ह्या प्रत्येक आवृत्तीच्या अडीच घटिकांत पंचतत्त्वें वहात असतात; तीं अशीं,–' पहिलें वायुतत्त्व, दुसरें अग्नितत्त्व, तिसरें भूमितत्त्व, चवथें जलतत्त्व आणि पांचवें आकाशतत्त्व,' याप्रमाणें. या रीतीनें पांच तत्त्वें दर अडीच घटिकांस वहात असतात. त्यांत विधीप्रमाणें अभ्यास करते वेळीं प्रथम तत्त्वसंख्या, दुसरा श्वास-

संधि, तिसरें स्वरचिह्न, चवथें स्थान, पांचवा त्यांचा वर्ण, सहावा प्राण, सातवा स्वाद आणि आठवा प्रकार गतिलक्षण आहे, त्यांचा अनुभव येतो. या सर्वांचें खरें तत्त्वज्ञान होण्याकरितां षण्मुखी मुद्रा कराव्या. त्या याप्रमाणें,—दोन्ही कानांत हातांचे दोन्ही अंगुठे घालून दोन्ही नाकपुड्यांवर दोन मधलीं बोटें ठेवून दोन डोळे व तोंड यांवर बाकीचीं बोटें ठेवावीं. याप्रमाणें छिद्रें बंद करण्याला षण्मुखी मुद्रा ह्मणतात. या मुद्रांचा विधीप्रमाणें अभ्यास झाला असतां रंगाचें भान होतें. त्यांत पिंवळा रंग पृथ्वीचा, पाण्याचा पांढरा, तेजाचा आरक्त, वायूचा निळा आणि आकाशाचा चित्रविचित्र वर्ण असतो. कोणतें तत्त्व प्रकट झालें हें समजण्याकरितां सुचविणारी एक आकृति आहे; ती अशी,—एक स्वच्छ कांशाचा आरसा घेऊन त्यावर श्वास सोडावा; त्यांत चतुष्कोण, अर्धचंद्र, त्रिकोण, वर्तुल आणि बिंदु, या आकारांवरून क्रमानें पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाशतत्त्व यांचा उदय झाला असें समजावें.

त्याप्रमाणेंच श्वास वाहत असतां नाकपुड्यांच्या खालीं वर कोणत्याही ठिकाणीं न लागतां मध्येंच जेव्हां वहात असेल तेव्हां पृथ्वीतत्त्व जाणावें. नाकपुड्यांच्या खालीं जेव्हां वहात असेल तेव्हां जलतत्त्व, वरच्या भागाला जेव्हां स्पर्श करीत असेल तेव्हां अग्नि, वांकड्या गतीनें वहात असेल तेव्हां वायु आणि आंत संचार करीत असेल तेव्हां आकाशतत्त्व जाणावें. अग्नि दोन्ही खांद्यांत राहतो, वायु नाभिमूलांत, पृथ्वी गुदामध्यें, उदक पायांच्या शेवटीं, आणि मस्तकांत आकाश आहे. पृथ्वीचा स्वाद मधुर, पाण्याचा तुरट, तेजाचा तीक्ष्ण ( तिखट ), वायूचा आंबट आणि आकाशाचा सर्वरस आहे. वायुतत्त्व आठ बोटें, पृथ्वी बारा बोटें, जलतत्त्व सोळा बोटें, तेज चार बोटें व आकाश मोकळें वाहतें.

पिंवळा वर्ण, हलके चालणार, हनुवटीपर्यंत खालीं वर न लागतां मध्य स्थितीनें वाहणार, किंचित् उष्ण, हा पार्थिव वायु होय. खालीं वाहणार, शीघ्र गमन, थंड आणि सोळा बोटें परिमाण, हा उदकवायु होय. पाण्याच्या भोंवऱ्यासारखा चालणार, अतिशय उष्ण, आणि चार बोटें उंच वाहणार हा तैजस वायु होय. कांहीं थंड, कांहीं उष्ण, काळ्या रंगाचा, वांकडा तसाच आठ बोटें वाहणारा जो श्वास तो वायुश्वास जाणावा. जो वायु कडू, ज्यांत सर्व रस मिश्र आहेत, तो आकाशश्वास समजावा. या तत्त्वांच्या विशेष धर्मांचा अनुगम ( ज्ञान ) याप्रमाणें जाणावा.

## अथ भावना.

**पृथ्वीतत्त्वः**— रंग पिंवळा, आकार चौकोन, स्वाद मधुर, मध्यस्थानांत वाहणार, परिमाण बारा बोटें, बीज 'लं', देवता ब्रह्मा, स्थान, कटी ( कंबर ) आहे. याप्रमाणें भावना करणाराच्या अंगाला सुगंध, शरीराची कांति सोन्यासारखी व देहाला हलकेपणा वाटतो.

**जलतत्त्वः**–श्वेतवर्ण, अर्धचंद्राकृति, तुरट, सोळा बोटें वाहणार, बीज 'वं', देवता विष्णु, स्थान नाभि आहे. याप्रमाणें भावना केली असतां भूकतहान सहन होऊन पाण्यात बुडणें वगैरे पीडा होत नाहीं.

**अग्नितत्त्वः**–आरक्तवर्ण, त्रिकोण, ऊर्ध्वगामी ( वर गमन करणारें ), उष्ण आणि चार बोटें वाहणारें आहे. बीज 'रं,' देवता रुद्र, आणि स्थान हृदय आहे. अशी भावना केली असतां भीमाप्रमाणें जठराग्नि प्रदीप्त होऊन अग्नितापाची पीडा होत नाही.

**वायुतत्त्वः**–नीलवर्ण, वर्तुल, अम्ल, वक्रगति, चपल आणि आठ बोटें वाहणारें आहे. याचें बीज 'यं', देवता ईश्वर आणि स्थान कंठ आहे. भावनेपासून पक्ष्याप्रमाणें उडण्याची शक्ति प्राप्त होते.

**आकाशतत्त्वः**– वर्ण, आकार, स्वाद आणि प्रवाहाची गति अगदीं अस्पष्ट असल्यामुळें तें निष्प्रकार आहे. बीज 'हं,' भावना करणारालां त्रिकालज्ञान व ( वि० सू० ४५ त सांगितलेल्या ) अणिमादि सिद्धी प्राप्त होतात.

या प्रकारचीं पंचतत्त्वें अडीच घटकांत 'पृथ्वी पंनास पळें, उदक चाळीस पळें, अग्नि तीस पळें, वायु वीस पळें आणि आकाश दहा पळें;' याप्रमाणें वाहतात. एक रात्र व दिवस मिळून साठ घटिका, त्यांत चंद्र व सूर्य या दोहोंचे सहा सहा मिळून बारा फेरे होतात. त्यांचे लग्नाप्रमाणें बारा विभाग आहेत; त्यांत वृषभ, कर्क, कन्या, वृश्चिक, मकर आणि मीन हीं सहा लग्नें चंद्राची आहेत; आणि मेष, सिंह, कुंभ, तुला, मिथुन आणि धनु ही सहा सूर्याचीं लग्नें समजावीं. त्यांत धनिष्ठा, रोहिणी, ज्येष्ठा, अनुराधा, श्रवण, अभिजित्, उत्तराषाढा, हीं ७ सात नक्षत्रें पृथ्वीतत्त्वाचीं आहेत. पूर्वाषाढा, आश्लेषा, मूल, आर्द्रा, रेवती, उत्तराभाद्रपदा आणि शततारका हीं सात नक्षत्रें जलतत्त्वाचीं आहेत. भरणी, कृत्तिका, पुष्य, मघा, पूर्वा, पूर्वाभाद्रपदा आणि स्वाती हीं सात नक्षत्रें तेजस्तत्त्वाची आहेत. विशाखा, उत्तरा, हस्त, चित्रा, पुनर्वसु, अश्विनी आणि मृग ही सात नक्षत्रें वायुतत्त्वाची आहेत.

याप्रमाणें नाडीज्ञान तसेंच तत्त्वज्ञान गुरूपासून विधिपूर्वक समजून घेतलें पाहिजे; कारण, सर्व शुभाशुभ कार्याचा विवेक तत्त्वज्ञानानें होऊं शकतो. ह्मणूनच स्वरोदयांत देवी पार्वतीनें शिवास प्रश्न केला कीं, 'हे देवाधिदेवा, शंकरा! स्वरापासून त्रिकालज्ञान कसें होतें हें मला सांगा?' शिव सांगतात; 'हे पार्वती! भूत, भविष्य व वर्तमान या तीन काळांत जयादिक शुभ व पराजयादिक अशुभ यांचें ज्ञान स्वरोदयाच्या ज्ञानानेंच होतें; यास दुसरा उपाय नाहीं. तत्त्वावरच शुभाशुभ कार्य, जय, पराजय, सुभिक्ष, दुर्भिक्ष हे होतात.

तत्त्व हें त्रिपद•( कालत्रयाश्रय ) आहे, असें ज्ञानी पुरुष सांगतात. तत्त्व अनुकूल होतें ह्मणूनच श्रीरामचंद्रास जय मिळाला; अर्जुनासही उत्तम तत्त्वामुळेंच जय मिळाला; आणि कौरवांस तत्त्व प्रतिकूल होतें ह्मणून त्यांचा सर्वस्वी नाश झाला.

याप्रमाणें तत्त्वविचार व नाडीवर्णन शिवस्वरोदय वगैरे ग्रंथांत सविस्तर केलें आहे; त्याचा संक्षेपरूपानें आणखी थोडासा अन्य ग्रंथाधारें विचार प्रतिपादन केला असतां अभ्यास करण्याला बरीच विशेष माहिती होऊन योगसाधनास पुष्कळ साहाय्य होईल. त्यांत प्रथम नाडींविषयीं विचार सांगतों,–

**सूर्यप्रवाहः**–उजव्या बाजूच्या नाडीस पिंगला, यमुना, सूर्यस्वर वगैरे अनेक नांवें आहेत. उजव्या नाकपुडींतून श्वास जेव्हां पूर्ण रीतीनें वाहतो तेव्हां त्यास सूर्यप्रवाह चालला असें समजावें. कठिन व क्रूर अशा विद्यांचें पठन किंवा अध्यापन ( दुसऱ्यास शिकाविणें ), स्त्रीसंग, वेश्यागमन, मोठ्या नावेंत ( जहाजांत ) बसणें, दुष्टकृत्य, मद्यपान, वीरमंत्रादिकांची उपासना, विह्वल करणें, देशविध्वंस, शत्रूंस विष देणें, शास्त्राभ्यास, गमन, शिकार, जनावरें विकणें, विटा, दगड, लांकडें, रत्न यांचें घर्षण आणि दुसरीं दारुण कृत्यें हीं सर्व सूर्यप्रवाह ( पिंगला नाडी ) सुरू असतां करणें प्रशस्त आहे. यंत्र, तंत्र, किल्ला व पर्वत यांवर चढणें; द्यूतक्रीडा, चोरीचा अभ्यास करणें, हत्ती, घोडे, रथ इत्यादि वाहनें सिद्ध करणें; व्यायाम, मारण, उच्चाटन, षट्कर्में, यक्षिणी, यक्ष, वेताल, विष आणि पिशाच यांचें निवारण करणें; गाढव, उंट, रेडा इत्यादिकांवर व हत्ती, घोडे यांवर बसणें; नदींतून तरून जाणें; तीव्र औषधें व लिहिणें हीं कृत्यें दक्षिणनाडीवर करणें प्रशस्त होय. मारण, मोहन, स्तंभन, द्वेष, उच्चाटन, वशीकरण, प्रेरण, आकर्षण, क्षोभ, दान, क्रय, विक्रय, प्रेतांचें आकर्षण, शत्रुनिग्रह, हातांत खड्ग धारण करणें, वैऱ्यांशीं युद्ध, भोग, राजदर्शन, भोजन व स्नान या कर्मांस पिंगला नाडी प्रशस्त होय. भोजनानें अग्नि मंद करणें, स्त्रियांचें वशीकरण व शयन हें सर्व सूर्यस्वरावर केल्यास सिद्ध होतील यांत संशय नाहीं. सायंकाळीं दैवयोगानें जर सूर्यप्रवाह नसला तथापि मध्यरात्रीं प्रवृत्त झाला असतांही शुभप्रद होतो. जवळच्या युद्धास सूर्य जयप्रद होय. सूर्यप्रवाह चालू असतां आपल्यावर चालून आलेल्या शत्रूचा जय होतो. सूर्यनाडी वाहत असतां दक्षिणेस व पश्चिमेस उभें राहून युद्ध केलें असतां निश्चयानें जय मिळतो. जर संग्रामकालीं सूर्यस्वर वाहूं लागला तर हल्ला करणाराला देव, दैत्य व मनुष्यें यांच्या युद्धांत जय प्राप्त होतो. कोणी पृच्छक ( प्रश्न करणारा ) दक्षिणभागीं उभा राहून जयाविषयीं प्रश्न करील तर त्याच्या मुखांतून निघालेलीं किंवा ज्याच्या विषयीं तो पुसत आहे त्याचीं नामाक्षरें सम कीं विषम हें पहावें. विषम असल्यास जय व सम असल्यास पराजय होतो. पृच्छक जर सूर्यस्वरावर युद्धप्रश्न करील तर युद्ध होईल. दक्षिणस्वरांत प्रथम अग्नितत्त्व असून पुढें जर आकाशतत्त्व प्रकट होईल

तर सर्व वस्तूंचा संग्रह करावा; कारण दोन महिन्यांत सर्व वस्तूंची महागाई होते. श्वास पिंगला नाडींत वाहत असतां जर दूत वामभागीं उभा राहून रोगप्रश्न करील तर त्या रोग्यास साक्षात् शंकरही त्राता ( रक्षण करणारा) असला तरी तो मरण पावेल. वायूचा रोध करून सूर्य आहे तोंपर्यंत ह्मणजे सर्व दिवसभर सूर्यस्वर बंद ठेवावा; आणि सूर्यास्त झाल्यावर सूर्यस्वर चालू करावा. अशा अभ्यासानें मनुष्य पुष्कळ दिवस वांचतो. दिवसां सूर्यस्वर निवारण करण्याचा अभ्यास करणारा मनुष्य योगी होतो यांत संशय नाहीं. पुष्कळ स्वरशास्त्रवेत्ते असें ह्मणतात कीं, 'दिवसां चंद्रस्वर व रात्रीं सूर्यस्वर चालत असल्यास दीर्घ आयुष्यांत कांहीं विघ्न येत नाहीं.' हा सिद्धांत कितीएक गोष्टींनीं आधुनिक विद्वानांच्या शोधाशीं पुष्कळ अंशीं मिळत आहे. कारण, हल्लींचे तार्किक ज्ञानी असें सांगतात कीं, 'वनस्पतींतून नेहमीं 'कॉर्बोनिक' हवा बाहेर निघत असते व त्या (वनस्पती) 'ऑक्सिजन' हवा ग्रहण करीत असतात.' आतां येथें आपला सूर्यस्वर उष्णतायुक्त आहे त्यामुळें त्याचा गुण 'ऑक्सिजनाला' ह्मणजे प्राणवायूला मिळतो, आणि चंद्रस्वर शीतल असल्यामुळें त्याचा स्वाभाविक गुण 'कॉर्बोनिक' हवेमध्यें मिळतो. यावरून असें स्पष्ट होतें कीं, प्रातःकालापासून तें सायंकालपर्यंत सूर्याची उष्णता वगैरेच्या योगानें आपणांला 'ऑक्सिजन' हवा मिळते; आणि रात्रीच्या वेळीं फारकरून आपल्या पोटांत 'कॉरबोनिक' हवा विशेष जाते, ह्मणून आपला कधींतरी दिवसां सूर्यस्वर चालत असला तर, आपल्या शरीरांतील सूर्यस्वराच्या उष्णतेबरोबर अधिक बाहेरच्या सूर्याच्या उष्णतारूपी 'ऑक्सिजन' हवेचा आपल्या हृदयांत संग्रह झाल्यामुळें हृदयाला विकार उत्पन्न होऊन व्याधीची उत्पत्ति होईल. ह्मणून दिवसां जर चंद्रस्वर चालत असला तर सूर्याच्या 'ऑक्सिजन' रूप हवेला आपल्या हृदयांतून निघणाऱ्या थंडीनें 'कॉर्बोनिक' हवेनें कांहीं थंड पाडून दुसरी अधिक आणखी वनस्पतींपासून निघणाऱ्या 'कॉरबोनिक' हवेचा आपल्या हृदयांत संग्रह केल्यानें आपलें हृदयस्थान निर्विकार होतें. याचप्रमाणें जर रात्रीं आपला चंद्रस्वर चालला तर त्या थंड हवेशीं वनस्पतींची 'कॉरबोनिक' थंड हवा मिसळल्यानें आपल्या हृदयस्थानांत विकार उत्पन्न होतो. आतां रात्रीच्या 'कॉरबोनिक' हवेबरोबर वनस्पतींची 'कॉरबोनिक' हवा मिसळली आहे, आणि त्या वेळेस जर आपली सूर्यस्वररूपी ऑक्सिजन हवा आपल्या शरीरांतून श्वासद्वारें बाहेर निघेल तर अशक्तपणा न येतां कोणत्याही प्रकारचा विकार हृदयास होणार नाहीं. यावरून आपले पूर्वीचे दूरदर्शी ज्ञानी जें सांगतात कीं, 'दिवसां चंद्रस्वर व रात्रीं सूर्यस्वर चालविल्यानें आयुष्याची वृद्धि होते,' हें त्यांचें ह्मणणें अनुभवशीर असून सर्वथा निःसंशय खरें आहे; असें सिद्ध होतें.

**चंद्रप्रवाहः**—डाव्या बाजूच्या नाडीस इडा, गंगा, चंद्रस्वर वगैरे अनेक नांवें आहेत. डाव्या नाकपुडींतून जेव्हां श्वास पूर्ण रीतीनें वाहतो, तेव्हां त्यास चंद्रप्रवाह चालला असें समजावें. चंद्रप्र-

वाह चालत असतां त्या वेळीं स्थिरकर्म, अलंकार, दूरदेशगमन, आश्रम, धर्मशाला, मंदिरें, वस्तूंचा संग्रह, हीं कृत्यें करणें प्रशस्त आहे. विहीर, आड व तलाव बांधणें, स्तंभप्रतिष्ठा (मुहूर्तावर घराचा खांब उभा करणें किंवा मुहूर्तमेढ ), यात्रा, दान देणें, लग्न, वस्त्रालंकार धारण करणें, शांतिकर्म, पौष्टिक, दिव्य औषधि, रसायनें, आप्तजन व स्वामी यांचें दर्शन, मैत्री करणें, व्यापार, धान्यसंग्रह हीं कामें इडा नाडी चालू असतां करणें प्रशस्त होय. गृहप्रवेश, सेवा करणें, शेतकी करणें, बीज पेरणें, संधि (तह करणें ), बाहेर गमन करणें, विद्यारंभ, बंधुदर्शन, मौंजी, मोक्षशास्त्रारंभ, धर्म, दीक्षा, मंत्रसिद्धि, कालविज्ञान व सूत्र यांचें अध्ययन, हत्ती, घोडे, गाई, म्हशी वगैरे घरीं आणणें, काल व व्याधीची चिकित्सा करणें, स्वामीस बोलावणें, हीं कर्में चंद्रनाडीवर करणें शुभ होत. नवीन हत्ती व घोडा यांवर बसणें, हत्ती व घोडे यांस बंधन करणें, परोपकार, ठेवा पुरून ठेवणें, गायन, वाद्य व नृत्य यांस आरंभ, नृत्यशास्त्राचा विचार करणें, नगरांत किंवा गांवांत प्रवेश, तिलकधारण करणें व शेत विकत घेणें इत्यादि कर्में इडानाडी पूर्ण वाहत असतां करावीं. दुःख, शोक, विषाद, ज्वर, मूर्च्छा यांचा प्रतिकार करणें, आप्तजन व स्वामी यांच्याशीं संबंध करणें अन्न इत्यादिक व लांकडें यांचा संग्रह करणें चंद्रनाडीवर शुभकारक आहे. स्त्रियांचीं हस्तिदंत इत्यादिकांचीं भूषणें ( चुडे, फण्या वगैरे ), पाऊस पडण्याकरितां अनुष्ठान, गुरुपूजा, अनेक प्रकारचीं विषें बाहेर पाडणें आणि योगाभ्यासादिक कर्में हीं कृत्यें इडा नाडीवर केलीं असतां सिद्ध होतात; परंतु त्या नाडींत वायु, तेज व आकाश हीं तत्त्वें वर्ज्य करावीं. हीं वर सांगितलेलीं कृत्यें दिवसां किंवा रात्रीं केलीं तरी सिद्ध होतात. सकाळीं प्रारब्धयोगानें जरी चंद्र नसला तरी मध्याह्नीं प्रवृत्त झाला असतांही शुभ होतो. तात्पर्य, सर्व शुभकार्यांत चंद्रनाडी प्रशस्त आहे. युद्धाच्या वेळीं जर चंद्रस्वर असेल तर चालून आलेला शत्रु स्वाधीन होऊन ठिकाणीं असलेल्या वीरास जय प्राप्त होतो. दूर युद्ध करण्यास चंद्र शुभ होय. चंद्रनाडी वाहत असतां पूर्वेस व उत्तरेस उभें राहून युद्ध केलें असतां निश्चयानें जय प्राप्त होतो. वामनाडी चालू असतां प्रयाण करूं नये; शत्रु जिंकील. वाहनावर चढतांना प्राणवायु आकर्षण करून घोड्याच्या डाव्या भागीं पाय देऊन चढावें म्हणजे सर्व कार्यांची सिद्धि होते. कोणी प्रश्न करणारा जयाविषयीं प्रश्न करील तर त्याच्या तोंडांतून निघालेलीं प्रश्नाक्षरें किंवा ज्याविषयीं तो पुसत आहे त्याचीं नामाक्षरें विषम कीं सम हें पहावें; सम असल्यास जय व विषम असल्यास पराजय होतो. पृच्छक जर चंद्रस्वरावर युद्धप्रश्न करील तर तह होईल. चैत्रशुक्लप्रतिपदेस आणि दक्षिणायन व उत्तरायण लागतें त्या दिवशीं प्रातःकाळीं चंद्रस्वर चालू असून त्यांत जर पृथ्वी, उदक व वायू हीं तत्त्वें चालू असलीं तर धान्याचें सुभिक्ष होईल; व त्यांत तेज व आकाश हीं तत्त्वें चालत असलीं तर दुर्भिक्ष व घोर भय प्राप्त होईल.

श्वासवायु चंद्रनाडींत असतां पृच्छक सूर्यस्थानीं उभा राहून ज्या रोग्याविषयीं प्रश्न करील तो शेंकडों वैद्यांनीं औषध दिलें तरी वांचणार नाहीं. आकाशापासून चंद्रस्राव होऊन देह-रूपी कमळ प्रफुल्लित होतें; याकरितां चंद्राचा आश्रय करून कर्मयोगाचा अभ्यास केला असतां अमर होतो. रात्रीं चंद्र निवारण करण्याचा अभ्यास करणारा मनुष्य योगी होतो यांत संशय नाहीं.

सोमवार, बुधवार व शुक्रवार या दिवशीं प्रातःकालीं ( बिछान्यावरून उठते वेळेस ) चंद्रनाडी चालत असली तर तो दिवस शुभ जाणावा; व जर सूर्यनाडी असली तर तो दिवस आपणांस अशुभ असें जाणावें. त्याप्रमाणेंच रविवार, गुरुवार, मंगळवार व शनिवार या दिवशीं प्रातःकाळीं जर सूर्यनाडी असली तर तो दिवस शुभ होय; व चंद्रनाडी असली तर आपणास अशुभ असें जाणावें. तसेंच ज्या दिवशीं चंद्रनाडी शुभ सांगितली असतां त्या वेळेस जर सूर्यनाडी चालू झाली; किंवा ज्या वेळेस सूर्यनाडी शुभ सांगितली असतां त्या वेळेस चंद्रनाडी चालू झाली; याप्रमाणें सतत सात दिवस सारखें चाललें असतां आपण आ-जारी पडूं; किंवा आपली धनहानि होईल; अथवा आपल्या कुटुंबांत कलह तरी उत्पन्न होईल, असें जाणावें.

**सुषुम्नाप्रवाहः**—ज्या वेळेस आपला श्वास दोन्ही नाकपुड्यांनीं सारख्या वेगानें वा-हतो किंवा क्षणभर डावीकडे व क्षणांत उजवीकडे वाहतो तेव्हां त्यास सुषुम्ना, शांभवी, मध्यमार्ग, ब्रह्मरंध्र, महापथ, श्मशान, शून्यपदवी इत्यादि अनेक संज्ञा आहेत. क्षणभर डावी-कडे, क्षणांत उजवीकडे, याप्रमाणें सुषुम्नाप्रवाह चालत असतां कोणतेंही शुभकार्य करूं नये. सुषुम्नानाडीच्या ठिकाणीं कालरूपी अग्नि नेहमीं प्रज्वलित आहे; तो विषाप्रमाणें कार्यारंभास वर्ज्य होय; कारण त्यावर केलेल्या सर्व कार्यांचा नाश होतो. जेव्हां क्रम उल्लंघन करून पु-रुषाच्या नाड्या वाहत असतात, तेव्हां त्या मनुष्यास अशुभ फल आहे असें जाणावें. तशीच ज्याची नाडी क्षणांत डावीकडे आणि क्षणांत उजवीकडे वाहते, त्यासही संकट आलें असें जाणावें. तेव्हां सर्व विपरीत फल प्राप्त होतें. जेव्हां दोन्ही नाडींचा संचार चालू असतो तेव्हां त्यास विषयुक्त असें ज्ञानी ह्मणतात; याकरितां या दोन्ही प्रकारच्या सुषुम्नास्वरावर क्रूर व सौम्य अशीं दोन प्रकारचींही कृत्यें करूं नयेत; कारण, तीं निष्फळ होतात. जीवित, म-रण, प्रश्न, लाभ, अलाभ, जय व पराजय या गोष्टी, विषम व विपरीत स्वर इत्यादि प्रसंगीं करूं नयेत. एक जगदीश्वराचें स्मरण व चिंतन करून नंतर योगाभ्यास इत्यादिक पारमार्थिक कृत्यें करावीं. जय, लाभ व सुख यांची इच्छा करणाऱ्या लोकांनीं या वेळेस परमार्थावांचून इतर कर्म करूं नये. सूर्यस्वरांत सुषुम्नानाडी वारंवार वाहत असतां शाप किंवा वर दिला तर तो सर्व व्यर्थ होतो. नाडीचें चलन होण्याच्या वेळीं व तत्त्वाचें चलन होतांना दान आदिकरून पुण्य-

कर्मे करावीं; दुसरें शुभ करूं नये. ज्या वेळेस विषमस्वराचा उदय असतो, तेव्हां कोणतेंह कार्य मनांत आणूं नये. विषमस्वरावर जो प्रयाण करितो तो मरण पावतो; किंवा अनेक क्लेश त्यास प्राप्त होतात यांत संशय नाहीं. सम्मुख (समोरचा), डावीकडचा, आणि ऊर्ध्व चंद्र बलिष्ठ होय; आणि दक्षिणेकडे, खालीं व पृष्ठभागीं सूर्य बली होय. यावरून विद्वान् लोकांनीं पूर्ण रिक्त या स्थानांचा चांगला विचार करावा. चंद्रस्वर वाहत असतां आलेला दूत ऊर्ध्वभागीं वामभागीं आणि अधोभागीं आल्यास शुभ जाणावा. तसेंच सूर्यस्वर चालत असतां पृष्ठभागीं. दक्षिणभागीं आणि खालीं आलेला दूत शुभसूचक होय. अनादि, निष्क्रिय, निश्चल असा जो विषमसंधि ह्मणजे सुषुम्नास्वर तो परतत्त्व जें ब्रह्म त्याचे ठिकाणीं लीन होतो, त्यास संध्या असें स्वरज्ञानी पुरुष ह्मणतात. ते लोकप्रसिद्ध जो वेद त्याला वेद ह्मणत नाहींत; कारण, त्याचे ठिकाणीं वेदत्व नाहीं. तर ज्याच्या योगानें परमात्म्याचें ज्ञान होतें त्यास ते स्वरज्ञानी पुरुष वेद ह्मणतात. त्याचप्रमाणें ब्राह्मण ज्या दिवस व रात्री यांच्या संधीस संध्या करितात त्या संध्येस ते संधि ह्मणत नाहींत; तर विषमसंधिगत ह्मणजे सुषुम्नानाडींत असणारा प्राणच ते संधि ह्मणतात.

जो सुषुम्नारूपी श्वासाला आकर्षून शरीरांत स्थिर करितो अशा पुरुषाला परमपदाची प्राप्ति होते; आणि याप्रमाणें जो करीत नाहीं त्यांचीं सर्व कृत्यें निष्फळ होतात. त्या वेळेस त्यानें केलेलीं कृत्यें त्यास मोठीं क्लेशदायक होतात. या प्रवाहाच्या वेळीं आपले आप्त व मित्र आपल्याशीं विरोध करून आपल्यावर कांहींतरी उगीच अपवाद ठेवून तिरस्कार करितात. तसेंच त्या वेळेस खरें तें खोटें ठरून भलताच परिणाम होतो. ह्मणून ह्या विद्येचे अनुभवी ज्ञाते असें सांगतात कीं, या प्रवाहांत जेवणखाण, बोलणें किंवा संकल्प वगैरे कांहींएक करूं नये. तात्पर्य हें कीं, कोणतेंही कर्म करण्याची खटपट ह्या वेळेस करूं नये; फक्त एकाग्रवृत्ति करून स्नान, ध्यान, संध्यादि नित्यकर्म, ईश्वरस्तुति, अतिथिपूजन वगैरे धर्मकृत्यें मात्र करावीं; अथवा योगाभ्यासी जो असेल त्यानें या वेळेस आपला श्वास शरीरांत स्थिर करून नाक, कान, डोळे वगैरे इंद्रियांची प्रवृत्ति विषयांकडे न जाऊं देतां एकाग्रचित्तानें आत्मज्योतींत निमग्न असावें. संसारसंबंधी कामें या वेळेस कांहीं एक करूं नयेत; कारण; त्यापासून महासंकटें व अनेक प्रकारचीं दुःखें प्राप्त होतात. याकरितां पूर्वीच्या महासमर्थ ऋषिलोकांनीं संधि ह्मणजे संध्येचे तीन काळ सांगितले आहेत. ते असे,—प्रातःकाळीं दोन्ही (इडा व पिंगला) श्वासांच्या संधीच्या वेळेस संध्या करून भगवंताचें ध्यान करावें; आणि नंतर चंद्रस्वर चालवावा. पुढें मध्याह्नसमयीं पुनः तशीच संध्या आणि ध्यान केल्यानंतर सूर्यस्वर चालवावा व भोजन करावें; पुढें चंद्रस्वर चालवून पाणी प्यावें. त्यापुढें संध्याकाळीं ह्मणजे सूर्यचंद्रांच्या संधीच्या वेळीं पुनः पूर्वप्रमाणें संध्या व ध्यान करून रात्रीं सूर्यस्वर चालवावा. याप्रमाणें संध्येचे तीन काळ

ज्ञानी पुरुषांनीं सांगितले आहेत. तथापि हल्लीं अज्ञानी लोक अशा पवित्र सुषुम्नारूप श्वासाच्या संधिरूप संध्येचा खरा उपयोग न समजतां या वेळेंत भलभलत्या क्रिया करितात; त्यांत पूर्ण लाभ न होतां उलट विपरीतच परिणाम होतो. ह्या श्वासाच्या संधिरूप संध्येचें असें सामर्थ्य आहे कीं, ह्याचा नित्य अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना त्रिकालज्ञान प्राप्त होतें; कारण, सर्व कल्पना दूर झाल्यामुळें श्वासाचें आकर्षण होऊन त्यांत ध्यान केल्यानें स्तंभवृत्ति अथवा कुंभकनांवाचा प्राणायाम सिद्ध होतो. त्या वेळेस सर्व स्नायूंचें आकर्षण झाल्यामुळें शरीरांत पंचभूतांचा काळा, लाल, पांढरा व निळा वगैरे रंग दिसायाला लागतात.-हे रंग पांच प्राणांतून उत्पन्न झाल्याबरोबर त्या सर्वांना संकल्पासहित एकत्र केल्यानें पुरुष त्रिकालज्ञ होतो. त्या वेळेस आत्म्याची प्रकाशमान ज्योति अवलोकन करितो. ह्या ज्योतींत सर्व नाड्या, सर्व वृत्ती, तसाच सर्व इंद्रियांचा समूह एकत्र झाल्यानें हें सर्व विश्व एकरूप प्रवाहांत चाललेलें दिसतें. नंतर निश्चयरूप बुद्धि आपला सर्व व्यापार सोडून देऊन कांहींएक चेष्टा करीत नाहीं; त्या अवस्थेस योगी जन परमगति ह्मणतात. या परमगतीचा देखावा सूर्यनाडी व चंद्रनाडी या दोहींतही प्राप्त होत नाहीं. याविषयीं हठयोगप्रदीपिकेंत सांगितलें आहे कीं, दिवसां सूर्यनाडी वाहत असतां आत्म्याचें पूजन ह्मणजे ध्यान करूं नये. तसेंच रात्रीं चंद्रनाडी वाहत असतां आत्मध्यान करूं नये; ( कारण, त्या वेळेस चित्त स्थिर राहत नाहीं. ) तर ह्या दोन नाडींना रोंकून त्यांच्या संधीच्या काळांत आत्म्याचें ध्यान करावें; कारण ह्या दोन्ही नाडींना रोंकलें असतां सुषुम्नारूपी अंतर्गत प्राणाची उत्पत्ति होते आणि त्यायोगानें मन स्थिर होतें. सुषुम्ना नाडी चालू असतां प्रयाण करूं नये; केलें असतां मोठें संकट प्राप्त होतें व कित्येक वेळां तर मृत्यु प्राप्त होतो. याकरितां आपण मार्ग चालत असतां एकाएकीं जर सुषुम्नाप्रवाह सुरू झाला तर तत्काळ तेथें रस्त्यांतच बसून जावें, आणि वृत्ती स्थिर करून ध्यानांत निमग्न व्हावें किंवा ईश्वरस्तुति करावी, ही अगत्याची सूचना आहे; कारण कीं, या श्वासाच्या वेळीं चोहोंकडे विघ्नें आहेत असें निश्चयानें जाणावें. असें या विद्येचे अनुभवी सांगतात.

दुसरें असें कीं, या श्वासाच्या वेळीं आपल्या अंतर्यामी आत्म्यानें कालस्वरूप धारण केलेलें असावें, किंवा मृत्यूचा समयच एखादे वेळीं जवळ आलेला असेल; असें समजावें. करितां त्या वेळेस आपल्या सत्य आत्मज्योतीचें ध्यान करण्यास कधीं चुकूं नये. कारण, असा योग वारंवार येत नाहीं; याकरितां या मृत्युयोगांत सर्व ब्रह्मांडाचें ऐश्वर्य मिळण्याचा जरी संभव असला तरी तो एकाद्या कस्पटाप्रमाणें मानून अगोदर नामस्मरण आणि ध्यान करावें. यायोगानें सुषुम्नाप्रवाहांतच परम गति प्राप्त होतें. दुसरें, याप्रमाणेंच भूत, भविष्य व वर्तमान या तीन्ही काळच्या गतीचें ज्ञान अभ्यासी पुरुषास होतें. करितां अशा योगांत जे जबर अभ्यास करणारे पुरुष सर्व संकल्पाचा त्याग करून आत्मध्यानांत निमग्न होतात ते मोठे

भाग्यवान् आहेत; कारण, त्या समयीं त्यांचे पूर्वीचे सर्व संकल्प थोड्या श्रमानें फल देणारे होतात. या योगाविषयीं निष्काम भक्ति आणि ध्यान करणारे पुरुष दरिद्याचे श्रीमंत, मूर्खांचे पंडित व महायशस्वी होऊन जातात. पूर्वी जे पुरुष अतिनीच योनींत उत्पन्न झालेले असून अतिमहत्त्वाच्या परमपदास प्राप्त होऊन ऋषि झाले; ते सर्व या गुप्तकृतीवर दृढ विश्वास ठेवून वागणारे होते ह्मणून झाले असें पक्कें समजावें. या योगांत भोजन व पान केलें असतां मोठे भयंकर व अनर्थकारक व्याधि उत्पन्न होतात. गृहस्थ या योगांत स्त्रीसंग करील तर जो गर्भ राहील तें संतान नपुंसक होईल; किंवा एखाद्या वेळीं मृत्यु सुद्धां प्राप्त होईल; असें सांगितलें आहे.

कालज्ञानाचें ' मूल सुषुम्ना आहे; कारण, सुषुम्नेला आरंभ करून ध्यानांत लीन झाल्यानंतर ज्या वेळेस हा प्रवाह बंद पडतो त्या वेळेस मनांत असे संकल्प उत्पन्न होतात कीं, ' अमुक क्रीडा अथवा अमुक साधनानें वाक्सिद्धि होऊं शकेल, अथवा अमुक प्रकारच्या समागमानें यथार्थ सत्ता बसूं शकेल;' याप्रमाणें संकल्प स्वाभाविकरीतीनें आपल्या हृदयांत प्रकट होतात. अशा संकल्पांना ध्यानांत ठेवून वर्तन करणाऱ्या पुरुषाला स्वतांचा स्वभाव, बुद्धि, ज्ञान आणि शक्ति वगैरे सामर्थ्यांचें ज्ञान उत्पन्न होतें; त्यावरून त्याच्या शरीर, मन वगैरेंची स्थिति आपोआप त्याला समजण्यांत येते. त्यावरून तो तसा पुरुष प्रत्येक संकल्पांत आपले गुणदोष काय आहेत हें जाणूं शकतो. ही गुणदोषांची संपूर्ण परीक्षा केल्यामुळें तो आपला संकल्प कोणत्या रीतीनें, कोणत्या जागीं, कोणाबरोबर, कोणत्या प्रकारचा लाभ, अलाभ, सुख आणि दुःख वगैरे देऊं शकेल या सर्वांचें प्रत्यक्ष ज्ञान यथार्थरीतीनें दुसऱ्याला सांगूं शकतो. या रीतीनें प्रथम आपलें स्वतःचें भविष्य जाणतो; नंतर आपल्या स्त्री, पुत्र आणि दुसरे संबंधी वगैरेंचें भविष्य जाणूं शकतो. त्याचप्रमाणें पुढें अनुभवावरून आपला गांव, देश आणि सर्व पृथ्वीचें भविष्य जाणूं शकतो. एवढेंच नाहीं तर शेवटीं सर्व ब्रह्मांडाचें सुद्धां भविष्य यथार्थ समजूं शकतो; कारण, प्राण सर्व सृष्टीचें सत्य मूलतत्त्व आहे. त्या प्राणाचें यथार्थ स्वरूप लक्षांत आल्यामुळें वर सांगितलेलें मोठें अद्भुत ज्ञान होऊं शकतें यामध्यें कांहीं आश्चर्य नाहीं; कारण, हृदयाकाशरूप गुहेंत आपला हंसरूपी प्राण सोहंरूपी आत्म्याच्या आकृतींत विराजमान झालेला असतो. आणि तो सोहंरूप आत्मा कुंडलीचक्रामधून सूर्य आणि चंद्र या दोन नाडींस प्रकट करितो. त्यांत सोहंरूपी आत्मा प्रजापतिरूपानें व्यापून राहिलेला आहे. आतां अन्नरूपी चंद्राचा भोक्ता सूर्यरूपी प्राण सांगितला आहे, यावरून हा बाहेरच्या ब्रह्मांडाचा जो सूर्य तो प्राण समजावा; आणि बाहेरचा चंद्र तो अपान समजावा. या अपानाचें खरेंस्वरूप या विश्वांत अन्न आहे, ह्मणून अन्नरूपी चंद्राचा भोक्ता सूर्यरूपी प्राण सांगितला आहे. याव-

रून अशा गुप्त अर्थांत,'सूर्य चंद्राचा आहार करितो,अथवा प्राण अपानाचा आहार करितो; असें सांगितलें. याचें तात्पर्य इतकेंच कीं, ह्या विश्वाच्या स्थावर, जंगम, जड, चैतन्य वगैरे सर्व आकृती अन्न अथवा चंद्र अथवा अपान यांच्या मानिल्या आहेत. त्याचप्रमाणें हा बाहेरचा सूर्य आणि आपला प्राण एकरूप झाल्यानें चंद्ररूपी अन्नाचा भोक्ता आपला प्राणरूपी सूर्य सांगितला. ह्मणून चंद्राचा आहार सूर्य करितो, असें ह्मटलें. यावरून सोहंरूपी प्रजापतीची संकल्परूप जी आकृति त्याला संवत्सर ह्मणतात. त्याचे अवयव सहा ऋतु, बारा महिने, पक्ष, आठवडे, दिवस, प्रहर, घटिका, पळें, निमेष वगैरे सांगितले आहेत. ह्मणून पक्षांतील कितीएक दिवस सूर्याचे व कितीएक दिवस चंद्राचे मानिले आहेत; ते मागें सांगितले. यावरून ह्या विद्येचे अनुभवी ज्ञाते पुरुष असें सांगतात कीं, कोणी पुरुष सूर्यस्वरांत त्याच्या (सूर्याच्या) तिथी आणि त्याचे वार घेऊन जर उत्तरेस किंवा पूर्वेस गमन करील व तेथें यथार्थ पुरुषार्थ करील तर तो पुरुष जय, कीर्ति, मान, प्रतिष्ठा वगैरे मिळवून कार्य संपादन करून परत येईल. याचप्रमाणें चंद्रस्वरांत त्याचे दिवस आणि वार घेऊन प्रयाण करून यथार्थ पुरुषार्थ करील तर त्यास शुभ फल प्राप्त होईल; परंतु तो स्वर मार्गांत पालटूं न देण्याचा प्रयत्न अवश्य करावा; कदाचित् पालटलाच तर तेथेंच स्थिर होऊन पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ध्यान, स्मरण वगैरे करावें. या काळयोगांत (सुषुम्नाप्रवाहांत) सूर्य तो दिवस आणि चंद्र ती रात्रि मानिली आहे; करितां दिवसां चंद्र व रात्रीं सूर्य याप्रमाणें नेहमीं नियमानें चालले तर आयुष्यांत कधींही विघ्नें येत नाहींत. त्याकरितां प्रातःकाळ, मध्याह्न, संध्याकाळ आणि मध्यरात्र, यांशिवाय वार व तिथी यांच्या संयोगकाळाच्या भागांला सुषुम्नेचा काल मानिला आहे. याचवरून रात्रीचे तीन वाजल्यापासून तें सकाळच्या नऊ वाजेपर्यंत ६ सहा तासांना सत्ययुग मानिलें आहे; सकाळच्या नऊ वाजल्यापासून तें दुपारच्या तीन वाजेपर्यंतच्या ६ सहा तास काळाला त्रेतायुग ह्मणतात; तसेंच दिवसाच्या तीन वाजल्यापासून तें रात्रीच्या नऊ वाजेपर्यंतच्या ६ सहा तास काळाला द्वापरयुग ह्मणतात; आणि रात्रीच्या नऊ वाजल्यापासून तें रात्रीचे तीन वाजेपर्यंतच्या सहा तास काळास कलियुग अशी संज्ञा दिली आहे. यारीतीनें चार युगांची गणती एकाच दिवसांत केली आहे. याकरितां असें सांगितलें आहे कीं, गृहस्थानें सत्ययुगांत आणि त्रेतायुगांत स्त्रीसंग करूं नये; कारण, जो दिवसरूपी सूर्य तो प्राणाची आकृति मानिली आहे; करितां यांत विषयभोग करील तर त्यानें स्वतः आपल्या प्राणाचा घात केला असें अनुभवी ज्ञाते समजतात, कशामुळें तर तो दिवसरूपी सूर्याच्या अग्नींत आपल्या श्वासरूपी प्राणाचा होम करण्याची इच्छा करितो; अथवा सूर्याच्या अग्नींत देहाचा होम करूं इच्छितो. दुसरें असें सांगितलें आहे कीं, प्राणाचें मूळ जें हृदयकमळ त्यामध्यें सोहंरूपी आत्मा राहिला आहे; त्याची परिपक्व परमगतीची स्थिति कोणत्या रीतीनें प्राप्त केली जाईल त्याकरितां सोहंक्रिया दाखविली आहे; ती करावी. ती अशी,–

## सोहंक्रिया.

आपला प्राण हृदयस्थानांतून बाहेर निघून १२ बारा बोटांच्या अवकाशामध्यें गमन करितो, तेथें तो थोडा वेळ स्थिर राहून तेथून अपानरूप धारण करून पुनः हृदयकमलांत येऊन स्थिर राहतो. आतां हृदयांतून जो श्वास बाहेर येतो तो सूर्याप्रमाणें उष्ण असल्यामुळें त्याला सूर्यस्वर अथवा प्राण ह्मणतात. हा प्राण जेव्हां बाहेरून पुनः हृदयांत येतो, त्या वेळेस थंड झाल्यामुळें त्याला अपान अथवा चंद्रस्वर ह्मणतात. यावरून सूर्य अथवा प्राणवायु हृदयाला उष्ण करितो, ह्मणून तो भोजन केलेल्या अन्नाचें यथार्थरीतीनें पाचन करितो. आतां अपानरूपी चंद्र ज्या वेळेस बाहेर निघून प्राणरूपी सूर्यांत लीन होतो, त्या वेळेस हृदयकमळांत अनंत तत्त्वें, त्यांत मुख्यत्वेंकरून साठ अथवा पांसष्ट तत्त्वें प्रकट होतात. या तत्त्वांत मन स्थिर केल्यानें सुख अथवा दुःख यांपैकीं कांहींच समजत नाहीं. त्याप्रमाणें प्राणरूपी सूर्यस्वर, अपानरूपी चंद्रामध्यें ज्या वेळेस लीन होतो त्या वेळेस पुनः जन्म व मरण यांचा संभव मुळींच राहत नाहीं दुसरें असें, प्राणवायु जितक्या वेळपर्यंत बाहेर काढून पुनः स्थिर ठेवावा तितक्या वेळपर्यंत कल्पना राहत नाहीं; व सर्व भ्रांति दूर होते. अपानस्वराला ( चंद्रस्वराला ) आंतमध्यें स्थिर ठेविल्यानें परमपद प्राप्त होऊं शकतें.

याप्रमाणें प्राण व अपानवायूच्या निरोधानें हृदयांत स्थिर राहिलेल्या अशा सोहंस्वरूपाचा साक्षात्कार होतो. तेणेंकरून आपलें मन सर्व संकल्पांसहवर्तमान श्वासाबरोबर एकत्र मिळून गेल्याप्रमाणें होऊन त्या वेळीं मनांत राहिलेले पूर्वींचे गुप्त संकल्प सृष्टीविषयीं प्राण आणि अपान या दोहोंची उदय आणि अस्तपणाची जी सर्व जगद्रूप क्रिया ती यथार्थपणें जाणूं शकतात; त्या योगानें आत्मज्योतींत मनाची स्थिति दृढ राहते. तसेंच मन आणि प्राण या दोहोंपैकीं जर एकाचा लय होईल तर दुसऱ्याचा सुद्धां लय होतो. याचप्रमाणें एकाचा उदय झाला असतां दुसऱ्याचा उदय होतो, आणि हे दोघे जर लीन झाले नाहींत, तर प्रत्येक इंद्रिय आपापल्या विषयांत प्रवृत्त होतें. ह्मणून मन आणि प्राण ह्या दोवांची ऐक्यता झाल्यानें मोक्षाची प्राप्ति होते; कारण, या दोघांचा लय झाल्यानें ते दोघे आत्मज्योतींत स्थिर होतात. कशावरून तर मन आणि वायु हे दोघे एकाच रूपानें आहेत.

ज्या आधारचक्रांत मन लीन होतें, त्याच आधारचक्रांत वायु सुद्धां लीन होतो. त्याचप्रमाणें जेथें वायु लीन होतो, तेथेंच मन लीन होतें; कारण, मन आणि पवन हे दोघे एकरूपच आहेत. त्यामुळें सोऽहंस्वरूपांत व्यापलेल्या श्वासाच्या सर्व नाड्यांना गुदा, नाभि, हृदय, कंठ, तालु आणि ब्रह्मरंध्र ह्या षट्चक्रांत गमन करण्याची शक्ति येते. त्या वेळीं प्राण आणि अपान यांच्या चलनवलनाच्या आधारावरून शरीराची स्थिति,

ज्ञान आणि नाड्या वगैरे बदलतात असें समजतें; त्यापुढें नाभिचक्राच्या मुळाशी जें एक कुंडलीनांवाचें सर्पाकार चक्र आहे, त्याचा संबंध सोहमाच्या सर्व नाड्यांबरोबर राहिलेला आहे; त्यामुळें सोहमांत राहिलेला प्राण व अपान यांचा संचार प्रमाणपूर्वक सोहमाच्या ठिकाणी वासना उत्पन्न करितो. सारांश इतकाच कीं, हें कुंडलीचक्र वासनारूपांतच राहिलें आहे. त्याकरितां हें वासनारूपी कुंडलीचक्र, चित्ताचा नाश झाल्याबरोबर नष्ट होतें.

चित्ताच्या वृत्तींचीं एक वासना आणि दुसरा प्राण अशीं दोन कारणें आहेत. ह्या दोघांतून एकाचा लय झाला असतां दुसऱ्याचाही लय होतो; ह्मणजे वासनेचा लय झाला असतां चित्त आणि प्राण ह्या दोहोंचा लय होतो; त्याचप्रमाणें प्राणाचा लय झाल्यानें चित्त आणि वासना या दोहोंचा लय होतो. त्याच रीतीनें चित्ताचा लय झाल्यानें प्राण आणि वासना या दोहोंचा लय होतो. या मूळतत्त्वाकरितां हठयोग्यांना प्राण आणि अपान या दोहोंच्या क्रियांच्या साधनाच्या वेळीं आसनाच्या दृढ अभ्यासानें कुंडलीचक्रास नियमानें चालवावें लागतें; कारण, ते जर तसें न करतील तर वायूचा कोप होऊन अनेक व्याधि उत्पन्न होतील; आणि योग सिद्ध होणार नाहीं. आतां दुसरें असें कीं, कुंडलीचक्राच्या आधारावर सर्व योग नीट रीतीनें होऊं शकतात; ह्मणून जेथपर्यंत कुंडली जागृत झाली नाहीं तेथपर्यंत योगाभ्यास व्यर्थ जातो. आणि ज्या वेळेस निजलेली कुंडली अनुभवी गुरूच्या प्रसादानें जागी होते, त्या वेळेस संपूर्ण षट्चक्रांचें भेदन होऊं शकतें, आणि तसें झाल्यामुळें ब्रह्मा, विष्णु व रुद्र अथवा उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय या सर्वांचें छेदन होतें ह्मणजे त्याचा जाणपणा राहत नाहीं. अशी स्थिति झाली ह्मणजे श्वास, शरीराच्या बरगड्यांत प्रवेश करितो; त्यामुळें याला योगी लोक मेरुदंड असें ह्मणतात. ह्या मेरुदंडामध्यें ज्या वेळेस श्वास वर चढावयास लागतो, त्या वेळेस शरीरांतील पंचभूतांचा वर्ण एकेक प्रकट होत आहे असें समजतें. आणि श्वास गुदाचक्राला सोडून नाभिचक्रावर जातो, त्या वेळेस इंद्रियें आपापला विषय ग्रहण करण्याचा व्यापार सोडून देतात; त्यामुळें तीं स्थिर राहतात. त्यापुढें कुंडलीरूपी वासनिक चक्राच्या संबंधानें आपलें मन पूर्वी दृढ झालेल्या भावनेच्या अनुसारानें स्वर्ग, मृत्यु आणि पृथ्वी यांच्या भिन्न भिन्न स्थानांमध्यें गमन करीत आहे असें वाटतें; अथवा विरक्तपणाच्या दृढ भावनेनें नीति, सत्यता, ज्ञान आणि ध्यान वगैरेंचें वर्णन करीत त्याची सत्य परीक्षा करण्याची किंवा दुसऱ्याला उपदेश करण्याची शक्ति त्याला येते. त्यापुढें जसजसा श्वास षट्चक्रांत वर चढत जातो, तसें तसें ज्ञान आणि मन वगैरेंची स्थिति पालटत जाते. नंतर ज्या वेळेस श्वास ब्रह्मरंध्रांत चढूं लागतो, त्या समयीं सत्य धारणा होऊं लागते; परंतु एवढ्या स्थितीस पोहोंचण्यास हठयोग्यांना अमुक अशा कांहीं नियमांप्रमाणें अत्यंत कठिन प्राणायाम करावे लागतात. कुंडलीचक्र प्रत्येक वेळीं नियमित न राहिल्यामुळें प्राणा-

च्या अंतसमयीं उदानवायु स्वर्ग अथवा नरक वगैरे स्थानांची प्राप्ति करवितो. ती अशी,– हृदयकमळांतून निघून शंभर नाड्यांच्या मध्यें राहणारी व वर गेलेली जी सुषुम्ना नाडी, तिच्याही वर जाणारा जो उदानवायु तो पायापासून तें माथ्यापर्यंत फिरत असतो. त्याच्या योगानें तो कर्माप्रमाणें ह्मणजे शुभकर्मांपासून देवादिक पुण्यस्थानाच्या लोकांची प्राप्ति करवितो. तसेंच कधीं जर पापरूप अत्यंत अशुभ कर्म केलें असेल तर पशुपक्ष्यादिक अधमयोनींत वासनेच्या योगानें प्राप्त करवितो; आणि जर पाप व पुण्य कर्मे बरोबरच झालीं असतील तर मृत्युलोकास प्राप्त करवितो. परंतु कुंडली नियमित रीतीनें चालवून श्वास ब्रह्मरंध्रांत नेल्यानें तो (उदानवायु) परमपदाची प्राप्ति करवितो; याकरितां कुंडलीच्या कृतीविषयीं कांहीं अधिक सांगणें अगत्याचें आहे. तें असें,–

हृदयस्थानांत कुंडलीचा संबंध पंचप्राणांबरोबर झाल्यामुळें कुंडलीच्या झोंकाप्रमाणें प्राणवायु सर्व ठिकाणीं गमन करितो; परंतु कुंडलीचक्र जर आडवें पडलें असेल तर प्राण आणि अपान हे दोघे एकत्र झाल्यामुळें उदानवायु वर चढतो व अपान खालीं जातो; असें झाल्यामुळें जठराग्नि प्रदीप्त होतो, आणि त्यामुळें आपण केलेल्या आहाराच्या सत्वांशाला, कुंडली भिन्न भिन्न नाड्यांमध्यें प्रवेश करविते; त्यांत रक्ताच्या नाडींत रक्त जातें; वीर्याच्या नाडींत वीर्याचा संग्रह होतो; आणि जड पदार्थांचा संग्रह अपानवायु गुदाचक्रांत करवितो. याप्रमाणें कुंडलीकृतीनें सर्व व्यवहार चालतात. ह्मणून कितीएक अनुभवी योगवेत्ते सांगतात कीं, जो मनुष्य पाठ फिरवून, ताठ बसून व पोटाचा भाग बरगड्यांकडे दाबितो, त्या मनुष्याच्या मध्यभागांत पोहोंचलेल्या शीतळतेचा नाश होऊन उष्णता उत्पन्न होते, आणि पोटाच्या आंतड्यांना लिपटून राहिलेला मळ सुटून गुदास्थानांत एक ठिकाणीं जमतो. पुढें मळ विसर्जन करण्याच्या वेळीं जर पोटाच्या भागाला जोरानें दाबून ताठ बसलें तर त्याचा मळ स्वच्छरीतीनें बाहेर निघून जातो. परंतु याप्रमाणें न करितां श्वासाचा पोटांत मात्र संग्रह करून ठेविला तर त्याला व्याधि उत्पन्न होते. ह्मणून अपानवायूला दाबून ठेवणारा ह्मणजे पोटाच्या भागाला वर सांगितल्याप्रमाणें बरगड्याबरोबर मिळवून देणारा अशा पुरुषाच्या सर्व स्नायूंमध्यें उष्णता आल्यामुळें शक्ति व निरोगीपणा स्वाभाविक रीतीनें प्रकट होतो. त्याकरितां प्राण व अपान यांचें आवर्जन (ग्रहण करणें) व विसर्जन होण्याची गति नियमित राखावी, ह्मणजे प्रत्येक श्वासोच्छ्वासाचा अति त्वरेनें तोंडावाटें पोटांत प्रवेश होऊं द्यावा. परंतु त्या वेळेस पोटाला बरगड्यांशीं (बरगड्यांत) मिळवून देण्याचें विसरूं नये. त्यानंतर आंत शिरलेल्या श्वासास फार मंदगतीनें कोणत्याही नाकपुडीवाटें बाहेर काढणें. याप्रमाणें सर्व श्वासाला बाहेर काढल्यानंतर थोडा वेळपर्यंत श्वास घेऊं नये; नंतर ज्या वेळेस प्राण गुदमरूं लागेल त्या वेळेस श्वासाला तोंडावाटें आंत घ्यावें. ह्या क्रियेला कागभुषंडी नांवाचा ऋषि पूर्णरी-

तीनें जाणत होता, त्यामुळें तो अमर झाला असें सांगितलें आहे. याचा सारांश इतकाच कीं, जो कोणी श्रद्धाळू पुरुष ही क्रिया यथार्थरीतीनें करून वीर्याचें संरक्षण निरंतर करीत राहतो; त्याला कोणत्याही व्याधीपासून उपद्रव होत नाहीं; कारण, अशा क्रियेनें कुंडलीचक्र सरळ होऊन जातें, आणि त्यायोगानें सर्व प्राणवायूंची गति एकसारखी नियमानें चालते. अशा कृतीला अमरकृति मानिली आहे. याशिवाय अमरगतीचे प्राप्त करवून घेण्याचे दुसरे आणिक कितीएक गुप्त प्रकार आहेत परंतु ते महायोगात्मेच. मात्र जाणतात.

आपल्या हृदयस्थानांत व्यापून राहिलेल्या कुंडलीचक्रांत आपली वासना राहिली आहे, त्यामुळें त्या कुंडलीचक्रांत प्राणवायूचें आगमन झाल्यानें कुंडलींत व्यापून राहिलेली वासना हालते. ह्मणून ज्या प्रकारानें वासना हालवावी त्या प्रकारानें कुंडलींत स्फूर्ति (स्फुरण) उत्पन्न होते, त्यायोगानें त्याच प्रकारचा भास आपल्या चित्तांत पडतो; तो याप्रमाणें,—आपण जर कुंडलींत असणाऱ्या वासनेस मनन करण्याच्या भावनेनें हालविली तर तत्काल मनाची उत्पत्ति होते. निश्चयाच्या भावनेनें हालविली तर बुद्धि प्रकट होते. स्मृतीच्या भावानें हालविली तर चित्त प्रकट होतें. सूक्ष्मतेच्या भावानें तर्क उत्पन्न होतो. अहंभावानें हालविली तर अहंकार आणि स्पर्शाच्या भावनेनें वायु प्रकट होतो. कारण, अनेक दृढ झालेल्या भावनांमुळें वासनेंत पंचतन्मात्र, देहचतुष्टय, चार अवस्था आणि अंतःकरणपंचक वगैरे दिसूं लागतात. हे सर्व भाव पंचभूतांच्या भिन्न भिन्न आकृतींमध्यें भासतात. परंतु हे सर्व भाव मन आणि प्राण या दोघांच्या व्यवहारावर अवलंबून राहिलेले असतात. याविषयीं छांदोग्य-उपनिषदांत सांगितलें आहे कीं, अन्नाच्या जडभागापासून विष्ठा होते, मध्यभागापासून मांस होतें, आणि ह्या वासनिकभावापासून मन प्रकट होतें, हें आपल्या अनुभवावरून खरें वाटतें; कारण, लहान मूल जेथपर्यंत अन्न खात नाहीं तेथपर्यंत त्याच्या मनाचें यथार्थरीतीनें बंधारण होत नाहीं. जर कधीं कोणीं एकाद्या साधारण पुरुषानें सुद्धां अन्नाचा आहार पुष्कळ दिवस केला नाहीं तर त्याचें मन लय होऊं पाहतें, ( मन ठिकाणीं राहत नाहीं, ) ह्मणून याच्या बंधारणाकरितां पृथ्वीतत्त्वाची जरूर आहे. जळाच्या स्थूलभागापासून मूत्र उत्पन्न होतें; त्याच्या मध्यमभागापासून रक्त आणि सूक्ष्मभागापासून प्राण प्रकट होतो. ह्मणून पाणी जर प्यालें नाहीं तर प्राण नष्ट होतो. यावरून प्राण जलभूताची आकृति आहे. याचप्रमाणें अग्नीच्या जडभागापासून हाडें उत्पन्न होतात; मध्यमभागापासून चरबी अथवा मांस उत्पन्न होतें; आणि सूक्ष्मभागापासून वाणी प्रकट होते. ह्मणून वाचा तेजभूताची आकृति आहे. सारांश हा आहे कीं, वाणी आणि प्राण वगैरे सर्व वस्तु पंचतत्त्वांच्या संयोगी क्रमावर आधार राखून असतात. त्यामुळें सोहंरूपी जीव ज्या वेळेस कुंडलीचक्रांत स्थिर होतो त्या वेळीं सर्व प्राणवायु स्वाधीन होतात; त्याकरितां वासनांचा भाव ज्या वेळेस दृढतेनें उत्पन्न

होतो, त्या वेळेस पंचतन्मात्रांच्या मार्गानें जगत् दिसूं लागतें, त्यामुळें हें दिसणारें जगत् संकल्पमात्र आहे. आणि हा संकल्प बंद पडल्यानें श्वासाची गति बंद पडते, आणि त्यामुळें सर्व प्राणवायु अकल्पित भावांविषयीं सिद्धि देऊं शकतात.

आतां मुख्य सिद्धी आठ आहेत; कोणी चोवीस सिद्धी ह्मणून सांगतात. यावरून सिद्धी अगणित आहेत असें ह्मटलें तरी चालेल. परंतु त्या सर्वांत अनुभवी योग्यांनीं मुख्य तीनच सिद्धी मानिल्या आहेत; त्यांत प्रथम संकल्पसिद्धि. ही गुप्त विद्येच्या ज्ञानानें प्राप्त होते. दुसरी प्राणसिद्धि आहे. इच्यांत प्रथम पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अपानवायूला निरंतर दाबून ठेवून तोंडावाटें बाहेरच्या श्वासाचें पोटामध्यें आकर्षण करावें, आणि मंदगतीनें नाकपुडीवाटें बाहेर सोडीत राहावें. आणि बाहेर श्वास सोडल्यानंतर जेथपर्यंत प्राण गुदमरूं लागला नाहीं तेथपर्यंत श्वास तोंडावाटें किंवा नाकावाटें सुद्धां ग्रहण करूं नये. याप्रमाणें अभ्यास झाल्यानें निरोगीपणा प्राप्त होतो. या दोन सिद्धींशिवाय तिसरी शौर्यसिद्धि मानिली आहे. इच्या योगानें शूरत्व प्राप्त होतें. शरीरांत शूरपणा प्रकट होण्याचें साधन असें आहे कीं, बाहेर काढिलेला प्राणवायु शरीरांत स्थिर करून पुष्कळ वेळ राखण्याचा अभ्यास ठेविल्यानें ती प्राप्त होते. ती, प्राणवायु शरीराच्या भिन्न भिन्न स्थानांत कसकशा रीतीनें स्थिर करावा याविषयीं नियम दाखवून भिन्न भिन्न प्राण्यांना जितकी शक्ति प्राप्त होते; तिच्यापेक्षां पुष्कळ अद्भुत अशी शक्ति प्राप्त करविते. ती अशी कीं, एकादे प्रसंगीं प्रबल इच्छाशक्तीच्या योगानें नुसत्या साधारण छडीनें सुद्धां मोठमोठे बलवान्, प्राणी स्वाधीन करितां येतात. ती कुंडलीमध्यें अनेक क्रिया करून भावना कल्पिते, त्यायोगानें वर सांगिल्याप्रमाणें शक्ति येते. आणखी असें कीं, कुंडलीच्या चलनवलनाच्या गतीवर जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति आणि तुरीया या चार अवस्थांचा आधार राहिलेला असतो. यांत जेव्हां प्राण आणि अपान या दोहोंच्या बरोबर समान अंतरांत कुंडली मध्यें येते, तेव्हां जाग्रत् अवस्था प्राप्त होते. ती कुंडली ज्या वेळेस डाव्या भागांत आडवी येते, त्या वेळेस चंद्रनाडी चालू होते, आणि जेव्हां उजव्या भागामध्यें येते त्या वेळेस सूर्यनाडी चालू लागते. परंतु ज्या वेळेस सुषुम्नानाडी चालूं लागते, त्या वेळेस सर्व स्नायू मोकळे होतात; याकरितां योगी लोक श्वासाला आंत स्थिर करून गुदाचक्रास दाबून ध्यान करितात; त्यामुळें कुंडली मेरुदंडामध्यें गमन करूं लागते. त्यायोगानें तुर्यावस्था प्राप्त होते. ज्यांना ही माहिती नाहीं अशा साधारण मनुष्यानें सुषुम्नेला याप्रमाणें शरीरांत स्थिर न केल्यामुळें त्याच्या देहांत अनेक विकार उत्पन्न होतात. ही कुंडली वरच्याप्रमाणें तीन प्रकारचा विकार निद्रावस्थेंत सुद्धां उत्पन्न करिते. त्याचा प्रकार असा आहे कीं, रात्रींच्या वेळीं जेव्हां आपल्याला डावी बाजू दाबून निजावयाचें असतें, त्या वेळेस कुंडली उजव्या भागांत आडवी येते. त्यायोगानें सूर्यनाडी

चालूं लागते; त्या वेळेस शांत, निर्विकार आणि सुखरूप अशी निद्रा येते. परंतु कुंडली ज्या वेळेस डाव्या भागांत आडवी येते; त्या वेळेस चंद्रनाडी चालण्यास आरंभ होतो. त्या वेळीं आपल्याला न समजतां शरीरामध्यें अपानाचे स्नायू उघडे राहिल्यामुळें शीतळता प्रकट होते. आणि आपणाला ज्या वेळेस उताणें निजावयाचें असतें, त्या वेळेस कुंडली त्रिकोणाकृति होते; त्या वेळीं सर्व स्नायूंची गति अडखळंत चालते, त्यायोगानें श्वास दोन्ही नाकपुड्यांतून वाहूं लागतो; त्यामुळें कंठांतील उदानवायु चलित होऊन स्वप्नें पाडितो. त्यांत जर कधीं चंद्रनाडी अधिक चालूं लागली तर ब्रह्मरंध्राला शीतळता प्राप्त होऊन कितीएक प्रसंगीं स्त्रीसंग केल्याचा भास होतो, त्यामुळें मगजांत असणाऱ्या वीर्याचा क्षय होतो. आतां कधीं जर सूर्यनाडीचा प्रवाह अधिक चालू असला, तर ब्रह्मरंध्र उष्ण झाल्यामुळें श्वास या जगाची रचना दाखवितो. आतां कधीं जर वरच्या दोन्ही नाड्या सारख्या चालूं लागल्या तर मगजांतील वीर्य केवळ व्याधियुक्त होऊन गेल्यामुळें सर्व वासना चित्रविचित्र भावनायुक्त होऊन जातात. त्यामुळें या जगतांत न पाहिलेल्या देखाव्याच्या विचित्र आणि आश्चर्यकारक कल्पना हृदयांतून आपल्या मनोमयचक्रांत प्रकट होतात; त्यामुळें दृढ झालेल्या संकल्पाप्रमाणें मन विलक्षण आकृति धारण करून तें संकल्पाची सृष्टि उत्पन्न करून दाखवितें. या सृष्टींत कोणीएक समयीं दोन चार चंद्र, त्याचप्रमाणें पांच सात सूर्य, व रात्रीचा दिवस भासून आणि त्यांत मनुष्यप्राण्याच्या चित्रविचित्र आकृती दिसतात. या सर्वांचा सारांश एवढाच आहे कीं, कुंडलीच्या निरनिराळ्या चलनवलनांनीं प्राणवायूच्या गतींत फरक पडतो. ह्मणून पुष्कळ या गुप्तविद्येचे अभ्यासी कुंडलीला नेहमीं नियमित ठेवितात. त्यांत प्रथम ते जेव्हां श्वासाला आंत स्थिर करितात, त्या वेळेस थोडें वळून व ताठ बसून पोट आणि गुदा या दोन भागांला बळकट दाबतात, त्यामुळें अपानवायु गुदाच्या तळीं जाऊं शकत नाहीं; तर वर येतो. दुसरें असें कीं, ते या गुप्तविद्येचे अभ्यासी प्राणाला मुखावाटें बाहेर काढीत नाहींत; तर हलके हलके नाकावाटें काढितात. यायोगानें सर्व स्नायू आपापल्या जागेवर नियमित राहतात; कारण, तोंडावाटें श्वास सोडिल्यानें सर्व स्नायूंचें बळ कमी होऊन ते ढिले पडून जातात; ह्मणून अनुभवी लोक याप्रमाणें क्रिया नेहमीं करितात. साधारणवासनायुक्त अशा मनुष्याच्या मरणसमयीं त्याचा श्वास तोंडावाटें किंवा गुदद्वारावाटें निघून जातो, त्यायोगानेंच त्याला लक्षचौऱ्याशीं योनींमध्यें त्या दृढ झालेल्या वासनांप्रमाणें भटकत फिरावें लागतें. पोटांत थंडी पोहोंचल्यामुळें मलशुद्धि होत नाहीं, परंतु वायूची वृद्धि होते; आणि तेथें अपानवायूचा संग्रह झाल्यामुळें तो प्राणाच्या गतीचें आपल्याशीं ऐक्य करवितो, त्यामुळें समान आणि व्यान हे दोघे प्राणाबरोबर मिळून जातात. अशा रीतीनें पांच प्राण एकत्र झाल्यानें छातींत कफ दाटतो,

त्यामुळें नाकावाटें प्राण जात नाहीं, तर मुखावाटें जातो. अशा उलट क्रियेनें मृत्यु तत्काल प्राप्त होतो; त्याकरितां या विद्येचा अभ्यास करणारे पुरुष सावध राहून श्वासाला मेरुदंडावर चढवितात, त्यामुळें काळाचें भय त्यांना मुळींच राहत नाहीं. त्याकरितां योगाभ्यासी पुरुष कुंडलीला निरंतर नियमित ठेवितात.

**कुंडलीची शक्तिः**–'योगाभ्यासी निरंतर कुंडलीला नियमित ठेवितात' ह्मणून पूर्वी सांगितलें; तर त्या कुंडलीला नियमित राखल्यानें योग्याला काय काय लाभ होतात ते येणें-प्रमाणें,–

नाभिस्थानाध्यें राहिलेला जो सूर्य त्याचें आकर्षण केल्यानें बाहेरच्या सूर्याचें आकर्षण होतें; त्यायोगानें (कुंडलीला यथार्थरीतीनें मात्र चालविली पाहिजे ह्मणजे) पण्ये योग्याला काळाचें सुद्धां भय राहत नाहीं. परंतु साधारण मनुष्य वरची क्रिया जाणत करूं त्यामुळें त्याची कुंडली जशी जशी हृदयचक्रांत आपली आपण जाऊं लागते तशी त[illegible]ाची आयुष्यमर्यादा कमी होत जाते. त्याची परीक्षा निरनिराळ्या चिह्नांवरून करण्यांत येते.

ही परीक्षा श्रीकृष्ण भगवानानें अर्जुनाला विराट्स्वरूपाचें दर्शन करवून नीट रीतीनें दाखविली होती; त्यामुळें अर्जुनाला असें वाटलें कीं, 'आपला आत्माच सर्व ठिकाणीं व्यापून राहिला आहे; अथवा सर्व विश्वाकृति, विराटांत राहिली आहे.'

आतां हें विराट्स्वरूप आपण कसें पहावें याविषयीं थोडक्यांत सूचना अशी कीं,–प्रातःकाळीं आणि सायंकाळीं ज्या बाजूस सूर्य असतो त्या बाजूला आपली पाठ करून उभें रहावें. त्यानंतर ज्या बाजूला आपली छाया पडली असेल त्या छायेवर जेथें आपलें मस्तक असेल त्या मस्तकाच्या मध्यें आपली स्थिर दृष्टि थोडक्यांत थोडकी निदान अर्ध्या तासा-पासून पावतासपर्यंत ठेवावी. पुढें डोळे न मिटतां त्या दृष्टीला निर्मळ आकाशामध्यें स्थिर करून एकसारख्या दृष्टीनें पहावें; असें केल्यानें आपला छायेचा सर्व देखावा केवळ पांढऱ्या आकाराच्या सर्व आकाशाच्या पोकळींत चहूंकडे फैलावून जाईल. त्या वेळीं सर्व सृष्टि त्यांत समावून गेली असें वाटेल, आणि तो आकार एका अति मोठ्या पुरुषाप्रमाणें यथार्थ भासूं लागेल. हेंच विराड्दर्शन होय. आतां वर सांगितलेल्या विराट्स्वरूपाचें मस्तक ज्या वेळेस आपणांला दिसत नाहीं असें होईल त्या वेळेस सहा महिन्यांनीं आपणास मृत्यु आहे असें समजावें. आणि ज्या वेळेस या आकृतीच्या हस्त, पाद इत्यादिक अवयवांपैकीं कोणता तरी अवयव खंडित झालेला भासेल, त्या वेळेस कुटुंबांतील कोण्या तरी मनुष्याला मृत्यु येण्याचा संभव आहे असें जाणावें. याशिवाय दुसरी परीक्षा अशी आहे कीं, आपल्या मस्तकावर आपल्या कोणत्या तरी हाताचा पंजा ठेवून त्या पंजाच्या खालच्या लांबट भागाकडे दोन्ही डोळ्यांची दृष्टि स्थिर करून आकाशाकडे पाहिल्यानें, जर त्यांत बारीक केंसाप्रमाणें तो हात दिसूं

लागेल तर त्या वेळेस मृत्यु दूर आहे असें समजावें. परंतु ज्या वेळेस तो हात जाडा दिसेल त्या वेळेस चौदा दिवसांत मृत्यु आहे असें समजावें. दुसरें, नाकाची दांडी ( लांबटभाग ) दिसेनासा होईल तर तेरा दिवसांत मृत्यु येणार असें समजावें. आतां जर वीस दिवसपर्यंत एकसारखी दिवसां सूर्यनाडी चालेल व रात्रीं चंद्रनाडी चालेल तर सहा महिन्यांत मृत्यु समजावा. एकपक्षपर्यंत चालेल तर पांच वर्षांत, एकेचाळीस दिवसपर्यंत चालेल तर दीड महिन्यांत मृत्यु येण्याचा संभव आहे असें समजावें. दुसरें, जर हात, पाय वगैरेंचे केश अथवा दिवा, पाणी वगैरे चित्रविचित्र दिसतील तर चार दिवसांत मृत्यु येण्याचा संभव असें सांगितलें आहे. जर कधीं मिरच्या, मीठ व कडुलिंब वगैरेंचा स्वाद बदललेला वाटेल तर दोन दिवसांत मृत्यु सांगितला आहे. दुसरें असें सिद्ध केलें आहे कीं, निरोगी पुरुषाची सुषुम्नानाडी पांच पळांपासून दहा पळांपर्यंत चालते. अर्ध्या तासापर्यंत सुषुम्ना चालल्यानें आयुष्यमर्यादा ३० तीस वर्षांची सांगितली आहे. एकापासून दीडतासापर्यंतला मर्यादा ३० तिसांपासून पंचविसांपर्यंतची सांगितली आहे. दोन तासांस २२॥ साडेबावीस वर्षे; तीन तासांस १७ सतरा वर्षे, पांच तासांनीं १० दहा वर्षे, ७ सात तासांनीं ५ पांच वर्षे, आठ तासांपर्यंत ३ तीन वर्षे, बारा तासांपर्यंत एक वर्ष आणि चोवीस तासांपर्यंत सुषुम्ना चालली तर घटकेंत अथवा पळांत मृत्यु समजावा. ज्या वेळेस मृत्यु जवळ आलेला असेल त्या वेळेस सुषुम्ना बंद पडून तोंडावाटें सर्व प्राणवायु मोठ्या वेगानें तोंडास फेंस उत्पन्न करीत बाहेर निघूं लागतात. तसें झालें ह्मणजे मृत्यु एक तासापासून दहा तासांत येणार असें समजावें.

या कारणामुळें कितीएक योगी सुषुम्नेला आकर्षण करून पंच प्राणांच्या श्वासोच्छ्वासाला मेरुदंडावर चढवून सर्व नाड्यांच्या गतीला बंद करितात, त्यामुळें कुंडली उताणी पडते; ह्मणून त्यांना काळाचें भय राहत नाहीं, आणि यायोगानें ते समाधिनिष्ठ होतात. हें समाधिकृत्य योग्यास स्थितीमध्यें राखून व अमृतपान करवून सर्व नाड्यांना बळ देतें; त्यायोगानें मृत्यु दूर होऊन पुनः तो योगी आयुष्य भोगतो. असें हठयोगप्रदीपिकेंत सांगितलें आहे.

परंतु असले योगी आपल्या सर्व कर्मांचा क्षय केल्यानंतर, त्याचप्रमाणें परोपकाराच्या शुभकर्मांपासून सुद्धां निवृत्त झाल्यानंतर, ज्या वेळेस ते आपल्या इच्छेनें देहत्याग करितात, त्या वेळीं कुंडलीचक्राला मेरुदंडाच्या मार्गानें ब्रह्मरंध्रामध्यें स्थिर ठेवितात. तेथें सर्व वासना नष्ट झाल्यामुळें पुष्कळ वेळीं स्वाभाविक रीतीनें मगज फाडून प्रबल झालेला आत्मा बाहेर निघतो. पुढें तो अखंड ओंकाररूप आत्म्याच्या स्वरूपांत व्यापून जातो. यामुळें अखंड मुक्तींत सोहंरूपी आत्मा अखंड राहतो. अशी क्रिया योगाच्या पूर्ण अभ्यासानें व संपूर्ण ज्ञानानें होऊं शकते. आतां साधारण हठयोगाचे अभ्यासी तर आसन दृढ करून श्वासाचा निरोध करितात त्यामुळें त्यांची कुंडली कंठचक्रांत चढून जाते. तेथें त्यांच्या दृढ झालेल्या

वासनांच्या अनुसार त्यांच्या पंचप्राणांच्या अनेक कृती चाललेल्या त्यांस वाटतात. त्यांत कुंडलीनें केलेल्या कृत्यांची स्मृति एका पाठीमागून एक येत गेल्यानें अनेक विचार उत्पन्न करिते. आणि त्या कल्पनांप्रमाणें वासनांचें स्फुरण झाल्यानें चित्रविचित्र, क्रीडा चाललेल्या त्यांना वाटतात. यांत स्वर्ग, नरक, ब्रह्मपुरी, इंद्रलोक, वैकुंठ आणि गोलोक वगैरे स्थानें सुद्धां पुष्कळ वेळां दिसतात. हें सर्व स्वतःच्या दृढ झालेल्या भावनांच्या संकल्पांप्रमाणें भासतें. अशा प्रकारच्या कुंडलीच्या चलनवलनाच्या आधारानें प्रत्येक मनुष्याला स्वतःच्या कर्तव्यकर्माप्रमाणें निरंतर भासत असतें. त्यांत साधारण बुद्धीचे भाविक व धार्मिक भक्तजन असें समजतात कीं, आमच्या पुण्याच्या प्रतापानें व आमच्या इष्टदेवतेच्या कृपेमुळें स्वर्गलोक, वैकुंठ, गोलोक अथवा अक्षरादिधामांत जाऊन तेथें राहिलेल्या भक्तजन अथवा मुक्तजनांबरोबर राहून निरंतर भगवंताच्या सेवेंत आह्मीं राहूं. अशी चित्रविचित्र कल्पना उत्पन्न करणारी कुंडलीच आहे. कारण कीं, मरणाच्या वेळीं यांचे पांच प्राण परस्पर जड, चैतन्य, स्थावर, जंगम इत्यादि रूपांच्या आकृती धारण करून क्रीडा करीत असतात. परंतु ज्या वेळेस संपूर्ण ज्ञानी योगात्म्याची कुंडली बाहेर निघून बाहेर पंचभूतांच्या सर्व प्राणवायूला आपल्यांत एकत्र करिते, त्या वेळेस कांहींच दृश्यमान वस्तु राहत नाहीं. आणि आपला चैतन्यमय सोहंरूप आत्मा ॐकाररूप आत्म्यांत सूर्याच्या किरणांप्रमाणें लीन होऊन जातो; आणि एक, अखंड, अद्वैतरूप अचंचल, निराकारी, आनंदस्वरूप असाच राहतो. असें मुंडकोपनिषदांत सांगितलें आहे.

वर सांगितल्याप्रमाणें पुण्यवान् भाविक भक्त अमुक काळपर्यंत मोक्षरूप आत्ममय ब्रह्मलोक अथवा अक्षरधामांत राहिल्यानंतर त्याला पुनः जन्म भोगावे लागतात; कारण तो कोणत्या तरी थोडक्या वेळांत कोणत्या तरी जातीच्या प्रकृतीच्या असत्य भावनायुक्त वासनेच्या अणूंनीं आसपास व्यापलेल्या पंचभूतांच्या तत्त्वांना भावनारूपांत पाहतो, त्यायोगानें तो शेवटीं स्वतः अमुक आकृतीमध्यें विराजमान असा आपल्याला पाहतो; आणि यालाच पुनर्जन्म ह्मणतात. आतां पांच विषयांत अपरिमित तृष्णायुक्त, क्रूरस्वभाव व केवळ स्वार्थतत्पर अशा पापी पुरुषाच्या मरणसमयीं त्याचे कुंडलीनें व्यापलेले पंचप्राण पुष्कळ वेळां गुदद्वारानें गमन करितात. पुढें त्याच्या दृढ झालेल्या अशुभ वासनांच्या स्फूर्तीमुळें प्राणवायूच्या द्वारें त्याची भावना अनेक प्रकारच्या आकृती दाखविते. त्यांत यमाचे दूत आपल्याला पकडून घेऊन जाऊन आपल्या क्रूरकर्माप्रमाणें शिक्षा करिताहेतसें त्याला वाटतें. त्यांत पुनः आपली स्त्री, कन्या, माता, भगिनी वगैरेंनीं सांगितलेलीं दुष्टकर्में स्पष्ट पाहण्यांत येतात. त्याचप्रमाणें तो आपले सोयरेधायरे आपला तिरस्कार करितांना सुद्धां पुष्कळांना पाहतो. त्याशिवाय यमाचे दूत अनेक प्रकारच्या भयंकर मार्गानें अत्यंत पीडा देत यमराजाजवळ अथवा कोणा एका, दृढ कल्पनांनीं निश्चित केले-

त्या ईश्वराजवळ घेऊन जाताहेतसें दिसतें. दुसरें, मार्गामध्यें अनेक दुष्ट पशूही पीडा देताहेतसें वाटतें. याप्रमाणें अनेक प्रकारच्या चित्रविचित्र आकृतींची भयंकर रचना दिसते. या रीतीनें सर्व मतांच्या धर्मपुस्तकांत आणि इतिहास वगैरे ग्रंथांत यमराज अथवा कोणीएक समर्थ ईश्वर त्या प्राण्याला तामिस्र, अंधतामिस्र, महारौरव, रौरव आणि नरक वगैरे कुंडांत अथवा केवळ अंधकारांत, त्यांनीं केलेल्या कर्माप्रमाणें टाकतो. याप्रमाणें कितीएक काळपर्यंत तशा कल्पनायुक्त पुरुषाला प्रत्यक्ष दिसण्यांत येतें. दुसरें, त्या कुंडांवर आरक्त, तांबडा, पिंवळा वगैरे सूर्याचा प्रकाश पडतोसा दिसतो असें सांगितलें आहे. हा सर्व देखावा सुषुम्नेमध्यें पंचप्राणांच्या आगमनानेंच दिसतो; कारण, अशा प्रकारचे चमत्कार सुषुम्नारूपी नाडी आपल्या पंचप्राणांच्या किरणांनीं वासनांप्रमाणें उत्पन्न करून दाखविते. त्यामुळें सर्व प्राण्यांला, मरणकाळीं सुषुम्ना चालल्यानें त्याला आपल्याविषयीं प्रत्यक्षरूपानें असे चमत्कार दृष्टीस पडतात. हें सर्व कोणी श्रद्धाळू गुप्तविद्येचे अभ्यासी अथवा योगी निरंतर सुषुम्नाप्रवाह चालत असतां पूर्वी सांगितल्याप्रमाणें ध्यान करतील तर त्यांना वर्तमान, भूत आणि भविष्य यांचें ज्ञान आपोआप स्वाभाविकरीतीनें अथवा इच्छेप्रमाणें तत्काल प्रकट होईल. त्यांत प्रथम आपले प्रत्येक विचार, त्यांच्या भावना आणि त्या भावना कोणत्या वृत्तींत कशा दृढतेनें राहिल्या आहेत यांचें यथार्थ ज्ञान होतें. या ज्ञानानें पुढें आपल्या मन, बुद्धि, चित्त वगैरे तत्त्वांत उत्पन्न झालेल्या कल्पना कोणाविषयीं कशा प्रकारचा सिद्धांत करितात तें समजल्यामुळें प्रत्येक मनुष्याच्या हृदयांत कशी कल्पना, कशी दृढता आणि कसे विचार व्यापलेले आहेत ते ओळखतां येतात. यावरून प्रत्येक मनुष्याची वर्तणुक आणि त्याच्या कल्पनांच्या ज्ञानावरून त्याच्या कोणत्या कृत्यानें कसें प्रारब्ध होऊन कशा प्रकारचें वळण मिळून तो कोणतें कर्म करील व कोणत्या प्रकारचें सुखदुःख भोगील; हें सर्व समजूं शकतें. एवढेंच नाहीं तर सर्व सृष्टि आणि सर्व ब्रह्मांडांत होणारे फेरफार तसेंच असंख्य प्राण्यांच्या असंख्य जन्मजन्मांतरींच्या कथा सुद्धां सांगूं शकतो. आणि त्या सर्व कथा आपणाला अनुभवावरून सत्य वाटतात; कारण, सुषुम्नेच्या आकर्षणाच्या वेळीं शरीराच्या पंचतत्त्वांची पांच रंगांवरून परीक्षा होते. त्या परीक्षेवरून त्या तत्त्वाच्या वर्णाच्या चलनवलनाप्रमाणें आपल्याविषयीं कल्पना प्रकट होतात, आणि त्या कल्पना ज्या प्रकारचा आपला विचार होईल त्याप्रमाणें कृति करून दाखवितात. असें असल्यामुळें कितीएक प्रसंगीं आपलीच उत्पन्न होणारी कल्पना आपणांला विचित्र आणि भिन्न प्रकारचें ज्ञान उत्पन्न करविते. या सत्यज्ञानानें भूत, भविष्य आणि वर्तमान यांचें ज्ञान सुद्धां दृढनिश्चयी पुरुषास, यथार्थ पुरुषार्थ केल्यानें समजतें.

ज्या वेळीं सुषुम्नेचा प्रवाह चालतो त्या वेळीं कुंडली शरीराच्या भिन्न भिन्न स्थानांत स्थित

झाल्यामुळें वरसांगितल्याप्रमाणें वर्ण दाखविते. त्यासमयीं सर्व शरीररूप पिंजऱ्यांत अखंडज्योति प्रकाशमान झाल्यामुळें तत्त्वपरीक्षा होऊं शकते. त्यांत प्रत्येक तत्त्व साधारण रीतीनें दडिपासून दोन तासपर्यंत बदलतें. त्या वेळीं श्वासावर स्थिर केलेल्या दृष्टीसमोर अनेक सूक्ष्म तेजाचे परमाणू उडून राहिले आहेत असे दिसतात, आणि त्यांच्या मध्यें एक अचळ असा तेजाचा परमाणु राहिलेला असतो, त्यामुळें या मध्यें व्यापलेल्या तेजाच्या परमाणूंवर दृष्टि स्थिर ठेविली असतां आपल्या अनेक वृत्ती त्यांच्या बरोबर एकरूप होऊं लागतात. त्या वेळी पाहणाराच्या दृष्टीमध्यें पिंवळा रंग दिसूं लागतो. त्यामुळें सर्व ब्रह्मांडांत त्या वेळीं पृथ्वीतत्त्व व्यापून राहिलें आहे असें समजावें. पुढें ज्या वेळेस निळा रंग दिसेल त्या वेळेस सर्व ठिकाणी वायुतत्त्व आच्छादून राहिलें आहे असें समजावें. यांत प्रश्न पुसणाराचें कार्य शांत रीतीनें सफळ होतें. पुढें ज्या वेळेस पांढरा रंग दिसूं लागेल त्या वेळेस जलतत्त्व चहूंकडे व्यापून राहिलें आहे, असें समजावें. या वेळीं प्रवास करणाऱ्या मनुष्याला जय प्राप्त होतो. त्यांत आशीर्वाद फलद्रूप होतो. त्यांत दुसरें, या वेळीं या रंगांत दृष्टि ठेवून श्वासाला स्थिर करून याच वर्णाविषयी अशी कल्पना करील कीं. 'वादळ होवो,' तर तत्काळ वादळ होऊं लागतें; अथवा वायूची कल्पना करील तर वायु सुरू होईल. सारांश की, यांत सर्व संकल्प सफल होतात. पुढें ज्या वेळेस रक्त वर्ण दिसूं लागेल त्या वेळेस चहूंकडे अग्नितत्त्व व्यापून राहिलें आहे असें समजावें. यांत प्रश्न पुसणाराचें कार्य होत नाहीं. दुसरें, या तत्त्वांत जर वर्षाचा आरंभ होईल तर त्या देशांत लढाई आणि चोऱ्या होऊन राज्याचा क्षय होईल. जर कधी यांत मुलाचा जन्म होईल तर त्या मुलाचें आयुष्य अल्प समजावें. जलतत्त्वांत जर जन्म होईल तर बालक प्रतापी होईल; पृथ्वीतत्त्वांत जन्म होईल तर मंदभाग्याचा होईल; वायुतत्त्वांत मध्यमप्रारब्धाचा होईल. आणि ज्या वेळेस श्वेत किंवा श्याम रंग प्रकट होईल त्या वेळेस आकाशतत्त्व व्यापक झालेलें असें समजावें. या वेळी त्रिकोण, व चौकोन व षट्कोन वगैरे ज्योतींचे आकार भासतात. त्या वेळेस जाणावें कीं, आपल्याला उन्मनी मुद्रा प्राप्त झाली आहे. या तत्त्वास पाहणाराचें सर्व शरीर लांकडासारखें अथवा मेल्यासारखें वाटतें. असें झालें असतां तो पाहणारा स्वतः अखंडप्रकाशित ज्योति पाहतो. या स्थानीं श्वासाची स्थिति स्थिर होते. त्या वेळीं आपण जणूं सर्व ब्रह्मांडाच्या माथ्यावर पूर्णानंदानें स्थिर आहोंत असें वाटतें. आणि त्या वेळीं आपल्या सर्व कल्पना, मनोवृत्ती, ज्ञान आणि पंचभूतें वगैरे सर्व रचना अदृश्य होऊन गेल्या आहेतसें वाटतें. त्यामुळें आपणांला महानंदाच्या सुखाचा भास पडतो. त्या वेळेस असें समजावें कीं, आपला श्वास मेरुदंडद्वारें आपल्या ब्रह्मरंध्रचक्रावर येऊन स्थिर झालेला आहे. त्यायोगानें सत्य ईश्वरसंबंधी ज्ञान समजतें. अशा प्रकारच्या निदिध्यासानें वर सांगितलेल्या आनुभविक

संपूर्ण ज्ञानानें आपलें मन वर सांगितलेला तत्त्वाचा वर्ण, त्याची कृति आणि रचना वगैरेंचें पृथक्करण करितें. त्यांत मन दोन प्रकारांनीं वर्तन करितें ह्मणजे बाह्य इंद्रियांत व्यवहार केल्यामुळें तें विषयी होतें; आणि आंत स्थित झाल्यामुळें पूर्ण तत्त्वज्ञान प्राप्त करून घेतें; आणि स्वतः हृदयांत स्थिर राहतें. सर्व इंद्रियांचें अध्यक्ष व सर्व विचारांचें प्रेरक मन आहे. तें हृदयकमलरूप गोलोकांत स्थिर आहे. बाह्य शब्दादिकांचें ग्रहण करूं शकत नाहीं, त्यामुळें हें मन अंतःकरणरूपी आंतील इंद्रिय आहे; कारण, मन सर्व व्यवहाराला कारण आहे; कारण, हें मन सत्व, रज आणि तम अशा तीन गुणांत राहिलें आहे. त्यांत वैराग्य, क्षमा, उदारता आणि शांति वगैरे गुण सत्वगुणापासून उत्पन्न होतात, त्याचप्रमाणें काम, क्रोध, लोभ आणि प्रयत्न वगैरे वृत्ती रजोगुणापासून प्रकट होतात; आणि आळस, भ्रांति व निद्रा वगैरे तमोगुणापासून उत्पन्न होतात. यांत सत्वगुणाच्या वृत्तीनें शुभ कर्म केलें जातें. परंतु तमोगुणाच्या वृत्तीनें शुभ किंवा अशुभ या दोहोंपैकीं कांहींच होऊं शकत नाहीं. तें केवळ अंधाररूपच आहे; त्यामुळें यांत गुप्तरीतीनें अभिमानाची वृत्ति राहिली जाते. त्यामुळें पुढें अहंकार प्रकट होऊं लागतो, आणि अहंकारापासून चार वाचा, अंतःकरणपंचक आणि दहा इंद्रियांत आपलें मन प्रवृत्त होतें. परंतु सोहंरूपी आत्म्याविषयीं पंचप्राण वर सांगितलेली क्रिया करतील तर हें मनाचें प्रवृत्त होणें बंद होऊन ध्यानावस्था प्राप्त होईल.

## प्राणायामविवरण.

या शरीरांत प्रधान प्राणाच्या व्ययावर आयुष्यमर्यादा अवलंबून आहे. ह्मणून ज्यांचा प्राणव्यय पुष्कळ होतो त्यांचा देहनाश थोड्या दिवसांत होतो. परंतु प्राणायामतत्पर योगी तर चिरायु होतात. ह्मणूनच सांगितलें आहे कीं, 'अडीच घटिका चंद्र वाहतो, त्या वेळेला दिवस ह्मणतात. आणि पुढें अडीच घटिका सूर्य वाहतो, त्या वेळेला रात्र ह्मणतात. याप्रमाणें पांच घटिकेंत रात्रिदिवसात्मक काल होतो. ह्मणून लौकिक अहोरात्राच्या काळांत योग्याचा बारा अहोरात्रात्मक कालव्यवहार होतो. या कालमानानें प्राण्याचें आयमान होतें. ज्या वेळेस सुषुम्नामार्गानें प्राण ब्रह्मरंध्रांत लीन होतो; त्या वेळेस रात्रिदिवसात्मक कालाचा निरोध झाल्यानें सुषुम्ना कालभोक्त्री आहे असें ह्मटलें.' त्यामुळें जितका प्राणाचा निरोध होतो, तितकें आयुष्यमान वाढतें. दीर्घकाल अभ्यास झालेला योगी, उत्क्रांतिकाल ( प्राणोत्क्रमणाचा समय ) जवळ आलेला जाणून ब्रह्मरंध्रांत प्राणाचा लय करून कालास जिंकितो; अथवा स्वेच्छेनें देहत्याग करितो. ह्मणून सांगितलें आहे कीं, 'प्राणायाम झाल्यानें मन सुद्धां निरुद्ध होतें;' कारण, चित्ताच्या स्थितीला कारणें दोन आहेत; एक वासना, आणि दुसरा प्राण. त्यांत एकाचा नाश झाल्यानें दुसरें नाश पावतें. असें योगवासिष्ठांत सांगितलें आहे. ह्मणूनच हठयोगप्रदीपिकेंत सांगितलें आहे कीं, 'ज्या

स्थानीं प्राण लय पावतो तेथें मनही लीन होतें; व जेथें मन लय पावतें तेथें प्राणही लीन होतो.' ह्यावरून आप्त ( सत्यवक्ते ) हिताकरितां उपदेश करितात कीं, 'ब्रह्मादि सुरगुरु सुद्धां काळाच्या भयानें प्राणायामपर झाले; मग साधकाची ती काय कथा !' जेथपर्यंत प्राण सुषुम्नेंत प्रविष्ट होऊन ब्रह्मरंध्रांत स्थित झाला नाहीं तेथपर्यंत तो असिद्ध आणि कर्माधीन समजावा. ज्या वेळेस सुषुम्नेंत प्रवेश करितो त्या वेळेस प्राण बिंदुसहित चित्तनिरोध करितो. ह्मणून अमृतसिद्धींत सांगितलें आहे; कीं, 'जेथपर्यंत वायु इतर नाड्यांत संचार करीत आहे तेथपर्यंत त्याला कर्मानुवशग आणि असिद्ध समजावा. ज्या वेळेस वायु चलित होतो त्या वेळेस बिंदु सुद्धां चलित होतो. बिंदु चलित झाला असतां चित्त सुद्धां चंचल होतें. बिंदु, चित्त आणि वायु चलित झाले असतां हा लोक जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतो यांत संशय नाहीं. जी अवस्था वायूची होते तशी बिंदूची सुद्धां होते. जसजसा वायु स्वाधीन होतो तसतसा बिंदुही साध्य होतो. मूर्च्छित झाला असतां व्याधीचें हरण करितो, आणि बद्ध झाला असतां आकाशगमन करवितो. लीन झाला असतां सर्वसिद्धिकारक होतो; आणि निश्चल झाला असतां सर्व सिद्धी देणारा होतो.' योगबीजांतही असेंच सांगितलें आहे; कीं, 'चित्तनिरोध झाला असतां प्राणनिरोधही होतो. जर निरोध न होईल तर त्याला गुरु आणि शास्त्र निष्फल आहेत; कारण, निरोधावांचून आत्मप्रतीति होत नाहीं, त्यामुळें मोक्षही प्राप्त होत नाहीं. हठयोगप्रदीपिकेंतही असेंच सांगितलें आहे. तात्पर्य, प्राणायामपर होऊन अग्निसहित कुंडलीचा प्रबोध करून सुषुम्नेंत प्राणाचा सुखानें प्रवेश होऊं शकतो. ज्या वेळेस प्राण सुषुम्नावाही होतो, त्या वेळेस मनोन्मनी अवस्था सहज सिद्ध होते. दुसरा अभ्यास तर योग्यांला प्रयासरूपच समजावा. ज्यानें चित्तनिरोध केला त्यानें प्राणनिरोधही केला असें समजावें. चित्ताचे हेतु दोन आहेत; वासना आणि वायु. दोघांतून एकाचा निरोध झाला असतां दुसराही निरुद्ध होतो; कारण, क्षीरनीरांप्रमाणें ( दूधपाण्यांप्रमाणें ) एकत्र प्राप्त झालेले प्राण आणि चित्त हे दोघे सारखी क्रिया करणारे होतात. जेथें प्राणाची प्रवृत्ति, तेथें चित्ताचीही प्रवृत्ति होते; जेथें चित्ताची प्रवृत्ति तेथें प्राणाचीही प्रवृत्ति होते. ह्मणून एकाचा नाश झाला असतां सारसपक्ष्यांच्या जोड्याप्रमाणें दुसराही नष्ट होऊन जातो. एकाची प्रवृत्ति झाली असतां दुसऱ्याची प्रवृत्ति होते. व्युत्थानास पावलेलें चित्त पराङ्मुख होऊन देहकार्याचा निभाव ( निर्वाह) करितें, आणि प्रत्यङ्मुख होऊन वृत्तिनिरोध झाला असतां मोक्षपदाची सिद्धि होते. ह्मणून ब्रह्मादिक सुरगुरु सुद्धां कालभयास्तव प्राणायामपर झाले. त्याकरितां प्राणायामाचा सतत अभ्यास करावा. जेथपर्यंत प्राण निरुद्ध आहे, चित्त निराकुल आहे आणि दृष्टि भ्रुकुटींमध्यें स्थिर आहे; तेथपर्यंत कालाचें भय कोठून असणार ? विधीप्रमाणें प्राणायामाच्या अभ्यासानें नाडीचक्रें

शोधित होऊन सुषुम्नेचें तोंड मोकळें केलें असतां प्राण सुखानें तीमध्यें प्रवेश करितो. ज्या वेळेस ब्रह्मनाडीमध्यें प्राणाचा संचार होतो; त्या वेळेस मन स्थिर होतें. त्यालाच मनोन्मनी अवस्था ह्मणतात. तिच्या सिद्धीकरितां शास्त्रज्ञ पुरुष विचित्र (अनेकप्रकारचे) कुंभक करितात. कारण, विचित्र कुंभकांच्या अभ्यासानें विचित्र सिद्धी प्राप्त होतात. प्राणायामानें दोषांचा, प्रत्याहारानें पातकांचा, धारणेनें दुःखांचा आणि ध्यानानें अनैश्वर्याचा दाह करावा. जसें सोनें तापविल्यानें शुद्ध होतें, त्याप्रमाणें इंद्रियकृत दोष प्राणनिग्रहानें दग्ध होतात. तो प्राणनिग्रह युक्तीनें करावा; कारण, जसे हत्ती, सिंह, व्याघ्र वगैरे बलवान् प्राणी धीरे धीरे स्वाधीन होतात, तसा विधीप्रमाणें प्राणनिरोध करणें युक्त आहे. जसा पाळलेला सिंह रक्षण करणाराला खात नाहीं त्याप्रमाणें वश झालेला प्राण साधकाचा नाश करीत नाहीं; तर दोषांचा दाह करितो. जे मंदबुद्धीचे पुरुष प्राणायामावांचून योगसाधन करितात त्यांना योगसिद्धि होऊं शकत नाहीं ह्मणून ज्ञात्यांनीं प्राणायाम अवश्य करावा; व तो मात्रांच्या हिशोबानें करावा. प्राणायामाचे कनिष्ठ, मध्यम आणि उत्तम असे तीन भेद आहेत. कनिष्ठ प्राणायामांत स्वेदाचा जय करावा ( अभ्यासानें अंगास घाम न येईल असें करावें). मध्यमांत कंपास आणि उत्तमांत विषादास ( खेदास) जिंकावें. याप्रमाणें अनुक्रमानें अभ्यास करून प्राणजय केल्यानें प्रत्याहार, धारणा आणि ध्यान होऊं शकतात. त्याचा विधि याप्रमाणें,–इडा ह्मणजे डावी नाडी, अर्थात् डाव्या नाकपुडीनें पूरक करून ( बाहेरचा वायु पोटांत ओढून घेऊन ) पुढें कुंभक करून तो वायु पोटांत तसाच कांहीं नियमित वेळेपर्यंत स्तंभून धरून ) पिंगला ह्मणजे उजव्या नाकपुडीनें रेचक करावा ( तो पोटांत सांठविलेला वायु हळू हळू बाहेर सोडावा ). त्यानंतर पिंगलेनें पूरक करून यथाशक्ति कुंभक करून इडेनें रेचक करावा. ज्या नाडीनें पूरक केला असेल त्याच नाडीनें तत्काल रेचक करूं नये. या रीतीनें नाडीशुद्धि झाली ह्मणजे मग स्वेच्छेनें प्राणायाम करावा. याप्रमाणें शास्त्रद्वारा सामान्य प्राणस्वरूप जाणून, प्राणायाम हा परम कल्याणाचा मार्ग आहे असें समजून पवित्र आणि रमणीय स्थानी सिद्धासन इत्यादिक करून पूर्वेस किंवा उत्तरदिशेस तोंड करून बसावें, व गुरूनें उपदेश केल्याप्रमाणें अभ्यास करावा. कारण, योगबीजांत भगवान् महादेवानें सांगितलें आहे कीं, ' ज्याला प्राणजय झाला आहे अशा सिद्ध गुरूची सेवा करून तो प्रसन्न होऊन जो विधि दाखवून देईल त्याप्रमाणें अभ्यास सुरू करावा. कारण, अमनस्क खंडांत भगवान् महादेवानें असें सांगितलें आहे कीं, 'हे वामदेवा ! एका गुरूवांचून वेदांत, तर्क (न्यायशास्त्र), योग, मीमांसा इत्यादिक शास्त्रांचें पठन केल्यानें तसाच जो दुसरा पुराण, इतिहास इत्यादि ग्रंथसमूह आहे, त्याचें अवलोकन केल्यानें अथवा स्वबुद्धीनें अनुष्ठान केल्यानें चिंतामणियोगाची प्राप्ति होत नाहीं.' तर या सर्वांला गुरूच असला पाहिजे. ह्मणूनच श्वेताश्वतर–उपनिषदांत सांगितलें आहे कीं, 'ज्याची

देवावर दृढ भक्ति आहे, तशीच गुरूचे ठिकाणीं आहे; अशा सेवा करणाऱ्या महात्म्या सद्भक्ताला अलौकिक अर्थ प्रत्यक्ष होतात.' भगवान् मनूनें हा आशय आपल्या स्मृतींत दुसऱ्या अध्यायांत स्पष्ट सांगितला आहे. सांख्यसूत्रांतही सांगितलें आहे कीं, 'प्रणाम (नमस्कार), ब्रह्मचर्य इत्यादिकेंकरून इंद्राला बहुत कालानें सिद्धि प्राप्त झाली आहे.' ह्मणून सामवेदाच्या छांदोग्य उपनिषदांत सांगितलें आहे कीं, 'आचार्यापासून ( गुरूपासून ) योगचर्येचें सर्व रहस्य जाणून पुढें अभ्यासद्वारानें पुरुष आपोआपच सिद्धि आणि आनंदाला प्राप्त होतो.' स्कंदपुराणांतही असेंच सांगितलें आहे. याप्रमाणें देव आणि गुरु यांचे ठिकाणीं एकनिष्ठ भक्ति ठेवून आपल्या इष्टदेवता, महान् महान् योगी आणि गुरु यांना प्रथम निर्विघ्नपणानें अनुष्ठानाची समाप्ति व्हावी ह्मणून नमस्कार करावा; असें कूर्मपुराणांत सांगितलें आहे.

हा प्राणायाम पूरक, कुंभक, रेचक आणि केवलकुंभक असा चार प्रकारचा आहे. त्यांत पूरक, कुंभक व रेचक यांचें लक्षण अथर्ववेदाच्या अमृतबिंदुउपनिषदांत याप्रमाणें सांगितलें आहे,—'जसा पुरुष कमलाच्या देंठावाटें तोंडानें पाण्याचें आकर्षण करितो; तसें बाहेरच्या वायूचें नाकपुडीवाटें आंत आकर्षण करून प्राणगतीचा निरोध करणें याला पूरक प्राणायाम ह्मणतात. पूर्वी जिह्वाबंध करून नंतर जालंधरबंधानें पूरक करणें प्रशस्त आहे. पोटांतील प्राणवायूला नाकपुडीवाटें बाहेर सोडून देऊन वायूनें जेव्हां पोट अगदीं रिकामें होईल तेव्हां रेचक झाला असें समजावें. प्रथम पूरकानें अथवा रेचकानें प्राणाचा निरोध करून पुढें रेचकानें किंवा पूरकानें रहित अशी जी शून्य स्थिति त्याला सहितकुंभक प्राणायाम ह्मणतात.' रेचकाच्या आरंभीं व कुंभकाच्या शेवटीं उड्डियानबंध राखल्यानें पूरक, कुंभक, व रेचक लवकर सिद्ध होतात. चवथा केवलकुंभक आहे तो याज्ञवल्क्यसंहितेंत याप्रमाणें सांगितला आहे,—'रेचक करावयाचा नाहीं त्याप्रमाणें पूरकही करावयाचा नाहीं; तर एकप्रयत्नानें सुखानें जो प्राणनिरोध त्याला केवलकुंभक प्राणायाम ह्मणतात. ह्या केवलकुंभकाची सिद्धि होईल तेथपर्यंत सहितकुंभकाचा अभ्यास करावा. रेचकपूरकरहित अशा ह्या केवलकुंभकाची सिद्धि झाली असतां योग्याला तीन्ही लोकांत कोणतीही वस्तु दुर्लभ राहत नाहीं; आणि समाधि वगैरे सर्व सोपें पडतें. कारण, सूर्यचंद्रांला धारण करणाऱ्या रात्रंदिवसाचा अभाव झाल्यामुळें सुषुम्ना कालभोक्त्री ( काळाला भक्षण करणारी ) होते, अर्थात् प्राणाचा सुषुम्नाद्वारांत प्रवेश होतो; कीं ज्यामुळें उन्मनी अवस्था सहजच प्राप्त होते. ह्मणून हा केवलकुंभक प्राणायाम दुसऱ्यापेक्षां श्रेष्ठ आहे. त्यांत अनुष्ठानाचा क्रम याप्रमाणें आहे,— 'इडा जी डाव्या नाकपुडीकडे आहे, तिनें सोळा मात्रांपर्यंत प्राणाचा पूरक करावा; चौसष्ट मात्रांपर्यंत त्याचा पोटांत कुंभक करावा; आणि बत्तीस मात्रांपर्यंत, उजव्या नाकपुडींत राहिलेल्या पिंगलानाडीच्या वाटें रेचक करावा; अर्थात् जितक्या मात्रांपर्यंत प्राणाचा

पूरक होईल, त्याच्या चौपट संख्या कुंभकांत, आणि दुप्पट रेचकांत पाहिजे; कारण, फार त्वरेनें रेचक केल्यानें शरीरबळ कमी होतें. असें पूर्वीच्या आचार्यांनीं ह्मटलें आहे. हठयोगप्रदीपिकेंत असें सांगितलें आहे कीं, 'जर बाहेरचा वायु डाव्या नाकपुडीनें पोटांत सांठविला असेल तर तेथें नियमित वेळेपर्यंत कुंभक करून नंतर तो उजव्या नाकपुडीनें हलके हलके बाहेर सोडावा. व जर उजव्या नाकपुडीनें पोटांत सांठविला असेल तर तेथें नियमित वेळेपर्यंत कुंभक करून नंतर डाव्या नाकपुडीवाटें हलके हलके बाहेर सोडावा. याप्रमाणें वरचेवर व नित्य अभ्यास करणाऱ्या व उत्तम रीतीनें यमाचें पाळण करणाऱ्या योग्याच्या सर्व नाड्या तीन महिन्यांनंतर अगदीं मलरहित अशा होतात.' पूरक, कुंभक व रेचक हे देवतांचें ध्यान करून करावे. त्या त्या प्राणायामाचें देवताध्यान अथर्ववेदाच्या ध्यानबिंदुउपनिषदांत सांगितलें आहे. तो प्रकार असा,—'पूरकाचे वेळीं, नाभिदेशांत राहणारा, अळसीच्या(जवसाच्या) फुलाप्रमाणें आहे नीलवर्ण ज्याचा, आणि शंख, चक्र, गदा, पद्म यांनीं विराजमान आहेत चार हात ज्याचे अशा लक्ष्मीसहित भगवान् महाविष्णूचें ध्यान करावें. कुंभकाचे वेळीं, हृदयदेशांत राहणारा, चतुर्मुख, रक्तवर्ण, कमल आहे आसन ज्याचें व सर्वांचा पितामह अशा ब्रह्मदेवाचें ध्यान करावें. रेचकसमयीं, ललाटदेशांत असणारा, शुद्ध स्फटिकाप्रमाणें आहे गौर वर्ण ज्याचा, सर्व पापांचा नाश करणारा, निष्कल व त्रिलोचन अशा श्रीमहादेवाचें ध्यान करावें.' अशा रीतीनें देवतांच्या प्रसादानें प्राणजय लवकर होतो. 'प्राणायाम फार धीम्मेपणानें करणें अवश्य आहे; नाहींतर त्यापासून खोकला, दम वगैरे अनेक रोगांची उत्पत्ति होऊन साधक पुरुषाचा नाश होतो. केवल हठयोगानें विरुद्ध आलेला प्राण, रोमरंध्रांतून बाहेर निघतो त्यामुळें शरीरांत कुष्ठादि ( कोड वगैरे ) रोग होतात; ह्मणून गुरूकडून चांगली माहिती करून घेऊन जसा सिंह हत्तीला वश करितो त्याप्रमाणें हलके हलके प्राणाला वश करावें.' याप्रमाणें नीट सावधगिरीनें गुरूनें उपदेश केला असेल त्याप्रमाणें, सकाळीं, दोनप्रहरीं, संध्याकाळीं आणि मध्यरात्रीं अशा प्रत्येकवेळीं सुमारें ऐशींपर्यंत शांतपणानें कुंभक करण्याचा उत्तम अभ्यास करावा. त्यांत प्रथम दहा कुंभक करावे, पुढें अभ्यासानें दिवसेंदिवस पांच पांच वाढवीत जाऊन प्रत्येक वेळेस ऐशीं प्राणायाम करण्याचा अभ्यास करावा. याप्रमाणें सर्व रात्रंदिवस मिळून ३२० तीनशें वीस प्राणायाम होतात. त्यांमध्यें याप्रमाणें विचार समजावा,—पूरक, शांतपणानें अथवा वेगानें केला तरी हरकत नाहीं; कारण, पूरक वेगानें करण्यांत कांहीं दोष उत्पन्न होत नाहीं. परंतु रेचक तर शांतपणानेंच केला पाहिजे. उतावळेपणानें केला असतां बलहानि होते.' याप्रमाणें कुंभकाचा अभ्यास होतां होतां त्याचा परिपाक उत्तम, मध्यम व कनिष्ठ असा तीन प्रकारचा होतो. ज्या वेळीं कुंभक केल्यानें शरीराला घाम उत्पन्न होतो तो कनिष्ठ कुंभक

समजावा. ज्यांत अंगास घाम सुटत नाहीं, परंतु शरीरास कंप उत्पन्न होतो तो मध्यम आणि ज्या कुंभकांत जमिनीपासून शरीराचें उत्थान होतें ( जमिनीपासून वर अधर शरीर उचललें जातें) तो उत्तम, कुंभक होय.' असें भगवान् याज्ञवल्क्यानें सांगितलें आहे. लिंग-पुराणांत प्राणायामधारणेच्या मात्रांवर उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे तीन भेद सांगितले आहेत. त्यांत बारा मात्रांपर्यंतचा कुंभक कनिष्ठ, चोवीस मात्रांपर्यंतचा मध्यम व छत्तीस मात्रांपर्यंतचा कुंभक उत्तम समजावा. यानें हठसिद्धि होते. याला हठयोग सुद्धां ह्मणतात. कारण 'ह' ही संज्ञा सूर्याची व 'ठ' ही संज्ञा चंद्राची आहे. ह्या दोघांचा जेथें योग होतो ह्मणजे हे दोघे जेथें एकत्र होतात; त्याला हठयोग ह्मणतात. असें सिद्धसिद्धांतपद्धतींत सांगितलें आहे. याचा अभिप्राय असा,–हृदयदेशांत सूर्य आहे आणि नासिकेच्या अग्रभागीं चंद्र आहे. हें कशावरून तर, ज्या वेळेस हृदयाला स्पर्श करून प्राणवायूचें गमन बाहेर होतें त्या वेळेस तो उष्ण होतो; परंतु ज्या वेळेस आंत प्रवेश करितो त्या वेळेस तो शीतल होतो; याचें कारण, चंद्राचा स्पर्श झाल्यामुळें शीतळ होतो. याप्रमाणेंच प्राण आणि अपान यांचा सूर्यचंद्रांबरोबर संबंध झाल्यानें त्यांना सुद्धां सूर्य, चंद्र असें ह्मणतात. ज्या वेळेस प्राणायामाच्या अभ्यासानें सूर्य व चंद्र यांचा योग होतो, त्या वेळेस वायु ब्रह्मनाडींत सुखानें प्रवेश करितो.

प्राणायामाचें मान ह्मटलें ह्मणजे बारामात्रांपर्यंत वायुनिरोध करणें हा कनिष्ठ कुंभक ह्मणून सांगितलें; त्यालाच उद्धात असें ह्मणतात. दोन उद्धात ( २४ चोवीसमात्रांपर्यंत.) मध्यम कुंभक, व तीन उद्धात ह्मणजे छत्तीसमात्रांचा उत्तम कुंभक होतो. मात्रांचें प्रमाण भगवान् मार्कंडेयानें असें सांगितलें आहे कीं, 'डोळे झांकून उघडावे नंतर एक टाळी वाजवावी, त्यानंतर एका लघु अक्षराचें उच्चारण करावें ह्मणजे प्राणायामाचा एक मात्राकाल होतो.' अशा बारा मात्रा झाल्या ह्मणजे एक कनिष्ठ प्राणायाम होतो. याच्या दुप्पट मध्यम व तिप्पट उत्तम प्राणायाम होय. भगवान् याज्ञवल्क्यानें सुद्धां अशाच प्रकारचा मात्राकाल सांगितला आहे. स्कंदपुराणांत,–'फार वेगानें नाहीं व अगदीं मंदगतीनें नाहीं अशा मध्यम रीतीनें गुडघ्याला एक प्रदक्षिणा करून चुटकी वाजवावी; ह्मणजे, एक मात्राकाल होतो;' असें सांगितलें आहे. उद्धाताचें लक्षण पूर्वी सांगितलें त्याशिवाय दुसरें असें सांगितलें आहे की, 'नाभीच्या मुळापासून प्रेरित जो वायु त्याचें मस्तकाला अभिघात ( आघात ) करून पुनः परतणें याला उद्धात ह्मणतात.

प्राणायाम करणाराला मिताहार इत्यादिक सर्व नियम व पवनाभ्यास निरंतर केला पाहिजे. प्राणायाम दोन प्रकारचा आहे, सगर्भ आणि अगर्भ. मंत्रयुक्त प्राणायाम सगर्भ आणि मंत्ररहित प्राणायाम अगर्भ समजावा. वसिष्ठसंहितेंत सगर्भ प्राणायाम याप्रमाणें सांगि-

तला आहे. 'प्रणवाचा विधि सर्व जाणून पूरक, कुंभक आणि रेचक याप्रमाणें तीन प्राणायाम करावे. तो प्रकार असा,–डाव्या नाकपुडीवाटें बाहेरचा वायु सोळा मात्रांपर्यंत हळूहळू आकर्षण करून पोटांत सांठवावा. त्यांत ओढतांना उकारमूर्तीचें स्मरण करून व कुंभकाचे वेळीं मकारमूर्तीचें स्मरण करून प्रणवाचा ६४ चौसष्ट मात्रांपर्यंत जप करावा; नंतर हलके हलके बत्तीस मात्रांपर्यंत प्रणवाच्या पहिल्या अक्षराचें ( अकाराचें ) ध्यान करीत उजव्या नाकपुडीनें रेचक करावा. सहितकुंभकाचे आठ प्रकार व त्यांचें लक्षण हठयोगप्रदीपिकेंत सांगितलें आहे. तें येणेप्रमाणें,

**अथ कुंभकभेदः**–१ सूर्यभेदन, २ उज्जायी, ३ सीत्कारी, ४ शीतली, ५ भस्त्रिका, ६ भ्रामरी, ७ मूर्च्छा व ८ प्लाविनी असे आठ कुंभक आहेत. त्यांत भस्त्रिका, मूर्च्छा आणि प्लाविनी हे तीन कुंभक शिवाय करून बाकीच्या प्रत्येक कुंभकांत पूरकाचे वेळीं मूलबंध, पूरकाच्या अंतीं आणि कुंभकाच्या पूर्वी जालंधरबंध, आणि कुंभकाच्या अंतीं आणि रेचकाच्या आरंभीं उड्डियानबंध करावा. जालंधरबंधाबद्दल जिह्वाबंध केला तरी चालेल.

**१ सूर्यभेदनः**–स्वस्तिकासन किंवा वज्रासन करून बाहेरील वायूचें प्रथम उजव्या नाकपुडीनें हळू हळू पोटांत आकर्षण करून नखापासून तें शिखेपर्यंत ( अर्थात् सर्व द्वारें बंद करून आपल्या शक्त्यनुरूप कुंभक करून पुनः हलके हलके डाव्या नाकपुडीनें रेचन करणें; अशा सतत अनुष्ठानास सूर्यभेदन कुंभक ह्मणतात. हा कुंभक ऐशीं प्रकारच्या वायूचे दोष आणि कृमिरोग इत्यादिकांचा नाश व मस्तकशुद्धि करितो.

**२ उज्जायीः**–सिद्धासन करून तोंड बंद करून दोन्ही नाकपुड्यांनीं बाहेरील वायु हलके हलके पोटांत आकर्षण करून घेऊन ज्या रीतीनें कंठाला आरंभ करून हृदयापर्यंत प्राणवायूचा स्पर्श होईल त्याप्रमाणें कुंभक करणें, नंतर डाव्या नाकपुडीनें वायु बाहेर हलके हलके सोडावा. ( ज्या नाकपुडीनें पूरक करावयास सांगितला असेल तेव्हां दुसरी नाकपुडी बोटानें दाबावी. तसेंच ज्या नाकपुडीनें रेचक सांगितला असेल तेव्हांही तीहून इतर नाकपुडी बोटानें दाबून बंद ठेवावी. याप्रमाणें सर्वत्र समजावें. अशा रीतीनें सतत अनुष्ठान केलें असतां याला उज्जायी कुंभक ह्मणतात. हा चालतांना, उभें राहतांना केला तरी चालतो. मूलबंध इत्यादि नियम पूर्वीप्रमाणें येथें करावे, ह्मणजे प्राणवायु ब्रह्मनाडी जी सुषुम्ना तींत प्रवेश करूं लागतो; ज्या योगानें केवलकुंभक सिद्ध होतो. या कुंभकानें कफ, वायु आणि जलोदर इत्यादि रोगांचा नाश होतो. तसेंच हृदय, कंठ या ठिकाणीं होणारे रोग व धातुविकार सर्व दूर होतात.

**३ सीत्कारीः**–दोन्ही ओंठांमध्यें जीभ धरून तीवाटें बाहेरचा वायु सीत्कारपूर्वक आंत ओढावा; नंतर तोंड मिटून घेऊन नियमित वेळेपर्यंत कुंभक करून पुढें दोन्ही नाकपुड्यांवाटें

रेचक करावा. येथें मुखावाटें रेचक कधीं करूं नये; कारण, बलहानि होते. ( जिभेवाटें पूरक करितांना 'सी' 'सी' असा ध्वनि सहजच निघतो; ह्मणून याला सीत्कारी कुंभक असें योगी लोक ह्मणतात. या कुंभकापासून शरीर सुंदर होतें, भूक तहान वगैरेंपासून पीडा होत नाहीं; आणि निद्रा, आळस वगैरे न येतां शरीर बळकट होऊन सर्व उपद्रव नाहींतसे होतात.

**४ शीतली**:–पक्ष्याच्या खालच्या चोंचीप्रमाणें ( अर्थात् अर्धवट नळीसारखी ) जीभ ओंठाच्या बाहेर काढून तिनें बाह्य वायु आंत ओढून घेऊन पुढें नखशिखान्त कुंभक करावा. नंतर नाकावाटें ( अर्थात् दोन्हीं नाकपुड्यांवाटें ) आंतील वायु शांतपणानें बाहेर सोडावा. याला शीतली कुंभक ह्मणतात. हा कुंभक साधल्यानें गुल्म, प्लीह, ज्वर, तसेच पित्तविकार इत्यादि सर्व बंद होतात. क्षुधा व तृषा दूर होतात; व कोणत्याही विषाची बाधा होत नाहीं.

**५ भस्त्रिका**:–दोन्ही मांड्यांवर दोन्ही पावलें उताणीं ठेवून बसणें अशा प्रकारचें पद्मासन करून कंठ व उदर समान राखून व तोंड बंद ठेवून जसा लोहार मोठ्या वेगानें भाता चालवितो, त्याप्रमाणें आपल्या शरीरांतील प्राणवायूचें वारंवार चालन करावें. तें असें कीं, हृदय, कंठ आणि कपाळ एथपर्यंत वायु जाऊन पोहोंचेल ह्मणजे डाव्या नाकपुडीनें लवकर पूरक करून उजव्या नाकपुडीनें रेचक करावा; पुनः पूरक करावा, पुनः रेचक करावा; याप्रमाणें पूरक रेचक, रेचक पूरक असें केल्यानें शरीरांतील वायु चलित होऊन जातो. ही क्रिया वारंवार करतांना जर श्रम झाले तर सूर्यनाडीनें ( उजव्या नाकपुडीनें ) पूरक करून, पुढें यथाशक्ति कुंभक करून चंद्रनाडीनें ( डाव्या नाकपुडीनें ) रेचक करावा; याला भस्त्रिका कुंभक ह्मणतात. याचा अभ्यास सतत करण्याला योग्य आहे. हा कुंभक कफ, पित्त आणि वायु यांचा नाश करितो. हा कुंडलीला बोध ( जागृत ) करणारा आहे. ती जागृत झाल्यावांचून कोणत्याही योग्याचें 'पिंडब्रह्मांडाचें ऐक्य होऊं शकत नाही. करितां या कुंभकानें तिला जागृत करणें शक्य आहे.

**६ भ्रामरी**:–जसा भ्रमरांचा शब्द होतो त्याप्रमाणें गुंजारवसहित मोठ्या वेगानें डाव्या नाकपुडीनें पूरक करून पुढें आपल्या शक्तीप्रमाणें कुंभक करावा, आणि भ्रमरींचा जसा शब्द होतो त्याप्रमाणें मंद मंद गुंजारवसहित हलके हलके उजव्या नाकपुडीनें रेचक करणें; याला भ्रामरी कुंभक ह्मणतात. या कुंभकानें योग्याचें हृदय आनंदानें उंचबळून जातें. यानें चित्ताची चंचलता दूर होते.

**७ मूर्च्छा**:–डाव्या नाकपुडीनें पूरक करून, पूरकाच्या शेवटीं अति दृढ जालंधरबंध बांधून दोन्हीं हातांच्या दोन्ही अंगुठ्यांनीं दोन्ही कान, दोन्ही तर्जन्यांनीं दोन्ही नाकपुड्या आणि बाकींच्या बोटांनीं तोंड बंद करून ( ह्याला षण्मुखी मुद्रा ह्मणतात. ) जोरानें

कुंभक करावा. आणि पुढें हळू हळू जालंधरबंधसहित उजव्या नाकपुडीनें रेचक करावा. हा कुंभक मनास मूर्च्छित करितो; ह्मणून याला मूर्च्छाकुंभक अशी संज्ञा आहे.

८ **प्लाविनीः**—पद्मासन करून छाती वर करून माथ्यावर दोन्ही हात लांब करून त्यांचे दोन्ही अंगुठे वळवून आंकड्यासारखे एकमेकांत अडकवून पाण्यावर स्थिर व्हावें. अशा स्थितींत पूरकानें पोटांत पुष्कळ वायु सांठविला असतां सर्व पोट वायूनें भरल्यामुळें तो पुरुष पाण्यावर कमळाच्या पानासारखा सहज तरंगतो ह्मणून याला प्लाविनी कुंभक ह्मणतात.

त्यांत सूर्यभेदन आणि उज्जायी हे दोन कुंभक उष्ण आहेत, ह्मणून शीतकालांत फायदेशीर आहेत. सीत्कारी व शीतली हे दोघे थंड आहेत ह्मणून उष्णकालांत हितकारक आहेत. भस्त्रिकादि कुंभक समशीतोष्ण आहेत ह्मणून नेहमीं हितकारक आहेत. सर्व कुंभक सर्व रोग दूर करणारे खरे परंतु त्यांत विशेषेंकरून सूर्यभेदन प्रायः वातहारक आहे; उ-ज्जायी प्रायः कफहारक आहे; सीत्कारी व शीतली प्रायः पित्तनाशक आहेत; भस्त्रा ( भस्त्रिका ) कुंभक तीन्ही दोषांचा नाश करून सुषुम्नेंत प्रवेश करवितो; ज्या योगानें षट्-चक्रांचा भेद होऊन हृदयग्रंथींचा छेद होतो.

याप्रमाणें रेचक व पूरक हे दोन्ही सोडून देऊन केवलकुंभक सहज होऊं लागेल तेथपर्यंत या सहितकुंभकाचा अभ्यास करावा. केवलकुंभक सिद्ध झाल्याचें असें चिह्न आहे कीं, शरीर कृश ( रोड ) होणें, तोंडावर प्रसन्नता ( टवटवी ), स्वच्छ डोळे, आरोग्य, नाडीवि-शुद्धि, अग्नि प्रदीप्त, बिंदुजय आणि नादानुसंधान इत्यादि होऊं लागतात. असें हठयोग-प्रदीपिका वगैरे ग्रंथांत पुष्कळ विस्तारानें सांगितलें आहे.

जसे धारणा, ध्यान आणि समाधि हे एक आहेत त्याचप्रमाणें हा प्राणायाम सुद्धां दीर्घकालव्यापी झाला ह्मणजे त्याला प्रत्याहार इत्यादि व्यवहार होतो असें योगचिंतामणींत सांगितलें आहे. कांहीं कमी बेचाळीस विपलांचा एक कनिष्ठ प्राणायाम होतो, ह्मणून जें सांगि तलें आहे तेथें एक चुटकी वाजविण्याच्या कालाची एक मात्रा अशा विवक्षेनें बाराच मात्राकाल होतो. त्याच प्रमाणें चौऱ्याशीं विपलांचा एक मध्यम प्राणायाम येथें चोवीस मात्रा समजाव्या. आणि १२५ किंवा १२६ विपलांचा उत्तम प्राणायाम येथें ३६ छत्तीस मात्रा समजाव्या; ज्या वेळेस बंधपूर्वक सवाशें विपलांपर्यंत प्राणाचें स्थैर्य (स्थिरता ) होतें त्या वेळेस तो ( प्राण ) ब्रह्मरंध्रांत जातो. जेव्हां ब्रह्मरंध्रांत गेलेला प्राण पंचवीस पळांपर्यंत स्थिर राहतो, त्या वेळेस प्रत्याहार; जेव्हां पांच घटिकांपर्यंत स्थिर राहतो तेव्हां धारणा; जेव्हां साठ घटिकांपर्यंत प्राण ब्रह्मरंध्रांत स्थिर राहतो त्या वेळेस ध्यान आणि ज्या वेळेस बारा दिवसपर्यंत स्थिर राहतो त्या वेळेस समाधि असें ह्मणतात.

**बाह्याभ्यन्तरविषयाक्षेपी चतुर्थः ॥ ५१ ॥**

प्राणवायूची बाहेरील ह्मणजे श्वास सोडण्याची सीमा नाकापासून बारा बोटांपर्यंत आहे; तो त्याचा बाह्य विषय झाला. व त्याची आंतील प्रश्वासाची सीमा हृदय, नाभिचक्र इत्यादि तो त्याचा आभ्यंतर विषय आहे. ह्या दोन विषयांकडे लक्ष ठेवून वायूचें स्तंभन करणें ह्मणजे त्याची गति बंद करणें हा चवथा प्राणायाम होय.

मागील सूत्रांत सांगितलेल्या तिसऱ्या कुंभकप्राणायामापेक्षां या प्राणायामांत हा विशेष भेद आहे कीं, कुंभक प्राणायाम बाह्य व आभ्यंतर विषयांच्या निश्चयावांचूनच केवल एक वेळां प्रयत्न केल्यानें, तापलेल्या दगडावर उदकाचा थेंब पडावा त्याप्रमाणें एकदम स्तब्ध होतो आणि हा चवथा प्राणायाम तर त्या दोन विषयांचा पूर्वी निश्चय करून स्तब्ध होणारा व फार प्रयत्नानें सिद्ध होणारा असा आहे. तिसऱ्या कुंभकास सहितकुंभक ह्मणतात व या चवथ्या प्राणायानास केवलकुंभक ह्मणतात. यांचें दीर्घत्व सूक्ष्मत्व पूर्वीच्या प्रमाणेंच जाणावें.

---

**सू० ५१ टीपः–१**

आभ्यंतर चक्रांचा साक्षात्कार प्राणायाम ( केवलकुंभक ) धारणेमध्यें येतो, ह्मणून या प्राणायामांत या पिंडब्रह्मांडाची अंतर्लीला दृष्टीस पडूं शकते. त्याच्या पूर्वी हा देह पांचभौतिक आहे, त्यांत त्या त्या भूतांचें स्वरूप प्रत्यक्ष होतें; आणि पृथ्वी इत्यादिकांची धारणा करून पृथ्वी, जल, तेज, वायु व आकाश यांपासून प्राप्त होणाऱ्या मृत्यूचा जय होतो.

१ **पृथ्वीधारणाः**–नाभि व गुदा या दोहोंच्या मध्यें पांच घटिकांपर्यंत वायु धारण केला असतां पृथ्वीपासून होणाऱ्या भयाला दूर करणारी अशी पृथ्वीधारणा प्राप्त होते; अर्थात् त्या योग्याला पृथ्वीपासून मरणाची भीति राहत नाहीं.

२ **जलधारणाः**–पृथ्वीधारणा साध्य झाल्यानंतर नाभीच्या ठिकाणीं पांच घटिकांपर्यंत वायु धारण केला असतां जलापासून होणाऱ्या भयाला दूर करणारी अशी जलधारणा प्राप्त होऊन जलापासून मृत्यूचें भय राहत नाहीं.

३ **तेजोधारणाः**–नाभीचे वर असणाऱ्या मंडलाच्या ठिकाणीं पांच घटिकांपर्यंत वायूचें धारण केलें असतां अग्नीपासून प्राप्त होणारें भय निवारण करणारी अशी तेजोधारणा प्राप्त होऊन त्या योग्याला अग्नीपासून मरणाचें भय राहत नाहीं.

४ **वायुधारणाः**–नासिका आणि भ्रुकुटी यांच्या मध्यभागीं असणाऱ्या मंडलाच्या ठिकाणीं पांच घटिकांपर्यंत वायु धारण केला असतां वायवीय धारणा ( वायुधारणा ) प्राप्त होऊन वायूपासून मरणाचें भय राहत नाहीं.

५ **आकाशधारणाः**–भुवयांच्या मधल्या भागाच्या थोडें वर मोठ्या प्रयत्नानें पांच

घटिकांपर्यंत वायु धारण केला असतां आकाशधारणा प्राप्त होते. आकाशधारणा करणारा निश्चयेंकरून मृत्यूला जिंकितो; आणि तो कोठें जरी असला तथापि तेथें त्याला अत्यंत सुख प्राप्त होतें.

जेथपर्यंत इडा वगैरे नाड्यांत प्राण संचार करीत आहे तेथपर्यंत तो असिद्धच असतो; ह्मणून सुषुम्नानाडीवाटें लय करण्याकरितां या चवथ्या प्राणायामाच्या वेळीं मुद्रांचा अभ्यास करावा ह्मणून महात्मे पुरुष उपदेश करितात. ज्या योगानें स्वाधिष्ठानचक्राजवळ आलेली भगवती कुंडली जी आपल्या शेंपटाच्या साडेतीन वेढ्यांनीं ह्मणजे अंगाचे साडेतीन वेढे देऊन सुषुम्नेचें द्वार मुखानें झांकून टाकून अज्ञानी लोकांच्या बंधाकरितां आणि ज्ञान्यांच्या मोक्षाकरितां निजलेली आहे, तिला हठयोगानें जागृत करून सुषुम्नेचें द्वार खुलें होतें; ज्या योगानें षट्चक्रांचा भेद होऊन ब्रह्मचक्रांत प्राण लीन होतो. ह्मणून गुरूपदेशाप्रमाणें मुद्रांचा अभ्यास करावा. त्या मुद्रा दहा आहेत. त्या अशा,—१ महामुद्रा, २ महाबंध, ३ महावेध, ४ खेचरी, ५ उड्डियान, ६ मूलबंध, ७ जालंधरबंध, ८ विपरीतकरणी, ९ वज्रोली आणि १० शक्तिचालन. या दहा मुद्रा जरा व मरण यांचा नाश करणाऱ्या आहेत, ज्यांचा मुख्य आचार्य भगवान् शंकर आहे. ज्या आठ प्रकारचें दिव्य ऐश्वर्य देणाऱ्या व सर्व सिद्धांना प्रिय असून देवांनाही मिळण्यास कठीण अशा आहेत. यांचें स्वरूप हठयोगप्रदीपिकेंत याप्रमाणें सांगितलें आहे,—

**१ महामुद्राः**—जननेंद्रिय आणि गुदा यांच्या मध्यें जी शिवण असते, तिला योनिस्थान ह्मणतात. त्या योनिस्थानाला डाव्या पायाच्या टांचेच्या जवळच्या भागानें दाबून (अर्थात् योनिस्थानाला टांचेजवळचा भाग चिकटवून) उजवा पाय ताठ जमिनीवर पसरून त्याचा चवडा उभा असूं द्यावा. त्या पायाचा आंगठा दोन्ही हातांच्या तर्जन्यांनीं (आंगठ्याजवळच्या बोटांनीं) बळकट धरावा. पुढें कंठाचे ठिकाणीं जालंधरबंध करून (हृदयाला हनुवटी लावून) वायूचें वर सुषुम्नेंत धारण करावें. असें केल्यानें मूलबंधही सिद्ध होतो; कारण त्याचें स्वरूप ह्मटलें ह्मणजे योनिस्थानाला टांचेनें दाबून जिह्वाबंध केला असतां मूलबंध होतो. याप्रमाणें मूलबंध केल्यानें कुंडली शक्ति सर्पाप्रमाणें जो आकार असतो तो सोडून देऊन दंडाप्रमाणें सरळ होते. त्या वेळेस सुषुम्नेंत प्राणाचा प्रवेश होतो, ज्या योगानें इडा आणि पिंगला या दोहोंना प्राणवियोग होतो. पुढें हलके हलके रेचक करावा; रेचक करितांना घाई करूं नये. याला सिद्ध पुरुष महामुद्रा ह्मणतात. हिच्या योगानें अविद्यादि पांच क्लेश दूर होतात; ह्मणून हिला सिद्ध पुरुषांनीं महामुद्रा अशी संज्ञा दिली आहे. ही (डाव्या भागाला चंद्र अशी संज्ञा आहे व योनिस्थानास डाव्या पायानें दाबावयाचें असतें व डाव्या नाकपुडीनें पूरक व नियमित वेळपर्यंत कुंभक करून उजव्या नाकपुडीनें रेचक करावयाचा असतो ह्मणून) चंद्रांग महामुद्रा झाली. ह्याचप्रमाणें सूर्यांग महामुद्रेचा अभ्यास करावा. ती अशी,—

उजव्या पायाच्या टांचेच्या जवळच्या भागानें शिवणीस दाबून धरून डावा पाय, पाऊल उभें राहील असा सरळ पसरावा; आणि त्या पायाचा आंगठा दोन्ही हातांच्या तर्जन्यांनीं बळकट धरून पूर्वींप्रमाणें मूलबंध करावा. व उजव्या नाकपुडीनें पूरक करून रेचक डाव्या नाकपुडीनें करावा. जेथपर्यंत चंद्र व सूर्य या दोन्ही बाजूंकडे कुंभक सारखा होऊं लागेल तेथपर्यंत महामुद्रेचा अभ्यास करावा. दोन्हीकडे कुंभक सारखा वेळ-पर्यंत होऊं लागला ह्मणजे मग महामुद्रेचा अभ्यास सोडून द्यावा. हा अभ्यास पुरा झाल्या-वर पथ्यापथ्यांचा विचार करावयास नको; सर्वच पथ्य होतें. कारण, घोर विष सुद्धां जरी प्राशन केलें तरी तें अमृत होऊन जिरून जातें. क्षय, कोड, गुदावर्त, गुल्म, अजीर्ण तसेच सर्व उदररोग नाश पावतात.

२ **महाबंध:**—पूर्वींप्रमाणें डावा पाय वंळवून टांचेनें शिवण जेथें असते तेथें दाबून डाव्या मांडीवर उजवें पाऊल ठेवावें, आणि पूरक करून हनुवटी हृदयाजवळ लावून अर्थात् जालं-धरबंध करून कुंभक करावा. ( यांत योनिस्थान दाबल्यानें मूलबंध झाला आणि हनुवटी हृ-दयासरशी केल्यानें जालंधरबंधही झाला. ) मूलबंध आणि जालंधरबंध बरोबर झाल्यानें प्राण मध्यनाडी जी सुषुम्ना तिच्यांत प्रवेश करितो. आपल्या शक्तीमाफक कुंभक करून हळू हळू रेचक करावा. येथें चंद्रांग आणि सूर्यांग असे पूर्वींप्रमाणें दोन प्रकार आहेत. त्यांत हा सां-गितला प्रकार तो चंद्रांग महाबंधाचा झाला; याच्या उलट ह्मणजे उजव्या पायानें शिवणी दाबून उजव्या मांडीवर डावें पाऊल ठेवून उजव्या नाकपुडीनें पूरक करून हनुवटी हृदयाजवळ आणून कुंभक करावा. तो आपणास होईल तितका नियमित मात्रांपर्यंत झाल्यावर डाव्या नाकपुडीनें हळू हळू रेचक करावा. याला सूर्यांग महाबंध ह्मणतात. या चंद्रांग व सूर्यांग दोन कुंभकांची मात्रासंख्या बरोबर होईल तेथपर्यंत हा अभ्यास चालू ठेवावा. कितीएक आचार्य असें ह्मणतात कीं, जालंधरबंधांत कंठबंध ( कंठ बंद ) होतो त्याचा कांहीं उपयोग नाहीं छातीसरशी हनुवटी करण्याची जरूर नाहीं; तर पुढच्या दांतांच्या वर आणि टाळूच्या खालीं जीभ ठेवणें अशा प्रकारचा जिह्वाबंध या ठिकाणीं प्रशस्त आहे. या जिह्वाबंधानें सुषु-म्नेशिवाय इतर सर्व नाड्यांतील वायूच्या ऊर्ध्वगतीचा निरोध होतो. या मुद्रेनें इडा, पिंगला आणि सुषुम्ना या तीन नाड्यांचा एकत्र संगम होऊन प्रयागराजतीर्थ होऊन जातें; कारण, यांना क्रमानें गंगा, यमुना आणि सरस्वती अशा संज्ञा आहेत ह्मणून जसा प्रयागास त्रिवेणी-संगम आहे त्याप्रमाणें या मुद्रेनें या तिहींचा संगम होऊन प्रयागराजतीर्थासारखें होतें. ज्या-योगानें मन आज्ञाचक्रांत राहिलेलें केदारस्थानाप्रत सहज प्राप्त करवितां येतें. (भ्रुकुटींच्या मध्यें शिवस्थान आहे त्याला केदार अशी संज्ञा आहे.) रूप, लावण्य, कांति इत्यादि शोभेनें

युक्त तरुण अशी स्त्री जशी पतीवांचून निष्फल आहे याप्रमाणें महामुद्रा आणि महाबंध या दोघांना महावेधाची आवश्यकता आहे. त्याचें स्वरूप याप्रमाणें,–

**३ महावेधः**—महाबंधमुद्रेंत सांगिल्याप्रमाणें बसून चित्त एकाग्र करून दोन्हीं नाकपुड्यांनीं जालंधरमुद्रेनें कुंभक करून दोन्ही हातांचे तळवे जमिनीवर टेंकून त्यांच्या आधारानें शरीर थोडें उंच खालीं करून हलवावें. पुढें दोन्हीं पायांच्या टांचांनीं शिवणीला दाबावी. असें केल्यानें प्राण, इडा व पिंगला या दोहोंना सोडून सुषुम्नेंत प्रवेश करितो. याप्रमाणें इडा, पिंगला आणि सुषुम्ना या तिहींचा संबंध झाला असतां योगी अमर होतो. याप्रमाणें कांहीं वेळ कुंभक करून पुनः रेचन करावें. अशा तऱ्हेनें महावेधाचा अभ्यास केल्यानें अणिमा इत्यादिक अनेक सिद्धी प्राप्त होतात. जरेमुळें शरीरास वळ्या पडल्या असतील, केश पांढरे झाले असतील किंवा अंग कांपत असेल तर या महावेधाच्या अभ्यासानें सर्व दूर होतात. रोज दिवसांत आठ वेळां हा महावेध थोडथोडा केला असतां पुण्यसंचय होऊन पापाचा अगदीं नाश होतो.

**४ खेचरीः**—जीभ वळवून तिचा कपाळाच्या ( पडजिभेजवळ असणाऱ्या ) भोंकांत प्रवेश करविणें आणि दृष्टि भुवयांच्या मध्यें स्थिर राखणें; याला खेचरीमुद्रा ह्मणतात. जीभ कपाळाच्या छिद्रांत जाण्यास युक्ति अशी करावी कीं, प्रथम निर्मल आणि तीक्ष्ण धारेचें असें कोमल शस्त्र ( या कामांत नस्तर चांगलें उपयोगी पडतें तें ) घेऊन त्यानें युक्तीनें व सावधपणानें जिभेचें मूळ ह्मणजे जिभेच्या खालची शीर केंसाइतकी छेदन करावी. पुढें हिरडे व सैंधव ( योगाभ्यासी असेल त्यानें सैंधवाबद्दल काथ घ्यावा; कारण योगाभ्यासाला सैंधवाचा निषेध आहे इतरांस नाहीं; करितां केवळ खेचरीमुद्रा साधणारानें सैंधव घेण्यास हरकत नाहीं. ) यांचें बारीक चूर्ण करून त्यानें तो छेदन केलेला भाग घांसावा; याप्रमाणें सात दिवसपर्यंत सांजसकाळ करीत असावें. याला छेदनक्रिया ह्मणतात. नंतर आठवे दिवशीं पुनः केंसाइतकें अधिक छेदन करून पूर्वींचें चूर्ण सात दिवसपर्यंत सांजसकाळ लावावें. नंतर पुनः आठवे दिवशीं अधिक छेदन करावें. याप्रमाणें सहा महिनेपर्यंत युक्तिपूर्वक केलें तर जिभेच्या खालची नाडी ह्मणजे शीर जी जिभेला कपाळाच्या छिद्रांत जाण्यास अटकाव करिते. तिचा नाश होईल. हाताचा अंगुठा व तर्जनी या दोन बोटांनीं जीभ धरून डावी उजवीकडे फिरवावी, याला चालन ह्मणतात. आणि दोन्ही हातांचे आंगठे व तर्जनी या बोटांनीं, गाईची धार काढतांना जसा स्तन ( थान ) धरून ओढतात त्याप्रमाणें जीभ धरून ओढओढून लांबवावी; ती इतकी कीं, बाहेर निघून भुवयांच्या मधल्या भागास (पडजिभेस) स्पर्श करील. इतकी लांब होण्यास सकाळ संध्याकाळ रोज थोडथोडी जीभ ओढावयाची, याप्रमाणें सहा महिने केलें पाहिजे. याला दोहन ह्मणतात. असें केल्यानें जिभेला

बेडीप्रमाणें अटकाव करणारी जी खालची शीर ती तुटून जाते; ज्यायोगानें जीभ भ्रूमध्यप्रदेशाला स्पर्श करूं शकते. याप्रमाणें भुवयांच्या मध्यप्रदेशाला जीभ लावणें याला खेचरीमुद्रा, व्योमचक्र अशा संज्ञा आहेत. याप्रमाणें व्योमचक्राच्या अभ्यासानें योगी सर्वप्रकारच्या व्याधींपासून मुक्त होतो. कारण, सोमपान केल्यानें त्याचें शरीर सोमकलांनीं पूर्ण होतें, त्यामुळें तक्षक इत्यादि नागांच्या महाविषापासून त्याला पीडा होत नाहीं आणि देह स्वइच्छेनें सोडतो. कारण, अमृताचें आस्वादन केल्यानें तो अमर होतो. याचा अभिप्राय असा कीं, भ्रुकुटींच्या मध्यें डावेबाजूस चंद्रापासून अमृत स्रवत असतें. त्रिपथ ह्मणजे इडा, पिंगला आणि सुषुम्ना ह्या तीन नाड्यांचा मार्ग जें कपाळाचें आंतील छिद्र ( ज्याला व्योमचक्र ह्मणतात ). त्यांत जीभ उंच करून राखावी; व तेथें अमृत स्रवत (गळत) असतें तें जिभेनें चाटावें. यामुळें पूर्वीं जें अमृत व्यर्थ सूर्यांत पडत होतें त्याचा प्रतिबंध होऊन खेचरीमुद्रेच्या प्रभावानें योगी सोमकलापूर्ण होतो. त्या अलौकिक रसाचा अनुभव घेतल्यामुळें लौकिक खानपान इत्यादिकांविषयीं कुत्सित बुद्धि उत्पन्न होऊन त्या अमृताचेंच सेवन करितो; ज्यायोगानें भूक, तहान इत्यादि सर्व दूर होतात. मल व मूत्र अगदींच थोडीं होतात, किंवा होतही नाहींत. व उत्तम शरीरसंपत्ति प्राप्त होते; अर्थात् रूप, लावण्य, वीर्य व वज्राप्रमाणें शरीर बळकट होतें. ज्यायोगानें शस्त्र, अस्त्र त्या योग्याला लागूं शकत नाहींत. उलट शस्त्रादिकच त्याच्या वज्रभावामुळें कुंठित होऊन तुटून जातात. त्याचप्रमाणें ज्यानें टाळूच्या वरचें छिद्र खेचरी मुद्रा करून झांकून टाकिलें असेल तो स्त्रीबरोबर आलिंगन करून राहिला असला तरी त्याचें वीर्य स्खलित होत नाहीं; आणि तो नेहमीं ऊर्ध्वरेता राहूं शकतो. व मृत्यूला जिंकितो; कारण, मेरुपर्वताप्रमाणें उंच जी सुषुम्ना तिच्या वरच्या भागामध्यें जें छिद्र आहे तेथें चंद्रामृत राहत असतें तें खालीं गळून गेल्यानें मृत्यु प्राप्त होतो, ह्मणून जर योगी त्या अमृताचा स्राव होऊं देणार नाहीं तर मग पुढें अमर होण्यास कांहीं विलंब लागत नाहीं. जसा सर्व बीजांत ओंकार मुख्य आहे, सर्व देवांत भगवान् विष्णु मुख्य आहे, आणि सर्व अवस्थांत उन्मनी अवस्था मुख्य आहे; त्याप्रमाणें सर्वमुद्रांत खेचरीमुद्रा मुख्य आहे.

५ **उड्डियानबंधः**—नाभीच्या खालच्या व वरच्या भागाला (पाठीला पोट चिकटेल तेथपर्यंत) ओढून धरून व ज्या रीतीनें बरगड्यांला आढ्या पडतील असें करावें. महापक्षी जो प्राण तो या मुद्रेनें अनायासानें सुषुम्नेंत गगन करितो अथवा या मुद्रेनें रोंकलेला वायु सुषुम्नेंतून ब्रह्मरंध्रांत उडून जाऊं शकतो, ह्मणून या मुद्रेला उड्डियानबंध ह्मणतात. सिंह जसा हत्तीस मारितो, त्याप्रमाणें हा बंध मृत्यु दूर करितो. गुरूपासून हा चांगल्या रीतीनें समजून घेऊन याचा निरंतर अभ्यास केला तर वृद्ध पुरुष असला तरी तो तरुणाप्रमाणें दिसेल.

६ **मूलबंधः**—एका टांचेनें योनिस्थान ह्मणजे शिवण दाबून आणि गुदद्वाराला संकुचित

करून अपानवायूची जी खालीं गति आहे ती, त्याला वर आकर्षण करून वर चालूं करावी; याला मूलबंध ह्मणतात. तात्पर्य, प्राण व अपान यांचा संयोग करवून त्यांची सुषुम्नेंत गति करवावयाची याला मूलबंध ह्मणतात. या क्रियेनें मूलस्थाना ( गुदा ) चें बंधन होतें. ह्मणूनच त्याचें नांव मूलबंध पडलें आहे. या मुद्रेनें प्राण, अपान, नाद आणि बिंदु यांचें ऐक्य होतें प्राणवायूची ऊर्ध्व ( वर ) गति आहे व अपानवायूची अधोगति ( खालीं गति ) आहे. या दोहोंचें ऐक्य सुषुम्नेंत झाल्यानें नाद ( मेघाप्रमाणें ध्वनि ) प्रकट होतो. आणि प्राण तसाच अपान यांचें हृदयावर गमन झाल्यामुळें नाद व बिंदु यांचें ऐक्य होतें. नंतर हे चौघे मस्तकांत प्रवेश करितात; त्यामुळें योगसिद्धि होते. नेहमीं मूलबंधमुद्रा केल्यानें ज्या वेळेस प्राणवायूची व अपानवायूची एकता होते त्या वेळेस संचित झालेलें मूत्र तसाच मल ( विष्ठा ) शरीरांत मलरूपानें राहत नाहींत. मूलबंध केल्यानें अपानवायु वर चालूं लागतो आणि तो चालून नाभीच्या खालीं त्रिकोणाकृति अग्निमंडल आहे त्यांत प्रवेश करितो. यायोगानें जठराग्नि प्रदीप्त होतो. पुढें अग्नि आणि अपानवायु हे दोघे प्राणवायूंत जातात त्यामुळें अग्नि अतिशयच प्रदीप्त होतो, आणि त्यामुळें वेटोळें घालून निजलेली कुंडलिनी शक्ति जागृत होते. निजलेली सर्पिणी जशी लांकूड मारलें असतां सरळ होते तशी ती कुंडलिनी नीट होऊन सुषुम्नेंत प्रवेश करिते. कुंडलीला जागृत करण्याला मूलबंध उपयोगी आहे; ह्मणून योगाभ्यास करणारानें निरंतर तिचा अभ्यास करणें आवश्यक आहे.

७ **जालंधरबंधः**—कंठाचें भोंक आकुंचित करून मान खालीं वांकवून हनुवटी (दाढी) हृदयापासून चार बोटांच्या अंतरावर असूं देणें याला जालंधरबंध ह्मणतात. हा जरा व मृत्यु दूर करणारा आहे. हा शिरासमूहाला व खालीं स्रवणारें जें चंद्रामृत त्याला प्रतिबंध करितो ह्मणून याला जालंधरबंध नांव पडलें आहे. कंठाला खालीं वांकवून जालंधरबंध केल्यानें चंद्रामृत जठराग्नींत पडत नाहीं, आणि त्यामुळें प्राणवायु नाडींत प्रवेश करून प्रकोप करीत नाहीं. कंठाचा दृढ संकोच झाल्यामुळें व जे अंगुष्ठ, गुल्फ, जानु, ऊरु, सीवनी, लिंग, नाभि, हृदय, ग्रीवा, कंठ, जिह्वा, नासिका, भ्रूमध्य, ललाट, मूर्धा आणि ब्रह्मरंध्र असे सोळा आधार आहेत त्यांचें बंधन झाल्यामुळें इडा व पिंगला यांचें वाहणें बंद होतें. मूलबंधानें अपानवायूची ऊर्ध्व गति होते, जालंधरबंधानें इडा व पिंगला या दोघींचें वाहणें बंद होतें, आणि उड्डियानबंधानें वायु सुषुम्नेंत गमन करितो. या युक्तींनीं प्राणवायु स्थिर होऊन जातो, आणि ब्रह्मरंध्रांत स्थान करून राहतो. याला प्राणलय ह्मणतात. प्राणलयानें मरण, जरा, रोग, अंगावर वळ्या, पांढरे केंस, मूर्च्छा, आणि आलस्य वगैरे सर्व नाश पावतात. तालूच्या मूळाशीं दिव्यरूप चंद्रमा आहे; त्यांतून अमृत पाझरत असतें. त्या अमृताचा नाभीमध्यें राहिलेला जो अग्निरूपी सूर्य तो ग्रास करितो त्यामुळें वृद्धावस्था प्राप्त होते. याकरितां गुरुमुखानें हा पुढील विपरीतकरणी नांवाचा उपाय नीट समजून घेण्याचा अभ्यास करावा.

८ **विपरीतकरणी:**—भ्रुकुटींच्या मधल्या भागाजवळ असलेल्या चंद्रापासून जें अमृत वाहत असतें त्याचें नाभीच्या ठिकाणीं असणाऱ्या अग्निरूपी सूर्यानें भक्षण करूं नये ह्मणून नाभीजवळचा सूर्य वर राखावा आणि चंद्र खालच्या भागांत आणावा; याला विपरीतकरणी मुद्रा ह्मणतात. ही मुद्रा गुरुमुखानेंच सिद्ध होते; नाहींतर कितीही शास्त्रश्रवण केलें तथापि होत नाहीं. या मुद्रेनें अभ्यास करणाराचा जठराग्नि प्रदीप्त होतो ह्मणून त्यानें यथेच्छ आहार केला पाहिजे नाहीं तर थोडा आहार झाल्यानें अग्नि शरीराला जाळून टाकितो. दोन्ही तळहातांवर डोकें खालीं टेंकून पाय वर अधर राखावे; ही विपरीतकरणी मुद्रा होय. (याला कपालासनही ह्मणतात.) पहिले दिवशीं ही मुद्रा क्षणभर करावी; दुसरे दिवशीं त्याच्या दुप्पट वेळपर्यंत, याप्रमाणें क्रमानें वाढवीत वाढवीत अभ्यास करावा. या मुद्रेच्या अभ्यासानें अंगावर पडलेल्या वळ्या, पांढरे केंस वगैरे सर्व दूर होतें.

९ **वज्रोली:**—ही सा० सू० ३० पृ० ३१ ब्रह्मचर्यबिंदुविचारांत सांगितली आहे तीच येथें समजावी.

१० **शक्तिचालन:**—कुटिलांगी, कुंडलिनी, भुजंगी, शक्ति, ईश्वरी, कुंडली आणि अरुंधती हे ७ सात एकमेकांचे पर्यायशब्द आहेत. ज्या रीतीनें मनुष्य किल्लीनें कुलूप काढून दार उघडतो त्याप्रमाणें योगी हठाभ्यासानें कुंडलीच्या योगानें मोक्षाचें कपाट (सुषुम्नेचा मार्ग) खुला करूं शकतो. ज्या सुषुम्नामार्गानें संपूर्ण दुःखांनीं रहित अशा ब्रह्मरंध्रास जावयाचें आहे तेथें द्वाराच्या तोंडींच आपलें मुख पसरून कुंडलिनी निजली आहे. शिश्नाच्या वर आणि नाभीच्या खालीं कंद आहे, ह्मणजे मूलस्थानापासून तो कंद वीतभर उंच आहे. ज्याचा चार बोटें विस्तार आहे. तो मृदु, श्वेतवर्ण आणि अंडाकृति असा आहे, त्या कंदाला वज्रासन करून दोन्ही हातांनीं दोन्ही पाय धरून तो पायाच्या घोंट्यांनीं दाबावा आणि पुढें भस्त्रिकाकुंभक करून नाभीच्या ठिकाणीं असणाऱ्या सूर्याचें आकुंचन करावें; ज्या योगानें भगवती कुंडलिनी जागी होईल. जी योग्याला मोक्षाकरितां व मूढ जनांच्या बंधासाठीं तेथें निजली आहे. तिला गुरूनें सांगितलेल्या उपदेशाप्रमाणें तिचें शेंपूट धरून वर करावी; कीं. ज्यायोगानें ती जागी होऊन सुषुम्नेचा रस्ता सोडून देऊन वर येईल. या रीतीनें सुषुम्नेचें द्वार खुलें झाल्यामुळें प्राण सुखानें ब्रह्मरंध्रमार्गांत प्रवेश करितो. याप्रमाणें सकाळ संध्याकाळ सूर्यनाडीनें पूरक करून चार चार घटिकांपर्यंत तिचें चालन करावें ह्मणजे तिला जाग्यावरून हालवावी. याप्रमाणें सुखानें झोप घेत पडलेल्या अरुंधतीस नित्य जागी करावी. कारण, तिचें संचालन केल्यानें योगी सर्व रोगांपासून मुक्त होतो. ज्यानें शक्तिचालन केलें तो योगी सिद्ध जाणावा. या नाडींतील मल सर्व दूर होतात; आणि कालाचा जय सहजरीतीनें करितो. ही ब्रह्मनाडी सुषुम्ना आसन, प्राणायाम आणि मुद्राभ्यास यांनीं सरळ होते ह्मणून

**ततः क्षीयते प्रकाशावरणम् ॥ ५२ ॥**

बुद्धिसत्व ( चित्त ) हें स्वभावतः निर्मल आहे खरें परंतु त्यावर क्लेशरूपी मल च-सला ह्मणजे तें अगदीं मलिन होऊन जातें. तो मल प्राणायामाच्या अभ्यासानें दूर होतो.

**धारणासु च योग्यता मनसः ॥ ५३ ॥**

धारणेचें लक्षण पुढें सांगावयाचें आहे. प्राणायामांपासून चित्तमल नाहींसा झाला असतां मनाला ज्या अत्यंत सूक्ष्म लक्ष्याच्या ठिकाणीं धारण करावें तेथें चंचल न होतां स्थिर राहण्याची योग्यता येते.

---

सू० ५१ टी०-१

सुषुम्नाद्वारानें प्राणाचा लय करण्याकरितां कुंडलीला जागी करणें अत्यावश्यक आहे. जशी राजा असल्यावांचून पृथ्वी शोभत नाहीं, किंवा चंद्रावांचून रात्रि शोभत नाहीं तशा वि-चित्र मुद्रा राजयोगावांचून शोभत नाहींत. याकरितां एकाग्र होऊन चतुर्थ प्राणायाम जो केवलकुंभक तो सफल होईपर्यंत मुद्रांचा अभ्यास करावा. या शक्तिचालनमुद्रेंत कुंड-लीला चलायमान केल्यामुळें सर्व प्रकारचे रोग दूर होऊन कालाचें भय मुळींच राहत नाहीं कारण देहत्याग करणें हें योग्याच्या इच्छेवर असतें.

या मुद्रांचा अभ्यास करितां करितां ज्या वेळेस प्राण सुषुम्नेंत प्रवेश करून संचार करूं लागतो, तशी तशी त्याची स्वाभाविक बारा अंगुळांची गति कमी कमी होत जाते; ज्या योगानें क्रमाक्रमानें त्याच्या गतीचा निरोध होऊन प्राण शून्यांत लीन होतो.

प्रवेशकालीं प्राणाची गति बोटें, १० दहा निघतांना १२ बारा, गमनकालीं २४ चोवीस, धांवतांना ४२ बेचाळीस, मैथुनकालीं ६५ पांसष्ठ, निद्रेंत १०० शंभर, स्वाभाविक गति १२ बारा, व भोजनकालीं १८ अठरा आहे. त्यांत जी स्वाभाविक बारा बोटें गति सांगितली, त्यांतून एक बोट गति कमी केली असतां ह्मणजे वायूची गति अकरा बोटें झाली असतां निष्कामता प्राप्त होते; त्यातून एक बोट गति कमी केली असतां ह्मणजे दहा बोटें गति असतां आनंद प्राप्ति; नऊ बोटें गति असतां अलौकिक कवित्वशक्ति प्राप्त होते; आठ बोटें गति असतां वाचासिद्धि प्राप्त होते; सात बोटें प्राणगति झाली असतां दूर दृष्टि प्राप्त होते; सहा बोटें असतां आकाशगमन होतें; पांच बोटें गति असतां प्रचंड वेग प्राप्त होतो; चार बोटें असतां आणिमादि सिद्धी प्राप्त होतात; तीन बोटें असतां नव निधी प्राप्त होतात; दोन बोटें गति राहिली असतां तो योगी एकावेळीं अनेक देह धारण करूं शकतो. एक बोट गति केल्यानें साउली नाहींशी होते; आणि ती एक बोटही गति नाहींशी केल्यानें तो वायु नखशिखाग्रापर्यंत पूर्ण होतो. मग त्यास अमृतपान होत असल्यामुळें खण्यापिण्याची मुळींच गरज राहत नाहीं.

**स्वविषयासंप्रयोगे चित्तस्वरूपानुकार इवेन्द्रियाणां प्रत्याहारः ॥ ५४ ॥**

शुद्ध झालेलें चित्त वैराग्यामुळें शद्ब, स्पर्श इत्यादिक आपल्या सर्व विषयांचा त्याग करून् आत्मस्वरूपीं तल्लीन होतें; तेव्हां चक्षु इत्यादिक इंद्रियें सुद्धां चित्ताच्या स्वरूपाचेंच अनुकरण करितात हें जें इंद्रियांचें आपल्या विषयांचा संसर्ग न करितां चित्ताच्या स्वरूपास अनुसरून राहणें याला प्रत्याहार असें ह्मणतात. जशा मधमाशा आपल्या मधील राजाच्या धोरणानें वागतात; ह्मणजे तो पुष्पावरून उडाला असतां त्याच्या मागें उडून जातात; व तो पुनः एखाद्या फुलावर मकरंदसेवनास बसला असतां आपणही तेथें बसूं लागतात. त्याप्रमाणें मन् हें सर्व इंद्रियांचा राजा आहे. तो ज्याप्रमाणें वागतो त्याप्रमाणें तींही वर्तन करूं लागतात. ( यथा राजा तथा प्रजाः ) याकरितां चित्ताला आवरून धरिलें असतां इंद्रियें हीं आपोआपच स्वाधीन होतात. ह्मणून चित्तनिरोध करावा; असें या सूत्राचें तात्पर्य आहे.

**ततः परमा वश्यतेन्द्रियाणाम् ॥ ५५ ॥**

प्रत्याहाराचा अभ्यास केल्यानें इंद्रियें इतकीं स्वाधीन होतात कीं, त्यांना आपण जरी बळेंच बाह्य विषयांकडे लाविलें तरी तीं त्यांकडे प्रवृत्त होत नाहींत.

---

## प्रत्याहार ( हें योगाचें पंचमाङ्ग होय. )

सू० ५४ टी०-१

शद्बादिक विषयांत अथवा घटपटादिक पदार्थांविषयीं सत्ता, स्फुरता आणि प्रियतारूप मात्र एक आत्मा आहे असें समजून नामरूपक्रियांनीं मनाला विरक्त करून आत्म्यांत तल्लीन होणें याला प्रत्याहार ह्मणतात. या प्रत्याहाराच्या साधनांत शद्ब, स्पर्श, रूप, रस आणि गंध वगैरे इंद्रियांना स्थिर करून जितक्या वेळपर्यंत श्वासाला स्थिर ठेववेल तितका वेळ ठेवून नंतर त्याला हलके हलके नाकावाटे बाहेर सोडावा. असें करीत असतां कर्णेंद्रिय बंद करून एकाग्र चित्त केल्यानें पुष्कळ वेळां प्राणवायूंत अथवा जठराग्नींत होणारे ध्वनी ऐकण्यांत येतात. जसें अन्न आणि पाणी यांच्या खाण्यापिण्यानें शीतोष्ण प्रकट होतें; तसें नादरूपी रज्जूनें बांधलेलें मन आपल्या चपळतेचा त्याग करून निरालंब ब्रह्माकार वृत्तीच्या प्रवाहाला धारण करितें; कारण, नादाच्या अनुसंधानानें आंतील व बाहेरील ह्या दोन्ही चिंतेंचा त्याग होतो. त्या योगानें बहिर्मुखरूपी चंचळ जें आपलें मन तें वश होतें. जसा फुलांचा रस पिण्यांत मग्न झालेला भ्रमर सुगंधाची इच्छा करीत नाहीं; तसें नादांत आसक्त झालेलें चित्त पंचविषयांची अपेक्षा करीत नाहीं. त्याकरितां नादाभ्यासी लोक क्षणमात्रांत आपल्या चित्ताची चंचळता जिंकून त्याला वश करितात. त्यांत कितीएक प्रसंगीं मोठ्या समुद्राच्या गर्जनेप्रमाणें अथवा मेघाच्या गर्जनेप्रमाणें नाद ऐकूं येतो. तसाच अ-

भ्यासामुळें अति सूक्ष्म नाद सुद्धां ऐकूं येतो. तो असा,--ध्वनीचा अभ्यास करितांना प्रथम योग्यानें दोन्ही आंगठ्यांनीं कानांला दाबून ठेवल्यानें त्याचा नाद ऐकूं येतो; त्यामुळें पुढें तुरीयपद प्राप्त होतें; परंतु ही तुरीयपदाची प्राप्ति होण्याच्या पूर्वीं सर्व नाद बंद पडून जातो. पुढें ज्या वेळेस मन आपला व्यवहार चालविण्याचें बंद करितें, त्या वेळेस कालज्ञान होण्याकरितां आत्मस्थितीचा लाभ होतो. जेथपर्यंत नाद ऐकण्यांत येतात, तेथपर्यंत चित्त आकाशांत राहतें, परंतु ज्या वेळेस मनाबरोबर शब्दाचा लय होतो; त्या वेळेस चित्त आपलें जें मूळ स्वरूप शब्दरहित ब्रह्म त्यांत स्थिर होऊन जातें.

जे विवेकी पुरुष आहेत ते वाणीनें ग्रहण करून सर्व इंद्रियांचा मनांत लय करितात, आणि मनाचा ज्ञानस्वरूप आत्मबुद्धींत लय करितात, त्यामुळें मन स्वतः मनादि किरणांला प्राप्त होतें, त्या योगानें पुढें ज्ञानरूपी बुद्धीच्या योगानें उत्पन्न झालेलें जें हिरण्यगर्भरूप महत्तत्त्व अथवा आत्मा त्यामध्यें लय पावतें. या रीतीनें सर्व इंद्रियादिक किरणांचा लय केल्यानें तुरीयपदरूप शान्त आत्म्याची प्राप्ति होते.

प्रत्याहारांत श्वासाचें माप शरीराच्या बाहेरच्या आकाशांत बारा बोटेंपर्यंत मानिलें आहे. हा श्वास षट्चक्रांत फिरत राहतो. त्यांत श्वास ज्या वेळेस ब्रह्मरंध्राकडे जाऊं लागतो, त्या वेळेस शांभवी मुद्रा प्रकट होते. ती अशी,--गुदापासून ब्रह्मरंध्रापर्यंत जीं चक्रें आहेत, त्यांच्या मध्यें वासनिकचक्र आहे. त्यांत अंतःकरणाची वृत्ति अथवा देहाची बाहेरची जी दृष्टि आहे ती बंद करून ह्मणजे इंद्रियें आणि मनोविकार नष्ट करून वृत्ति स्थिर करणें; याला शांभवी मुद्रा ह्मणतात. हिला ऋग्वेद, वेदान्त, सांख्य आणि पातंजल इत्यादिक शास्त्रांत गुप्तविद्या ह्मणतात. ज्या वेळेस प्रथम धारणासमयीं अंतर्लक्ष होऊन बहिर्दृष्टि अंतःकरणांत लीन होईल अशा रीतीनें एक क्षणभर तरी निदान राहील. त्या वेळेस त्याला उन्मनी मुद्रा प्राप्त झाली असें ह्मणतात. याप्रमाणें धारणेचा अभ्यास करणाऱ्या पुरुषाला हृदयकमल अंगुष्ठाएवढें कितीएक वेळां दिसतें. या हृदयकमलाच्या सूक्ष्म छिद्रांत अंतःकरणसुद्धां अंगुष्ठप्रमाण भासूं लागतें. त्यांत सर्व जगत् परिपूर्ण एकवटून अंगुष्ठाएवढी आत्मज्योति दिसूं लागते; त्याला पुरुष असें ह्मणतात. तो शरीराच्या मध्यभागांत स्थिर राहिला आहे. त्याला तिन्ही काळांचा नियंता ईश्वर जाणून आपलें रक्षण करण्याची इच्छा करीत नाहीं. तो साक्षात् ब्रह्मस्वरूप ह्मणवितो. त्याला असें ज्ञान प्रकट होतें कीं, प्राणाच्या साहाय्यानें वाणी इत्यादिक इंद्रियांत प्राणाकृतीनें आत्मा गमन करीत आहेसें वाटतें. त्या गमन करण्यानें शरीरांत त्याची स्थिति होते. त्यामुळें त्याला प्राणसंज्ञा प्राप्त झाल्यानें त्याला प्राणधारक असेंही ह्मणतात. या प्राणधारकाला योगी याप्रमाणें समजतात,--

जसा कूर्म ( कासव ) आपल्या अंगाला आंत संकुचित करून ओढून घेतो त्याप्र-

माणें विषयांपासून इंद्रियांना निवृत्त करून त्यांची वृत्ति आंत ( आत्म्याच्या ठिकाणीं ) स्थिर करणें यांचें नांव प्रत्याहार. प्रत्याहारानें इंद्रियांची परम वश्यता होण्यास उपाय भगवान् याज्ञवल्क्यांनीं याप्रमाणें सांगितला आहे,-'हे गार्गि ! दोन पायांचे आंगठे. दोन गुल्फ ( घोटे ), दोन जांघेच्या मधले भाग, गुदस्थानाचें मूळ. एक देहाचा मध्यदेश. एक लिंगाचा मूळदेश. नाभिदेश. हृदयदेश. कंठकूप, तालूचा मूळदेश, नासिकेचा मूलदेश, दोन नेत्रमंडलें. भुवईचा मध्यदेश. ललाट. मस्तक ( ब्रह्मरंध्र ) इतकीं शरीरांत मर्मस्थानें आहेत. या मर्मस्थानांच्या ठिकाणीं मनासुद्धां प्राणाचें धारण प्रत्याहार सिद्ध होईपर्यंत करावें. पुढें एका स्थानांतून दुसऱ्या स्थानांत, दुसऱ्यांतून तिसऱ्यांत या क्रमानें प्राणाचें वर आकर्षण करावें ह्मणजे पायाच्या आंगठ्यापासून तें ब्रह्मरंध्रापर्यंत क्रमाक्रमानें धारण करीत करीत वर वर प्राणाला आकर्षण करावें. पुढें आपल्याला इच्छा वाटेल तेथें स्थिर रहावें; नंतर पुनः क्रमानें प्राणाचें खालीं आकर्षण करावें. ह्मणजे प्रथम ललाट. पुढें भ्रूमध्यदेश. कंठकूप. हृदयदेश. नाभिचक्र. लिंगमूल, तेथून अग्निस्थान जी सीवनी ( शिवण ) तेथें प्राणाचें धारण करावें. तेथून गुदद्वार. तेथून ऊरूचा ( मांड्यांचा ) मूलदेश, पुढें मध्यदेश. त्यापुढें गुडघ्यांचा मध्यभाग. चितिमूल. जंघामध्यदेश, गुल्फ व पादांगुष्ठ या ठिकाणीं क्रमानें मनासहित प्राणाचा निरोध करावा. या रीतीनें एका स्थानांतून दुसऱ्या स्थानांत प्राण स्थिर करण्याच्या निमित्तानें बाह्य विषयांच्या ठिकाणीं जी इंद्रियांची आसक्ति असते ती नाहींशी होते. आणि नेहमीं अंतर्दृष्टि राहते. त्या योगानें सर्व पातकें दूर होऊन स्वेच्छेनें योगी देहत्याग करितो.

हा एक प्रकार. दुसरा प्रकार तादात्म्य विकल्पाचा आहे. ह्मणजे 'कोणत्याही अन्य पदार्थापासून भयच प्राप्त होणारें आहे ' असें पूर्ण ज्ञान झाल्यानें इंद्रियांची विषयांवरची आसक्ति नाहींशी होऊन सहज प्रत्याहार सिद्ध होतो. अथवा जें कांहीं दृश्य आहे तें सर्व आत्मस्वरूपानें पाहणें याला योगी प्रत्याहार ह्मणतात.

'एक अंगुष्ठप्रमाण पुरुष धूमरहित अग्नीच्या प्रकाशाप्रमाणें योगी लोक हृदयांत लक्षणावरून जाणतात. आणि तो वर्तमान, भूत व भविष्य या तिन्ही काळांचा नियंता ईश्वर आहे. तो नित्य कूटस्थ पुरुष सर्व प्राणिमात्राचे ठिकाणीं व्यापून राहिलेला आहे. त्याप्रमाणें दुसरा असा कोणी नाही.' या ब्रह्मरूप प्रकाशाच्या प्राप्तीच्या वेळीं प्राणवायु ब्रह्मरंध्रांत गमन करितो. त्या वेळीं अनेक प्रकारचे ध्वनी ऐकण्यांत येतात.

प्रत्याहारांत मनाला स्थिर राखण्याकरितां अंतर्दृष्टींत याप्रमाणें ज्ञान असू द्यावें,-' आत्म्याला रथाचा स्वामी समजावा, आणि शरीराला रथ समजून इंद्रियाना घोडे समजावें. इंद्रियांना हाकणारा सारथी निश्चयरूप बुद्धि समजावी. आणि संकल्पविकल्परूपी ज्या

मनाच्या वृत्ती, त्यांना घोड्यांचा लगाम समजावा.' याप्रमाणें प्रथम अभ्यास करणारानें प्रत्याहारांत दृढ निश्चयानें बुद्धि राखावी. याप्रमाणें दृष्टि स्थिर झाली ह्मणजे मग अभ्यास करणारानें ध्यान करण्यास आरंभ करावा.

तत्त्वदर्शनाच्या निदिध्यासानें आत्मज्योतीचा साक्षात्कार करणें यालाच मुख्य ध्यान ह्मणतात. त्यांत ध्यान करितांना देहाभिमानरहित होऊन 'मी ब्रह्म आहें' याप्रमाणें ब्रह्माकार वृत्ति ठेवून ब्रह्मानंदांत निमग्न होणें. याप्रमाणें ध्यानरूप वृत्ति परमानंदाची प्राप्ति करून देणारी आहे. अशा ध्यानानें प्राणाचें आकर्षण होऊन प्राण आणि अपान हे दोन्ही एकत्र होतात. पुढें हे दोन प्राण दुसऱ्या प्राणांशीं एकत्र करीत जाऊन ते मूलाधार ( गुदस्थान ), मणिपुर ( नाभि ), अनाहत ( हृदय ), विशुद्धि ( कंठ ), आज्ञा ( भ्रुकुटी ) आणि ब्रह्मरंध्र ह्मणजे मगज या सर्वांना भेदन करूं लागतात, त्यामुळें या वायूच्या कृतीप्रमाणें अंतःकरणादिक तत्त्वांची स्थिति शान्त राहते.

जेथपर्यंत वायु शरीरांत निरुद्ध झालेला आहे; जेथपर्यंत चित्त बाह्य व्यापारांत चंचल झालें नाहीं; आणि जेथपर्यंत भ्रुकुटीमध्यें दृष्टि स्थिर आहे तेथपर्यंत काळाचें भय कोठून असणार ? ज्या समयीं सोहंरूप व्यानवायूच्या बरोबर दुसरे वायू एकत्र होऊन मेरुदंडावर चढावयास लागतात, त्या वेळीं प्राण, अपान, समान आणि उदान या चार वायूंची गति मंद होते आणि कुंडली संकुचित होऊन दुसऱ्या चक्रावर जाऊं लागते. त्यांत ज्या वेळीं कुंडली मेरुदंडद्वारें कंठ, तालु आणि ब्रह्मरंध्र यांवर जाऊं लागते, त्या वेळेस गुदा, नाभि आणि हृदय हीं चक्रें संकुचित होऊन एकत्र होतात, त्यामुळें प्राणाचें गमन बाहेरच्या अवकाशांत बारा बोटेंपर्यंत होत नाहीं, तर त्या पंचप्राणांत एकत्र होऊन ब्रह्मरंध्राकडे प्राणवायु फिरूं लागतो; कारण, त्या वेळेस कुंडली उलट झालेली असते, त्यामुळें सर्व स्नायु सरळ होतात, आणि पंच प्राणांची एकत्र झालेली ज्योति चहूंकडे दिसूं लागते. अशा भासाच्या वेळीं देहाभिमान गेलेला असतो. त्यामुळें कुंडली चालविणारा पुरुष मुक्त होतो. कुंडलीशक्ति कंदाच्या वरच्या भागांत योग्यांच्या मोक्षाकरितां आणि मूढ पुरुषांच्या बंधनाकरितां निजलेली असते; त्यांत योगी इला चलित ( जागी ) करून मुक्त होतात; आणि मूढजन इला जाणतच नसल्यामुळें बंधनांत राहतात. योगाचा सर्व आधार कुंडलीवर अनुरोधून आहे. या कुंडलीच्या आधारावरून एकाग्रता व पंचप्राणांच्या आकर्षणानें ज्या वेळीं ज्योति प्रकाशित होते त्या वेळीं ही सृष्टि भिन्न प्रकारच्या आनंदांत समजली जाते. आणि त्या वेळीं श्वास मेरुदंडावर चढावयाच्या तयारींत राहतो. त्या समयीं ध्यान करणाराचें मन संपूर्ण एकाग्र झाल्यामुळें मनाच्या संकल्पाचा प्रवाह आंतच ( मनांतले मनांत ) चालतो. ज्या वेळेस वायु सुषुम्नानाडींत गमन करितो त्यावेळेस मन स्थिर होतें; अथवा ज्या वेळेस मन स्थिर होतें, त्या वेळेस वायु सुषुम्नेंत गमन करितो. त्या वेळेस ऐक्यवृत्तिरूपानें ध्यान होतें. आणि याप्रमाणें ज्या वेळेस संपूर्ण

रीतीनें मन स्थिर होईल, त्या वेळेस त्या स्थितीस उन्मनी आणि मनोन्मनी अवस्था ह्मणतात. या अवस्थेंत गुप्तविद्या प्रकट होते. त्याकरितां या मनोन्मनी अवस्थेच्या पांच भूमिका मानिल्या आहेत. त्यांत पहिली क्षेप, २ री मूढता, ३ री विक्षेप, ४ थी एकाग्रता आणि ५ वीं निरोध. अशा पांच आहेत. त्यांत क्षेपभूमिका ह्मणजे हा लोक आणि देहवासना यांचीं वृत्ति प्रकट होणें. पुढें निद्रा आणि आलस्य इत्यादिकांत ज्या वेळेस वृत्ति जाईल त्या वेळेस मूढताभूमिका असें ह्मणतात. ध्यानांत वृत्ति बहिर्मुख असून मनाचें प्रकट होणें याला विक्षेप ह्मणतात. आणि ज्या वेळेस सर्व वृत्ति एकाग्र होऊन परिपक्वपणानें निमग्न होऊन स्थिर राहील त्या वेळेस त्या अवस्थेला निरोधभूमिका समजावी. या निरोधभूमिकेच्या वेळीं प्राणवायू मंदगतीनें चालूं लागतात; त्यामुळें त्या ध्यान करणाऱ्या पुरुषाला त्या समयीं महाज्ञान उत्पन्न होतें. कारण, त्या वेळीं षट्चक्रें संकुचित होऊन जेव्हां श्वास मेरुदंडावर जाऊं लागतो, त्या वेळीं सर्व प्राणवायूंच्या मलाची शुद्धि होऊन सर्व नाड्या स्वाधीन होऊन जातात. आणि प्राणसंग्रह करण्याची शक्ति योग्यांस येते. याविषयीं श्रीमद्भागवतांत एकादशस्कंधांत असें सांगितलें आहे कीं, मनुष्याच्या शरीराच्या स्थितीच्या प्रमाणांत स्वाभाविक रीतीनें श्वासाचा वेग बाहेरच्या अवकाशांत जाग्रत् स्थितींत बारा बोटांपर्यंत राहतो; ज्या वेळेस मनुष्य चालूं लागतो त्या वेळेस त्याचा वेग अठरा बोटांपर्यंत चालतो; आणि मनुष्य जर बसून बोलूं लागला तर सोळा बोटांपर्यंत वेग चालतो. आणि ज्या वेळेस पळत असेल त्या वेळेस बावीस बोटांपर्यंत चालतो. ह्मणून त्या वेळीं जर श्वासाला कमी चालवून नाकावाटे काढितां येईल तर त्याच्या सर्व नाड्यांतील मरदींचा विकार दूर होऊन सर्वांगांत उष्णता उत्पन्न होते. हा श्वास गृहस्थांना स्त्रीसंग करीत असतां तेवीस बोटें चालतो. त्यांत जर त्या श्वासाला कमी चालविण्याचा अभ्यास असेल तर त्या वीर्यापासून उत्पन्न होणारें बालक अति चंचल आणि निरोगी होतें. याप्रमाणें श्वासाला सोडतेवेळीं त्याची मंद गति केल्यानें वीर्याची वृद्धि, व्याधीचा नाश व ज्ञानाचा उत्कर्ष होतो. याच नियमाप्रमाणें कितीएक योगीलोक आत्मपदाच्या प्राप्तीकरितां आपल्या श्वासाची जी स्वाभाविक गति असते तिला कमी करितात. त्यामुळें त्यांना पूर्ण ऐश्वर्य प्राप्त होतें. अद्भुत ज्ञानाचा उदय होऊं लागतो; त्याच प्रमाणें धर्मजिज्ञासु पुरुष विवेकानें कोणी सद्गुरूच्या द्वारानें या नियमाप्रमाणें चालतील तर त्यांच्या व्याधि वगैरेचें बल कमी होऊन त्यांला सर्व कार्यें उत्तम रीतीनें करण्याचें सामर्थ्य येईल. परंतु अल्पबुद्धीचे, विषयलंपट, ज्यांना अतिशय तृष्णा व केवळ जे स्वार्थतत्पर अशा पुरुषांची अधिक हानि होईल.

**क्रियायोगं जगौ क्लेशान विपाकान् कर्मणामिह ॥**
**तद्दुःखत्वं तथा व्यूहान पादे योगस्य पञ्चकम् ॥ १ ॥**
**इति श्रीपातञ्जलयोगशास्त्राभिप्राये साधनपादः समाप्तः ॥ २ ॥**

ॐ तत्सत्परमात्मने नमः ।

# पातञ्जलयोगशास्त्राचा अभिप्राय.

## विभूतिपाद ॥ ३ ॥

जीं पूर्वीं योगाचीं धारणा, ध्यान व समाधि अशीं तीन अंगें सांगितलीं तीं स्पष्टपणें समजण्याकरितां प्रथम त्या तिघांना संयम असें नांव देऊन नंतर मग बाह्य व आभ्यंतर वगैरे सिद्धि सांगणार आहेत; त्याकरितां त्यांचें प्रथम लक्षण सांगतात.–

**देशबन्धश्चित्तस्य धारणा ॥ १ ॥**

नाभिचक्र, हृदय, उर, कंठ, मुख, नाकाचा अग्रभाग, नेत्र, भुवईंचा मध्यभाग, मस्तक व त्यावरचा प्रदेश या दहा ठिकाणीं क्रमाक्रमानें चित्त दुसऱ्या विषयावरील काढून धारण ( स्थिर ) करणें याला धारणा असें ह्मणतात. त्यांत मुखशब्दानें जिभेचा शेंडा व मस्तकाच्या वरचा भाग बारा बोटें प्रमाणाचा घ्यावयाचा. याचा अभिप्राय 'ज्यानें चित्तांत मैत्री, करुणा इत्यादि भावनांचा पूर्ण अभ्यास केला आहे; ज्यानें यमनियमांचें अनुष्ठान उत्तमरीतीनें केलें आहे; ज्याला आसन व प्राणायाम उत्तम रीतीनें साधला आहे; व ज्यानें आपलीं इंद्रियें विषयांपासून आवरून धरिलीं आहेत, अशा योग्यानें जेथें कोणतेही प्रकारचा उपद्रव नाहीं अशा ठिकाणीं शरीर सरळ करून बसून, शीत, उष्ण इत्यादि सहन करून, संप्रज्ञात समाधीचा अभ्यास करण्याकरितां नाकाचा शेंडा वगैरे ठिकाणीं चित्त स्थिर करावें' हा होय. चित्त स्थिर करण्याला जर कांहीं आधार नसेल तर धारणा होऊं शकत नाहीं; ह्मणून आधाराकरितां परमेश्वराचें स्वरूप चिंतन करून त्या ठिकाणीं चित्त स्थिर करावें. तीं ध्यानें टीपेंत चांगल्या रीतीनें दिलीं आहेत; तीं विचारपूर्वक वाचावीं.

---

### धारणा ( हें योगाचें षष्ठांग होय. )

सू० १ टीपः–१

आधिभौतिक आणि आध्यात्मिक या भेदांनीं धारणा करण्याचे देश दोन प्रकारचे आहेत. त्यांत रत्नमणि किंवा वृक्षाची शाखा, पर्वताचें शिखर, पृथ्वी, समुद्र वगैरे शालग्राम, शिवलिंग वगैरे देवतामूर्ति, सूर्यमंडल, चंद्र, ध्रुवादि नक्षत्रें वगैरे भौतिक पदार्थ, ज्यांची प्रतीति अत्यंत बाह्य रूपानें होते, ते आधिभौतिकधारणेचे प्रदेश होत.

नासिकाग्र, ( नासिकामूल, ) आधारचक्र, स्वाधिष्ठान, मणिपूरक, अनाहत, विशुद्धांबुज, तालुचक्र, आज्ञाचक्र, ब्रह्मचक्र वगैरे आध्यात्मिक धारणेचे विषय होत.

अति सूक्ष्मांत एकदम प्रवेश होत नाहीं, ह्मणून योगांगें अनेक सांगितलीं. त्यांत प्रत्याहार ज्या वेळेस सिद्ध होतो त्या वेळेस साधक पुरुष मोक्षमार्गाच्या नाक्यावर जाऊन

पोहोंचला असें समजावें; कारण इंद्रियें विषयवश न होतां चित्ताप्रमाणें वागूं लागलीं; त्यामुळें आतां जेथें मन लावावें तेथें तें इंद्रियांचें उलट आकर्षण न झाल्यामुळें स्थिर होण्यास कांहीं विलंब लागत नाहीं. ह्मणून प्रत्याहार सिद्ध करण्याकरितां इष्टदेवता वगैरेंच्या मूर्तींत मन स्थिर करण्याचा अभ्यास करावा. अथवा विराट् पुरुष किंवा त्याचा एक एक अवयव, स्थूल पृथ्वी, जल वगैरे पदार्थांचा अभ्यास करावा. त्या धारणा सात सांगितल्या आहेत त्यांचें स्वरूप याप्रमाणें,—

योगाभ्यास करणाऱ्या योग्यानें मिताहार व इंद्रियजय करून भूः इत्यादि सूक्ष्म सात धारणा मस्तकाच्या ठिकाणीं कराव्या. त्यांत पृथ्वीप्रत धारण केल्यानें त्यापासून सूक्ष्मता येते. तो योगी आपल्याला पृथ्वीच असें समजतो; आणि तिच्या गंधाचा त्याग करितो. तशीच उदकाच्या ठिकाणीं धारणा केली असतां रसाचा त्याग होतो. तशीच तेजाच्या ठिकाणीं धारणा केली असतां रूपाचा त्याग होतो. वायूच्या ठिकाणीं धारणा करणाराच्या स्पर्शगुणाचा त्याग होतो. आकाशाच्या ठिकाणीं धारणा करणाराची सूक्ष्म प्रवृत्ति होऊन शब्दगुणाचा त्याग होतो. मनाच्या ठिकाणीं धारणा केली असतां मनाप्रमाणें सूक्ष्मता प्राप्त होते; व आपल्या मनानें सर्व प्राण्यांच्या मनांत प्रवेश करूं शकतो. त्याचप्रमाणें बुद्धिसत्वाच्या ठिकाणीं धारणा केली असतां बुद्धीसारखी अतिसूक्ष्मता प्राप्त होते. तात्पर्य, ज्या ज्या भूतावर प्रीति ठेवून धारणा करितो त्या त्या भूताशीं तादात्म्य होऊन त्या त्या भूताचा सूक्ष्म गुण प्राप्त झाल्यामुळें त्या त्या भूतांत त्याचा लय होतो. याकरितां परस्पर संसक्त झालेलीं सूक्ष्म भूतें जाणून जो योगी त्या सूक्ष्माचा त्याग करितो तो परमपदास प्राप्त होतो. हींच सात सूक्ष्म भूतें नेहमीं बंधाला कारण आहेत; आणि या सातांविषयीं ज्यास वैराग्य असेल तो मुक्त होतो. हें सर्व जगत् गंधादिकांचे ठिकाणीं संसक्त झाल्याकारणानें मूर्खपणानें पुनः पुनः जन्ममरणाच्या भोंवऱ्यांत सांपडतें. याकरितां त्यांविषयीं विरक्त होऊन धारणेनें त्यांचा लय करावा ह्मणजे त्यांपासून मुक्त होऊन परमपदास जातो.

पुढें नासिकाग्र, नासिकामूल, जिव्हाग्र वगैरे आध्यात्मिक प्रदेशाचा अभ्यास झाल्यावर शरीरांत पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश अशा पांच धारणा कराव्या. त्यांचें स्वरूप याप्रमाणें भगवान् याज्ञवल्क्यांनीं सांगितलें आहे; ' भूमि, जल, तेज, वायु आणि आकाश या पांच भूतांत धारणा पांच प्रकारची होते. त्यांत पायांपासून आरंभ करून गुडघ्यांपर्यंत पृथ्वीतत्वाचें स्थान आहे. गुडघ्यांपासून गुदद्वारापर्यंत जलतत्त्वाचें स्थान, गुदद्वारापासून हृदयापर्यंत अग्नितत्त्वाचें स्थान, हृदयापासून दोन्ही भ्रुकुटींच्या मध्यदेशापर्यंत वायुतत्त्वाचें स्थान आणि भ्रूमध्यप्रदेशापासून ब्रह्मरंध्रापर्यंत आकाशतत्त्वाचें

स्थान आहे.' स्वरोदयांत असेंच सांगितलें आहे कीं, 'या पंचतत्वमयदेहांत पांच तत्वें सूक्ष्म रूपानें राहिलीं आहेत; त्यांना तत्ववेत्ते योगी जाणूं शकतात.'

हा धारणा करण्याचा विधि देवताबीजसहित याज्ञवल्क्यसंहितेंत याप्रमाणें सांगितला आहे. त्यांत पृथ्वीधारणेचें स्वरूप असें,–

**पृथ्वीधारणाः**–पृथ्वीस्थानांत प्राणाचा निरोध करून मकारबीजासहित चतुर्भुजाकृति, सृष्टि करणाऱ्या अशा ब्रह्मदेवाचें चित्तांत ध्यान करावें. याप्रमाणें पांच घटिकांपर्यंत धारणा केल्यानें योगी पृथ्वीतत्त्वाचा जय करूं शकतो.

**तेजोधारणाः**–अग्निस्थानीं प्राणाचा निरोध करून रकारबीजासहित त्रिलोचन, तरुण आदित्याप्रमाणें प्रसन्नमुख आणि ज्यानें सर्वांगाला भस्म लेपन केलें आहे अशा भगवान् महारुद्राचें चिंतन करावें. याप्रमाणें पांच घटिकांपर्यंत धारणा केल्यानें अग्नीपासून तो दग्ध होत नाहीं, आणि अग्नितत्त्वाचा जय होतो.

**जलधारणाः**–जलस्थानांत प्राणाचा निरोध करून वकारबीजासहित चतुर्भुजावान् शुद्धस्फटिकसमान तसाच पीतांबर, शुचिस्मित अशा श्रीनारायणाचें चिंतन करावें. याप्रमाणें पांच घटिकांपर्यंत धारणा केल्यानें पापापासून मुक्त होऊन जलतत्त्वाचा जय होतो.

**वायुधारणाः**–वायुस्थानांत प्राणाचा निरोध करून यकारबीजासहित सर्वज्ञ सर्वशक्तिमान्, शान्त, सर्वव्यापक, सर्वकारण अशा भगवान् ईश्वराचें चिंतन करावें. या रीतीनें पांच घटिकांपर्यंत धारणा केल्यानें वायूप्रमाणें वेग होतो, आणि वायुतत्त्वाचा जय होतो.

**आकाशधारणाः**–आकाशस्थानांत प्राणनिरोध करून हकारबीजासहित प्रणवाची अर्धमात्रारूप, व्योमाकार ह्मणजे विभु, शुद्धस्फटिकसमान गौरवर्ण, ज्याचा मौलिभाग बालचंद्रानें विभूषित असा, पंचवदन व ज्याच्या प्रत्येक मुखाला तीन लोचनें ( डोळे ) आहेत, जो दिव्यायुधें आणि आभरणें इहींकरून सुशोभित आहे, अशा सर्वकारणकारण अर्धनारीश्वर भगवान् शंकराचें चिंतन करावें. ही आकाशधारणा रोज केवल एक मुहूर्तभर केली असतां तो मुक्त होतो; असें तांत्रिक ग्रंथांत सांगितलें आहे.

तंत्रवेत्त्यांनीं पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश या धारणांना क्रमानें 'स्तंभिनी, द्राविणी, वैश्वानरी, भ्रामरी आणि शोषणी' अशीं नांवें दिलीं आहेत.

या धारणांच्या उत्तम अभ्यासापासून शिवस्वरोदयांत याप्रमाणें फल सांगितलें आहे– 'जो बुद्धिमान् पुरुष पंचभूतांच्या धारणेचा उत्तम अभ्यास करीत आहे त्याला शेंकडों ब्रह्मदेवांचें आयुष्य जरी खपलें तथापि कालाचें भय असत नाहीं.

प्रत्याहाराच्या बलानें ज्या वेळेस अंतर्दृष्टि होते त्या वेळेस अंतःसृष्टीचा देखावा स्पष्ट होतो. आणि त्या काळापर्यंत राहिलेल्या अज्ञात लीलांचा साक्षात्कार होतो. ह्मणजे जशीं विषयी पुरुषाचीं नेत्र वगैरे इंद्रियें पदार्थांचा संबंध झाल्यानें ज्ञान उत्पन्न करणारीं होतात, तशीं तीं प्रत्याहारानें आंत फिरूं लागतात व त्यामुळें बाह्य पदार्थांचा संबंध नसल्यामुळें बाह्य वस्तूंची प्रतीति होत नाहीं, तर अंतःसृष्टीचा सर्व देखावा दिसूं लागतो.

विधात्याची अद्भुत कारागिरी दाखविणारें हें शरीराचें संस्थान मोठें विचित्र आहे. जशी त्याची बाहेरची रचना भव्य पाहण्याजोगी आहे त्यापेक्षां आंतील रचना विशेष आश्चर्यकारक आहे. ही एक अशी अमूल्य देणगी ब्रह्मदेवानें जीवाला दिली आहे कीं, जर तो तिची किंमत समजेल आणि तिचा योग्य उपयोग करील तर तो स्वतंत्र होऊन विश्वांत विराजमान होईल. परंतु जसा मृग आपल्या नाभीच्या ठिकाणीं कस्तूरी असतां सर्व वनांत तिच्या शोधाकरितां भ्रांतीनें भटकत फिरतो, तसा पुरुष बाह्य विषयांत आसक्त होऊन परतंत्र होतो. ज्या वेळेस प्रत्याहारानें इंद्रियांचा प्रतिलोम ( उलट ) परिणाम होतो, त्या वेळेस तो आपली योग्यता समजून आत्म्याच्याच ठिकाणीं रममाण होऊन आपणास कृतार्थ मानतो. पुढें तो प्रत्याहारपरायण अंतःसृष्टीचें परम सौंदर्य पाहून, बाह्य विघ्नांचा जय करून सदा प्रत्यग्दृष्टि ( आत्म्याच्याच ठिकाणीं आहे दृष्टि ज्याची असा ) होऊन निर्भयपणानें राहतो. पुढें अंतःशरीरांत ( नाभिस्थानाजवळ ) राहिलेला कंद आणि त्यांतून निघालेल्या नाड्या इत्यादिकांची व चक्रादिकांच्या विशेष रचनेची चांगली माहिती होऊं लागते; आणि अभ्यास केल्यानें त्यांचें पूर्ण स्वरूप समजतो. या अमुक चक्राचें स्वरूप कसें आहे, किती पांकळ्या आहेत, देवता कोण आहे वगैरे सर्व साक्षात्कार होतो. चक्राचें स्वरूप गरुडपुराणांत याप्रमाणें सांगितलें आहे,—

गुदा आणि लिंग या दोहोंच्या मध्यभागांत मूल कंद आहे; तेथें 'वं शं षं सं' या चार वर्णांनीं चिह्नित अशा चार पांकळ्यांनीं युक्त अग्नीच्या वर्णासारखें व भगाकृति असें आधारचक्र आहे. याला वन्हिकुंड असेंही ह्मणतात. त्याचा अधिष्ठाता ह्मणजे त्यामध्यें राहणारी देवता भगवान् गणेश आहे. या चक्रांत ज्योतिष्मती भगवती कुंडलिनी आहे.

दुसरें:—लिंगाच्या पश्चिमभागीं गुह्यदेशांत 'बं भं मं यं रं लं' या सहा वर्णांनीं चिह्नित अशा सहा पांकळ्यांनीं युक्त, सूर्यवर्णसमान व पोंवळ्याच्या अंकुराप्रमाणें असें स्वाधिष्ठानचक्र आहे. याची देवता भगवान् ब्रह्मा.

तिसरें:—नाभिदेशांत 'डं ढं णं तं थं दं धं नं पं फं' या दहा वर्णांनीं चिह्नित अशा दहा पांकळ्यांनीं युक्त, रक्तवर्ण असें मणिपूरचक्र आहे. याची देवता भगवान् विष्णु.

चवथें:—हृदयदेशांत 'कं खं गं घं ङं चं छं जं झं ञं टं ठं' या बारा वर्णांनीं चिन्हित अशा बारा पांकळ्यांनीं युक्त, सुवर्णवर्ण, खालीं मुख केलेलें असें अनाहतचक्र आहे. याची देवता भगवान् शंकर.

पांचवें:—कंठदेशांत 'अ आ इ ई उ ऊ ऋ ॠ ऌ ॡ ए ऐ ओ औ अं अः' या सोळा वर्णांनीं अंकित अशा सोळा पांकळ्यांनीं युक्त, चंद्रवर्णसमान असें विशुद्धिचक्र आहे. त्याच्या डाव्या बाजूस इडा, उजवीकडे पिंगला आणि मध्यभागीं सुषुम्ना आहे. याची देवता रुद्र.

तालुकाचक्र ज्याला घंटिकास्थान ह्मणतात, तें दहाव्या द्वाराचा मार्ग आहे.

दोन्ही भुवईच्या मध्यें 'हं' आणि 'क्षं' या दोन अक्षरांनीं अंकित अशा दोन पांकळ्यांनीं युक्त, रक्तवर्ण असें आज्ञाचक्र आहे. याला बिंदुस्थान असेंही ह्मणतात. हें नासिकामूलाच्या नादोत्पत्तीचें स्थान आहे.

निर्वाणसूचक ब्रह्मरंध्र सुईच्या अग्राप्रमाणें आहे.

याच्यावर दहाव्या द्वारांत राहिलेलें, हजार पांकळ्यांनीं युक्त, स्फटिकवर्णासारखें असें ब्रह्मचक्र आहे. त्यांत संविद्रूप (ज्ञानस्वरूप) सच्चिदानंद आहे. हीं जीं चक्रें व त्यांचीं दलें ह्मणून सांगितलीं त्यांत चक्रें ह्मणजे सुषुम्नेबरोबर संबद्ध झालेले एका प्रकारचे शिराग्रंथी, यांनांच पद्में ह्मणतात. व या ग्रंथींचे जे सूक्ष्म शिरातंतू त्यांला दल असें ह्मणतात यांत स्थिति झाली असतां विशेष ज्ञान होतें. त्या योगानें जरी एक रंग एका पद्मांत प्रधान दिसला असला तथापि सूक्ष्म रीतीनें पाहिलें असतां असें प्रत्यक्ष होतें कीं, प्रत्येक दल भिन्न भिन्न रंगाचें आहे. त्या पांकळ्यांच्या द्वारानें मनोवृत्ति भिन्नभिन्न प्रकारची होते; तिचें सुद्धां अवलोकन करावें. उदाहरणार्थ अनाहतचक्र हें मनःस्थान आहे. त्यांत याप्रमाणें पांकळ्यांचा रंग व त्यांपासून उत्पन्न झालेल्या मनाच्या भावना होतात, त्या साधकानें एकाग्रचित्त होऊन ओळखाव्या.

**पांकळींचें अनुसंधान—मनश्चक्राचें कोष्टक.**

| पांकळीचा देश. | रंग. | पांकळीच्या द्वारानें उत्पन्न होणाऱ्या वृत्ती. |
|---|---|---|
| पूर्व | पांढरा | धैर्य, औदार्य, धर्मबुद्धि, यशोलाभ. |
| आग्नेय | रक्त | प्रमाद, आलस्य, निद्रा. |
| दक्षिण | काळा | द्वेष, क्रोध, दुष्टबुद्धि. |
| नैर्ऋत्य | निळा | संसारासक्ति, स्त्रीपुत्रादिकांत अत्यंत प्रेम. |
| पश्चिम | धूम्रवर्ण | अज्ञानानंद, हास्य, विनोद. |
| वायव्य | श्याम | चिंता, उद्वेग. |
| उत्तर | पिंवळा | भोगादिकांत प्रीति. |
| ईशान | गौर | कृपा, क्षमा, शांति, ज्ञान. |

हें जीव व ईश्वर यांची उपलब्धि होण्याचें विशेष स्थान आहे, जसें राजाचें सिंहासन. ह्मणून या आध्यात्मिक तीर्थावर देवतांचा साक्षात्कार करण्याकरितां योगी प्रवृत्त होतात. आणि अंतर्लीलेचा देखावा पाहून स्वानंदांत मग्न होऊन शरीररूप जी देणगी परमेश्वरानें दिली आहे तिची खरी योग्यता समजून पुढें ज्ञाननौकेनें ते तरून जातात.

ही धारणा सतत करण्याचें कठीण आहे. 'तरवारीच्या धारेवर चालणें बरें, परंतु विक्षिप्त-चित्त पुरुषाला धारणेची स्थिति करणें परम दुर्घट आहे;' असें महाभारतमोक्षपर्वांत सांगितलें आहे. त्याकरितां सावध होऊन धैर्य धरून विषयांपासून निवृत्त झालेल्या चित्ताची धारणा त्या त्या देशावर करून आणि उत्साह राखून त्याचा निग्रह क्रमाक्रमानें करीत जावा. मांडूक्योपनिषदाच्या कारिकेंत ह्मटलें आहे कीं, 'जसें एकेक बिंदूनें समुद्राचेंही शोषण झालें तसें भेद केल्यावांचून मनाचा निग्रह करावा.'

येथें अशी एक कथा आहे कीं, 'एक टिट्टिभ (टिटवी) पक्षी आपल्या स्त्रीबरोबर समुद्रतीराजवळ निवास करीत होता. ज्या वेळेस त्याची स्त्री गर्भिणी झाली त्यावेळेस तिनें आपल्या स्वामीस सांगितलें कीं,' हे स्वामी! आतां माझी प्रसूत होण्याची वेळ जवळ आली आहे करितां एक निवाऱ्याचें, कोरडें स्थल पाहिलें पाहिजे. प्रसूत होण्यास समुद्रकिनारा बरोबर नाहीं.' याप्रमाणें तो टिट्टिभपक्षी आपल्या स्त्रीचें बोलणें ऐकून ह्मणाला कीं, 'हे प्रिये! कशाकरितां भय बाळगितेस ? येथें अंडीं घालण्यास कांहीं हरकत नाहीं. समुद्राची अशी काय शक्ति आहे कीं, तो अपराधावांचून आपलीं अंडीं बुडवील?' याप्रमाणें दृढ निश्चय करून त्यानें आपल्या स्त्रीचें सुद्धां कांहीं ऐकिलें नाहीं. पुढें त्या टिटवीनें अंडीं घातलीं. एकदां समुद्राला मोठी भरती येऊन लाटांच्या योगानें तीं सर्व अंडीं वाहून पाण्याच्या तळीं गेलीं. हें पाहून टिट्टिभपक्ष्याला मोठा राग आला, आणि त्यानें समुद्राला शोषून टाकण्याची प्रतिज्ञा केली. पुढें एकच निश्चय ठेवून आपल्या चोंचीनें एकेक बिंदु समुद्रांतून घेऊन तो बाहेर टाकूं लागला. याप्रमाणें कितीएक दिवस लोटून गेले. पुढें त्याला अत्यंत दुःखी पाहून त्याची स्त्री व इष्टमित्र त्याला उपदेश करूं लागले कीं, 'मूर्खा ! कोणीकडे लक्षावधी योजन विस्तृत समुद्र; आणि कोणीकडे तूं एवढासा पक्षी ? हा वेडेपणा सर्व सोडून दे.' इत्यादि पुष्कळ शिकविलें परंतु जेव्हां तो टिट्टिभपक्षी आपल्या निश्चयापासून ढळला नाहीं, उलट त्यानें सर्वांची समजूत करून त्यांनाही आपल्या पक्षास वळवून घेतलें. याप्रमाणें सकुटुंब समुद्र शोषण करण्याकरितां पहिल्यापेक्षां अधिक उत्साहानें तो प्रवृत्त झाला. असेही कितीएक दिवस लोटले. पुढें भगवान् नारदमुनि दैवयोगानें फिरतां फिरतां सहज त्या ठिकाणीं आले. आणि त्या पक्ष्याचा तो व्यापार पाहून त्याला त्या असाध्य कार्यापासून निवृत्त करण्याकरितां त्या मोठ्या दयाळू मुनीनीं पुष्कळ उपदेश केला. परंतु

आपल्या प्रतिज्ञेपासून बिलकूल तो ढळला नाहीं; असें पाहून नारदास अतिशय दया येऊन त्याचें दुःख निवारण करण्याकरितां ते वैकुंठास गेले; आणि गरुडास ह्मणाले कीं, 'हे समर्था! तूं सर्व पक्ष्यांचा राजा आहेस. ह्यावेळीं मृत्युलोकांत समुद्रानें तुझ्या सजातीय पक्ष्याचा मोठा अपमान केला आहे, तर तूं समज कीं 'माझाच अपमान केला;' कारण, प्रजांला गुण दोष तें राजालाच असें समजावें. ह्मणून तुला त्याचें रक्षण करणें अवश्य आहे.' याप्रमाणें ऐकून गरुडानें त्या ठिकाणीं जाऊन आपल्या सामर्थ्यानें अगस्त्यमुनीप्रमाणें समुद्र शोषण करण्याला आरंभ केला. त्यामुळें समुद्रानें गरुडाला शरण येऊन त्या टिट्टिभपक्ष्याचीं अंडीं परत आणून दिलीं.' या प्रमाणें हळू हळू अभ्यासानें चित्ताचा निरोध करावा. लौकिक सर्व व्यवहार सोडून देऊन दृढ प्रतिज्ञेनें आणि उत्साहानें जर पुरुष निरंतर प्रवृत्त होईल तर निश्चयबलानें ईश्वर त्याला साहाय्य केल्यावांचून कधींही राहणार नाहीं. याकरितां साधक पुरुषानें श्रद्धा व वीर्य (उत्साह) कधींही सोडूं नये. असेंच भगवद्गीतेंत श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें आहे, 'अर्जुना! धारणेच्या देशाचा परित्याग करून जेथें जेथें हें चंचल मन जाईल तेथून तेथून त्याला निग्रहानें वळवून आणून आपल्या ठिकाणीं स्थिर करावें.'

ब्रह्मनिष्ठ अभ्यासी याचें मन ज्या ज्या पदार्थांत जातें; त्या त्या पदार्थांत त्याला सत्ता, स्फूर्ति आणि प्रियतारूप एक ब्रह्मच दिसतें. त्याला दुसऱ्या सर्व नामरूपांच्या वृत्ती मिथ्या वाटतात. याकरितां या मिथ्या वस्तूंत आत्म्याच्या स्वरूपाचें अनुसंधान करणें, याचें नांव धारणा होय. याचप्रमाणें पूर्वीं सांगितलेल्या षट्चक्रांत जी मनाची धारणा करणें याला सुद्धां धारणाच ह्मणतात. आतां ब्रह्मनिष्ठ राजयोगाचा अभ्यास करणाऱ्यानें ब्रह्माची धारणा कोणत्या रीतीनें करावी तें मांडूक्योपनिषदांत सांगितलें आहे; त्याचा भावार्थ असा कीं,— ब्रह्म निरंतर आपल्या स्वतांच्या प्रकाशानें प्रकाशून राहिलें आहे. तें सूर्य इत्यादिकांला प्रकाशित करितें. तें सूक्ष्माहून अति सूक्ष्म आहे. तसेंच तें पृथ्वी इत्यादिक स्थूल वस्तूंपेक्षां सुद्धां अतिस्थूलरूप भासतें. त्याचें चैतन्य सर्वांत व्यापून राहिलें आहे; ह्मणून तें सर्वांचें आश्रयरूप अक्षर अथवा अविनाशी ब्रह्म असें ह्मणवितें. तेंच प्राणाचा प्राण आहे, त्याचप्रमाणें तें वाणी आणि मन यांचें सुद्धां आधारभूत आहे. ह्मणजे प्राण इत्यादि सर्वांच्या मध्यें जें विद्यमान (हल्लीं असणारें) चैतन्य आहे तें चैतन्य त्यांचा आश्रय झाल्यामुळें प्राण, इंद्रियें इत्यादिक सर्व संघात त्याचा आश्रय करून असतात.' याप्रमाणें दुसऱ्या आणीक श्रुतींवरून समजतें. दुसरें त्यांनीं प्राण इत्यादिकांच्या मध्यें चैतन्यरूप अक्षर आहे असेंही सांगितलें आहे. तें खरें आहे ह्मणूनच अविनाशी अथवा अमृतरूप आहे. दुसरें तें आपल्या मनानें वेध करण्याला योग्य आहे; ह्मणजे त्यामध्यें मनाचें समाधान होऊं शकतें. आतां याचें वेधन कसें करावें तें मुंडकोपनिषदांत सांगितलें आहे. त्याचा भावार्थ

असा कीं,—'उपनिषदांत वर्णन केलेलें जें प्रसिद्ध ओंकाररूप धनुष्य त्या धनुष्यावर निरंतर ध्यानानें संस्कारयुक्त होऊन आत्मरूप बाणाचें संधान करावें; ह्मणजे चित्तानें इंद्रियांसहित अंतःकरणाला आपल्या विषयांपासून निवृत्त करवून लक्ष्यांत आणण्याकरितां धनुष्याचें आकर्षण करून सांगितलेल्या लक्षणयुक्त अक्षररूप लक्ष्याचें वेधन करावें. ह्मणजे ब्रह्माचे ठिकाणीं चित्ताला एकाग्र करावें.' याचें तात्पर्य असें कीं, जसें धनुष्यांत बाणाचा प्रवेश होण्याला कारण लक्ष्य आहे, त्याप्रमाणें आत्मरूप बाणाचा अक्षररूप लक्ष्यांत प्रवेश होण्याला कारण ओंकार आहे. ज्याप्रमाणें अभ्यास केलेल्या धनुष्यानें संस्कारयुक्त झालेला अथवा त्या धनुष्याच्या आश्रयाला पावलेला बाण लक्ष्यांत स्थिर होतो, त्याप्रमाणें अभ्यास केलेल्या ओंकाररूपानें संस्कारयुक्त झालेला अथवा त्या ओंकाररूप आश्रयाला पावलेला जो अभ्यासी तो त्या आत्म्याच्या प्रतिबिंबविषयांत स्थित होतो. ह्मणून ओंकार धनुष्य आणि आत्मा बाण असें मानिलें. म्हणजे उपाधिसंयुक्त आत्मा पाण्यांत पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबाप्रमाणें स्थूलदेहांत बुद्धीच्या वृत्तींचा साक्षी होऊन प्रवेशपणाला प्राप्त होतो ह्मणून त्याला बाणरूप ह्मटलें आहे. त्याचप्रमाणें विषयांच्या प्राप्तीकरितां तृष्णारूप प्रमादानें रहित, सर्वांपासून विरक्त आणि जितेंद्रिय असें व एकाग्रचित्तानें वेधण्याला योग्य जें ब्रह्म तें लक्ष्यरूप आहे; ह्मणून त्याला वेधल्यानंतर बाणाप्रमाणें त्याच्याच रूपांत हा आत्मा ऐक्यास पावतो. जसें बाणाच्या संधानानें ऐक्यमय फल प्राप्त होतें, त्याचप्रमाणें देहादिक अनात्माकार वृत्तींच्या तिरस्कारानें तो अक्षराबरोबर ऐक्याचें फल संपादन करितो.

आतां आत्म्याचा भास कशा रीतीचा आहे त्याचा थोडा विचार करूं. ज्याप्रमाणें घरांत दिवा असतो, आणि त्याचे अनंत किरण प्रकाशताहेत असें दिसतें, त्याप्रमाणें स्थूल देहांत ओंकाररूप आत्मा दीपक आहे, आणि त्याचे किरण 'सोऽहं' आहे. त्यानें पंचप्राण अंतःकरणपंचक, देहचतुष्टय आणि सर्व इंद्रियें वगैरे उत्पन्न केलीं आहेत. त्यामुळें प्रथम मन, पुढें इंद्रियें, त्यानंतर सर्व प्राणवायू यांना क्रमानेंच स्वाधीन केल्यानें हृदयाकाशांत जी दीपकाची ज्योति आहे, तिच्या मध्यें सोऽहंशब्द ओळखण्यांत येतो. नंतर त्याच्या पुढें वृत्ति स्थिर ठेविल्यानें ह्या सोऽहं ओंकाररूप आत्म्याकडे सर्व वृत्तींचें आकर्षण होऊं लागतें. आणि जसें जसें आकर्षण अधिक होऊं लागतें, तसा तसा ओंकाराचा प्राप्तिकाल जवळ येऊं लागतो. पुढें त्यामुळें शेवटीं चित्त संपूर्ण एकाग्रतेला पावतें. याचेंच नांव निदिध्यास असें सांगितलें आहे. एका श्रुतींत याविषयीं असें सांगितलें आहे कीं, वर सांगितलेल्या कृतीप्रमाणें संशयरहित शब्दांच्या अर्थात् स्थापन केलेल्या वृत्तीच्या एकाग्रतेला निदिध्यास ह्मणतात, अर्थात् या निदिध्यासानें सोहं चिदात्मानंद तो ध्यान करणारा पुरुष होतो. कारण हा ओंकाराच्या संवेदनानें प्रकट होतो, ह्मणून तो आत्म्यामध्यें ऐक्यभावानें स्थिर राहतो, आणि

याच्याच चलितपणानें देहचतुष्टय, चार वाचा, चार अवस्था इत्यादि सहवर्तमान शरीररूप पिंजरा तयार केला आहे. आणि त्यामध्यें गुप्तपणानें आपल्या सूक्ष्म शून्यरूप ज्योतीनें तो स्वतः प्रकाशून राहिला आहे. तसें झाल्यानें ह्या बाहेरच्या ब्रह्मांडांतील अनंत शब्द आणि आकार धारण झालेले दिसतात. त्या योगानें सर्व विश्वाचा व्यवहार शब्दरूपानें चालत आहे-सा दिसतो ह्मणून याला नादब्रह्म म्हणतात. ह्मणूनच या पंचभूतांत जितके आकार आहेत, तीं सर्व शब्दाचींच रूपें आहेत. या ठिकाणीं स्थूल भोगांचा भोक्ता स्वतः जीवात्मा जाणला जातो. याचें तात्पर्य इतकेंच कीं, स्थूल, तैजस आणि प्राज्ञ या तीन प्रकारच्या भोगांस ओंकाररूपी दीपक आपल्या किरणांच्या प्रसरणानें प्राप्त करवितो. असेंच मांडूक्योपनिषदांत सांगितलें आहे. त्याचा भावार्थ असा कीं, 'विश्व' ह्मणजे जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ति अशा तीन प्रकारच्या स्थिती असल्यामुळें त्या तीन प्रकारच्या भोगांला तो प्रकट करितो. तसेंच 'नित्यस्थूलभुक्' ह्मणजे स्थूल भोगांचा भोक्ता तो ह्मटला जातो. याच रीतीनें 'प्रविविक्तभुक्' ह्मणजे वासनामय सूक्ष्म भोगांचा भोक्ता झालेला तो दिसतो. आणि 'प्राज्ञ-आनंदभुक्' ह्मणजे आनंदाचा भोक्ताही तोच स्वतः जाणवितो. याप्रमाणें तीन प्रकारच्या भोगांचा जाणणारा तो आहे.

अशा प्रकारच्या भोगांच्या प्राप्तीनें मनुष्यप्राण्यांचें मन जगत्पटलाला सत्य मानतें, आणि अपरिमित तृष्णायुक्त पुरुष सोहंरूपाला भुलून जाऊन तो या बाहेरच्या आणि आंतील चित्रविचित्र रचनांचा अनुभव घेण्याकरितां निरंतर निमग्न राहतो. इंद्रियांच्या विषयांमुळें स्वाभाविक देहाच्या आणि सर्व ब्रह्मांडांच्या अनंत आकृती भिन्नरूपानें आहेत असा निश्चय झाल्यानें आपली स्वतांची कल्पना अनेक तर्कवितर्कांच्या आकृतींत उत्पन्न झाल्यानें, ओंकाराचें ज्ञान अदृश्य होतें. त्यामुळें कल्पनांच्या संयोगानें आपलें मन इंद्रियांच्या द्वारानें शब्दानें व्यवहार चालवावयास लागलें, आणि ओंकार स्वतः गुप्तरीतीनें हृदयाकाशाच्या मध्यांत अखंड ज्योतिरूप अशा ब्रह्मस्वरूपानें व्यापून राहिला. या ज्योतीस आपलें बहिर्मुख मन आपली अंतर्दृष्टि न केल्यामुळें भुलून गेलें, त्यामुळें शब्दाचे अनेक अर्थ वृत्तिभावानें प्रकट झाल्यामुळें जगदाकृति सत्य वाटली, ह्मणून त्याला विषय ज्ञानापेक्षां प्रिय लागले. त्यामुळें आपलें स्थूलभावी मन 'मी जीव आहें, मी पापी आहें, मी अल्पज्ञ आहें, मी अज्ञानी आहें,' असें स्वतांच आपल्याला समजूं लागलें; त्यामुळें देहाभिमानी होऊन उपद्रव पीडा देऊं लागल्यामुळें दुःखी झालें. त्यांत कितीएक संस्कारी भोळे भक्त आणि अल्पज्ञानी या विश्वरूप उपाधीमध्यें सत्यस्वरूपाचा शोध करूं लागले, परंतु मन, बुद्धि आणि तर्क यांच्या मार्गानें शब्दजाल रचून अनेक प्रकारच्या शास्त्र, पुराण, नीति आणि भक्ति वगैरे क्रियांच्या ग्रंथांची रचना कल्पनांच्या योगानें प्रकट झाली, आणि त्यामुळें कितीएक सद्-

त्यांना कांहीं निर्मलता झाली; परंतु त्यानें केवळ सत्यज्ञान प्राप्त होऊन सच्चिदानंदाच्य प्राप्तीचें साधन मिळालें नाहीं; तर मन भ्रमांत पडूं लागलें; त्यामुळें भ्रांतीची वृद्धि होउ लागली. मूळचा सत्यमार्ग मिळाला नाहीं, त्या वेळेस कितीएक भाविक जन स्वत अज्ञानरूपांत राहून अनेक गुरूंच्या द्वारानें तें सत्य ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करूं लागले परंतु सर्व गुरु इंद्रियरूप उपाधीच्या विषयांत आसक्त झाल्यामुळें अथवा त्यांच्या संकुचित ज्ञानामुळें स्वर्ग, नरक इत्यादिकांच्या ज्ञानास दाखवूं लागले; त्यामुळें उन्नति पावलेल्य उत्तम संस्कारी जनांला तशा गुरूंपासून संपूर्ण संतोष झाला नाहीं. ह्मणून तशा निश्चयी पुरुषांला योगात्म्यांच्या सत्यज्ञानाचा योग मिळाल्यानें असें ज्ञान प्राप्त झालें आहे कीं. आपला आत्माच सर्वशक्तिमान् ईश्वर आहे, परंतु मायावी विषयांच्या जाळ्यानें ती शक्ति गुप्त राहिली आहे; ह्मणून या जालापासून विरक्त होऊन आपण आपला शोध केला पाहिजे कीं, आपल्या शरीरांत अशी अद्भुत वस्तु कोणती राहिली आहे ? अशा प्रश्नाचा शोध एकांतांत निवास करणाऱ्या महात्म्याच्या समागमानें असा समजला कीं, 'देहरूपी वृक्षावर प्रथम ईश्वर आणि जीव असे दोघे पक्षी वास करून राहिले आहेत. त्यांत एक पक्षी आपल्याला जीवरूप मानून कर्मफळाच्या सुखदुःखमय अनेक प्रकारच्या वेदनांचा अनुभव घेत स्वादरूप फळाला अविवेकानें भोगीत आहे. आणि ईश्वररूपी पक्ष्याला त्याचा भोग नाहीं, तर तो वृक्षापासून वेगळा राहून केवळ त्याला पहात आहे, त्यामुळें त्याला समजतें कीं, पंचज्ञानेंद्रियांच्या संयोगानें हें मिथ्यारूप विश्व दिसत आहे. याचा सारांश इतकाच कीं, इंद्रियें जर नसतील तर या सृष्टीचे पदार्थ समजणार नाहींत, ह्मणून विश्व आपलीं इंद्रियें आहेत. अशा ज्ञानानें इंद्रियें बंद करून ह्मणजे त्यांचा निग्रह करून पूर्वी सांगितल्याप्रमाणें सर्व वृत्तींची एकाग्रता करून कुंभक केल्यानें महा अलौकिक अद्भुत ईश्वरी ज्ञानाची स्फूर्ति पूर्णाभ्यासानें आपोआप होऊं लागते. वर सांगितल्याप्रमाणें मनाचा लय करून कुंभक केल्यानें प्राणाचा लय होतो. तसें झाल्यानें गुप्तविद्येच्या अभ्यासी पुरुषाला कसा लाभ होतो तो याप्रमाणें सांगितला आहे. 'पूर्वी सांगितल्याप्रमाणें विधीनें प्राणवायु स्थिर होऊन त्याची ब्रह्मरंध्रांत ज्या वेळेस स्थिति होते त्या वेळेस प्राणाचा लय झाला असें ह्मणतात; आणि प्राणाचा लय झाला ह्मणजे जरा, व्याधि आणि मृत्यु वगैरे जिंकून त्या त्या योग्याचीं आळस आणि मूर्च्छा वगैरे नाश पावतात. आणि त्यामुळें सर्व इंद्रियांची धारणा आंतील हृदयाकाशयुक्त तेजोमय स्वरूपांत चालू होऊन ह्मणजे बाहिर्मुख सृष्टि दिसण्याचें बंद होऊन, अखंड आनंदांत आणि सुखांत राहिलेल्या त्या योग्याला अनुभव येतो. परंतु तशा रीतीनें झाल्यानें पूर्वीच्या ध्यानाच्या धारणेनें दृष्टि प्रथम ज्योतिरूप न दिसतां अंधकारासारखी कांहीं वस्तु दिसते; आणि त्यामध्यें

पाण्याच्या लाटांप्रमाणें सूक्ष्म असंख्य शून्यरूप चैतन्यरजःकण परस्पर वर खालीं होताहेतसे दिसतात, तेच ओंकाररूप आत्म्याचे सोहंरूप चिदणु आहेत; परंतु तें मोकळें झाल्यानें देहाची आकृति आणि आंतील भ्रांति प्रकट होऊन येतात. या भ्रांतीची परीक्षा निश्चयात्मक बुद्धिज्ञानाच्या दृढतेनें ओळखली जाते. ती अशी,–उन्मनी अथवा तुर्यावस्थेची प्राप्ति होण्याकरितां शीघ्रतेनें भ्रुकुटींत ध्यान करून 'मी आपण स्वतः आत्मा स्थिर आहें' असा दृढ निश्चय झाल्यानें राजयोगाच्या पदाच्या प्राप्तीच्या सुखाचा उपाय अल्पबुद्धिमानाला सुद्धां प्राप्त होतो; आणि तो या नादाच्या प्रतीतींत तुर्यावस्थाचित्ताचा लय करवितो. याचा सारांश इतकाच आहे कीं, तुर्यगामी मनाच्या ज्ञानयुक्त निश्चयानें हृदयाकाशांत परीक्षा केल्यानें ओंकाररूप सोहं स्वरूपाकडे आपल्या निश्चययुक्त बुद्धीच्या अनेक वृत्ती मंदगतीनें चलन करूं लागतात, त्यामुळें त्यांचा आकार तसेंच ज्ञान पालटत जातात; तें याप्रमाणें.– स्थावरजंगमसहित जें दृश्य जगत् तें ज्ञेयरूप आहे. त्याचा परित्याग केल्यानें आपलें मन सच्चिदानंदरूप आत्माकार होतें; अथवा मनाचा संपूर्ण लय झाल्यानें केवळ एक अद्वितीय शेष राहतो; अर्थात् मन, बुद्धि वगैरेंच्या अनंत वृत्ती ज्या वेळेस चैतन्यरूप ओंकारांत. मिळून जातात, त्या वेळेस त्याचा प्रवाह निश्चल दिव्याप्रमाणें स्थिरपणामध्यें स्तब्ध होतो; याचें नांव संयम असें ह्मणतात. अशा संयमप्राप्तीच्या वेळीं सर्व कृती कल्पित भासतात. जशी स्वप्नांत आपण पाहिलेली वस्तु सर्व मिथ्या मानिली जाते, त्याप्रमाणें ध्याननिष्ठ पुरुषानें जाग्रत् अवस्थेंतील सुद्धां सर्व वस्तु कल्पित आणि मिथ्या मानिल्या असतात. कारण, हें सर्व आत्म्याच्या अविद्येनें कल्पित चित्तांत प्रथम कल्पितपणानें रचिलें आहे; आणि त्यांत दृश्यरूप वर्तमान पदार्थ मनन केल्यानें कल्पनांमध्यें आंत चित्ताला ते पदार्थ दिसूं लागतात, त्यामुळें तें पुढें बुद्धिभेदाला पावतें. सारांश इतकाच कीं, ज्याचें चित्त बाहेर आहे असा पुरुष बाहेरच्या वस्तूंची कल्पना करितो; आणि ज्याचें चित्त आंत आहे असा ज्ञानी पुरुष सर्व मनोरथरूप कल्पित व्यवहारांला असत्य मानितो. याचें तात्पर्य हेंच कीं, संयमांत सर्व वृत्ती पूर्ण ज्ञान प्रकट करितात; कारण, ब्रह्माविषयीं वाणी आणि मन वगैरेंचा विषय संभवत नाहीं, ह्मणून वाणी आणि मन हीं सर्व मनोमन व्यवहारसहित ब्रह्मांत निवृत्त होतात. कारण, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय हे चार कोश त्याचप्रमाणें अकार, उकार आणि मकार ह्या तीन मात्रा निवृत्तरूप ब्रह्मांत राहतात, कशावरून कीं, हें सर्व ओंकाररूप ब्रह्मापासून उत्पन्न झालेलें आहे, त्याकरितां हें सर्व शेवटीं त्याच्याच मध्यें लीन होतें. आणि असें झाल्यानेंच संपूर्ण प्रकाशित आत्मानंदाची प्राप्ति होते.

**तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् ॥ २ ॥**

ज्या एका वस्तूवर चित्ताची धारणा केली असेल तेथेंच त्याची एकतानता होऊन ह्मणजे लय लागून जाऊन अर्थात् एकाग्रता होऊन तें दुसरीकडे न जाऊं देणें, ह्यास ध्यान असें ह्मणतात.

---

## ध्यान ( हें योगाचें सप्तमांग होय. )

**सू० २ टीपः-१**

ध्यानसमयीं ज्यावेळीं योग्याचें कुंडलीचक्र गुदा अथवा मूलाधारचक्रावर येतें त्यावेळेस पुरुष मुक्त झाला असें ह्मणतात. अशा वेळीं हृदयरूप गुंफेंत जो सोहंरूपी आत्मा आहे, तो पंच प्राणांच्या असंख्य नाड्यांच्या आकारांत मिश्र होऊन स्तंभाकार भासल्यामुळें, त्यानें स्तंभरूपी सोहमाच्या आकृतींनीं विराट् स्वरूप धारण केलें आहे असें वाटतें. त्यामुळें त्याविषयीं सर्पाकार कुंडलीचा देखावा आपल्या वासनानिर्मित स्वर्ग, मृत्यु आणि पाताल इत्यादिकांच्या देखाव्यांत प्रकट होतो. हें सविकल्पसमाधीचें प्रथमचें चिह्न आहे. या स्थानीं ज्या वेळीं संयमरूप चित्तवृत्ती शांतपणांत स्थिर होऊं लागतात; त्या वेळीं त्या योग्याचा श्वास आठ बोटांपर्यंत राहिला असें समजावें. आतां सविकल्प आणि निर्विकल्प स्थितीविषयीं थोडा विचार सांगतों,—नाम, जाति आणि पदार्थ वगैरेंच्या भासाला विकल्प ह्मणतात, ह्मणून जेथपर्यंत त्यांबरोबर व्यवहार ठेवण्यांत येतो तेथपर्यंत सविकल्पसमाधि मानिला जातो या सविकल्पसमाधीमध्यें हृदयरूप ब्रह्मांत चित्तवृत्ति स्थिर होते, त्यामुळें नाम, जाति वगैरे अवस्तुरूप दृश्याचें मिथ्यापण स्वाभाविक रीतीनें समजण्यांत येतें. परंतु यांत निर्विकल्पाचें स्थल त्या अभ्यासी पुरुषाला समजण्यांत येत नाहीं त्यामुळें तें आहे कीं नाहीं याचा निश्चय होत नाहीं. त्यामुळें अभ्यास करणाराच्या त्या चित्ताच्या अनेक वृत्तींत अनेक भावना प्रकट झाल्यानें त्या चित्ताच्या अनेक वृत्ती सोहमानें दाखविलेल्या निराकृतींत ऐक्यानें मिळूं लागतात; त्यामुळें त्याचें शरीर कोण्या प्रसंगीं महाब्रह्मांडाएवढें दिसूं लागतें, आणि त्याच्या वर सांगितलेल्या चित्ताच्या अनेक वृत्तींनीं या विश्वाच्या आकृती धारण केल्या आहेत असें वाटतें. त्यांत त्याचें मन, बुद्धि, चित्त, तर्क, अहंकार आणि ज्ञान वगैरे कल्पनांच्या शाखा दृढ झालेल्या वासनांप्रमाणें आदर्शाकृति ( आरशाप्रमाणें ) दिसूं लागतात; आणि तेथें कुंडली व चक्रें प्राणिमात्राविषयीं चित्ताच्या अनेक वृत्तींमध्यें वासनापूर्वक पाहण्यांत येतात; आणि आपण जसे जसे कर्मांचे जे जे संकल्प शरीरद्वारें जशा दृढ भावनांनीं पूर्वी केले असतील ते सर्व कोणत्या प्रकारचीं सुखदुःखें देतील तें मनोमनज्ञानानें स्पष्ट समजतें. आणि तशा स्थितींत चंद्रामृतधारेचें पान केल्यानें ते योगी जरा ( ह्मातारपण ), व्याधि वगैरे कांहीं एक नड न येतां दीर्घायुषी होतात. असा चमत्कार

श्वास जेव्हां सात बोटांवर येऊन पोहोंचतो त्या वेळेस होऊं लागतो. या रीतीनें सर्पाकार कुंडली उलट झाल्यामुळें सोहंरूप विराट् आकृति धारण करितो. त्यांत आकाश आणि अग्नि हीं दोन तत्त्वें शरीरांत खालच्या भागांत येतात; आणि पृथ्वी, जल व वायु हीं तीन तत्त्वें कंठचक्राकडे जाऊं लागतात. त्यांत तो सोहं कुंडलीबरोबर एकरूप होऊन स्तंभाकारांत सर्व प्राणवायूंला सरळ करवितो; त्यामुळें चित्ताच्या अनेक वृत्ती या बाह्य ब्रह्मांडाच्या कल्पना करितांना बंद पडतात. ह्मणून मनोमनज्ञानांत या सृष्टिसंबंधीं कल्पना आंत प्रकट झाल्यानें अनेक देश आणि रचना वगैरे अद्भुत आकारानें त्या भासूं लागतात. ह्या सर्व प्राणवायूच्या दृढतेच्या अनुसार चित्तकला अशा आकारांत स्फुरलेली दिसते.

ज्या समयीं कुंडलीच्या बरोबर सोहं आणि प्राणवायु हे एकरूप होऊन मेरुदंडावर चढून जाण्याची तयारी करितात त्या वेळीं कंठाच्या स्वप्न नांवाच्या नाडीबरोबर पूर्वीं सांगितलेल्या प्राणवायूच्या बाहत्तर हजार नाड्या आणि सर्व शरीराचे साडे तीन कोटी लोम ( केश ) यांविषयीं स्थूल आकाराच्या वर सांगितलेल्या बाहत्तर हजार नाड्या सोहमाच्या प्रकाशित स्वरूपाला यथार्थ आकृतींत सुषुम्नेच्या योगानें प्रकट करितात. ती सुषुम्नाशक्ति सूर्यचंद्रांच्या ऐक्यसंबंधानें रहित होऊन स्वतः ध्यानद्वारें चैतन्यरूप आत्म्याचा साक्षात्कार करविते, त्यामुळें ह्या सर्व नाड्या पंचभूतांच्या सूक्ष्म किरणांच्या आकारांत चहूंकडे व्याप्त झालेल्या दिसतात, आणि त्या कुंडलीचक्राच्या आसपास काळा, लाल, निळा, पिंवळा आणि पांढरा वगैरे वर्ण एकत्र होऊन चक्राकार फिरताहेतसे दिसतात. आणि त्यांत सोहंरूपी आत्मा, पंचप्राण व कुंडली हीं ऐक्यानें मिळून जातात. त्या समयीं श्वासाची गति बंद पडून झोंपीं गेल्याप्रमाणें तो योगी दिसतो. अशा दिसणाऱ्या स्थितीस जीवन्मुक्ति ह्मणतात. या स्थितींत अंतःकरण स्वस्थ आनंदांत असतें, आणि जाग्रत् अवस्थेंत निद्रातुल्य असतां एकाग्रवृत्तीचा प्रवाह जाग्रतासारखा भासतो; तरी पण त्या समयीं श्वासोच्छ्वासाची गति बंद पडलेली दिसते. याला जीवन्मुक्ति म्हणतात. अशा वेळीं ओंकाररूप आत्म्याच्या अभ्यासाविषयीं सोहं आणि कुंडली, हे दोघे व्यापून जातात, तसें झाल्यानें एकाग्रचित्ताच्या शांतियुक्त अनेक चित्तकला अथवा वृत्ती सोहंरूपाच्या मूळांत जशी भावना उत्पन्न करील, त्याप्रमाणें कल्पना प्रकट होतात. त्यामुळें सोहमांतील प्राणवायूविषयीं दृढ झालेल्या वासनांत चित्ताच्या अनेक वृत्ती भावनेच्या अनुसार प्रवेश करितात. त्यामुळें सर्व वृत्ती देवी, देवता, ऋषि, तपस्वी आणि साधुसंत यांचे आकार धारण करून सोहंरूपी आत्म्याला दाखवितात; एवढेंच नाहीं तर, ते सर्व देव, मूर्ति सोहंरूपी आत्म्याला अनेक प्रकारचे मंत्र, विद्या आणि क्रिया वगैरेंची सूचना सुद्धां करितात. आणि त्यांच्या ज्ञानानें देहद्वारें या सृष्टीच्या

सर्व स्वरूपांच्या कृति समजतात. असला देखावा आपल्या ज्ञानाच्या दृढतेनें प्राप्त होतो. अशा प्रकारचा यथार्थ संपूर्ण अनुभव मोठ्या निश्चयी महापुरुषाला येतो. त्याला दृष्टांत सद्ग्रंथांतु पुष्कळ आहेत. अशा स्थितींमध्यें वर्तमान, भूत आणि भविष्य वगैरे काळांचे सगळे नियम समजतात. याच देखाव्याला योगशास्त्रांत संयमप्राप्ति ह्मटलें आहे. याच संयमप्राप्तीच्या योगानें महात्मे आणि तत्त्वदर्शी सत्य, त्रेता, द्वापर आणि कलि वगैरे युगांचें भविष्य कथन करून गेले आहेत. अशी स्थिति झाल्यानंतर पुढें आपले सर्व प्राण-वायू अदृश्य झालेले दिसतात, आणि कुंडली तसेंच सोहं ओंकाररूप आत्मा हे ऐक्य धारण करितात. त्यामुळें आपल्या स्थूल देहाचें भान रहात नाहीं ह्मणून याला निर्विकल्प-समाधि म्हणतात. त्यांत या प्रसंगीं आपली वासनायुक्त कुंडली पंचप्राणांच्या सर्व नाड्यां-मध्यें सजीवनरूपानें राहिली आहे. त्यामुळें जर सोहंरूपी आत्म्यांत थोडी जरी कल्पना प्रकट होईल तर त्या योग्याचे सर्व प्राण पुनः मेरुदंडाच्या मार्गानें शरीराच्या सर्व चक्रांत नियमित रीतीनें आपापल्या स्थानांत स्थित होऊन जातात. त्या योगानें त्या समाधिनिष्ठ पुरुषाचा देह आणि त्याचीं सर्व इंद्रियें पूर्वीप्रमाणें जाग्रत् स्थितींत पुनः प्राप्त होऊन सृष्टिव्यवहार करितात. अशा प्रकारचे चमत्कार श्वास पांच बोटांपर्यंत राहिल्यानें दिसतात. त्याकरितां जे एकांतवासी पूर्ण योगेश्वर आहेत, ते आपल्या प्राणांला पुष्कळ कालपर्यंत संयमांत ठेवून निर्विकल्पसमाधींत राहतात. याप्रमाणें मनाला जिंकिल्यानें मन आणि वृत्ति हीं दोन्ही शून्य होतात, ह्मणजे ते योगी मुक्याप्रमाणें राहतात. याचा सारांश इतकाच कीं, स्फूर्तीचा प्रतिबंध केल्यानें मात्र एकच साक्षी आत्मा राहतो; आणि याचेंच नांव 'तुरीयावस्थासंयमाभास' असें या विद्येच्या ज्ञात्यांनीं सांगितलें आहे. त्यामुळें यामध्यें सर्व प्राण, सोहं आणि कुंडली हे सर्व एकरूप होऊन ओंकाररूप आत्म्यांत मिळून जातात. हा देखावा आपला सोहंरूपी आत्मा भ्रुकुटीचक्रांत व्यापून गेल्यानें पांहण्यांत येऊं लागतो. याप्रमाणें तुरीयरूपी संयमाभासांत ओंकाररूप आत्मा लीन होतो. तसें झाल्यानंतर सोहमाबरोबर व्याप्त झालेली कुंडली आणि प्राणांच्या असंख्य नाड्या भिन्न भिन्न तंतूंप्रमाणें अथवा सूर्याच्या अति सूक्ष्म किरणांसारख्या ज्यांचें माप होऊं शकत नाहीं अशा अमर्याद अनेक रूपांनीं दिसतात. त्यांच्यावर सोहंरूपी आत्म्याची दृष्टि पडल्यानें त्या ज्ञानदृष्टीनें भिन्न भिन्न सूचना देतात. त्यांत कुंडलीरूपी वासनिकचक्र आपल्या स्वरूपांत ऐक्यरूपानें मिळून गेल्यानें जी आपली वासना प्रकट होते, त्या वासनेहून कुंडली भिन्न नाहीं; ह्मणून जशी वासना तशीच सृष्टि आपोआप प्रकट होते. या चैतन्य-प्रकाशरूपी किरणावर आपण ज्या वेळेस स्थिरता राखून लक्ष ठेवितों, त्या वेळेस आपली चलन होणारी स्फूर्ति मनोमन अंतर्यामी भावनायुक्त ज्ञानाविषयीं प्रथम दृढ केलेल्या

संकल्पाप्रमाणें या जगच्चक्रांत व्यवहार करून दाखविते, अथवा त्या सर्व प्राणिमात्राच्या निश्चित केलेल्या संकल्पाप्रमाणें आपला संकल्प उत्पन्न होतो. यावरून अनुभवी ज्ञानी असें सांगतात कीं, या विश्वाच्या दृश्य आणि अदृश्य सर्व वस्तु आपल्या दृढ झालेल्या संकल्पांत राहिलेल्या सत्त्व, रज आणि तम या गुणांच्या दृढतायुक्त निश्चयार्थांत मिळून जाऊन आपल्या संकल्पाच्या भावनेबरोबर एकत्र एकपणानें लीन होतात, त्यावरून सर्व कृती आपल्या दृढ झालेल्या संकल्पाच्या आहेत. अशा प्रकारच्या महा अद्भुत स्वयंज्ञानानें आकाश, अग्नि, जल, वायु आणि पृथ्वी इत्यादि तत्त्वांच्या बंधारणानें पशु, पक्षी, कीट आणि मनुष्यादिक चराचर विश्वांतील प्राणिमात्राची उत्पत्ति कशा रीतीनें होते तें जाणूं शकतो, एवढेंच नाहीं तर त्यांचें भक्ष्य, पान, वाणी आणि संकल्पविकल्प वगैरे त्यांच्या अंतःकरणांत राहिलेल्या सर्व क्रियांना आपला संकल्प यथार्थ स्वयंज्ञानानें जाणून त्यांच्या सर्व व्यवहाराला मुद्धां दाखवितो. याचें कारण असें आहे कीं, आपल्या ओंकाररूप आत्म्याच्या अनंत प्रकाशरूपी किरणांच्या मूळांत अंतर्यामीरूपानें ती ज्योति व्यापून गेल्यामुळें जसा आपला संकल्प आणि जशी आपली इच्छा असेल, तशा किरणरूपी अनंत चैतन्याचे तंतू सर्वत्र आपल्या भावनेप्रमाणें चलित होऊं शकतात. त्यामुळें आपल्या मनोमनज्ञानानें जशा रूपांत आपण त्या तंतूंना हालवावें तशा भावांत ते व्यापून त्या प्राण्याजवळ तशाच प्रकारची कृति करितात. अथवा ते त्या प्राण्याचें मन आपल्या भावाप्रमाणें कृति करितेंसें आपणाला भासवितात. याला गुप्तकृति ह्मणतात.

या गुप्तकृतींत जसें या सृष्टींत कार्य व्हावयाचें असेल त्या प्रकारचे संकल्प आणि भाव गुप्तकृतीस जाणणाराला प्रकट होऊन येतात, त्यामुळें तो महा समर्थ योगेश्वर प्रत्येक मनुष्याचें संचित, क्रियमाण आणि प्रारब्ध यांविषयीं खरा निश्चय करूं शकतो. अथवा तो महापुरुष हृदयांत जसा निश्चितार्थ दृढ करील त्याप्रमाणेंच कार्य झालें पाहिजे. याचें तात्पर्य इतकेंच आहे कीं, ओंकाररूप आत्म्याचा जो आभास अथवा छाया आहे ती जी अविद्या दृश्यरूपानें राहिली आहे, तिचीं सर्व मूलतत्त्वें समजण्यांत येतात. याच ज्ञानानें गुप्तविद्या, ज्योतिषविद्या, रमलविद्या, प्रारब्ध, संचित आणि क्रियमाण तसेंच अगम्यवस्तू, शकुनापशकुन, यांच्या भविष्यदर्शनाचा शोध प्रथम समर्थ योगात्म्यांनीं केलेला आहे. अशा ज्ञानाचा संपूर्ण अनुभव, ज्या वेळेस श्वास चार बोटांच्या अंतरांत येतो त्या वेळेस प्रत्यक्ष होतो. त्यामुळें याचें नांव योगांत उपरति सांगितलें आहे. उपरतिशब्दाचा अर्थ योगविद्येच्या ग्रंथांत असा आहे कीं, सविकल्प आणि निर्विकल्प समाधीच्या अभ्यासानें प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा आणि स्मृति अशा पांच वृत्तींचा निरोध होतो, त्यालाच उपरति ह्मणतात. इचा अभ्यास करणाऱ्या पुरुषाच्या हृदयाची

वासना नष्ट होते, त्या वेळेस ही उपरति मोठें अलौकिक ऐश्वर्य देते. चित्ताच्या सर्व वृत्तींचा निरोध झाल्यानें विस्मरण होतें. हा तत्वबोध प्रधानरूप आहे; कारण हा वैराग्य आणि उपरति या दोहोंला उपकारी साधन असल्यामुळें साक्षात् मोक्षाला प्राप्त करवितो. असें आहे ह्मणून हठाभ्यासी पुरुष हठानें उपरति आणि वैराग्य संपादन करितात. हें सर्व खरें, परंतु जेथपर्यंत पूर्ण ज्ञान प्राप्त झालें नाहीं तेथपर्यंत मोक्षाची प्राप्ति होत नाहीं.

आतां गुप्तविद्येच्या पूर्ण ज्ञानाला अंतर्दृष्टीनें जे चमत्कार दिसतात ते सांगतों,– मघग्नीप्रमाणें जर विस्मृति होऊन जाईल, तर त्या ध्याननिष्ठाच्या उपरतीची सीमा आहे. अशा स्थितींत स्वयंबुद्धीच्या प्रकाशानें सत्य आत्मज्ञानाचा निश्चय होतो. अशा स्थितींत सोहं आणि ओंकार हे दोन एकाग्रवृत्तींत स्थिर राहतात. त्यामुळें ओंकाररूप आत्म्याच्या ज्योतीचे असंख्य किरणरूप तंतू आपल्या स्वरूपांत परस्पर एकत्र होऊन चक्राप्रमाणें फिरूं लागतात, आणि हे सर्व तंतू पुढें महान् तेजोमय गोल आकृतीनें प्रकाशित होतात. यावेळीं या स्वरूपाच्या मध्यभागांत अदृश्यरूपानें जी अविद्या अथवा ईश्वरी माया मूळ गुप्तसंकल्परूपानें राहिलेली आहे, तिच्या मध्यभागांत अनंतकोटी ब्रह्मांडांची उत्पत्ति, स्थिति आणि लय होताहेतसे दिसतात; त्यांत असंख्य ब्रह्मदेव, रुद्र आणि देवी, देवता वगैरे तसेच असंख्य सूर्य, चंद्र आणि नक्षत्रें वगैरेंची मुद्धां उत्पत्ति, स्थिति आणि लय होताहेतसें भासतें. त्यांत जेव्हां ओंकाररूपी आत्म्याचा भाव ज्या संबंधानें अणूंवर होतो, त्या वेळेस ते अणू तसे भावरूपी संकल्प, ज्ञान आणि अनंतकोटी ब्रह्मांडें उत्पन्न करून दाखवितात. पुढें ज्या वेळेस त्या भावना नष्ट होतात तेव्हां वर दर्शविलेल्या अनंत ब्रह्मांडें वगैरेंचा लय झालेला भासतो. अशा प्रकारच्या ध्यानाच्या अभ्यासानें सर्व प्राण्यांबरोबर आपल्या हृदयगत मनोमन ज्ञानानें, आपल्या निश्चितार्थाप्रमाणें सर्व व्यवहार चाललेले दिसतात. यावरून तत्त्वज्ञान प्रकट करूं शकतो. अशा प्रकारचे चमत्कार, आपला श्वास ज्या वेळेस तीन बोटांच्या अंतरांत येतो त्या वेळेस प्रत्यक्ष दिसतात. तसें झाल्यानंतर त्यांतून निवृत्त होऊन शेवटीं संपूर्ण द्वैतभावयुक्त मन आणि अविद्या यांचा लय होतो. याचा स्पष्टार्थ असा कीं, संपूर्ण ज्ञानयुक्त ज्ञेयरूपानें ज्ञातारूप आत्म्याची प्रतीति होते. त्यांत आपल्या मनास ज्ञेय ह्मणतात; ह्मणून या मनरूपी ज्ञेयाचा लय झाल्यानें द्वैतरूप प्रपंचाचा लय ज्ञातारूप आत्म्यांत होऊन जातो. याचा सारांश हा आहे कीं, अशा ध्यानाच्या स्थितींत ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान; ध्याता, ध्येय आणि ध्यान; कर्ता, कार्य आणि करण; द्रष्टा, दृश्य आणि दर्शन याप्रमाणें सर्व त्रिपुटींचा भाव राहत नाहीं; तर ह्या सर्व त्रिपुटी ऐक्यरूपानें ओंकार आत्म्याविषयीं अखंडित प्रवाहाच्या स्थिर धारेप्रमाणें प्रकाश करितात. याळाही संयमस्थितिच ह्मणतात; कारण, या स्थानीं सोहंरूपी

आत्मा, कुंडलीरूपी वासना आणि सर्व प्राण हे एकाच ओंकाररूप आत्म्याच्या प्रकाशित तेजोमय किरणांत ऐक्यानें लीन होऊन गेलेले असतात; त्यामुळें देह आणि जगत् यांचा भाव राहतच नाहीं. त्यामुळें ओंकाररूप आत्म्याच्या अविद्येच्या संकल्पानें उत्पन्न झालेल्या अनंत वृत्ती ओंकाराच्या तेजोमय स्वरूपांत लीन झालेल्या दिसतात; आणि आपलें चित्त नष्ट झालेलें भासतें. याप्रमाणें सर्व वृत्ती सर्व तऱ्हेनें लीन झाल्यानें ओंकाररूप दिव्यलक्षणयुक्त पुरुषाची अथवा शुद्ध चैतन्याची प्राप्ति होते. ती अशी,–जशा गंगादि नद्या ज्यावेळीं गतिमान् होऊन समुद्रांत मिळतात, त्या समयीं त्या जशा नाम, रूप वगैरे आकृतीचा त्याग करून, समुद्रामध्यें अस्तपणाला धारण करितात, तसें पूर्ण ज्ञानानें योगी अविकृत नामरूपांपासून सुटून मुक्त होऊन पूर्वीं सांगितलेल्या अक्षयरूप व पराहून पर अशा दिव्यलक्षणयुक्त चैतन्यरूप पुरुषाप्रत प्राप्त होतो. अशा स्थितीच्या वेळीं ओंकाररूप आत्म्याच्या अविद्येच्या अणूंचा तेजोमय सूर्यासारखा प्रकाशित एक गोळा बनतो. या गोळ्याच्या किरणांचें जें तेज आहे तें या सृष्टींत राहिलेल्या सर्व स्थावर, जंगम, जड, चैतन्याकृतींमध्यें विद्युद्रूपानें राहिलें आहे. ती मूळ विद्युत् ओंकाररूप आत्म्याची ज्योति आहे, आणि तींत जे वर अणू आहेत, ते आत्मज्योतीचा एक किरण आहे. हा किरण आत्म्यामध्यें लीन झाल्यानें तो आत्म्यासारखाच दिसूं लागतो, त्यामुळें आत्मा आणि त्याचा किरण हे दोन निराळे नाहींत, तर एकरूप आहेत; कारण, वर सांगितलेल्या विजेच्या योगानें या सृष्टींत जे जे फेरफार होतात ते सर्व या अणुरूप सूर्यमय आत्म्यानें होतात. याप्रमाणें वर सांगितलेली विद्युत् सर्व अनंतकोटी ब्रह्मांडांचें आकर्षण करिते. त्याचप्रमाणें सर्व प्राणिमात्राला ती जीवंत ठेवून सर्वांविषयीं अनेक प्रकारचे संकल्प आणि विचार यांनीं दृढता करविते. दुसरें, जन्मजन्मांतराला प्राप्त करणारी सुद्धां कल्पनेमध्यें राहिलेली अशी या आत्म्याची ज्योतिमय गुप्त विद्युतच आहे. या सिद्धांताशीं कांहीं अंशीं मिळणारा हल्लींच्या पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा सिद्धांत आहे. तो सिद्धांत असा आहे कीं,–' प्रथम तेजोमय सूर्याच्या किरणांच्या उष्णतेनें सर्व सृष्टि प्रकट झाली.' याविषयीं आपले योगेश्वर विशेष इतकाच सांगतात कीं, उष्णरूपी सूक्ष्म विद्युत्मध्यें एक प्रकाशतत्त्वाहून सुद्धां अति सूक्ष्म वस्तु राहिली आहे. ती वस्तु आणि आपला संकल्प हे दोन्ही ऐक्यरूपानें व्यापून राहिले आहेत, त्यामुळें योगात्म्याला सर्व सृष्टीचें ज्ञान होऊं शकतें. या सत्य सिद्धांतावरून गुप्त विद्येच्या ज्ञात्यांनीं असें सांगितलें आहे कीं, आत्मरूप सूर्याच्या तेजाचें ज्या प्रकारचें झळकणें होतें, त्याप्रमाणें अणु आत्मरूप सूर्याची अमुक संकल्पयुक्त दृढता व्यापून जाते, त्यामुळें त्या दृढ संकल्पाच्या अमुक भावाचें चलनवलन होऊं लागतें. असें झालें ह्मणजे तो भावच तेजो-

मय प्रकाशानें प्रकाशित होतो. पुढें त्या भावाची छाया सर्व ब्रह्मांडांत व्यापून अनंत आकारानें सर्व शक्तींमध्यें कर्मानुसार वांटली जाते. या झालेल्या वांटणीप्रमाणें दुसरे भिन्न भिन्न संकल्प तो भाव उत्पन्न करितो, आणि त्याला अनुसरून सर्व कृती होऊं लागतात. अशा वेळीं ध्याननिष्ठ योगी स्वतः आकाशाहून सुद्धां सूक्ष्म अशा आकृतीला पोहोंचला असें वाटतें. सारांश हा कीं, आपली भावरूपी विद्युत् सर्व प्राणिमात्राच्या भावयुक्त विद्युत्मध्यें व्यापक होऊन आपल्या भावाप्रमाणें कर्म करविते. अथवा दुसऱ्याची भावयुक्त विद्युत् त्या योग्याच्या भावामध्यें व्यापक होऊन त्याच्या कर्माचें ज्ञान त्या योग्याला होतें. यावरून हल्लींच्या पश्चिमदेशांत राहणाऱ्या ( युरोपियन ) तार्किकज्ञान्यांप्रमाणें असें समजूंनये कीं, पंचतत्त्वांपासून उत्पन्न झालेली विद्युत् जी या जगाचा व्यवहार चालविते ती आपल्या आत्म्याचा चैतन्ययुक्त भाव आहे; कारण, त्या विद्युत्पेक्षां भावाची गति अति मोठी आहे. त्याशिवाय ही स्थूल विद्युत् ज्या स्थानावर जाऊं शकत नाहीं त्या ठिकाणीं भाव जाऊं शकतो; आणि हा भाव दुसऱ्याच्या संकल्पांत व्यापून जाऊन जगाच्या क्रिया, विचार वगैरेंना पालटून टाकितो. तें याप्रमाणें कीं, कोणी महात्मा योगेश्वर आपल्या प्रबल इच्छाशक्तीनें सत्ययुग होण्याचा संकल्प करील तर तत्काल तो भाव सत्ययुगाचीं धर्म, नीति, ज्ञान आणि प्रजा वगैरे झालेलीं दाखवून, ज्यांत सर्व प्रजा सत्यवादी, ज्ञानी आणि परमसुखी आहेत, असें त्या वेळचें जगत् हल्लींच्या जगतापेक्षां भिन्न रूपांतच भासवितो. याच्या सत्यतेविषयींचा दृढ निश्चय साधारण मनुष्यांस सर्व देशच्या मतपंथांच्या मूळ पुरुषांच्या कृती यथार्थ जाणल्यानें होऊं शकतो. या सर्वांचा सारांश इतकाच कीं, स्थूल विद्युत् जगताच्या सर्व जड पदार्थांचा व्यवहार चालविते. आतां दृढ झालेली भावना प्राण्यांच्या हृदयांत व्यापून कल्पनांचा व्यवहार चालविते, तसा व्यवहार स्थूल विद्युतेला चालवितां येत नाहीं; कारण, ती सूक्ष्म असून स्वाभाविक जड आहे, आणि दृढ झालेली भावना स्वभावानें चैतन्यरूप आहे; ह्मणून ही आत्म्याबरोबर ऐक्य दाखविते. तें इतकें कीं, 'मी निराकार आहें' याप्रकारची दृढ कल्पना इच्छाशक्तीनें झाली ह्मणजे आपली सर्व कल्पना आणि तिचे संकल्प निराकारपणाच्या आकृतींत व्यापून गेलेले आपणाला समजतात. त्याचप्रमाणें 'मी स्थिर पूर्ण ब्रह्म आहें' अशा प्रकारची दृढ कल्पना इच्छाशक्तीनें झाली ह्मणजे आपली वासना आणि आपले निश्चितार्थ स्थिरपणास पोहोंचून जातात. त्यामुळें अत्यंत सूक्ष्म आत्म्याचें आपणाला सत्य ज्ञान प्राप्त होतें. तात्पर्य इतकेंच कीं, जसा भाव, जशी भक्ति, जशी वासना, जसे निश्चितार्थ, जशी दृढता आणि जशी प्रबळ इच्छाशक्ति त्या प्रकारानें लाभ, अलाभ, सुख, दुःख, यश, अपयश आणि कीर्ति वगैरे सर्व ऐश्वर्य आपोआप चिंतिल्यावांचून आपल्याला प्राप्त होऊन

जातें. याच कारणावरून प्रथम उत्पन्न होणाऱ्या संकल्पाला प्रारब्धरूप अथवा इच्छाशक्ति असें सच्छास्त्रांत ह्मटलें आहे; कारण कीं, सर्व जन्म प्राप्त करविणारा मूळ संकल्प 'आणि मनच आहे; ह्मणून ज्ञानी पुरुषांनीं प्रारब्धाला मुख्य मानिलें आहे. संकल्पाच्या निश्चयार्थाचें नांवच प्रारब्धाचें मूळ आहे. ह्या निश्चयार्थ अणुरूप आत्म्याचें तेजोमय, चलितरूप, भावरूप चैतन्य अति सूक्ष्म आणि गुप्तविद्याद्वारें आपले सर्व संकल्प उत्पन्न करितें, आणि त्या उत्पन्न केलेल्या संकल्पांची सूचना ही भावरूप गुप्त विद्युत् आपल्या मन, बुद्धिरूप तत्त्वांना देते, या योगानें आत्म्याचा तेजोमय प्रकाशित स्वरूपाचा गोळा आपल्या प्रबल इच्छाशक्तीनें दृढ झालेल्या संकल्पाप्रमाणें या सृष्टीच्या सर्व प्राणिमात्रामध्यें व्यवहार करीत आहेसें वाटतें; अथवा या प्रकाशित आत्म्याच्या गोळ्याला आपआपल्या प्रबल केलेल्या इच्छाशक्तीनें दृढ वासनांच्या योगानें आपल्या संकल्पाच्या अनुसार आपल्या इच्छेप्रमाणें दुसऱ्या प्राण्यामध्यें प्रवेश करितां येतो; त्यामुळें आपला प्राण दुसऱ्या अनेक शरीरांमध्यें प्रवेश करूं शकतो; आणि यालाच परकायप्रवेश ह्मणतात. याच रीतीनें समर्थ शंकराचार्यांनीं एका राजाच्या शरीरांत आपल्या सर्व चैतन्य प्राणांसुद्धां प्रवेश केला होता. या रीतीनें तेजोमय आत्मरूप सूर्याचा असा प्रकाशित गोळा आपल्या दृढ संकल्पाप्रमाणें ज्या वेळेस चालतोसा वाटतो, त्या वेळेस आपला श्वास दोन बोटांच्या अवकाशांत चालतो असें समजावें, याला गुप्त विद्येचे ज्ञानी धर्ममेघ असें ह्मणतात.

या धर्ममेघाला कितीएक महात्मे समाधि ह्मणतात; कारण, समाधीच्या स्थितीप्रमाणें यांत ज्ञानरूप धर्माच्या अनंत अमृतमय धारा वर्षतात, अर्थात् गुप्त ज्ञानाच्या अनेक स्फूर्ती प्रकट होतात. समाधीविषयीं एका श्रुतींत असें सांगितलें आहे कीं, ' ज्या वेळेस ध्याता ह्मणजे ध्यान करणारा व ध्यान, ह्यांचा क्रम सुटून निवात प्रदेशांतील स्थिर दिव्याप्रमाणें केवळ ध्येयच स्थिर राहतें, त्या वेळेस त्याला समाधीची स्थिति ह्मणतात. यांत ध्येयरूप आत्म्याचे जे अनंत ज्योतिरूप किरण ते अमृताच्या धारेसारखे भासतात. अशा स्थितीमध्यें त्या समाधिनिष्ठ योग्याला आपल्या देहाचें भान राहत नाहीं, तर केवल आपला एक शुभ संकल्परूप भावच त्या समयीं सर्व सृष्टींत अनंत रूपांत भ्रमण करितो; ह्मणून या भावरूप शरीराला योगवासिष्ठांत अंतवाहक शरीर असें ह्मटलें आहे. दुसरें याला तुर्यावस्था असें सुद्धां ह्मणतात. या तुर्यावस्थेंत प्रकाशित होणाऱ्या आत्म्याचें स्वरूप याप्रमाणें सांगितलें आहे. ' प्राज्ञ, तैजस आणि विश्व इत्यादिकांपासून निवृत्त असल्यामुळें ईशान ह्मणजे नियामक, अव्यय व प्रभु असा आत्मा आहे. ' याला अव्यय ह्मणण्याचें कारण असें कीं, यांत सर्व विश्वादिक भाव मिथ्या होऊन जाऊन एक मात्र अद्वैत राहतें. या प्रकाशमान अद्वैताला देव, तुर्य, विभु इत्यादिक ह्मटलें याचा सारांश असा कीं,

ओंकाररूप आत्म्यामध्यें तुर्यमय अणु, आपले प्रकाशित झालेले असंख्य किरण व चित्ताच्या सर्व कला वगैरेंना आकर्षण करून व संकल्पाच्या सर्व भावनांस नष्ट करून ऐक्यरूपानें ज्योतीमध्यें मिळून जातो. त्या समयीं फक्त प्रथमच्या गुप्तसंकल्परूप भावाचा भास मात्र राहतो. बाकी कोणाचाही भास राहत नाहीं; तो असा कीं, साधारण जगांतील कितीएक मनुष्यें त्यांत उत्तम मानसिक ज्ञानवान् मुद्धां आणि कितीएक वैद्य मुद्धां त्या समाधिनिष्ठाला मरण पावला असें समजतात; कारण, त्या समयीं त्याचें श्वाससहित सर्व चैतन्य एकरूपानें आत्म्यामध्यें व्यापून जातें; त्यामुळें त्याचा देह दुसऱ्याला काष्ठाप्रमाणें भासतो. अशा स्थितीच्या वेळीं योग्याचा श्वास एक बोटाच्या अंतरांत राहिलेला असतो. अशा समयीं आपल्या संकल्पाचे सर्व भाव अनेक वृत्तींमध्यें ऐक्यरूपानें एकत्र होऊन जातात, त्यामुळें संकल्परूपानें अति सूक्ष्म अंतवाहक शरीर इच्छा मात्र अशा अनंतकोटी ब्रह्मांडांच्या स्थानांत गमन करूं शकतें. इतकेंच नाहीं तर तेथें अनेक क्रिया करून त्या केलेल्या क्रियांची यथार्थ जाणण्याची शक्ति मुद्धां पुष्कळ प्रसंगीं त्या समाधिनिष्ठ योग्याच्या संकल्पाला येते. पुढें त्या वेळीं अखंड ज्योति तेजोमय प्रकाशानें स्थिरता पावते, त्या वेळेस महदाकाशस्वरूपाचा भास पडतो. या भासांत असंख्य संकल्प अगणित ब्रह्मांडांची उत्पत्ति, स्थिति आणि लय करिताहेतसें वाटतें. त्या वेळीं अणुरूप आत्मा ओंकाररूप आत्म्यामध्यें पूर्णपणानें एकत्र होऊन जातो, त्यामुळें तो समाधिनिष्ठ योगी स्वतः शुद्ध आकाशाप्रमाणें निर्विकार भावांत अखंडदंडायमान ( येथून तितकें एक अशा ) महदाकृतियुक्त आकाशाच्या पोकळींत अविभाज्यपणाच्या लक्षणानें ( ऐक्यानें ) पंचभूतयुक्त विद्युतेचा कर्ता अति सूक्ष्म आकारानें सर्वत्र व्यापक होऊन स्वतः आपल्या मूळ स्वरूपांत स्थिर झालेला समजतो. असा मोठा आदर्श निराकारस्वरूपांत पूर्णानंदानें उदकाच्या लाटांप्रमाणें मिळून जातो. या स्थितीला अनुभवी ज्ञानी भूमास्थिति ह्मणतात. या स्थानांत मात्र गुप्त बुद्धीनें जगताचा द्वैतरूप भास उत्थानसमयीं वाटण्यांत येतो; ह्मणजे पुष्कळ वेळीं त्या योग्याला महदाकाशांत अंतवाहकरूप द्वैत सृष्टि दिसते. त्याकरितां उत्थान (समाधिभंग) न होतां जर बुद्धि शांति पावलेलीच राहील, तर अंतवाहकरूप द्वैत सृष्टि दिसणार नाहीं. यावरून स्पष्ट सिद्ध होतें कीं, द्वैतमय जगद्रूप दाखविणारी चंचलता पावलेली बुद्धिच होय.

याप्रमाणें केवळ शांति पावलेल्या बुद्धीच्या पुरुषास परमपदरूपी अविनाशी स्थिति प्राप्त होते, ती स्थिति जाणणारा प्रकाश आणि अंधकारकर्ता भिन्न प्रकारचे होतात. यांत ओंकाररूप आत्म्याचे चारही पाद त्या अभ्यासी योग्याला यथार्थ रीतीनें ओळखतां येतात; त्यामुळें तो योगी ओंकाररूप आत्म्याला संपूर्ण रीतीनें जाणतो,

त्यामुळें तो दृश्य अथवा अदृश्यरूपानें कोणत्याही पदार्थाचा विचार करीत नाहीं; कारण, अशा पूर्ण आनंदमय स्थितींत राहिलेल्या योग्याला कोणत्याही प्रकारचें भय नसतें. अशा समाधिनिष्ठ योग्याच्या स्वप्नावस्थेची स्थिति कशी असते ती सांगतों,– ' ओंकाररूप अद्वितीय ब्रह्माच्या स्थितींत जीव, ईश्वर इत्यादि चेतन, अचेतनरूप जें जगत् तें स्वप्नमात्र आहे. ' अर्थात् अविभाज्य ओंकाररूप अद्वितीय स्वरूपांत जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति, तुर्या आणि भूमा ह्या पांच अवस्था आणि त्यांचे सर्व देखावे स्वप्नाप्रमाणेंच गुप्त राहिले असतात. या ओंकाराला यथार्थ जाणणारा मात्र परम उत्तम योगेश्वर अथवा मुनि आहे असें मांडूक्योपनिषदांत सांगितलें आहे.

चक्रांचा अभ्यास झाला आणि त्यांचा पक्का अनुभव आला ह्मणजे मग त्या त्या धारण केलेल्या प्रदेशांत राहिलेल्या देवतांचें ध्यान करावें. हें ध्यान चार प्रकारचें आहे. ते प्रकार असे,– आधिभौतिक ध्यान शालग्राम इत्यादिकांचें, आधिदैविक सूर्य इत्यादिकांचें, आध्यात्मिक चक्रचिंतन करणें, आणि चवथें निराकार असें नादानुसंधान होय.

याचप्रमाणें ध्यान सगुण आणि निर्गुण या दोन भेदांनीं दोन प्रकारचें आहे; त्यांत सगुण ध्यान पांच प्रकारचें आहे. श्रीविष्णुध्यान, अग्निध्यान, सूर्यध्यान, भ्रूध्यान आणि पुरुषध्यान. या सर्वांचें लक्षण याज्ञवल्क्यसंहितेंत याप्रमाणें सांगितलें आहे,–

**श्रीविष्णुध्यानः**– जें कंदस्थानापासून निघालें आहे, ज्याचा बारा अंगुलें लांबीचा नाल ( देंठ ) आहे, ज्यास आठ पांकळ्या आहेत, आणि ज्याच्या मुखाचा चार अंगुलें विस्तार आहे, असें मणिपूरकचक्र आहे. त्याला प्राणायामानें ऊर्ध्वमुख करून व त्याची केशरयुक्त कर्णिका ( कमलकलिका ) प्रफुल्लित करून तिच्यांत जगताचें उत्पत्तिस्थान, जन्मरहित, व्यापक, चतुर्भुज, शंख, चक्र, गदा आणि पद्म हीं आयुधें ज्यानें चार हातांत धारण केलीं आहेत, किरीट, बाहुभूषणें इत्यादि भूषणांनीं भूषित, नीलकमलाप्रमाणें ज्याची शरीरकांति, प्रसन्नता व मंदहास्य यांनीं युक्त आणि पूर्णचंद्राप्रमाणें आह्लाददायक आहे मुखकमल ज्याचें, आणि शुद्धस्फटिकाप्रमाणें ज्याची प्रभा, पिंवळा पीतांबर ज्यानें परिधान केला आहे; कमलाप्रमाणें कोमल आहेत चरण ज्याचे; व त्याच कमलाच्या पांकळ्या ज्याच्या भोंवतीं व्याप्त झाल्या आहेत असा भगवान् लक्ष्मीपति पुरुषोत्तम आहे. तेथें एकाग्रचित्त होऊन ' तो मी आत्मा ' असें अभेदचिंतन करावें. याला सगुण विष्णुध्यान ह्मणतात.

**अग्निध्यानः**–प्रकृतिरूप आहे कर्णिका ज्याची, अणिमादिक आहेत पांकळ्या ज्याच्या, सोळा विकार हेच आहेत केसर ज्याचे, ज्ञानरूप आहे नाल ज्याचा, महत्तत्त्वरूप आहे कंद ज्याचा, प्राणायामानें विकसित आहे मुख ज्याचें, अशा हृदयकमलांत

अनेक किरणांनीं व्याप्त, ह्मणूनच भोंवतालीं ज्याचा प्रकाश फांकला आहे, जगद्योनि, जें शिखांचें बीज, ज्याचें पादतलापासून मस्तकापर्यंत सर्व शरीर तप्त होऊन राहिलें आहे, आणि निर्वात देशामध्यें असणाऱ्या दिव्याप्रमाणें निश्चल आहे शिखा ( ज्वाला ) ज्याची असा जो वैश्वानरनामक महाग्नि त्याच्या शिखांच्या मध्यें, जशी नीलमेघामध्यें विद्युद्रेखा असते त्याप्रमाणें विराजमान अशा अक्षरपरमात्म्याला पाहून नीवारशूकाप्रमाणें ( गव्हांच्या ओंब्यांस बारीक व लांब कांट्यासारखीं कुसळें असतात त्यांप्रमाणें ) आहे सूक्ष्म रूप ज्याचें अशा पीतवर्ण अग्नीस जाणून ' तो मीच आत्मा ' असें एकाग्रचित्तानें अभेदचिंतन करावें. याला अग्निध्यान ह्मणतात.

**सूर्यध्यानः**— पूर्वीं सांगितलेल्या हृदयकमलामध्यें सुवर्णमय आहेत श्मश्रु, केश आणि नखें ज्याचीं, पद्माचें आहे आसन ज्याचें, चार आहेत मुखें ज्यास, जो उत्पत्ति, रक्षण व संहार करणारा, जो सर्वलोकसाक्षी, आपल्या प्रभेनें सर्व जगताला प्रकाशित करणारा, प्रफुल्लित आहे कमलासन ज्याचें असा जो आत्मरूप भगवान् सूर्य त्यास पाहून त्या ठिकाणीं 'तो मीच आत्मा' असें एकाग्रचित्तानें अभेदचिंतन करावें.

**भ्रूध्यानः**—दोन्ही भ्रुकुटींच्या मध्यें देहाच्या मध्यभागापासून तें मस्तकापर्यंत स्थाणूप्रमाणें ( निश्चल ) स्थित असणारा, प्रकाशरूप, जगताचें कारण व अव्यक्त अशा आत्म्याला मनानें जाणून ' तो मी' असें एकाग्रचित्तानें अभेदचिंतन करावें. याला भ्रूध्यान ह्मणतात.

**पुरुषध्यानः**—पूर्वीं सांगितलेल्या विकसित हृदयकमलांत, सहस्रदलांनीं युक्त व अधोमुख ( पालथें ) जें दहाव्या द्वारांत कमल आहे, त्यांतून पडणाऱ्या अनेक अमृतधारांनीं भिजून गेलेला व सुधारसानें सिंचन करणाऱ्या चंद्रकिरणांनीं व्याप्त, तसेंच अमृताच्या सिंचनानें सर्वांगीं पुष्ट झालेला, तेजोमय असा जो भोक्ता पुरुष त्याचे ठिकाणीं 'तो मीच सच्चिदानंदपरब्रह्म आहें ' असें अभेदचिंतन करावें. याला पुरुषध्यान ह्मणतात. या रीतीनें ध्यानाचा अभ्यास करणारा योगी सहा महिन्यांत मृत्युंजय होतो, आणि वर्षामध्यें जीवन्मुक्त होतो.

याप्रमाणें सगुणध्यानाचा प्रकार सांगितला. आतां निर्गुणध्यानाचा एक प्रकार तेथेंच याप्रमाणें सांगितला आहे,—

**निर्गुणध्यान १ लें:**—' एक ज्योतिर्मय, शुद्ध, व्यापक, कूटस्थ, अनंत, अचल, नित्य, अनाकाश, असवर्ण, अरूप, अरस, अगंध, अप्रमेय, अनामय, आनंदस्वरूप, अजर, सदसत, सर्वकारण, सर्वाधार, जगद्रूप, अमूर्त, अज, अव्यय, अदृश्य, ज्ञान्यांनीं सर्वसंवेद्य, सर्वांच्या आंत आणि बाहेर स्थित, सर्वतोमुख, सर्वदृक्, सर्वठिकाणीं आहेत हस्त आणि

पाद ज्याला अशा विशेषणांनीं युक्त जें सच्चिदानंद परब्रह्म 'तें मी आहें' असें एकाग्रचित्तानें अभेदचिंतन करणें यास ब्रह्मवादी निर्गुणध्यान ह्मणतात.' ध्यानबिंदूपनिषदांत याप्रमाणें सांगितलें आहे, 'स्वदेहाला खालची अरणि करावी, व प्रणवाला उत्तर (वरची) अरणि करावी; आणि ध्यानरूप मंथनाच्या अभ्यासानें निगूढ परमात्म्याचा साक्षात्कार करून घ्यावा.'

**नि० ध्या० २ रें:**—जेथें कोणाचा उपद्रव नाहीं, अशा रिकाम्या जागेमध्यें किंवा पर्वताच्या गुहांमध्यें अथवा अरण्यामध्यें योगाभ्यास करणारानें नेहमीं योगतत्पर होऊन उत्तम रीतीनें ध्यान करण्यास आरंभ करावा. त्या वेळेस त्यानें अंतःकरणास स्वाधीन ठेवून सर्वसंगपरित्याग करावा; आहार कमी कमी करून इंद्रियांस जिंकावें; व बुद्धिपूर्वक नाक, तोंड इत्यादि सर्व द्वारें बंद करून मनास ध्यानाकडे गुंतवावें. त्या ध्यानांत त्यानें आपणास व सर्व जगतास, नित्य व अभिन्न असा जो ज्ञानस्वरूप भगवान् विष्णु तन्मय समजून ध्यान करावें, ह्मणजे योगी उत्तमगतीस प्राप्त होतो.

## लययोग.

**नि० ३ रें:**—अथवा योग्यांना या ठिकाणीं दुसऱ्याच प्रकारचें ध्यान सांगतों; कीं जें आजपर्यंत कोणालाही माहीत नसून मुक्ति प्राप्त होण्यास मुख्य साधन आहे. पहा! आपलें अंतःकरण वायूसारखें अगदीं चंचल असल्यामुळें त्याला एकठिकाणीं थांबवून ठेवणें मोठें कठीण आहे; ह्मणून तें प्रथम कलासहित (साकार व सगुण) वस्तूच्या ठिकाणीं स्थिर करावें ह्मणजे मग तें निर्गुण व निराकार अशा वस्तूच्या ठिकाणीं स्थिर होतें. प्रथम मूलाधाराचे ठिकाणीं जो दिव्याच्या ज्योतीप्रमाणें जीव आहे त्यास प्रणवानें विधिपूर्वक ओढून घेऊन दहाव्या द्वारांत (मस्तकांत) त्याचा प्रवेश करवावा. नंतर मूलाधारापासून निघून दहाव्या द्वारांत जाऊन पोहोंचलेला व आनंदस्वरूप अशा प्रणवाचा जप करावा. जसा ओंकार विधिपूर्वक उच्चारण केला असतां मस्तकास जाऊन पोहोंचतो; तसा योगी ओंकाररूप बनून परमात्म्याच्या ठिकाणीं निरंतर स्थिर राहतो. योगी याप्रमाणें नित्य करीत असतां ज्या वेळेस हंस, बिंदु, शिखा व ज्योति यांस अंतर्दृष्टीनें पाहतो; तेव्हां त्याला लय (लययोग) प्राप्त होतो. ब्रह्मद्वार ह्मणजे ब्रह्मरंध्राचे ठिकाणीं अतिशय सूक्ष्म, विकल्परहित, व्यापक व श्रेष्ठ अशा ज्योतिस्वरूप परमात्म्याला प्राप्त होऊन योगी तन्मय होऊन जातो. विकल्परहित असें स्थान प्राप्त होऊन व जीवाचा त्या ठिकाणीं लय होऊन त्या अंतर्यामी परमात्म्याच्या ठिकाणीं लय झाला असतां योग्याचीं सर्व शुभाशुभ कर्में नष्ट होतात. जसा झाडाच्या शेंड्यावर पक्षी एकाएकींच पाहण्यांत येतो, त्याप्रमाणें हृदयामध्यें असणारा भगवान् तत्काल प्रकट होतो. तो असा आहे कीं, जो पुढें, मागें, मध्यें, बाजूंस अर्थात् सर्व भागीं

विजांप्रमाणें चमकत आहे; कोट्यवधि सूर्यप्रमाणें ज्याची प्रभा पसरली आहे. याप्रमाणें त्या परमात्म्याचें दर्शन योग्याला झाल्यावर जसे स्त्री पुरुष दोघे रमत असतां रतिसमाप्तिस जो त्यांना क्षणभर आनंद होऊन 'मी कोण आहें' याचें भान त्यांस राहत नाहीं; त्याप्रमाणें कोणी योगी मोठें आश्चर्य वाटल्यासारखें कांहीं ऐकतच राहतो; कोणी चकितमुद्रेनें पाहतच राहतो; जरी कांहीं पाहतो, व ऐकतो तथापि त्या परमेश्वरास कोणी चांगल्या रीतीनें जाणत नाहीं. याकरितां गुरूच्या कृपेनें लक्ष्य ( स्वरूप ) समजून घेऊन तें साधण्याचा चांगला अभ्यास करावा. अभ्यासाच्या योगानें ज्ञानदृष्टि प्राप्त होऊन त्यायोगानें प्रभूचें दर्शन होतें. तें स्वरूप असें कीं, सर्व तेजस्वी पदार्थांपेक्षांही ज्याचें अधिक तेज, ज्या ठिकाणीं अंधकाराचा लवलेशही नाहीं, अनंतकोटि सूर्यप्रमाणें ज्याचा वर्ण, स्वच्छ व सुवर्णाप्रमाणें निष्कलंक, प्रकृतीहून भिन्न व केवल आनंदस्वरूप असा परमात्मा आपल्या हृदयाकाशांत आहे असें जो जाणतो तो मुक्तच असें समजावें.

'योगाच्या दुसऱ्या ग्रंथांत दुसरीं अनेक प्रकारचीं ध्यानें सांगितलीं आहेत, त्यांत हीं सगुण व निर्गुण ध्यानें उत्तम आहेत;' असें भगवान् याज्ञवल्क्यांनीं ह्मटलें आहे. 'या ध्यानांपासून चित्ताची शुद्धि होते; कारण, मनाच्या विक्षेपाला हेतु जे रजोगुण व तमोगुण त्यांचा समूळ नाश झाल्यामुळें सर्व पापें जळून जातात; आणि चित्त निर्मल होतें;' असें ध्यानबिंदूपनिषदांत सांगितलें आहे. याचेंच दृष्टांतपूर्वक स्पष्टीकरण विवेकचूडामणींत असें केलें आहे कीं, 'जसें सोनें क्षार इत्यादिकांच्या योगानें मल दूर होऊन पुनः पूर्ववत् उज्ज्वल होतें; त्याप्रमाणें ध्यानाच्या योगानें चित्त शुद्ध होऊन सत्वगुणाचा पराभव करणारें जें मलरूप रज व तम यांचा पराभव करून आपला स्वाभाविक जो शुद्ध सत्वगुण त्यांत स्थित होतें.' 'ध्यानांचा अभ्यास करणाराला चित्तशुद्धि झाल्यानंतर परमात्म्याचा साक्षात्कार होतो,' यावर विवेकचूडामणींत दृष्टांत सांगितला आहे कीं, 'ज्याप्रमाणें कोणीएक प्रकारचा किडा दुसरे सर्व व्यापार सोडून देऊन भ्रमराचेंच ध्यान करीत राहतो; तें ध्यान करितां करितां त्याला भ्रमराचें स्वरूप प्राप्त होतें; त्याप्रमाणें योगी परमात्म्याचें ध्यान करीत असतां ईश्वरसरूप होतो.'

याप्रमाणें ध्यान मोक्षाचें कारण आहे ह्मणून योग्याला वर सांगितल्याप्रमाणें ध्यान करणें अवश्य आहे; ह्मणूनच छांदोग्योपनिषदांत 'पृथ्वी, अंतरिक्ष, स्वर्ग, उदक, पर्वत, देवता व मनुष्य इत्यादि सर्व ध्यान करितात; ह्मणून त्यांना जें महत्त्व प्राप्त झालें आहे तें सर्व ध्यानाच्या फलाचा एक अंशमात्र आहे. त्याप्रमाणेंच जे अधम, कलहप्रिय, दुर्जन व निंदक आहेत, ते सर्व ध्यान न केल्यामुळेंच असे झाले आहेत. ह्मणून हे नारदा ! तूं ध्यानाची उपासना

कर;' असें सनत्कुमारांनीं नारदास सांगितलें आहे. भगवान् याज्ञवल्क्यांनींही ' ध्यान हें बंधमोक्षांला कारण आहे, ' असें सांगितलें आहे. ' कितीएक योगी ध्यानाची निर्विघ्नपणानें पूर्णावस्था व्हावी ह्मणून कुंडलीला जागी करून शून्यपदवीनें ( सुषुम्नामार्गानें ) प्राणाचा लय होण्याचा अभ्यास या अवस्थेंत विशेषेंकरून करण्यास सांगतात. त्याचा प्रकार असा आहे कीं, जसा सर्व पर्वतांसहित पृथ्वीला आधार शेष आहे; त्याप्रमाणें सर्व योगांगांना कुंडली आधार आहे. ही कुंडली निजलेली आहे, ती ज्या वेळेस गुरुकृपेनें जागी होते, त्या वेळेस सर्व चक्रें आणि ब्रह्मग्रंथि, विष्णुग्रंथि व रुद्रग्रंथि या सर्वांचा भेद होतो. त्या वेळेस सुषुम्ना ही प्राणाला राजमार्गाप्रमाणें होते ह्मणजे सुषुम्नेच्या वाटें ब्रह्मस्थानाकडे जाण्याला प्राणास कांही अडचण पडत नाहीं. त्या वेळेस चित्त स्थिर होऊन मृत्यूसही जिकण्यास समर्थ होतें. याकरितां जसें किल्लीनें कुलूप निघून दार सहज उघडलें जातें, त्याप्रमाणें हठयोगाचा अभ्यास करून कुंडलीनें मोक्षाचें द्वार जें अडवून धरलें आहे तें मोकळें करावें. ब्रह्मस्थानास जाण्याचा तो मार्ग आहे तेथें तोंडाशींच् कुंडली मुख पसरून निजली आहे.' असें हठयोगप्रदीपिका वगैरे ग्रंथांत सांगितलें आहे.

जिला शून्यपदवी, ब्रह्मरंध्र, महापथ, श्मशान, शांभवी, मध्यमार्ग वगैरे अनेक संज्ञा आहेत, अशी सुषुम्नानाडी कंदाच्या मध्यभागीं राहिलेली आहे. ती पाठीमागच्या बाजूनें मेरुदंडांतून ( पाठीच्या कण्यांतून ) ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन पोहोंचली आहे. ' मनुष्याच्या लिंग व गुद यांच्या मध्यभागीं जी शिवण आहे तेथून नऊ बोटें वर बेंबीच्या खालच्या बाजूस एक कंद आहे; तो कंद चार बोटें लांब व चार बोटें जाड असून त्याची आकृति व रंग पक्ष्याच्या अंड्याप्रमाणें आहे व भोंवतालची त्वचा कफवेष्टित झाली आहे ' असें याज्ञवल्क्यांनीं सांगितलें आहे.

या कंदाच्या मधून सुषुम्नानाडी निघून आधारचक्रांत जाते, तेथून पुढें क्रमाक्रमानें स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत व विशुद्ध या चक्रांत जाते. तेथें तिला एक पश्चिमेकडे व एक पूर्वेकडे असे दोन फांटे फुटतात. त्यांत पश्चिमेकडील फांटा, मानेच्या पाठीमागें मेरुदंड आहे त्यांतून ब्रह्मरंध्रापर्यंत जाऊन पोहोंचतो; व दुसरा पूर्वेकडील फांटा भुवयांच्या मध्यभागीं जें आज्ञाचक्र आहे त्यांतून ब्रह्मरंध्रांत जाऊन पोहोंचला आहे. या दोन मार्गांपैकीं पश्चिमेकडील मार्ग उत्तम आहे; कारण, अथर्ववेदाच्या योगशिखाउपनिषदांत सांगितलें आहे कीं, ' योगमार्गांत जे निपुण योगी आहेत ते सुषुम्नेचा जो पवित्र पश्चिममार्ग आहे. त्यांत प्राणकलेसुद्धां प्रवेश करितात. ' हठयोगप्रदीपिका व खेचरीपटल वगैरे ग्रंथांतही सुषुम्नेच्या पश्चिममार्गांत प्राणाचा प्रवेश करणें प्रशस्त सांगितलें आहे. या मार्गानें प्राण ब्रह्मस्थानांत जाऊन पोहों-

चतो खरा परंतु त्याच्या तोंडींच कुंडली तोंड पसरून मार्ग अडवून निजली आहे तिला जागी करून मोक्षमार्ग मोकळा करावा.

' कंदाच्या वरच्या जागेंत व नाभीच्या खालीं कुंडली सुषुम्नेला आपल्या अंगाचे साडे-तीन वेढे देऊन व शेंपूट तोंडांत बळकट धरून राहिली आहे; त्यामुळें पुरुषाला प्राणाचा प्रवेश इतर नाडींप्रमाणें सुषुम्नेंत सहज करितां येत नाहीं; ह्मणून दशम द्वार जें ब्रह्मस्थान त्यांत प्राणाचा लय करण्याविषयीं उत्सुक असणाऱ्या साधक पुरुषानें विधीप्रमाणें कुंडलीचें चालन करावें. ' असें याज्ञवल्क्यांनीं सांगितलें आहे.

' वज्रासन करून बसावें, नंतर दोन्ही हातांनीं घोंट्याच्यावर पाय बळकट धरून कंदाला दाबावें. पुढें उड्डियान, जालंधर, मूलबंध वगैरे बंधांपैकीं बंध करून प्राणायाम करावा. यायोगानें लवकरच ब्रह्मनाडींत प्राणाचा प्रवेश होऊं लागतो. पुढें वज्रासन करून भस्त्रानामक कुंभक करून नाभीच्या ठिकाणीं असणाऱ्या सूर्याचें आकर्षण करून निजलेल्या कुंडलीला जागें करावें. ' असें हठयोगप्रदीपिकेंत सांगितलें आहे. तात्पर्य, उड्डियान व मूलबंध केल्यानें अपानवायूचें वर आकर्षण होऊं लागतें; व जालंधरबंधानें प्राणवायूचें खालीं आकर्षण होऊं लागतें. नंतर प्राण आणि अपान हे दोघे एक ठिकाणीं झाल्यानें जठराग्नि अतिशय प्रज्वलित होतो. पुढें त्या अग्नीच्या उष्णतेमुळें व्याकुळ झालेली कुंडली सुषुम्नेच्या द्वारीं ठेवलेलें आपलें मुख उचलून सरळ होऊन सुषुम्नेच्या मार्गांत प्रवेश करून वर ब्रह्म-रंध्रांत गमन करिते.

खेचरीपटलांत याप्रमाणें कुंडलीचालन सांगितलें आहे,– ' ज्या वेळेस अनादि-कालापासून झालेला बुद्धिपुरुषांचा संयोग नष्ट व्हावा अशी इच्छा योग्यास उत्पन्न होईल, त्या वेळेस त्यानें पवित्र, रम्य व एकांत अशा स्थलीं सिद्धासन करून बसून कोट्य-वधि विजांप्रमाणें तेजस्वी अशा कुंडलीचें मूलाधारांत पुष्कळवेळपर्यंत चिंतन करावें. पुढें मूलाधारापासून आरंभ करून तें थेट पायांच्या तळव्यांपर्यंत व्याप्त झालेला जो जीव व प्राण यांचें आकर्षण करून दोघांना मूलाधारांत आणावें, आणि तेथें प्रलयाग्नीप्रमाणें भगवती कुंडलिनी दोघांना ग्राशीत ( गिळीत ) आहे असें चिंतन करावें. तात्पर्य, तळपायांपासून प्राणसहित जीवाला प्रत्याहाराच्या बलानें आकर्षून मूलाधारांत असणाऱ्या कुंडलींत आणून मिळवावें. याप्रमाणें तेथें थोडा विसांवा घेऊन जिच्यांत प्राण व जीव मिळाले आहेत अशा कुंडलीला स्वाधिष्ठानचक्रांत आणून ती मूलाधारापासून आरंभ करून स्वाधिष्ठानचक्रापर्यंत व्याप्त असणाऱ्या जीवसहित प्राणास गिळीत आहे असें चिंतन करावें. तेथून पुढें ती मणिपूरचक्रांत आणावी. आणि मणिपूरचक्रापासून आरंभ करून स्वाधिष्ठानचक्रापर्यंत व्याप्त असणाऱ्या जीवसहित प्राणाला कुंडली गिळीत

आहे असें चिंतन करावें. तेथें थोडा विसांवा घेऊन सोळा पांकळ्यांनीं युक्त अशा विशुद्धचक्रांत कुंडली आणून विशुद्धचक्राला आरंभ करून अनाहतचक्रापर्यंत व्यापून राहिलेल्या प्राणाला गिळीत आहे असें चिंतन करावें. तेथून भुवयांच्या मध्यें आज्ञाचक्रांत आणून जसें दूध व पाणी एकठिकाणीं असतां हंस त्यांतून दूध निराळें करितो त्याप्रमाणें शरीररूप पाण्यापासून जीवात्मारूप दुधाला विवेकेंकरून पृथक् जाणून कुंडलीबरोबर मिळवावें. तेथून ब्रह्मरंध्रद्वारानें परमानंदरूप क्षीराब्धीमध्यें असणाऱ्या हजार पांकळ्यांच्या ब्रह्मचक्रांत आणावी. जेथें साक्षी ज्ञानस्वरूप अशा अधिष्ठानांत ( स्थानांत ) कुंडलीसहित जीवाचा लय करावा. तेथें असणाऱ्या परमकारण अशा शिवाचा शक्तीशीं योग करून तीं दोघें एक आहेत अशी भावना करावी. याप्रमाणें भावना केली असतां जीव शिवामध्यें लीन होऊन शिवसरूप होतो.

याप्रमाणें सुषुम्नाद्वार खुलें झाल्यानें प्राण सुद्धां तिच्या मागें सुषुम्नेंत प्रवेश करून ब्रह्मचक्रांत जाऊन राहतो. या प्राणाच्या बरोबर, आधारचक्राच्या जवळ असणारें जें त्रिकोण अग्निकुंड, त्यांतून मूलबंधामुळें वर आलेली अग्नीची शिखा ( ज्वाला ) सुद्धां जाते; जिच्या तेजानें योग्यांना जाण्या येण्याचा मार्ग दिसतो. हें रहस्य अथर्ववेदाच्या अमृतबिंदु-उपनिषदांत स्पष्ट लिहिलें आहे.

याप्रमाणें ब्रह्मरंध्रांत कुंडली गेल्यानें चित्त निर्विषय होतें, त्यामुळें ध्यान निर्विघ्नपणें सतत चालतें; आणि त्या योगानें कैवल्यप्राप्ति होण्याला कांहीं अवकाश लागत नाहीं; असें कठोपनिषदांत सांगितलें आहे. आणि ' जसा हंसपक्षी जाळें तोडून आकाशांत निःशंक संचार करितो, त्याप्रमाणें जीव संशयरूप हृदयग्रंथीचा भेद झाल्यामुळें संसारपाशांतून मुक्त होऊन तरून जातो; ' असें अथर्ववेदांतील क्षुरिकाउपनिषदांत सांगितलें आहे.

अशा रीतीनें कुंडलीचालनानें प्राण ब्रह्मरंध्रांत लीन झाला असतां कृतार्थ होतो, ह्मणजे सुषुम्नाद्वारानें शक्ति ( कुंडली ) सहित प्राणाचा ब्रह्मचक्रांत निरोध झाल्यानें व तो निरोध सतत राहिल्यामुळें जीव तेथें तत्क्षणीं शिव होतो. यावरून श्रुतीमध्यें किंवा स्मृतीमध्यें जें ' जीवन्मुक्तांचे प्राण वर जात नाहींत, व ते धूममार्गांत अथवा अर्चिरादिमार्गांत प्रवेश केल्यावांचून येथेंच लीन होतात ' असें सांगितलें आहे तें बरोबर जुळतें. ' आतां कोठें कोठें प्रारब्धकर्माच्या योगानें देहत्यागापर्यंत तसाच असतो तो सुद्धां ब्रह्मरंध्रद्वारानें निघून ब्रह्मलोक वगैरे ठिकाणीं प्राप्त होऊन तेथें मुक्त होतो. ' असें मुंडक इत्यादि उपनिषदांत सांगितलें आहे.

एकत्र झालेल्या दूधपाण्यांप्रमाणें चित्त आणि प्राण यांची स्थिति आहे. ह्मणजे जेथें वायूची ( प्राणाची ) प्रवृत्ति, तेथें चित्ताची ( मनाची ) ही प्रवृत्ति होते; व जेथें चित्ताची प्रवृत्ति तेथें वायूची सुद्धां प्रवृत्ति असते. ह्मणून या दोघांतून एकाचा नाश झाला असतां

**तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः ॥ ३ ॥**

तेंच ध्यान जेव्हां केवळ ध्येयस्वरूपाकार ह्मणजे ज्याचें ध्यान करीत असेल तद्रूपच होऊन अन्य पदार्थांचें ज्ञान निराळें ह्मणून कांहींच राहत नाहीं ह्मणजे ध्यान व पदार्थ ह्या दोहोंचा एक आकार होतो तेव्हां त्यास समाधि असें ह्मणतात. तात्पर्य, ज्यामध्यें देशालंबन सुटून अर्थमात्राचाच एकाकार प्रत्यय 'अनुभव राहणें,' हा समाधि होय. समाधि या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, योगांत येणारे जे विक्षेप ह्मणजे अडथळे, ते सर्व दूर होऊन ज्यांत चित्ताची एकाग्रता होते तो समाधि होय.

---

दुसऱ्याचाही नाश होतो. चित्त चंचल झालें असतां इंद्रियें आपापल्या विषयांत प्रवृत्त होतात; व तेंच लीन झालें असतां सर्व इंद्रियांचा व्यापार बंद होऊन मोक्षसुख प्राप्त होतें. त्यांत इंद्रियांचा स्वामी मन, मनाचा स्वामी प्राण, प्राणाचा स्वामी लय, व लय हा नादाचा आश्रय करून असतो. याकरितां प्राणाचा लय विशेषेंकरून साध्य करण्यास योग्यानें झटलें पाहिजे; असें योगबीजांत सांगितलें आहे.

'कुंडलीचालन झाल्यानें ह्मणजे ती जागी होऊन तिनें प्राणाचा मार्ग खुला केल्या-मुळें सुषुम्नेचा रस्ता, जसा एकादा कोष्टी किंवा कोळी नांवाचा किडा आपण उत्पन्न केलेल्या तंतूवरून सहज जातो; तसा प्राणवायूला वर जाण्यास राजमार्गाप्रमाणें अगदीं सुलभ होतो.' असें याज्ञवल्क्यसंहितेंत सांगितलें आहे.

प्राणवायूचा सुषुम्नेंत चांगला संचार होऊं लागला ह्मणजे मग समाधीचा भंग होत नाहीं; आणि नंतर उन्मनीअवस्था सहज प्राप्त होते; त्यामुळें योगी पुनः संसारास येत नाहीं. याप्रमाणें ध्यानाची अगदीं परिपक्व अवस्था होऊन कुंडलीस जागी करणें, या विधीला राजयोग सुद्धा ह्मणतात. याला राजयोग हें नांव असण्याचें कारण असें कीं, योग ह्मणजे उपाय, जसा सर्वांत राजा मुख्य असतो त्याप्रमाणें मोक्षप्राप्तीचे जेवढे ह्मणून कांहीं उपाय आहेत त्या सर्वांत हा उपाय मुख्य व सुलभ आहे ह्मणून; आणि राजा ह्मणजे नेहमीं प्रकाशमान असणारा जो परमात्मा त्याची प्राप्ति प्राण्यांना हा ( समाधियोग ) करवितो ह्मणून याला राजयोग असें ह्मणतात.

**समाधि** ( हें योगाचें अष्टमांग होय. )

**सू० ३ टीपः-१**

ध्येय, ध्यान व ध्याता अशा त्रिपुटीचें भान बिलकुल नसून केवल ध्येयाकारच जेव्हां ध्यान होतें तेव्हां त्यास समाधि ह्मणतात. असेंच अथर्ववेदाच्या अमृतबिंदुनामक उपनिषदांतही सांगितलें आहे. जसा समुद्रांत पडलेला उदकाचा बिंदु एकस्वरूपानें दिसतो; त्याप्रमाणें ध्येयाकार झालेलें चित्त ज्या वेळीं स्वरूपशून्य होऊन ध्येयाकारानेंच भासतें त्या वेळेस

समाधि सिद्ध झाला असें समजावें. 'ज्याप्रमाणें पाण्यांत पडलेलें मीठ आपला मीठपणा टाकून उदकरूप होतें; त्याप्रमाणें आत्मा व मन यांचें ऐक्य होणें यास समाधि ह्मणतात,' असें हठयोगप्रदीपिकेंत सांगितलें आहे. ज्या वेळेस प्राण सुषुम्नामार्गानें वर जाऊन ब्रह्मचक्रांत लीन होतो त्या वेळेस चित्ताचा सुद्धां लय होतो; ती जी समरसता ( एकरूपता ) तिला समाधि ह्मणतात. याच रीतीनें सर्व संकल्पविकल्प नष्ट होऊन ज्ञानस्वरूप जीवात्म्याचें व परमात्म्याचें ऐक्य होणें हा समाधि होय. जसें इंधन ह्मणजे जळण सरून गेलें ह्मणजे अग्नि आपोआपच विझून जातो, त्याप्रमाणें संकल्पविकल्परहित झालेलें चित्त आपोआपच आपल्या कारणांत लीन होतें. 'जेथें श्वास व प्रश्वास अगदीं नष्ट झाले आहेत, विषयांवरील दृष्टि अगदीं उडाली आहे, चित्त अगदीं व्यापाररहित होऊन विकल्परहित झालें आहे, अशा योग्यास लय श्रेष्ठ आहे. तो लय कांहीं शब्दानें वगैरे सांगतां येण्याजोगा नव्हे तर केवल स्वतःच्या अनुभवावरूनच जाणण्याजोगा आहे. जेथपर्यंत मन आहे तेथपर्यंत द्वैताचें भान होतें; आणि ज्या वेळेस मनाला उन्मनी अवस्था प्राप्त होते त्या वेळेस द्वैताची ( भिन्नपणाची ) प्रतीति मुळींच राहत नाहीं; आणि कैवल्यप्राप्तीला थोडासा अवकाश राहिलेला असतो.' इत्यादि सर्व योगवासिष्ठांत सांगितलें आहे.

याप्रमाणें समाधि साध्य होऊन स्वस्थ झालेला योगी पुढें केवल आकाशांत असणाऱ्या घटाप्रमाणें आंत शून्य व बाहेर शून्य आणि समुद्रांत असणाऱ्या घटाप्रमाणें आंत पूर्ण व बाहेर पूर्ण असा होतो. समाधींत असणाऱ्या योग्याला, इंद्रियांस अविषय व केवल बुद्धीनेंच जाणण्यास योग्य अशा कैवल्यसुखाचा अनुभव येतो. त्या आनंदांत योगी निमग्न असतां, पुष्पावरील मकरंद पान करणाऱ्या भ्रमराप्रमाणें समाधीपासून चलित होत नाहीं; आणि या परमानंदापेक्षां त्याला दुसरी कोणतीही वस्तु अधिक प्रिय वाटत नाहीं. या सुखांत निमग्न असतां तुफान, पर्जन्य, थंडी, उन्हाळा इत्यादिकांच्या उपद्रवापासून व सिंह, व्याघ्र वगैरेंच्या शब्दांपासून समाधि चल होत नाहीं. याविषयीं एक दृष्टांत योगवासिष्ठांत असा सांगितला आहे कीं, 'शिखिध्वज नांवाचा एक राजा एके वेळीं समाधींत निमग्न असतां त्याची चूडाला नांवाची राणी मनांत विचार करूं लागली कीं, स्वामीची समाधि बरोबर लागली किंवा नाहीं; याची परीक्षा पाहूं. असा विचार करून त्याला समाधींतून जागा करण्याकरितां तिनें आपल्या योगप्रभावानें सिंहादिकांना सुद्धां भयंकर असा शब्द केला. परंतु तो राजा समाधींत गढून गेल्यामुळें बिलकुल समाधीपासून चल झाला नाहीं. यानंतर तिनें पुनः वरचेवर भयंकर शब्द केले तथापि तो जागृत होईना; तेव्हां तिनें शिखिध्वजाचें डोकें हातानें धरून खूब हिसके देऊन इकडून तिकडे फिरविलें; शेवटीं

त्याला तिनें जमिनीवर लोटून मुद्धां दिलें; तथापि तो समाधिभ्रष्ट झाला नाहीं.' इत्यादि समरसतेचीं उदाहरणें समजावीं.

विवेकचूडामणींतही समाधीपासून होणाऱ्या सुखाचा अनुभव असाच सांगितला आहे; की,–'कोणी एक शिष्य समाधि संपल्यावर आपल्या गुरूजवळ सांगूं लागला कीं, हे नाथ! आपण दाखविलेल्या रीतीप्रमाणें समाधि लावल्यावर ब्रह्माचें व आत्म्याचें ऐक्य होऊन माझी बुद्धि अगदीं लीन होऊन गेली, संकल्पविकल्प सुद्धां सर्व नाश पावले; आणि 'हें आहे, हें नाहीं' हा प्रकार बिलकुल भासेनासा झाला. परंतु तेथें जें कांहीं एक अतिशय सुख होतें तें स्वतांसच समजणारें आहे; त्याचा अनुभव दुसऱ्यास सांगतां येत नाहीं.' इत्यादि.

अशा स्थितीला योगीलोकांत राजयोग, समाधि, उन्मनी, मनोन्मनी, अमरत्व, लय, तत्त्व, शून्याशून्य, परंपद, अमनस्क, अद्वैत, निरालंब, निरंजन, जीवन्मुक्ति, सहजा, तुर्या, या शब्दांनीं व्यवहार होतो.

हा लय साधण्याकरितां आदिनाथानें ( शिवानें ) सव्वा कोट उपाय सांगितले आहेत; परंतु त्या सर्वांत 'नादानुसंधान' हा उपाय मुख्य सांगितला आहे. त्या नादानुसंधानाचा प्रकार असा,–'सिद्धासन करून बसून शांभवी मुद्रा करावी. तिचें स्वरूप असें,–दृष्टि नाकाच्या अग्रभागीं निश्चल करून भुवयांना थोड्याशा उंच कराव्या; डोळ्यांच्या पापण्यांची उघडझांक अगदीं बंद करावी. पुढें आंत आधारचक्राला आरंभ करून तें ब्रह्मचक्रापर्यंत ध्यान करावें. चित्त व वायु यांना विलीन करून ध्यानांत मग्न व्हावें. ही वेदशास्त्रांत गुप्त असणारी, मनाचा लय करणारी, मुक्ति देणारी व दुर्लभ अशी शांभवी मुद्रा आहे.' असें हठयोगप्रदीपिकेंत सांगितलें आहे. याप्रमाणें सिद्धासनस्थ योग्यानें शांभवी मुद्रेचें अनुसंधान करून पराङ्मुखी ( षण्मुखी ) मुद्रेच्या योगानें स्वस्थ होऊन शून्यपदवींत ( सुषुम्नेंत ) प्राणाचा लय करून शुद्ध सुषुम्नामार्गामध्यें नादाचें अनुसंधान करावें.

प्रथम अभ्यास करीत असतां नाद अनेक प्रकारचे मोठमोठे ऐकूं येतात, पुढें अभ्यास एकसारखा केल्यानें सूक्ष्म सूक्ष्म ऐकूं येऊं लागतात. त्यांत प्रथम प्राण ब्रह्मरंध्रांत प्रवेश करूं लागतो त्या वेळी त्याचा शब्द समुद्र, मेघ, भेरी, झर्झर यांच्या ध्वनीसारखा मोठ्यानें होतो. मध्यें ह्मणजे ज्या वेळीं प्राण ब्रह्मरंध्रांत जाऊन पोहोंचतो त्या वेळेस मर्दल, शंख, घंटा व काहल यांच्या शब्दासारखा शब्द होऊं लागतो. आणि शेवटीं ह्मणजे प्राण ब्रह्मरंध्रांत बराच वेळपर्यंत स्थिर होतो त्या वेळीं किंकिणी ( घागऱ्या ), मुरली ( अलगुजें ),

टीपः–१ या पुस्तकाचें भाषांतर आह्मीं करवून छापविलें आहे तें अवश्य पहावें; त्यांत याप्रमाणे अनेक आनुभविक दृष्टांत सांगितले आहेत.

वीणा आणि भ्रमर यांच्या शब्दासारखा फारच हलका ध्वनि ऐकूं येतो. याप्रमाणें देहांत अनेक प्रकारचे नाद होऊं लागतात, त्यांत प्रथम फार मोठा ध्वनि ऐकत असतां त्यापेक्षां जो अति सूक्ष्म नाद असेल त्याचें अनुसंधान करावें ह्मणजे ह्या ध्वनीपेक्षां ह्या अमुक वस्तूचा ध्वनि फारच लहान आहे, असें समजून त्या सूक्ष्म नादांत मनास स्थिर करावें. त्या सूक्ष्म ध्वनीमध्यें चित्ताचें लय लागून तें स्थिर झालें असतां त्याला तेथून काढून पुनः त्यापेक्षां जो पहिला घन ह्मणजे मोठा ध्वनि त्यामध्यें लावावें; पुनः त्या मोठ्या ध्वनीवरून मन काढून सूक्ष्म ध्वनीवर लावावें. याप्रमाणें घन ( मोठ्या ) नादाला सोडून सूक्ष्म नादाचें ग्रहण करावयाचें, पुनः सूक्ष्म नादाला सोडून देऊन घन नादाचें ग्रहण करावयाचें; या रीतीनें ग्रहण करणें व सोडून देणें अशा क्रीडेनें चित्त नादानुसंधानाविषयीं तयार होतें. याप्रमाणें अभ्यास एकसारखा चालला असतां नादाच्या १ आरंभावस्था, २ घटावस्था, ३ परिचयावस्था व ४ निष्पत्त्यवस्था याप्रमाणें चार अवस्था होतात. त्यांचें स्वरूप याप्रमाणें,—

१ **आरंभावस्था:**—ज्या वेळीं प्राणायामाच्या अभ्यासानें अनाहतचक्राच्या ठिकाणीं असणाऱ्या ब्रह्मग्रंथीचा भेद होतो तेव्हां मनास आनंद देणारा व तोरड्याइत्यादि भूषणांच्या शब्दासारखा मंजुळ असा हृदयाकाशांत उत्पन्न झालेला ध्वनि शरीरामध्यें ऐकूं येतो. हृदयाकाशांत नाद होण्यास सुरुवात झाली ह्मणजे योग्याचें हृदय आनंदानें भरून जातें. त्याला दिव्य रूप, लावण्य ( सौंदर्य ), बल इत्यादि गुण प्राप्त होतात. मोठा प्रतापी, नीरोगी व ज्याच्या शरीराला उत्तम सुगंध येत आहे असा योगी नादाच्या आरंभावस्थेंत होतो.

२ **घटावस्था:**—ज्यानें दृढासन ह्मणजे स्थिरासन केलें आहे अशा योग्याचा प्राणवायु जेव्हां अपान, नाद व बिंदु यांच्या सुद्धां मध्यचक्रांत ह्मणजे कंठस्थानीं येतो, तेव्हां कंठामध्यें असणाऱ्या विष्णुग्रंथीचा भेद होऊन कंठाकाशांत अनेक नादांनीं मिश्रित झालेला असा भेरी (नगाऱ्या) प्रमाणें शरीरांत शब्द ऐकूं येऊं लागतो. पुढें परमानंद ( ब्रह्मानंद ) प्राप्त होणार अशाचा सूचक तो शब्द कंठांत होऊं लागला ह्मणजे योगी पूर्वीपेक्षां अधिक ज्ञानी होऊन शरीरसंपत्तीनें देवासारखा तयार होतो. अशी घटावस्थेंत योग्याची स्थिति असते.

३ **परिचयावस्था:**—तिसऱ्या परिचयावस्थेंत शर्वपीठ जें आज्ञाचक्र त्याठिकाणीं प्राणाचा लय झाला असतां भुवयांच्या मध्यें असणाऱ्या रुद्रग्रंथीचा भेद होऊन विशेष ज्ञान उत्पन्न करणारा असा मर्दलासारखा शरीरांत शब्द ऐकूं येऊं लागतो. त्या वेळेस योग्यास मनास वाटतील त्या अणिमा इत्यादि सिद्धी प्राप्त होऊं शकतात; व स्वाभाविक आत्मसुख प्राप्त झाल्यामुळें आधि, व्याधि, जरा, दुःख वगैरे कांहीं राहत नाहींत. ही परिचयावस्था होय.

४ निष्पत्त्यवस्थाः—ब्रह्मरंध्रांत प्राण लीन झाल्यावर वीणा, मुरली इत्यादिकांच्या शब्दासारखा ध्वनि ऐकूं येऊं लागतो; व योग्याला फारच विलक्षण सामर्थ्य प्राप्त होतें. ह्या चौथ्या अवस्थेंतील चित्ताच्या एकाग्रतेलाच राजयोग, तुर्यावस्था इत्यादि संज्ञा आहेत. अथर्ववेदाच्या हंसोपनिषदांत असें सांगितलें आहे कीं, 'कोटी वेळां हंसमंत्राचा जप केला असतांना याप्रमाणें नादाचा अनुभव येतो.' त्याच उपनिषदांत नाद अनेक प्रकारचे सांगितले आहेत परंतु त्या सर्वांत मेघनादच श्रेष्ठ सांगितला आहे; कारण त्यापासून सच्चिदानंदप्राप्ति हें फल सांगितलें आहे; करितां त्याचेंच अनुसंधान करावें.

याप्रमाणें अनाहत ह्मणजे नगारे वगैरेप्रमाणें ताडन केल्यावांचूनच आपोआप उत्पन्न होणारे जे ध्वनी ऐकूं येतात, ते अंतर्गत स्वयंप्रकाश असें चैतन्य आहे. ध्येयाकार झालेलें चित्त त्यांत लीन होतें, तें विष्णूचें परमपद आहे. जें कांहीं नादरूप ऐकूं येतें ती परमेश्वराची शक्ति व त्या तत्त्वाच्या आंत निराकार तो ईश्वर आहे. याप्रमाणें नेहमीं नादानुसंधानाचा अभ्यास करणारा योगी कालापासून सुद्धां पराजित होत नाहीं; कारण कोणत्याही प्रकारें तो कर्मांत बद्ध झालेला नसतो. समाधींत निमग्न झाल्यामुळें त्याला कोणत्याही विषयाचें भान नसतें. त्याचें चित्त सुप्त नसतें किंवा जागृत नसतें; तें स्मृति, विस्मृति वगैरेंनीं रहित असून त्यांत उदय, अस्त इत्यादिक धर्म मुळींच राहत नाहींत. अशा रीतीनें जागृदवस्थेंत सुद्धां जो योगी स्वस्थ असतो, तो खरोखर जीवन्मुक्त समजावा.

समाधीविषयीं पूर्वी कितीएक सूचना दिल्या आहेत; त्यांत सांगितलें आहे कीं, ज्या वेळेस श्वास पांच बोटांच्या अंतरांत येऊं लागतो त्या वेळेस समाधीची प्राप्ति होऊन सर्व वृत्तींचा एकाग्र प्रवाह होऊं लागतो. आणि सर्व प्राणवायू एकत्र होऊन दुसऱ्या चक्रांच्या संबंधाचा त्याग करून मेरुदंडमार्गानें ब्रह्मरंध्राकडे जाऊं लागतात आणि असें झाल्यानें सर्व बाह्य इंद्रियें आपापल्या कार्याचा त्याग करून स्थिर होऊन जातात; त्यामुळें या सृष्टीच्या अनंत आकृती आणि शब्दस्पर्शादिकांचें ज्ञान त्या समयीं जाऊं लागतें. अशा स्थितीच्या वेळीं अंतर्वृत्तीचा ज्ञानाच्या योगानें प्रकाश होऊन अद्भुत चमत्कार दिसून पुष्कळ प्रसंगीं शरीरांतल्या सर्व रचना कोणत्या प्रकारच्या आहेत त्या स्पष्ट दिसूं लागतात. अशा वेळीं कुंभक झाल्यानें वायूंची गति वृत्तींच्या प्रवाहांत मिश्र होऊन, ते मोठ्या वेगानें ब्रह्मरंध्राकडे गमन करण्याचा प्रयत्न करूं लागतात; तेथें त्यांच्या बरोबर उदानवायु एकत्र झाल्यानें, अष्टसिद्धि वगैरेंच्या आभासाला तो योगी पाहतो. पुढें समान आणि अपानवायूंमधून वेणु वगैरेंच्या नादांला तो योगी ऐकतो. या वेळीं गुदा आणि कुंडलीचक्रांत रेचक होऊं लागतो, आणि तालु तसेंच कंठचक्रांत पूरक होतो. तसें झालें ह्मणजे व्यानवायूमधून 'हुं हुं हुं' असा ध्वनि निघून सर्व शरीरांत प्रकट होतो; अर्थात् हा शब्द सर्वांत व्यापक

होणारा असा सोहं आत्माच समजावा. ज्या वेळेस अंतर्नाड्यांची गति सारखी चालून राहते, त्या वेळेस स्थूल आणि सूक्ष्म इत्यादिक अनंत ध्वनी ऐकण्यांत येतात. याविषयीं एके ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, 'जो आपण मेघ इत्यादिकांचा घननाद ऐकतो, आणि सूक्ष्मांत सूक्ष्म असा वर सांगितलेला जो आत्म्याचा 'हुं हुं हुं' नाद ऐकूं येतो; त्यांत पूर्ण ज्ञानवान् योगी चंचलगुणयुक्त मनाच्या रजोगुणयुक्त विषयांचा त्याग करून 'हुं हुं हुं' अशा ध्वनींत आपल्या सर्व वृत्ती स्थिर करून 'ब्रह्माहं, शिवोहं, अजरोहं, मुक्तोहं' इत्यादिक आत्मरूप भावाच्या शब्दांनीं हृदयांत अंतर्जप करितो.' ह्या अजपाजपाला गुप्तमंत्र, गायत्रीमंत्र, सिद्धिमंत्र आणि मोक्षमंत्र सुद्धां ह्मणतात. या मंत्रानें लवकर सिद्ध प्राप्त होण्याकरितां कितीएक संपूर्ण ब्रह्मचर्यव्रत पाळणारे योगी कांहींएक पवित्र क्रिया सुद्धां करीत असतात. त्या येथें थोडक्यांत सांगतों,–

या पवित्र क्रिया नैष्ठिक ब्रह्मचर्यव्रत पाळणारे सिद्ध पुरुष चार घटिका रात्रीच्या वेळीं ह्मणजे प्रातःकाळच्या चार घटिका पूर्वी उठून शौचविधि, दंतधावन आणि स्नानादिक नित्य क्रिया करून एका पंचपात्रींत सुमारें चार पैसेभार तांदूळ धुऊन त्या धुतलेल्या पाण्यांत उत्तम सुवासाचें खोड उगाळून त्याचें दोन पैसेभार गंध घेऊन त्यांत दोन पैसेभार मध टाकून तें प्राशन करितात; पुढें दिवसां केवळ दूध आणि भाताचें हलकें व थोडेंसें भोजन करितात. आणि रात्रीच्या वेळीं मध, भाकरी, पोळी, तूप, दूध, आणि वरण वगैरे निर्गुण पदार्थांचें भोजन करितात; आणि तेल, तिखट, केळें आणि हिंग वगैरे रजोगुणी पदार्थांचें सेवन मुळींच करीत नाहींत. याप्रमाणें भोजन करून व रात्रीं स्नान करून एकांत वासांत समाधीकरितां स्थिर होतात आणि तेथें वर सांगितलेला अजपाजप करितात. पुढें चार घटिका रात्री राहिली ह्मणजे पुनः स्नान करून वर सांगितल्याप्रमाणें चंदन प्राशन करून ते योगी झोंप घेतात; त्यामुळें त्यांना रात्रीं झोंप येत नाहीं. याप्रमाणें एकवृत्तीनें व दृढनिश्चयानें ही क्रिया करणाऱ्या योग्याला स्वतः पुष्कळ वेळां सात दिवसांत वर सांगितलेल्या अंधाराच्या एकांतस्थानांत एक प्रकाशमान ज्योति ब्रह्मरंध्रांतून निघालेली त्या प्रकाशावरून समजते. असें झाल्यावर तो योगी जर अशी क्रिया सारख्या निश्चयानें करूं लागेल तर त्याला एक पक्षांत (पंधरा दिवसांत) गुप्तविद्येच्या मूलतत्त्वाचें ज्ञान होऊं लागेल. पुढें एक महिन्याच्या शेवटीं त्याला आपल्या श्वासाची गति मंद चाललेली समजेल. त्यापुढें फारकरून दोन महिन्यांच्या अखेरीस त्याला आपल्या कल्पनांप्रमाणें जगतांत अनेक रचना होताहेतशा समजतील. चार महिन्यांच्या शेवटीं प्रत्येक मनुष्याच्या मनाच्या कल्पनांना जाणण्याची शक्ति येईल. पांच महिन्यांत अंतवाहक भावरूपी शरीराची ह्मणजे ईश्वरी रचना समजूं लागतील. त्यांत पृथ्वीच्या अनेक प्रदेशांत कोणकोणत्या प्रकारचीं कार्यें होताहेत,

तें जाणण्याची शक्ति येईल. त्याचप्रमाणें आपली वृत्ति असली तर, अनेक देव, योगात्मे आणि महापुरुष यांचे आकार प्रकट होऊन आपल्या इच्छेप्रमाणें गुप्तविद्येचें ज्ञान त्यांच्या द्वारें आपणांस मिळूं शकेल. याप्रमाणें ही क्रिया पुण्यवान् पुरुषानें अत्यंत दृढनिश्चयानें केल्यानें सहा महिन्यांत त्याच्यासारखीच एक आकृति प्रबळ इच्छाशक्तीच्या योगानें त्याच्यासमोर प्रकट झालेली दिसेल, आणि ती सांगेल कीं, 'तुझा शुद्ध आत्मा तुझ्या प्रबळ इच्छाशक्तीप्रमाणें कार्य करण्याला समर्थ आहे;' असा साक्षात्कार झाल्यावर तो योगी कांहींएक इच्छा न धरितां 'कृपा ठेवावी' एवढेंच भाषण करितो. अशा रीतीनें निरंतर वागल्यानें वर सांगितलेला आकार आपल्या गुप्त इच्छेनें आपल्या शरीरांतून आपल्या प्रबळ इच्छेप्रमाणें पांच सात आकार धारण करून भिन्न भिन्न स्थानांत गमन करून आपल्या पहिल्या दृढ इच्छेप्रमाणें अनेक कार्यें करूं शकतो. हे सर्व आकार आपल्यांतच प्रकट होतात. याप्रमाणें पूर्वींचे दत्तात्रेय, गोरक्षनाथ, मत्स्येंद्रनाथ आणि वसिष्ठ वगैरे महात्मे करीत होते; आणि सांप्रतकाळांत प्रसंग पडेल तेव्हां हिमालयांतील महात्मे आणि योगी करितात सुद्धां. अशी क्रिया दृढनिश्चयानें व प्रबळ इच्छाशक्तीनें नैष्ठिक योग्याला कांहीं वर्षेंपर्यंत हल्लींच्या काळीं करण्याची आवश्यकता आहे. हें सर्व गृहस्थाश्रमी गुप्तविद्येचा अभ्यास करणाराला असें करण्याची जरूरी नाहीं. त्यांना तर आपल्या सनातन धर्माच्या मर्यादेंत दृढनिश्चयानें वर्तून व्यावहारिक कार्य करीत असतां व जनकराजाप्रमाणें सर्व मनोविकारांचा लय करण्याचा निश्चय ठेवल्यानें योग्य समयीं वर सांगितल्याप्रमाणें महाअद्भुत शक्ति प्राप्त होऊं शकेल. कारण, दृढनिश्चय आणि अति प्रबल पावलेल्या इच्छाशक्तीच्या योगानें ज्या वेळीं सर्व वृत्ती मनांत स्थिर होऊन जातात, त्या समयीं ब्रह्मरंध्रांत प्राणवायु प्रवेश करितो; आणि तसें झाल्यानें कुंडली अथवा वासनाचक्रांत ज्ञानदृष्टि एकत्र होते, त्यामुळें शेवटीं सविकल्पसमाधि प्रकट होतो. त्या प्रसंगीं सर्व वृत्ती स्तंभित होऊन त्या ब्रह्मनादांत स्थिर होतात, आणि असें झाल्यानें संयमाचा भास पडतो. त्यांत संकोचानें राहिलेल्या प्राणवायूंत पूर्वींचा जसा भाव असेल त्याप्रमाणें रचना दिसतात. या रचनांत जशी पूर्वींची शुभ अथवा अशुभ कल्पना असेल तशीं कार्यें होऊं लागतात. सारांश इतकाच कीं, अशा स्थितीच्या वेळीं त्या योग्याचे सर्व भाव आपोआप विज्ञानाकृतीनें राहतात; ह्मणजे बुद्धीच्या अनेक वृत्तींबरोबर तादात्म्यपणानें स्थित होतात. त्यामुळें समाधीच्या वेळीं त्याच्या अंतःकरणाची भावना स्वाभाविकपणानें 'अहं ब्रह्म, ब्रह्माहं,' अशा आत्मस्वभावाच्या ज्ञानांत निमग्न असते. त्या वेळेस त्याची याप्रमाणें स्थिति असते, आकाशाप्रमाणें सर्वत्र व्यापून राहिलेला जो आपला शुद्धज्ञानरूप आत्मा त्याविषयीं जर योगी ब्रह्माहं' या प्रकारची भावना करून आणि त्या भावनेला अपरोक्षभावानें 'अहं ब्रह्म' याप्रमाणें आपल्या आत्मस्वरूपाच्या एकाग्रतेनें लक्षांत ठेवून आणि कल्पनाविरक्त होऊन संपूर्ण

ब्रह्ममयभावनेंत स्थिर राहिला तर त्याची ' अहं ब्रह्म ' असा शब्दोच्चार करण्याची शक्ति सुद्धां ब्रह्मानंदांत स्वप्रकाशभावानें निद्रेप्रमाणें ऐक्यरूप होऊन जाते; आणि तसें झालें ह्मणजे आपणाला यथार्थ अद्वैत भासूं लागतें. ' परंतु ज्या वेळेस अशा स्थितीमध्यें पूर्वीच्या राहिलेल्या वासनेनें प्राणादिक सोळा कळा प्रकट होतात; त्या वेळेस आपण या कळांनीं रहित पूर्वी झालों असतां पुनः सविकल्पसमाधींत अशा प्रकृतिरूप अविद्येच्या संयोगानें कलावानासारिखें दिसूं लागतों; त्यामुळें आपण समाधीच्या वेळीं शरीरामध्यें हृदयकमलगत आकाशामध्यें जाणण्याला योग्य होऊन जातों. याच कारणानें आपलें चैतन्य प्राणादिक आणि ब्रह्मांडादिक व्यष्टि समष्टीला रचूं लागतें. त्याविषयीं एके ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, ' तें पुरुषरूप चैतन्य सांगितल्या रीतीप्रमाणें तिन्ही कालांतील वस्तूंला विषय करणाऱ्या ज्ञानरूप ईक्षणानें सर्व प्राणमय ह्मणजे समष्टि प्राणरूप हिरण्यगर्भ नांवाच्या सर्व प्राण्यांच्या कारणाला आधाररूप अंतरआत्मा अथवा कारणशरीराला ( प्राणाला ) उत्पन्न करितें झालें. या प्राणानें प्राण्यांच्या शुभकर्माविषयीं कारणरूप प्रवृत्तीला सुद्धां उत्पन्न केलें. पुढें कर्मफळाच्या उपभोगाला साधनरूप देहाचें अधिष्ठान आणि कारणरूप पांच प्रकारचीं पांच महाभूतें उत्पन्न केलीं. त्याचप्रमाणें शब्दगुणानें युक्त अशा आकाशाला, तसेंच कारणाचा गुण जो शब्द त्यानें स्पर्शयुक्त अशा वायूला, त्याचप्रमाणें आपल्या रूपगुणानें आणि कारणाचा गुण जो शब्द आणि स्पर्श यांच्या मिश्रणानें तेजाला उत्पन्न केलें. पुढें आपल्या साधारण रसगुणानें आणि कारणाचे गुण जे शब्द, स्पर्श आणि रूप यांच्या मिश्रणानें उदक उत्पन्न केलें. त्याचप्रमाणें आपल्या गंधगुणानें आणि कारणाचे गुण जे शब्द, स्पर्श, रूप आणि रस यांच्या मिश्रणानें पांच गुणांनीं युक्त अशी पृथ्वी उत्पन्न केली. याचप्रमाणें याच पंचभूतांनीं, हीं आपण परस्परांत मिश्र नव्हतीं अशा अवस्थेंत ज्ञानाकरितां आणि कर्माकरितां इंद्रियांना तसाच इंद्रियांचा नियामक जो ईश्वर त्याला प्रकट केलें. पुढें शरीरामध्यें असणाऱ्या संशय अथवा संकल्प इत्यादिक लक्षणांनीं युक्त अशा मनास उत्पन्न केलें. याचप्रमाणें प्राणिमात्रांचीं कार्यें व कारणें उत्पन्न करून त्यांच्या स्थितीकरितां अन्न उत्पन्न केलें. पुढें भक्षण केलेल्या अन्नानें सर्व कर्मांत प्रवृत्ति होण्याला साधन जें वीर्य त्याला उत्पन्न केलें. पुढें चित्तशुद्धीच्या साधनाकरितां तपाला उत्पन्न केलें. या तपानें शुद्ध झालेले निर्मल आंत बाहेर किरणरूप असे चारी वेद मनुष्यप्राण्यांच्या साधनाकरितां प्रकट केले. त्या वेदांच्या मंत्रांनीं अग्निहोत्रादिक कर्में झालीं. त्या कर्मांनीं कर्मांचे फलरूप चवदा लोक प्रकट झाले. याप्रमाणें प्राण्यांच्या अविद्या इत्यादिक, दोषरूप बीजाच्या अपेक्षेनें सोळा कळा उत्पन्न झाल्या.' अर्थात् माया अथवा अविद्यारूप दोषदृष्टीनें व्यष्टिसमष्टि इत्यादिक प्रकट झाले आहेत. जसा स्वप्नाचा द्रष्टा ( साक्षी ) स्वप्नामध्यें संकल्पानु-

सार सृष्टि प्रकट करितो, त्याप्रमाणें अविद्येचा द्रष्टा अविद्येच्या संकल्पानें अविद्यारूप सृष्टि प्रकट करितो. परंतु शेवटीं हें सर्व नामरूपउपाधिभेदाचा त्याग करून शुद्ध-चैतन्यांत लीन होतें. त्याप्रमाणें शेवटीं सर्व सृष्टि परमात्म्यामध्यें लीन होते. त्यास प्रमाण प्रश्नोपनिषदांत सांगितलें आहे; त्याचा अभिप्राय असा,–' सर्व सृष्टि शुद्धचैतन्यांत लीन होते. त्यांत पृथ्वी, उदक, तेज, वायु आणि आकाश हे सर्व, त्यांच्या तन्मात्रांसहित आत्म्यांत लय पावतात. त्याचप्रमाणें स्थूल आणि सूक्ष्म भूतें आणि त्यांचीं कार्यें जीं पांच ज्ञानेंद्रियें आणि पांच कर्मेंद्रियें त्यांच्या विषयांसहित जेवढें ह्मणून नाम आणि रूपमय जगत् आहे तसेंच ब्रह्मांड व त्याच्या उपाधिभूत सर्व वस्तु हे सर्व शुद्धचैतन्यांत समाधीच्या वेळीं, त्याचप्रमाणें आत्यंतिक प्रलयांत परमात्म्यांत लीन होतात.' समाधीच्या वेळीं हें सर्व कसें होतें हें येथें थोडेंसें सांगतों,–निश्चयी योग्याच्या पूर्णसमाधीच्या वेळीं प्रकाश करण्याला योग्य असा जो आपला सूत्रात्मा अथवा कारणशरीर तें व सर्व-प्राणाच्या तसेंच कार्यकारणांच्या समूहरूप दुसऱ्याच्या अर्थाकरितां मिश्रित झालेली जी सर्व नामरूपमय सृष्टि आणि समष्टि त्यांच्या सर्व उपाधींसहित वस्तू समाधिसमयीं योग्याच्या ब्रह्मरंध्रांत एकत्र होतात. जसे पक्षी रात्रींच्या वेळीं आपापल्या स्थानांत जातात, तशी प्रसिद्धरूप ही सर्व सृष्टि अक्षररूप परमात्म्यामध्यें लीन होते. अर्थात् पूर्वी सांगितलेल्या सविकल्पसमाधीमध्यें ऐकूं येणारे सर्व नाद, पंच प्राण, तशाच सर्व प्रकाश पावलेल्या वस्तू त्यांच्या स्वभावांसहित समाधिसमयीं आत्म्यामध्यें लीन होतात, त्या वेळेसच अखंड पूर्ण निर्विकल्पसमाधींत निद्रेप्रमाणें सर्व असत्य होऊन जातात; आणि समाधिनिष्ठ योगी स्वतः कांहींच नाहीं अशा अचंचल निराकार अद्वैतपदांत अमरपणानें स्थिर होऊन जातो. आणि अशीच स्थिति मृत्युसमयीं झाल्यानें कैवल्यमोक्ष अथवा परनिर्वाण याची प्राप्ति होते. कारण, अशा योगात्म्याच्या स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण इत्यादि सर्व देहांचा लय झालेला असतो. याप्रमाणें योगविद्येचा शेवटचा परिणाम कैवल्यमोक्षच आहे.

## राजयोग.

**योगाविषयीं स्फुट विचारः**–योग ह्मणजे समाधि. तो साधण्याचे उपाय एकंदर चार; हठयोग, राजयोग, मंत्रयोग आणि लययोग. या सर्वांस यम, नियम वगैरे अंगें अवश्य असावीं लागतात; तीं असलीं ह्मणजे मग पुढील तीन प्रकारचे उपाय करून योग साध्य होतो; आणि तीं जर नसतील तर समाधीस कोणताही उपाय लागू पडणार नाहीं. याकरितां प्रथम यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि हीं आठ अंगें हठयोगांत सांगितलीं. त्यांत चित्ताचे मलिन संस्कार दूर होऊन त्याची सत्वगुणा-

कडेच प्रवृत्ति एकसारखी राहण्यास यमनियमांची आवश्यकता आहे. शरीर व मन यांस जडता व चंचलता जी उत्पन्न होते ती तमोगुणाच्या व रजोगुणाच्या प्रभावानें उत्पन्न होते; ती दूर करण्याकरितां आसनांची जरूरी आहे. कितीएक आसनांपासून तर प्राणाची सुद्धां स्थिरता होते. प्राणनिरोध झाल्यावांचून साधारण• अधिकाऱ्याचें चित्त स्थिर होत नाहीं; व तशा अधिकाऱ्याचा प्राणनिरोध प्राणायामावांचून होणार नाहीं; ह्मणून प्राणायामाची अत्यंत आवश्यकता आहे. आतां अभ्यासानें प्राणायाम सिद्ध झाला ह्मणजे क्रमानेंच चित्त स्थिर होतें; चित्त स्थिर झालें ह्मणजे इंद्रियें सुद्धां अभ्यासानें मनाप्रमाणें वागूं लागतात; हाच प्रत्याहार होय. प्रत्याहार झाल्यामुळें चित्ताचा ज्या एका वस्तूशीं संबंध करावा त्यावरच तें सुखानें राहूं शकतें; ही धारणा झाली. धारणा झाल्यावर चित्ताला दुसऱ्या कोणत्याही वस्तूचा विचार करण्याचें व्यवधान नसल्यामुळें तें ज्यावर लाविलें असेल त्याच्याच स्वरूपाचा निरंतर पूर्ण विचार करण्यास समर्थ होतें; हें ध्यान झालें. ध्यान पूर्णदशेस जाऊन पोहोंचलें ह्मणजे तें ज्याचें ध्यान करीत आहे त्याच्यांत अगदीं गढून जातें; हा समाधि झाला. याप्रमाणें आस्थापूर्वक निरंतर अभ्यास चालविला असतां सत्वगुणाची वृद्धि होऊन व शेवटीं सर्वांविषयींच अत्यंत कडकडीत वैराग्य उत्पन्न होऊन असंप्रज्ञातसमाधि सिद्ध होतो; व त्यापासून कैवल्यसुख प्राप्त होतें. याप्रमाणें हठयोगांत समाधि साधण्याचा क्रम आहे; ह्मणजे प्रथम मोठ्या श्रमानें प्राणनिरोध करून चित्तनिरोध करावयाचा; व पुढें चित्तनिरोधानें समाधि. यांत श्रम फार पडतात.

राजयोगांत असा प्रकार नाहीं; कारण, त्यांत प्रथम चित्तनिरोधानेंच प्राणनिरोध करावयाचा असतो; यामुळें त्यांत कांहीं विशेष प्रयास नसतात. याकरितां ज्यांचें चित्त स्थिर होत असेल त्यांनीं राजयोगाचाच अभ्यास करावा; त्यांना हठयोगाचा क्रम घेण्याची जरूरी नाहीं. आतां राजयोगाचे क्रियायोग व ज्ञानयोग असे दोन विभाग पाडून पहिल्यास नुसती ‘ राजयोग ’ अशी संज्ञा व दुसऱ्यास ‘ सहजसमाधि’ अशी संज्ञा देऊन दोन्हीं राजयोगांच्या अनुष्ठानाचा क्रम सांगतों; तो असा,–राजयोगांत (क्रियायोगांत) प्रथम, पूर्वेस किंवा उत्तरेस तोंड करून पद्मासन घालून बसावें. दोन्ही जांघांवर दोन्ही हात, ध्यानमुद्रा ( ह्मणजे आंगठ्याजवळचें बोट ( तर्जनी ) आंगठ्याच्या मधल्या भागास लाऊन बाकीचीं बोटें लांब करून ठेविलीं असतां ध्यानमुद्रा होते; ती ) करून ठेवावे; डोळे अर्धवट उघडे ठेवून, नासिकाग्राचे ठिकाणीं दृष्टि स्थिर करून, मनास बिलकूल चंचल न होऊं देतां श्वासोच्छ्वास बंद ठेवावे अर्थात् कुंभक प्राणायाम करावा. पुढें आज्ञाचक्राचे ठिकाणीं प्राण, अपान, नाद व बिंदु या सर्वांना लीन करून पराङ्मुखी ह्मणजे षण्मुखी मुद्रा

करावी; आणि तेथें रुद्रग्रंथीचा भेद झाल्यावर तेथें होणाऱ्या नादाचें अनुसंधान करण्याचा सतत अभ्यास करावा ह्मणजे तेथें चित्ताचा लय होऊन राजयोग सिद्ध होईल; व राजयोग सिद्ध झाला असतां योगी जन्ममरणांपासून मुक्त होईल.

## सहजसमाधि ( राजयोग ).

शरीरादिकांला श्रम झाल्यावांचून अनायासानें सिद्ध होणारा जो समाधि त्याला सहजसमाधि ह्मणतात; वेदांतमतांतील राजयोग तो हाच होय. पुढें सांगितलेल्या ध्याना-मध्यें ज्या वेळेस मन अगदीं लीन होतें, त्या वेळेस सहजसमाधि होतो. या राजयोगाचीं एकंदर पंधरा अंगें आहेत. तीं येणेंप्रमाणें:– १ यम, २ नियम, ३ त्याग, ४ मौन, ५ देश, ६ काल, ७ आसन, ८ मूलबंध, ९ देहसाम्य, १० दृक्स्थिति ( स्थिरदृष्टि ), ११ प्राण-संयमन (प्राणायाम), १२ प्रत्याहार, १३ धारणा, १४ आत्मध्यान ( ध्यान ) व १५ समाधि.

**१ यमः**–आकाशादिकांस आरंभ करून तें शरीरापर्यंत जें कांहीं जगत् आहे तें सर्व अनित्य व असार आहे, अशा रीतीनें जगताचा बाध करून व सर्वत्र एक ब्रह्मच व्यापून राहिलें आहे असा निश्चय करून आणि 'सर्व विषय परिणामीं नाश पावणारे आहेत' अशा दोषदृष्टीनें सर्व इंद्रियांस आपापल्या विषयांपासून आवरून धरणें यास यम ह्मणतात.

**२ नियमः**–अंतःकरणाच्या वृत्तींचे सजातीय व विजातीय असे दोन प्रकारचे प्रवाह आहेत. त्यांत 'जीवात्म्याहून परमात्मा भिन्न नाहीं, ते दोन्ही एकच आहेत;' अशी जी सतत ब्रह्माकार अखंडवृत्ति, तो सजातीय वृत्तिप्रवाह होय. व अनेक जन्मांपासून 'दिसणारा सर्व प्रपंच व परमात्मा हे दोवे भिन्न आहेत' असा संस्कार मनावर दृढ झाला आहे त्यायोगानें मनाची सतत प्रपंचाकार वृत्ति होते, तो विजातीय वृत्तिप्रवाह होय. प्रपं-चाकारवृत्तींत अनेक दोष आहेत असें समजून प्रपंचाकारवृत्तीचा त्याग करणें व सजातीय वृत्तिच नेहमीं असूं देणें यास नियम ह्मणतात.

**३ त्यागः**–जें कांहीं सर्व जगत् नामरूपांनीं व्यवहारांत स्फुरत आहे तें केवळ स्वप्नवत् भासमान असून, तें ज्यावर भासत आहे तें अधिष्ठानच सत्य असून स्वयंप्रकाश चैतन्य ब्रह्म आहे, असें जाणून जगताचा त्याग करणें यास त्याग ह्मणतात.

**४ मौनः**–ज्या ठिकाणीं वाणी अथवा मनाची सुद्धां प्रवृत्ति होत नाहीं; ह्मणजे ज्याला वाणी व मन सुद्धां जाणूं शकत नाहींत, असा आत्मा आहे ह्मणून त्याला मौन ह्मणतात. याप्रमाणें आत्मा हा जरी वाणीनें सांगतां येत नाहीं व मनाच्या विचारांत येत नाहीं तथापि अध्यात्मज्ञानी त्याला जाणून त्याचा साक्षात्कार करून घेतात. असें जें ब्रह्म तें मी आहें; असें नेहमीं अनुसंधान ठेवणें; व 'जगत् हें सत्य आहे', 'जगत् हें मिथ्या आहे'

इत्यादि अनेक वाद आहेत; त्यांत कोणताही पक्ष घेतला तरी जगत् हें शेवटीं निर्विवाद लयाला जाणारें आहे अशा दोषदृष्टीनें त्याविषयीं मौन धारण करणें यास मौन ह्मणतात.

५ **देशः**–आत्म्याच्या पूर्वी, मध्यें किंवा शेवटीं जगत् नसून आत्माच सृष्टीच्या पूर्वी, मध्यें व सृष्टीच्या लयानंतर असतो असें जाणून सर्वत्र आत्माच आहे, आत्म्यावांचून दुसरी कांहीं वस्तु नाहीं; असा निश्चय करून बसणें, यास निर्जन ( एकांत ) देश ह्मणतात.

६ **कालः**–सर्व सृष्टीला उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवापासून तें मशकादि क्षुद्र प्राण्यापर्यंत सर्व वस्तूंच्या आयुर्मर्यादेची कालानें गणना होत असते. पळ, घटिका याप्रमाणें काल सर्वांचें आयुष्य हरण करीत असतो; यावरून काल ह्मणजे ईश्वराहून कोणी भिन्न पदार्थ आहे असें नसून काल हा साक्षात् परमात्माच आहे; असा पक्का निश्चय असूं देणें, यासच योगास अनुकूल काल ह्मणतात.

७ **आसनः**–ब्रह्मावांचून अन्य कांहीं एक वस्तु नाहीं, असें चिंतन करीत सुखानें स्वस्थ बसणें, व मी अखंडानंद ब्रह्मच आहे अशा आनंदांत निमग्न होऊन शरीरास कंप वगैरे उत्पन्न न होऊं देतां सर्व मनोरथ सिद्ध झाल्याची मुद्रा ( चेहरा ) दर्शवून बसणें, यास आसन ह्मणतात.

८ **मूलबंधः**–जें या सर्व प्रपंचास मूल ( आश्रय ) आणि जें चित्ताला बंधन करणारें जें अज्ञान त्याचेंही मूल; याप्रमाणें सर्व प्रपंचास आश्रयभूत जें ब्रह्म तेंच मूलबंध आहे; त्याचेंच राजयोग्यानें निरंतर सेवन ठेविलें पाहिजे.

९ **देहसाम्यः**–वेदादिकांत जें भगवंताच्या अवयवांचें वर्णन केलें आहे, व अमुक अवयवाचे ठिकाणीं अमुक लोक आहे; इत्यादि जें वर्णन आहे तें सर्व कल्पित आहे. तशी कल्पना करण्याचें तात्पर्य इतकेंच कीं अमुक वस्तु हीन आहे व अमुक वस्तु श्रेष्ठ आहे असें नाहीं; कारण सर्व भगवंताचेच अवयव आहेत; परमात्म्यावांचून एकही वस्तु नाहीं. सर्वशरीरांत जसा आत्मा व्यापून राहिला आहे; अमुक अवयवांत ह्मणजे त्याची व्याप्ति नाहीं असें नाहीं; त्याप्रमाणें सर्व जगत् ईश्वरमय आहे अशा भावनेस देहसाम्य ह्मणतात.

१० **दृक्स्थितिः**–अंतःकरणाची वृत्ति अखंड ब्रह्माकार करून संपूर्ण जगत् ब्रह्मभावानें पाहणें, व द्रष्टा, दृश्य व दर्शन ह्या त्रिपुटीचा ज्या ठिकाणीं लय होतो; अशा ब्रह्माच्या ठिकाणीं चित्त ठेवणें याला स्थिरदृष्टि ह्मणतात.

११ **प्राणसंयमनः**–संकल्प इत्यादिक ज्या अंतःकरणाच्या वृत्ती आहेत त्या ठिकाणीं ब्रह्मत्वाची भावना करून सर्व वृत्तींना आवरून धरणें यासच प्राणायाम ह्मणतात; कारण, प्राण हा चित्ताच्या स्वाधीन आहे ह्मणून चित्ताचा निरोध केला असतां प्राणाचा

निरोध सहज होतो. याकरितां चित्ताच्या वृत्तींना रोंकून धरणें हाच प्राणायाम होय. अनात्म ( परमात्म्याहून इतर ) वस्तूंचा, असत्य आहेत ह्मणून निषेध करणें, ह्यास रेचक, 'मी ब्रह्म आहें' अशा वृत्तीस पूरक व 'अखंडाकारवृत्तिस्वरूप मी ब्रह्म आहें' असा जो निश्चलपणा यास कुंभक असें ह्मणतात.

१२ **प्रत्याहारः**—शब्दादिकविषयांचे ठिकाणीं किंवा घटपटादिक पदार्थांचे ठिकाणीं जी सत्ता, स्फुरता आणि प्रियता वगैरे आहे तें सर्व आत्माच आहे असें जाणून त्या ठिकाणीं नामरूपरहित अशा आत्मस्वरूपाची भावना करून मनाला नेहमीं आत्मस्वरूपीं तल्लीन करणें, यास प्रत्याहार ह्मणतात.

१३ **धारणाः**—ज्या ज्या पदार्थावर मन जातें त्या त्या पदार्थाच्या ठिकाणीं सत्ता, स्फुरता व प्रियतारूप ब्रह्मच आहे; आणि नामरूप हें सर्व मिथ्या आहे असें जाणून मिथ्या वस्तूची उपेक्षा करणें आणि सत्यस्वरूप जो आत्मा त्याच्या दर्शनाचें अनुसंधान ठेवणें, याचें नांव धारणा.

१४ **ध्यानः**—देहादिकांविषयींचा अहंममताभाव सोडून देऊन 'मी ब्रह्म आहें' अशी अखंडाकार चित्ताची निश्चल वृत्ति राखणें, याला ध्यान ह्मणतात.

१५ **समाधिः**—अंतःकरणाच्या वृत्ती ज्या विषयाकार झाल्या आहेत त्या विषयरहित करून अखंड ब्रह्माकार होणें, आणि ध्याता, ध्येय व ध्यान ह्या त्रिपुटीनें रहित होऊन प्राण, मन इत्यादिकांचा आत्मस्वरूपीं लय करणें यास समाधि ह्मणतात.

याप्रमाणें या ज्ञानयोग अथवा सहजसमाधीची १५ पंधरा अंगें सांगितलीं. याचें अनुष्ठान करण्याचा ज्ञान्यास अधिकार आहे. ज्यांना अध्यात्मज्ञान पूर्ण झालें नसेल त्यांनीं पूर्वीं सांगितलेल्या राजयोगाचें ( क्रियायोगाचें ) अनुष्ठान करावें. जेपुरुष ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगण्यांत मात्र फार कुशल असतात आणि त्यांची चित्तवृत्ति तर सर्व विषयांनीं कलुषित (मलिन) झालेली असते, अशा पुरुषांस योगाची सिद्धि होणार नाहीं; आणि ते जन्ममरणांच्या फेऱ्यांत तसेच फिरत राहतील; वृत्तीवांचून केवळ वार्तेपासून कांहीं एक फळ नाहीं याकरितां ब्रह्माकार वृत्ति निरंतर असली पाहिजे. ब्रह्मादिक देव सुद्धां ब्रह्माकार वृत्तीवांचून एक क्षणभर राहूं शकत नाहींत. त्यांनीं समाधि सिद्ध होईपर्यंत याच राजयोगाचें सेवन केलें आहे ह्मणून हा राजयोग श्रेष्ठ आहे; याकरितां मुमुक्षुजनांनीं याचें सेवन अवश्य केलें पाहिजे.

## ( समाधि सिद्ध झाल्याचें चिह्न. )

योगाचा अभ्यास करितां करितां जेव्हां ब्रह्माचा साक्षात्कार होण्याचा समय येतो तेव्हां पहिल्यानें क्रमानें धुकें, धूर, सूर्य, अग्नि, वायु, काजवे, वीज, स्फटिक व चंद्र यांच्या स्व-

त्रयमेकत्र संयमः ॥ ४ ॥

एकाच वस्तूविषयीं जी धारणा, ध्यान व समाधि, याला संयम असें ह्मणतात. तात्पर्य, या शास्त्रांत 'संयम' असा शब्द जेथें जेथें उच्चारण केला असेल तेथें तेथें त्याचा अर्थ एकाच वस्तूविषयीं धारणा, ध्यान व समाधि असा समजावा.

तज्जयात्प्रज्ञालोकः ॥ ५ ॥

संयमाचा अभ्यास करितां करितां तो संयम एकसारखा होऊं लागला ह्मणजे त्यापासून विवेकख्याति उत्पन्न होते; ह्मणजे ज्या वस्तूचें आपण ध्यान करीत आहों त्याचें ज्ञान उत्तम रीतीनें होतें.

तस्य भूमिषु विनियोगः ॥ ६ ॥

स्थूलपदार्थापासून तें थेट सूक्ष्मपदार्थापर्यंत ज्या भूमि ह्मणजे चित्ताच्या अवस्था असतात त्यांकडे त्या संयमाची योजना करावी, ह्मणजे चित्ताचा संयम करून पहिल्या

---

रूपाचा मनास भास होतो; नाना प्रकारचे नाद होतात व अनेक चमत्कार होतात. घटामध्यें पाणी भरतांना जसा 'घट घट' आवाज होतो; त्याप्रमाणें आपल्या पोटांत 'घट घट' आवाज होतो. असें झालें ह्मणजे सुषुम्ना व कुंभक सिद्ध झाले असें समजावें. पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं पांच महाभूतें उठलीं व पांच योगगुणांची प्रवृत्ति झाली ह्मणजे योगाग्निरूपी शरीराचा लाभ होतो. व नंतर रोग, जरा व दुःख हीं त्या योग्यास बाधत नाहींत. देहास हलकेपणा येतो, आरोग्य प्राप्त होतें, अधाशीपणा जातो, अंगाचा वर्ण प्रसन्न होतो, स्वरास माधुर्य येतें, अंगास सुवास सुटतो, लघ्वी थोडी व शौचासही थोडें होतें. असें होऊं लागलें ह्मणजे पहिल्या योगप्रवृत्तीस आरंभ झाला असें समजावें.

जेव्हां ब्रह्मरंध्रांत किंवा मस्तकाचा मध्यभाग जी टाळू तीमध्यें प्राण स्थिर होतो तेव्हां त्या योग्याला निर्विकल्प समाधींत निर्वाणस्थिति प्राप्त होते. त्यापासूनं त्याला काळ व कर्म इत्यादि कोणाचें भय राहत नाहीं. त्या स्थितींत जो आनंद प्राप्त होतो तो तसा पूर्वी कधींच झाला नसेल असा अलौकिक व अखंड आनंद होतो. असा आनंद ब्रह्मऋषींना प्राप्त होतो.

जशी सोन्याची, रुप्याची किंवा इतर धातूंची मूर्ति तावून काढिली किंवा पाण्यानें स्वच्छ धुतली ह्मणजे तिचा चिकटलेला मळ निघून जाऊन ती चमकूं लागते, त्याप्रमाणेंच त्या आत्मतत्त्वाचें दर्शन झालें ह्मणजे देहधारी पुरुष होतो; व ऐक्य पावून कृतार्थ होऊन त्याचा सर्व प्रकारचा शोक नाहींसा होतो. जेव्हां योगाभ्यासानें दीपासारख्या आत्मरूप पदार्थानें ब्रह्मरूप पदार्थास पाहतो; तेव्हां जन्मरहित, अविकार्य व अविद्येच्या सर्व गुणांनीं अस्पृष्ट अशा देवाचें ज्ञान होऊन सर्व पाशांतून सुटतो; तिन्ही लोकांत गमन करितो; व शेवटीं जीवात्मा स्वतः ब्रह्मसरूप होतो.

एकेक अवस्थेचा जय करीत करीत जाऊन त्यांहून पुढें ज्या भूमि ह्मणजे अवस्था आहेत त्यांना जिंकण्याची इच्छा धरावी.

**त्रयमन्तरङ्गं पूर्वेभ्यः ॥ ७ ॥**

योगाच्या आठ अंगांपैकीं पहिलीं यम, नियम, आसन, प्राणायाम व प्रत्याहार हीं पांच योगास बहिरंग साधनें आहेत, व त्यांपेक्षां धारणा, ध्यान व समाधि हीं तीन अंतरंग साधनें आहेत. ह्मणजे संप्रज्ञात समाधीस प्रतिबंध करणारा जो चित्त, शरीर, प्राण व इंद्रियें यांचा मल तो दूर करण्यास पहिलीं पांच अंगें उपयोगी पडतात; नंतर संप्रज्ञात समाधि सिद्ध होतो, अशा परंपरेनें उपयोगी पडतात ह्मणून तीं बहिरंग साधनें आहेत. आणि धारणा, ध्यान व समाधि हीं तीन अंगें तर संप्रज्ञात समाधीस साक्षात् उपयोगी पडतात; ह्मणून तीं अंतरंग साधनें आहेत. ( बहिरंग ह्मणजे परंपरेनें उपयोगी पडणारें व अंतरंग ह्मणजे साक्षात् उपयोगी पडणारें. )

**तदपि बहिरङ्गं निर्बीजस्य ॥ ८ ॥**

ज्या वृत्तींत कोणताही विषय येत नाहीं अशा वृत्तिशून्य समाधीला अर्थात् असंप्रज्ञात समाधीला तर तीं धारणादिक तीन अंगें सुद्धां बहिरंग ह्मणजे परंपरेनेंच उपयोगी पडणारीं आहेत; साक्षात् नाहींत.

**व्युत्थाननिरोधसंस्कारयोरभिभवप्रादुर्भावौ निरोधक्षण-चित्तान्वयो निरोधपरिणामः ॥ ९ ॥**

व्युत्थान ह्मणजे संप्रज्ञात समाधि व निरोध ह्मणजे परवैराग्य. या दोहोंपासून एकप्रकारचे संस्कार उत्पन्न होत असतात. त्यांपैकीं ज्या वेळेस व्युत्थानसंस्कार क्रमानेंच जसजसा कमी कमी होत जातो; तसतसा निरोधसंस्कार क्रमानेंच अधिकाधिक वाढत

**सू० ९ टी० १** अथवा व्युत्थान ह्मणजे १ क्षिप्त, २ मूढ व ३ विक्षिप्त अशा तीन चित्ताच्या प्रथमच्या अवस्था; व निरोध ह्मणजे चित्ताच्या शेवटच्या (पांचव्या) अवस्थेंतील सात्विक परिणाम होय. त्यांत १ रजोगुण अधिक वाढल्यामुळें अनेक विषयांवर जाणारें अर्थात् अत्यंत चंचल असें जें चित्त त्यास क्षिप्त असें ह्मणतात. २ जें तमोगुण अधिक वाढल्यामुळें निद्रा इत्यादि अवस्थेंत असणारें तें मूढ. ३ जें सत्वगुण अधिक वाढल्यामुळें समाधि लागत असतांही यत्किंचित् रजोलेशानें अन्यविषयांवर जाणारें; त्यांत चित्तवृत्तिनिरोध क्षिप्तापेक्षां अधिक असतो ह्मणून त्यास विक्षिप्त असें ह्मणतात. व सर्व चित्तवृत्तींचा लय होऊन केवळ संस्कार मात्र शेष राहणें यास निरोध, व हा संस्कार चित्ताच्या ज्या अवस्थेंत उत्पन्न होत असतो त्या अवस्थेस निरुद्ध ह्मणतात. ज्या वेळीं या सांगितलेल्या व्युत्थानापासून उत्पन्न झालेला संस्कार कमी कमी होत जातो; व निरोधापासून उत्पन्न होणारा संस्कार वाढत जातो त्या वेळेस चित्तावर दोन्ही प्रकारचे धर्म असतात ह्मणून त्याला निरोधपरिणाम असें ह्मणतात.

जातो, त्या निरोधकाळच्या चित्ताचा संबंध दोहींकडे ह्मणजे व्युत्थानअवस्थेकडे व निरुद्ध-अवस्थेकडे असतो ह्मणून त्या वेळच्या चित्ताच्या स्थितीस निरोधपरिणाम असें ह्मणतात.

**तस्य प्रशान्तवाहिता संस्कारात् ॥ १० ॥**

वर सांगितलेल्या निरोधसंस्कारामुळें चित्ताचा ओघ शांतपणें वाहूं लागतो; ह्मणजे त्याचें जें इकडे तिकडे भटकत फिरणें अशा प्रकारचा विक्षेप नाहींसा झाल्यामुळें चित्त ज्या वस्तूवर लावावें त्या ठिकाणीं तें स्थिर होतें.

**सर्वार्थतैकाग्रतयोः क्षयोदयौ चित्तस्य समाधिपरिणामः ॥ ११ ॥**

सर्वार्थता ह्मणजे चित्ताची अनेकविषयाकारता ( चित्ताचें चंचलपणानें अनेक विषयांवर जाणें ) व एकाग्रता याचें लक्षण पुढच्या सूत्रावर सांगणार आहे ते, हे दोन्ही चित्तधर्म आहेत. यांपैकीं ज्या वेळीं सर्वार्थतेचा अगदीं क्षय ह्मणजे नाश होऊन एकाग्रता झाली ह्मणजे सत्वगुणाची वृद्धि होऊन चित्त स्थिर राहणें यास समाधिपरिणाम ह्मणतात. पहिला जो निरोधपरिणाम सांगितला त्यापेक्षां या समाधिपरिणामांत हा विशेष आहे कीं, त्या निरोधपरिणामांत व्युत्थानसंस्कार हा अगदीं पराभव पावला तरी गुप्त रीतीनें असतो; ह्मणून एकाग्रता होत नाहीं; आणि समाधिपरिणामांत सर्वार्थता अगदीं नाहींशी होऊन एकाग्रता उत्पन्न होते.

**ततः पुनः शान्तोदितौ तुल्यप्रत्ययौ चित्तस्यैकाग्रतापरिणामः ॥ १२ ॥**

त्यानंतर सर्वार्थतेचा अगदीं क्षय झाल्यामुळें गेलेला अनुभव व हल्लीं होत असणारा अनुभव एकसारख्याच आकारानें होणें ह्मणजे चित्ताला मध्यें अंतर न पडतां एकसारखें एकाच पदार्थाचें भान होणें हा एकाग्रतापरिणाम होय.

**एतेन भूतेन्द्रियेषु धर्मलक्षणावस्थापरिणामा व्याख्याताः ॥ १३ ॥**

निरोधपरिणाम, समाधिपरिणाम व एकाग्रतापरिणाम हे चित्ताचे तीन परिणाम सांगितले; यावरून, आकाश इत्यादि स्थूल भूतें व शब्द, स्पर्श इत्यादि सूक्ष्म भूतें तशींच ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें व अंतःकरण ह्यांचे सुद्धां धर्म, लक्षण व अवस्था असे तिन प्रकारचे परिणाम आहेत असें जाणावें. त्यांत एका धर्मीचा पूर्वीं असलेला धर्म नाहींसा होऊन त्यास दुसरा धर्म प्राप्त होणें यास धर्मपरिणाम असें ह्मणतात. ( ज्यावर धर्म असतो तो धर्मी, किंवा याचें दुसरें लक्षण पुढच्या सूत्रांत सांगणार आहेत. ) जसा मातीच्या गोळ्याचा

---

सू० ९ टी० २ पहिल्या पादांत आठराव्या सूत्रांत सांगितलेला जो असंप्रज्ञात समाधि तो हाच होय; ज्याचें विशेष स्वरूप तसेंच फल भगवान् सूत्रकार पुढें चवथ्या पादांत २९ व्या सूत्रापासून तें थेट ग्रंथसमाप्तिपर्यंत सांगणार आहेत.

घट (घागर) तयार केला असतां धर्मी जो मातीचा गोळा त्यावर असणारा जो गोळेपणा धर्म, तो जाऊन त्यास घटपणा हा धर्म प्राप्त झाला ह्मणून हा धर्मपरिणाम होय. आतां त्याच घटाची जर तयार करण्याच्या पूर्वीची स्थिति नाहींशी होऊन तो तयार झाला किंवा तो तयार होऊन फुटला तर त्यानें यांत पुढें प्राप्त होणाऱ्या स्थितीचा त्याग करून हल्लींची स्थिति स्वीकारली; व तिचाही त्याग करून पुनः पूर्वीची स्थिति स्वीकारिली ह्मणून याला लक्षणपरिणाम ह्मणतात. तात्पर्य, लक्षणशब्दाचा अर्थ व्यावर्तक ह्मणजे विशेषण. तीं विशेषणें तीन; भविष्य, वर्तमान व भूत हे तीन काल होत. आतां त्या त्या काळांत असणाऱ्या घटानें इतर काळच्या घटाची व्यावृत्ति (निराकरण) होते ह्मणून वर दिलेलें उदाहरण लक्षणपरिणामाचें आहे. याचप्रमाणें त्याच घटाचे धर्म व लक्षण हीं दोन्ही पहिल्या क्षणीं जशीं होतीं तशींच जरी तीं दुसऱ्या क्षणांत असलीं तथापि त्या घटावर प्रथम जो 'नवा घट' असा व्यवहार होऊन कांहीं दिवसांनीं त्यालाच 'जुना घट' असा व्यवहार होऊं लागतो. त्यांत प्रत्येक क्षणीं बदल झालेला जरी आपणांस स्पष्टपणें लक्षांत आला नाहीं तरी नव्याचा एकदम जुना होणें संभवत नसल्यामुळें प्रत्येकक्षणीं अवस्थांतर होत आहे असें सहज सिद्ध होतें. हा अवस्थापरिणाम समजावा.

**शान्तोदिताव्यपदेश्यधर्मानुपाती धर्मी ॥ १४ ॥**

ज्यांचा व्यापार पूर्वी संपला गेला ते शांत ह्मणजे भूतकालचे; ज्यांचा व्यापार हल्लीं सुरू आहे ते उदित ह्मणजे वर्तमानकालचे; व जे व्यवहार करण्यास अशक्य असून ह्मणजे स्पष्टपणें सांगतां येण्याजोगें नसून केवळ मृत्तिका इत्यादि धर्मीच्या ठिकाणीं शक्तिरूपानें असतात ते अव्यपदेशी ह्मणजे अनागत अर्थात् पुढें उत्पन्न होणारे; असे तीन प्रकारचे धर्म, त्यांना अनुसरून जो नियमानें राहतो त्यास धर्मी ह्मणतात. जसें, सोन्याचीं प्रथम कुंडलें, नंतर त्यांचीं पदकें वगैरे केलीं तर, सोनेंपणा प्रत्येकामध्यें कायम असून त्या कुंडलांचा कुंडलपणा मात्र जातो व त्यांस पदकपणा येतो. ह्मणून सोनें हें धर्मी होय.

**क्रमान्यत्वं परिणामान्यत्वे हेतुः ॥ १५ ॥**

प्रथम माती पिठासारखी बारीक असते, नंतर तींत पाणी घालून मळून तिचा चिखलाचा गोळा तयार होतो; नंतर त्याला चाकावर घालून दंड व हातांच्या व्यापारानें त्याचा घडा बनतो. पुनः तो फुटला ह्मणजे त्याचीं दोन अथवा अधिक शकलें (तुकडे) होतात; पुनः त्यांला कुटलें असतां पूर्वीप्रमाणें वस्त्रगाळ माती तयार होते. याप्रमाणें एका मातीच्या इतक्या प्रकारच्या अवस्थांचा जो भिन्न भिन्न क्रम दृष्टीस पडतो, तोच, मातीचे धर्मरूपपरिणाम हे भिन्न भिन्न आहेत अशाविषयीं द्योतक आहे. धर्मीच्या परिणामाविषयीं जें आतां

सांगितलें, त्याचप्रमाणें त्या धर्मीच्या ठिकाणीं लक्षणपरिणाम व अवस्थापरिणाम भिन्न भिन्न होण्याला कारण पूर्वीचा क्रमच होय. येथें मृत्तिका इत्यादिक धर्मी परिणामी असले तरी ते नित्य व एक आहेत, व घटादि परिणामरूप धर्म हे भिन्न भिन्न असून त्यांचीं लक्षणें व अवस्था सुद्धां निरनिराळ्या आहेत ह्मणून ह्या सिद्धांतांत धर्म अनेक झाले तरी धर्मी एक असल्यामुळें बौद्धांचा क्षणिकत्ववादाचा प्रसंग येत नाहीं.

**परिणामत्रयसंयमादतीतानागतज्ञानम् ॥ १६ ॥**

पूर्वी जे धर्म, लक्षण व अवस्था असे तीन परिणाम सांगितले, त्यांच्या ठिकाणीं संयम केल्यानें योग्याला भूतकाळचें व भविष्यकाळचें ज्ञान चांगलें होतें; कारण, चित्त हें शुद्ध सत्वगुणाच्या योगानें नेहमीं प्रकाशरूप असल्यामुळें त्याला सर्व पदार्थ जाणण्याची शक्ति आहे. मात्र योगास मध्यें जे जे अडथळे येतील ते सर्व योग्य उपाय योजून दूर केले पाहिजेत; ह्मणजे आरशाप्रमाणें स्वच्छ अशा त्या चित्ताला एकाग्रतेमुळें सर्व समजण्याची शक्ति येते.

**शब्दार्थप्रत्ययानामितरेतराध्यासात्संकरस्त-**
**त्प्रविभागसंयमात्सर्वभूतरुतज्ञानम् ॥ १७ ॥**

ज्याचें कर्णेंद्रियानेंच मात्र ज्ञान होतें तो शब्द; तो आकाशाचेच ठिकाणीं राहणारा गुण आहे. शब्द दोन प्रकारचा; एक ध्वन्यात्मक ह्मणजे ध्वनिरूप व दुसरा वर्णात्मक ह्मणजे ज्यांत वर्ण ठरलेल्या क्रमानें असतात व ज्याच्यापासून मनाला नियमित अर्थबोध होतो तो. ध्वनिरूप शब्द ह्मटला ह्मणजे भेरी (नगारा) इत्यादिकांपासून होणारा. वर्णात्मक शब्दाला व्याकरणशास्त्रांत स्फोट असें ह्मणतात. तो दोन प्रकारचा; एक पदस्फोट व दुसरा वाक्यस्फोट. त्यांत 'गाय' हें एक पद आहे ह्मणून हा पदस्फोट होय; व 'गाय आण' हें एक वाक्य आहे ह्मणून हा वाक्यस्फोट होय. या दोन्ही प्रकारच्या स्फोटांमध्यें (शब्दांमध्यें) अर्थाचा बोध करण्याची शक्ति आहे. अर्थ ह्मणजे द्रव्य, गुण, कर्म व जाति इत्यादिरूप. त्यांत पृथ्वी, उदक, तेज, वायु, आकाश, काल, दिशा, आत्मा व मन हीं नऊ द्रव्यें होत. रूप, रस, गंध, स्पर्श इत्यादि तर्कशास्त्रांत सांगितलेले चोवीस गुण होत. वर फेंकणें, खालीं झोंकणें, गुंडाळणें, पसरणें व जाणेंयेणें हीं पांच प्रकारचीं कर्मे; अथवा करणें, बोलणें, चालणें इत्यादिक कर्में ह्मणजे क्रिया होत. आणि ब्राह्मणपणा, क्षत्रियपणा इत्यादि ह्या जाती होत. जो शब्द श्रवणापासून होणारा व अर्थ आहे विषय ज्याचा असा चित्ताच्या ठिकाणीं होणारा तो प्रत्यय ह्मणजे ज्ञान होय. ज्ञान ह्मणजे विषयाकार बुद्धीची वृत्ति. जसें, गायीचें ज्ञान ह्मणजे गायीचा पोळी, शिंगें, शेंपूट व कांस वगैरे आकार बुद्धींत येणें. याप्रमाणें हे शब्द, अर्थ व प्रत्यय (ज्ञान) यांचे मार्ग अगदीं निरनिराळे असतांही व्यवहारांत बालापासून तें पंडितापर्यंत त्यांविषयीं गोंधळ होऊन तीं एकच आहेत

असें वाटतें. जसें एकाद्याला 'गाय आण' ह्मणून ह्मटलें असतां तो, ज्यावर गोत्व ह्मणजे गायपणा ही जाति व पूर्वीचा सांगितलेला आकार असतो तो पदार्थ घेऊन येतो. त्याच्या समजुतींत 'गाय' हा शब्द, 'गाय' या शब्दाचा अर्थ व 'गाय' या शब्दापासून त्याच्या मनाला झाला जो बोध ह्मणजे ज्ञान, हीं सर्व एकच आहेत असें असतें; आणि शब्द, अर्थ व ज्ञान यांचा निरनिराळा भेद असल्याचें त्यास समजत नसल्यामुळें त्याला जर कोणी 'गाय आण' असें ह्मटलें, व यांत शब्द कोणता, अर्थ कोणता व ज्ञान कोणतें असें विचारिलें तर तो तिन्ही प्रश्नांचें उत्तर 'गाय' असेंच देईल. याप्रमाणें जो शब्दादिकांचा एकमेकांच्या अभेदाच्या अध्यासानें (भ्रमानें) संकर (एकीभाव) झाला आहे ह्मणजे शब्दादिक शास्त्रानें व युक्तीनें निरनिराळे प्रसिद्धपणें असतां ते एकरूपानें भासत आहेत; त्यांचे शास्त्र व युक्तीनें निरनिराळे भाग पाडून त्यावर जो संयम करितो, त्याला सर्व मनुष्य, पशु, पक्षी, जलचरप्राणी इत्यादिकांच्या शब्दांचें ज्ञान होतें, ह्मणजे ह्या अर्थाचा शब्द तो प्राणी उच्चारीत आहे, असें तो संयम करणारा पुरुष समजतो.

**संस्कारसाक्षात्करणात्पूर्वजातिज्ञानम् ॥ १८ ॥**

चित्ताचें वासनारूप संस्कार दोन प्रकारचे; त्यांत कांहीं संस्कार असे आहेत कीं, ज्यांयोगानें पूर्वीची आठवण मात्र होते; आणि कांहीं संस्कार असे आहेत कीं, ज्यांच्या योगानें जाति, आयुष्य व भोग हे परिणाम उत्पन्न होतात. जसें, धर्मापासून चांगली जाति, पुष्कळ आयुष्य व उपभोग प्राप्त होतात; व अधर्मापासून वाईट जाति, थोडें आयुष्य व दुःखें प्राप्त होतात. त्या संस्कारांच्या ठिकाणीं चित्ताचा संयम केला असतां ह्मणजे 'ह्या पदार्थाचा पूर्वी मी अनुभव घेतला किंवा याप्रमाणें मीं पूर्वी कृत्यें केलीं, अशा पूर्वी घडलेल्या गोष्टींकडे लक्ष देऊन त्यांजवर संयम करितो, त्या वेळेस संस्कारांस कोणी उत्तेजन देणारें नसतांही केवळ मनांत आणिल्यानें संस्कार प्रकट होऊन पूर्वी घडलेल्या सर्व गोष्टींची आठवण त्या योग्याला होते. पुढें क्रमानेंच सर्व संस्कार बुद्धीमध्यें प्रकट झाले ह्मणजे पूर्वजन्मीं अनुभविलेल्या जाति वगैरे त्याला प्रत्यक्ष दिसूं लागतात.

**प्रत्ययस्य परचित्तज्ञानम् ॥ १९ ॥**

दुसऱ्याचा चेहरा पाहून व कांहींएक चिह्नांवरून त्याचें चित्त अशा प्रकारचें आहे असें ओळखून त्याच्या चित्ताचे ठिकाणीं संयम केल्यानें दुसऱ्याच्या चित्तांत काय आहे तें सामान्यरीतीनें समजूं लागतें.

**न च सालम्बनं तस्याविषयीभूतत्वात् ॥ २० ॥**

पूर्वी जें चित्तसंयमानें परचित्तज्ञान होतें ह्मणून सांगितलें तर त्या चित्तांतील सर्व विषयांसुद्धां चित्ताचें ज्ञान होतें असें नाहीं तर हर्षादिकचिह्नांवरून फक्त हें चित्त चांगलें आहे

एवढेंच अनुमान होतें. कारण पूर्वजन्मींचे संस्कार ओळखंण्याला जशीं कांहीं चिह्नें आहेत; तसें दुसऱ्याच्या चित्तांत विषय काय आहे हें समजण्याला कांहीं साधन नाहीं. आतां जर दुसऱ्याचें चित्त प्रथमतः साधारण ओळखून घेऊन नंतर आपल्या चित्ताचा संयम त्या ठिकाणीं करून परचित्ताचा साक्षात्कार झाल्यावर त्या वेळीं ह्या चित्ताचा विषय काय आहे असें आपल्या चित्तांत आणील तर त्या वेळचा विषय त्या योग्याला समजेल, ही गोष्ट निराळी आहे.

**कायरूपसंयमात्तद्ग्राह्यशक्तिस्तम्भे चक्षुःप्रकाशासंप्रयोगेऽन्तर्धानम् ॥ २१ ॥**

शरीराचें रूप हें डोळ्यांनीं दिसणारा गुण आहे; त्या आपल्या शरीररूपावर चित्त एकाग्र केलें असतां दुसऱ्याची रूप दिसण्याची जी डोळ्याची शक्ति; तिचा प्रतिबंध होऊन योगी आपल्या इच्छेप्रमाणें कोणाला दिसेनासा होतो. याचप्रमाणें आपल्या शब्द, स्पर्श इत्यादिकांवर चित्ताचा संयम केला असतां दुसऱ्यांला आपला शब्द ऐकू येत नाहीं व स्पर्श होत नाहीं, इत्यादि सिद्धी प्राप्त होतात.

**सोपक्रमं निरुपक्रमं च कर्म तत्संयमादपरान्तज्ञानमरिष्टेभ्यो वा ॥ २२ ॥**

जें कर्म पूर्वजन्मांत केलें आहे तें संस्काररूपानें या जन्मांतही असतें. तें पूर्वकर्म दोन प्रकारचें,–१ सोपक्रम आणि २ निरुपक्रम. त्यांपैकीं ज्या कर्मापासून फल लवकर प्राप्त होतें तें सोपक्रम; जसें, उन्हांत पसरलेलें ओलें वस्त्र लवकर वाळतें त्याप्रमाणें. आणि ज्याचें फल कांहीं कालांतरीं उत्पन्न होणारें असतें तें निरुपक्रम. जसें, त्याच ओल्या वस्त्राचा पिळा, जेथें ऊन्ह नसेल तेथें नुसता ठेवून दिला असतां तो कांहीं काळानें वाळतो तसें. अशा दोन प्रकारच्या कर्मांच्या ठिकाणीं जो चित्तसंयम करितो ह्मणजे 'काय, माझ्या कर्मांचें फल मला लवकर मिळणार किंवा कांहीं कालांतरीं प्राप्त होणार आहे' असें ध्यान करितो त्याला आपण अमुक ठिकाणीं अमुक वेळीं मरूं असें ज्ञान होतें. त्यांत सोपक्रम कर्माचा साक्षात्कार झाला असतां त्याचें फल लवकर भोगून संपवून टाकण्याकरितां योगी एका वेळींच अनेक देह धारण करून त्यांनीं सर्व फल उपभोगानें सारून देहत्याग करितो; नाहींतर फल न संपल्यामुळें मरणाला अवकाश लागेल. १ आध्यात्मिक, २ आधिभौतिक व ३ आधिदैविक अशीं तीन प्रकारचीं अरिष्टें आहेत. त्यांत कानांचीं भोंकें बंद केलीं असतां प्राणवायूचा आवाज ऐकूं न येणें, इत्यादिक आध्यात्मिक अरिष्टें समजावीं. भयंकर पुरुष ह्मणजे यमदूत वगैरेंचें दर्शन होणें, इत्यादि आधिभौतिक; व एकाएकीं स्वर्ग वगैरे पदार्थ दिसणें, इत्यादि आधिदैविक अरिष्टें समजावीं. अशा अरिष्टांवरून सुद्धां सर्वाला आपला मरणकाळ जवळ आला असें समजतें.

**मैत्र्यादिषु बलानि ॥ २३ ॥**

मैत्री, दया, आनंद व उदासीनता ह्यांचीं लक्षणें पूर्वीं (स० सू० ३३ त) सांगितलीं.

यांच्या ठिकाणीं जर संयम केला तर त्यात्या संबंधाचें बल प्राप्त होतें. ह्मणजे तो योगी सर्व प्राण्यांला सुख देणारा व सर्वांचा मित्र असा होतो; व अनाथांला दुःखापासून सोडविणारा व दुष्टपक्षाचा अभिमान न धरणारा असा होतो.

बलेषु हस्तिबलादीनि ॥ २४ ॥

हत्ती, मारुति, भीमसेन, गरुड इत्यादिकांपैकीं ज्याज्या बलाच्या ठिकाणीं चित्त एकाग्र करावें, तींतीं हत्ती इत्यादिकांचीं बलें प्राप्त होतात; कारण चित्ताच्या ठिकाणीं सर्व प्रकारचें सामर्थ्य स्वाभाविक आहे.

प्रवृत्त्यालोकन्यासात्सूक्ष्मव्यवहितविप्रकृष्टज्ञानम् ॥ २५ ॥

पूर्वी ज्योतिष्मती नांवाची प्रवृत्ति सांगितली, तिच्या सात्विक प्रकाशाच्या योगानें सर्व विषयांचे ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां तेणेंकरून जें विषयांचें ज्ञान होतें त्या ज्ञानापासून आपल्या अंतःकरणांत व इंद्रियांचे ठिकाणीं विलक्षण शक्ति प्राप्त होते, त्या-योगानें परमाणु इत्यादि सूक्ष्म पदार्थ, जमिनींत पुरून ठेवलेलें द्रव्य व फार दूर असलेल्या मेरुपर्वतावर असणारीं रसायनें इत्यादि पदार्थांचें ज्ञान होतें.

भुवनज्ञानं सूर्ये संयमात् ॥ २६ ॥

सूर्यमंडलाचे ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां घट इत्यादिक पदार्थ जसे आपण प्र-त्यक्ष पाहतों त्याप्रमाणें चवदा भुवनांचें ज्ञान उत्तमरीतीनें होतें. तीं चवदा भुवनें व्यासभाष्यांत विस्तारपूर्वक सांगितलीं आहेत.

चन्द्रे ताराव्यूहज्ञानम् ॥ २७ ॥

चंद्राच्या ठिकाणीं चित्तसंयम केला असतां सर्व नक्षत्रसंबंधीं ज्ञान होतें; ह्मणजे सूर्याच्या तेजामुळें जें नक्षत्रांचें ज्ञान होत नाहीं, तें होतें.

ध्रुवे तद्गतिज्ञानम् ॥ २८ ॥

ध्रुव नक्षत्राचे ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां प्रत्येक ताऱ्याची गति इतक्या वेळांत इतकी आहे ह्मणजे हें नक्षत्र व हा ग्रह अमुक काळांत अमुक राशीवर व अमुक नक्षत्रावर जाईल अशा प्रकारचें ज्ञान उत्पन्न होतें.

नाभिचक्रे कायव्यूहज्ञानम् ॥ २९ ॥

सोळा पाकळ्यांचें एक चक्र जें शरीराच्या मध्यभागीं सांगितलें आहे त्याला नाभि-चक्र ह्मणतात; त्याचे ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां शरीरांत जे रस, मल, धातु, नाड्या वगैरे आहेत, त्यांचें उत्तम रीतीनें ज्ञान होतें.

कण्ठकूपे क्षुत्पिपासानिवृत्तिः ॥ ३० ॥

जिभेच्या खालीं मध्यभागीं जी एक शीर आहे, तिच्या खालीं गळ्यांत एक कूप

ह्मणजे खळगा आहे; जेथें प्राण इत्यादि वायूचा स्पर्श झाल्यामुळें भूक व तहान हीं लागत असतात, त्याला कंठकूप असें ह्मणतीत; तेथें चित्त एकाग्र केलें असतां योग्याला भूक व तहान लागत नाहींत.

कूर्मनाड्यां स्थैर्यम् ॥ ३१ ॥

पूर्वी जो कंठकूप ह्मणून सांगितला त्याच्या खालच्या बाजूला हृदयाच्या ठिकाणीं एक कासवाच्या आकाराची नाडी आहे तिला कूर्मनाडी ह्मणतात; तेथें संयम केल्यानें ह्मणजे संयमानें चित्त तिच्यामध्यें प्रवेश करील तर त्याला व शरीराला स्थिरता प्राप्त होईल.

मूर्धज्योतिषि सिद्धदर्शनम् ॥ ३२ ॥

मस्तकांत ब्रह्मरंध्र नांवाचें एक छिद्र ( भोंक ) आहे, तें सुषुम्नानाडीच्या योगानें व हृदयांतील चित्तरूप मण्याच्या प्रकाशानें फारच तेजस्वी आहे. त्याच्या ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां योग्याला जगांतील सिद्ध पुरुष गुप्त असले तरी दिसूं लागतात; ह्मणजे त्यांचें दर्शन होतें.

प्रातिभाद्वा सर्वम् ॥ ३३ ॥

कांहीं कारणावांचून केवल मनापासून जें ज्ञान उत्पन्न होणारें व ज्यांत कांहीं असंगतपणा नसतो, त्यास प्रतिभा ह्मणतात; त्या ठिकाणीं चित्ताचा संयम केला असतां जशी सूर्योदय होण्यापूर्वी प्रथम सूर्याची प्रभा प्रकट होते, व त्या योगानें आतां सूर्योदय होणार असा पूर्ण निश्चय होतो; तसें विवेकख्याति आतां पुढें निश्चयानें होणार अशाचें सूचक असें सर्व पदार्थांविषयींचें ज्ञान उत्पन्न होतें. त्याला प्रतिभेनें ह्मणजे केवल तर्कानें झालेलें ह्मणून प्रातिभज्ञान ह्मणतात. तें ज्ञान झालें असतां मग दुसऱ्या चित्तसंयमाची गरज न लागतां केवल त्या प्रातिभज्ञानाचेंच योगी सर्व जाणतो.

हृदये चित्तसंवित् ॥ ३४ ॥

हृदय ह्मणून एक शरीराचा विशेष भाग आहे. त्या ठिकाणीं खालीं तोंड केलेलें असें एक कमल आहे तेथें चित्ताची राहण्याची जांगा आहे; त्या ठिकाणीं संयम केला असतां योग्याला आपल्या तसेंच दुसऱ्याच्या चित्ताचें वासनासहित ज्ञान होतें.

सत्वपुरुषयोरत्यन्तासंकीर्णयोः प्रत्ययाविशेषो भोगः परार्थात्स्वार्थसंयमात्पुरुषज्ञानम् ॥ ३५ ॥

सत्व ह्मणजे बुद्धि, ही प्रकाशरूप व सुखादिरूप असा अचेतन प्रकृतीचा एक विशेष परिणाम असून भोग्य आहे; व पुरुष ह्मणजे आत्मा हा भोक्ता असून चेतन आहे. याप्रमाणें हे दोघे अगदीं निराळे असतां बुद्धीचे जे सुख, दुःख, मोह, ज्ञान वगैरे परिणाम त्यांचा प्रतिबिंबद्वारानें पुरुषावर आरोप होतो; ह्मणजे बुद्धीमध्यें पुरुषाचें प्रतिबिंब पडलें असतां ( जसें पाणी हालूं लागलें किंवा गढूळ झालें असतां त्यामध्यें पडलेलें जें चंद्र इत्यादिकांचें प्रतिबिंब तेंही हालतेंसें व मलिन झालेंसें भासतें; नंतर भ्रमानें 'चंद्र हालतो,' व 'चंद्र मलिन

दिसतो' इत्यादि व्यवहार साक्षात् चद्रादिकांवर होऊं लागतो; त्याप्रमाणें ) त्या प्रतिबिंबावर सुख, दुःख, मोह, ज्ञान इत्यादि बुद्धीचे विकार भासूं लागतात. नंतर अज्ञानानें साक्षात् पुरुषावरच सुखी, दुःखी, मूढ, ज्ञानी इत्यादि एकरूपत्वानें व्यवहार होऊं लागतो. तो जो अविवेकामुळें सुखादिकांचा पुरुषावर आरोप तोच पुरुषाला भोग व त्याचा पुरुष हा भोक्ता होय. तो भोग बुद्धीच्या ठिकाणीं असल्यामुळें त्याला भोग्यत्व आहे ह्मणून तो परार्थ ह्मणजे आत्म्याकरितां भोग आहे; त्या परार्थभोगाहून भिन्न असा केवल पुरुषस्वरूपाच्या आश्रयानें असणारा जो स्वार्थ भोग ह्मणजे अहंकाररहित बुद्धीमध्यें पडलेलें चैतन्याचें प्रतिबिंब त्या ठिकाणीं चित्ताचा संयम केला असतां योग्याला आत्म्याचें ज्ञान होतें. तात्पर्य, आत्म्याला बुद्धि हा भोग परार्थ प्रतिबिंबद्वारा अशा परंपरेनें आहे; व प्रतिबिंब हा साक्षात् भोग आहे. त्यांत जड भोगाचे ठिकाणीं ऐक्यभान झाल्यानें आत्म्यासही सुखदुःखमोहादिक जड विकार प्राप्त झाले. त्यांना सोडून देऊन जर अन्यचैतन्यप्रतिबिंबाचे ठिकाणीं संयम केला तर चित्प्रतिबिंबही चित्स्वरूपच असल्यामुळें संयमानें योगी आपणास चित्स्वरूप जाणतो; व आत्म्याचें स्वरूप असेंच आहे ह्मणून आत्मज्ञान प्राप्त होतें असें सांगितलें. व बिंब व प्रतिबिंबाचा अभेदच असतो ह्मणून प्रतिबिंब चित्स्वरूप असें ह्मटलें:

**ततः प्रातिभश्रावणवेदनादर्शास्वादवार्ता जायन्ते ॥ ३६ ॥**

त्या स्वार्थ भोगाचे ठिकाणीं संयम केल्यापासून योग्याला प्रातिभ, श्रावण, वेदना, आदर्श, आस्वाद व वार्ता असें सहा प्रकारचें ज्ञान प्राप्त होतें. त्यांत प्रातिभ ह्मणजे पूर्वी सांगितलेलें सर्वविषयक ज्ञान; तें तप, स्वाध्याय इत्यादिकांच्या निर्मल अनुष्ठानानें शुद्ध झालेल्या केवल मनापासून उत्पन्न होतें. तें झालें असतां योगी सूक्ष्म इत्यादि पदार्थ पाहतो. श्रावण ह्मणजे श्रोत्रेंद्रियानें होणारें ज्ञान; त्यापासून योग्याला दिव्य ह्मणजे स्वर्गांतील शब्द ऐकूं येऊं लागतात. वेदना ह्मणजे स्पर्शेंद्रियानें होणारें ज्ञान; त्यापासून योग्याला स्वर्गांतील स्पर्शाचें ज्ञान होतें. आदर्श ह्मणजे चक्षुरिंद्रियानें होणारें ज्ञान; त्या योगानें स्वर्गांतील रूपाचें ज्ञान होतें. आस्वाद ह्मणजे रसनेंद्रियानें होणारें ज्ञान; तें झाल्यामुळें योग्याला स्वर्गांतील रसाचें ज्ञान होतें. वार्ता ह्मणजे घ्राणेंद्रियानें होणारें ज्ञान; तें झाल्यापासून योग्याला स्वर्गांतील गंधाचें ज्ञान होतें. असें हें सहा प्रकारचें ज्ञान व्युत्थानअवस्थेंत सुद्धां कायम राहतें.

**ते समाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः ॥ ३७ ॥**

पूर्वी ज्या प्रातिभ इत्यादिक सिद्धी सांगितल्या त्या असंप्रज्ञात समाधींत तत्पर झालेल्या योग्याला समाधीस विघ्न करणाऱ्या आहेत; ह्मणजे त्या प्राप्त झाल्यामुळें आनंद, आश्चर्य इत्यादिक उत्पन्न होऊन समाधीस कमीपणा येतो. याकरितां मुमुक्षु त्यांच्या लोभांत पडत नाहीं. आतां ज्या वेळेस व्युत्थान अवस्था असते त्या वेळेस तर त्याच सिद्धी योग्याला सुखकारक होतात.

**बन्धकारणशैथिल्यात्प्रचारसंवेदनाच्चित्तस्य परशरीरप्रवेशः ॥ ३८॥**

सर्व प्रदेशांत व्याप्त होणें हा चित्ताचा स्वभाव खरा, परंतु धर्म व अधर्मरूप कारणानें तें केवळ आपल्या शरीरांतच बांधल्यासारखें संकोचानें राहिलें आहे. तें धर्माधर्मरूप बंधकारण संयमाच्या योगानें कमी होतें; आणीक चित्ताचा संचार करण्याचा मार्ग ज्या नाड्या त्यांच्या ठिकाणीं संयम केल्यानें संवेदन ह्मणजे अमक्या वेळेस अमुक नाडीनें चित्ताचा संचार होत आहे असें ज्ञान होतें. तसेंच प्राण व इंद्रियें यांचा संचार करण्याचा मार्ग ज्या नाड्या त्यांचें संयमानें ज्ञान होतें. तें झालें असतां जसें आपल्या किंवा दुसऱ्याच्या घरांत प्रवेश करण्याला दार इत्यादिकांचा प्रतिबंध असतो, तो दूर झाल्यानें प्रवेश सहज करितां येतो; त्याप्रमाणें आपल्या चित्ताचा मृतशरीरामध्यें अथवा जीवंत शरीरामध्यें प्रवेश करवितां येतो; त्यामागून बाकीचीं इंद्रियें सुद्धां प्रवेश करितात. यालाच परकायाप्रवेश ह्मणतात.

**उदानजयाज्जलपङ्ककण्टकादिष्वसङ्ग उत्क्रान्तिश्च ॥ ३९ ॥**

भाताच्या कोंड्याच्या ज्वालेप्रमाणें सर्व इंद्रियांपासून एकदम उत्पन्न झालेली वृत्ति तिला जीवन असें ह्मणतात. त्या वृत्तीच्या व्यापारामध्यें भेद असल्यामुळें त्यांना प्राण, अपान इत्यादि नांवांनीं व्यवहार होतो. त्यांत नाकाच्या शेंड्यापासून तें हृदयापर्यंत जो वायु व्यापार करीत असतो त्यास प्राण असें ह्मणतात. हृदयापासून तें नाभीपर्यंत जो वायु व्यापार करितो त्यास समान ह्मणतात; कारण, खाल्लेल्या अन्नाचा तो समान (सारखा) परिणाम करितो. नाभीपासून तें पायांच्या अंगठ्यापर्यंत जो व्यापार करितो, त्याला अपान ह्मणतात; कारण, तो अन्नमलाचें अपनयन (विसर्जन) करितो. नाकाच्या शेंड्यापासून तें मस्तकापर्यंत जो व्यापार करितो त्याला उदान ह्मणतात. तोच प्राण जाण्याला कारण आहे. आणि सर्व देहांत जो संचार करितो त्याला व्यान ह्मणतात. ह्या पांचांपैकीं प्राण हा सर्वांत श्रेष्ठ आहे. यांत सांगितलेल्या उदान वायूचा संयमानें जय झाला असतां बाकीच्या वायूंचा व्यापार बंद पडल्यामुळें योग्यास ऊर्ध्वगति ह्मणजे सर्वांपेक्षां वर राहण्याची गति प्राप्त होऊन तो मोठ्या नद्या वगैरे मध्यें किंवा मोठ्या गाळांत अथवा मोठाल्या कांट्यांच्या जाळ्यांत फसून राहत नाहीं; ह्मणजे तो सर्वांपेक्षां हलका झाल्यामुळें कापसाच्या गोळ्याप्रमाणें नदी इत्यादि ठिकाणीं तो पडला तरी वर येतो.

**समानजयात्प्रज्वलनम् ॥ ४० ॥**

नाभीच्या जवळ राहणारा जो जठराग्नि, त्याच्या भोंवतीं व्यापून (वेढून) राहणारा जो समानवायु त्याचा संयमानें जय झाला असतां, त्या अग्नीवरील आच्छादन दूर

झाल्यानें त्याच्या ज्वाला वर येऊं लागतात; या योगानें योगी अग्नीप्रमाणें प्रदीप्त दिसतो. याचप्रमाणें प्राणादिकांचा संयमानें जय केला असतां योग्याला आपल्या इच्छेप्रमाणें त्या त्या क्रियेची सिद्धि प्राप्त होते; असें जाणावें.

**श्रोत्राकाशयोः संबन्धसंयमाद्दिव्यं श्रोत्रम् ॥ ४१ ॥**

श्रोत्र ह्मणजे शब्दाचें ग्रहण करणारें व अहंकारापासून ज्याची उत्पत्ति असें इंद्रिय आहे; व आकाश हें शब्दतन्मात्राचें कार्य ह्मणजे शब्दतन्मात्रापासून आकाशाची उत्पत्ति आहे. श्रोत्रेंद्रिय व आकाश या दोहोंचा देशदेशिभाव ह्मणजे आधाराधेयभाव संबंध आहे; ह्मणजे कानांचीं भोंकें आधार व आकाश हें आधेय ह्मणजे त्यामध्यें राहणारा पदार्थ आहे. या आधाराधेयभाव संबंधाच्या ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां त्या योग्याचें श्रोत्रेंद्रिय फार दूरच्या व बारीक अशा शब्दाचें ग्रहण करूं शकतें.

**कायाकाशयोः संबन्धसंयमाल्लघुतूलसमापत्तेश्चाकाशगमनम् ॥ ४२ ॥**

पंचभूतांनीं तयार झालेलें शरीर व त्यास राहण्यास जागा देणारें आकाश, या दोहोंचा जो संबंध त्या ठिकाणीं चित्तसंयम केला असतां आणि कापूस वगैरे हलक्या वस्तूच्या ठिकाणीं चित्ताची तदाकार वृत्ति करून समाधि साधली असतां योगी कापसाच्या गाळ्याप्रमाणें हलका होऊन पहिल्यानें जलविहार करितो, नंतर कोळी नांवाच्या किड्यानें केलेल्या जाळ्यावरून संचार करितो, नंतर सूर्याच्या किरणांबरोबर फिरूं लागतो, नंतर इच्छेस वाटेल तिकडे आकाशांत फिरूं लागतो.

**बहिरकल्पिता वृत्तिर्महाविदेहा ततः प्रकाशावरणक्षयः ॥ ४३ ॥**

देहाच्या ठिकाणीं अहंभाव असतांच 'माझें मन बाहेर असो' अशा कल्पनेनें देहाच्या बाहेर जी मनाची वृत्ति असते ती केवळ कल्पिलेलीच ह्मणून ती कल्पिता विदेहा या नांवानें धारणा प्रसिद्ध आहे. आतां ज्या धारणेनें देहाच्या ठिकाणचा अहंभाव सुटतो आणि त्या योगानें आपले आपणच मनाला बाहेरच्या वृत्तीचा लाभ होतो ती वृत्ति या सूत्रांत सांगितलेली अकल्पिता महाविदेहा नांवाची धारणा वृत्ति होय. त्या वृत्तीच्या ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां सात्विक चित्ताच्या प्रकाशाचें जें आच्छादन ह्मणजे क्लेश, कर्म इत्यादि चित्तमल त्यांचा नाश होतो.

**स्थूलस्वरूपसूक्ष्मान्वयार्थवत्त्वसंयमाद्भूतजयः ॥ ४४ ॥**

पृथ्वी इत्यादिक पंचमहाभूतें, त्यांच्या ज्या १ स्थूलत्व, २ स्वरूपत्व, ३ सूक्ष्मत्व, ४ अन्वयत्व आणि ५ अर्थवत्त्व अशा पांच विशेष अवस्था यांच्या ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां पंचमहाभूतें योग्याच्या अगदीं स्वाधीन राहतात. ह्मणजे १ पंचमहाभूतांचें दिसण्यासारखें विशेष

आकाराचें जें रूप तें स्थूलरूप होय. २ ह्यांचीं अनुक्रमानें कठिनता, स्नेह, उष्णता, प्रेरण व अवकाश देणें हीं पांच स्वरूपें आहेत. ३ ह्या भूतांच्या अनुक्रमानें कारणरूपानें असलेलीं जीं गंध, रस, रूप, स्पर्श व शब्द हीं तन्मात्रें तीं सूक्ष्मरूपें होत. ४ प्रकाश, प्रवृत्ति व स्थिति हे तीन गुण नेहमीं सर्वत्र एक ठिकाणीं मिळून असतात हें अन्वयत्व होय. ५ त्याच गुणांमध्यें असलेली उपभोग व मोक्ष मिळवून देण्याची जी शक्ति ती अर्थवत्त्व होय. याप्रमाणें येथें ज्यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत अशा पांच अवस्थांनीं युक्त असलेल्या पंचमहाभूतांच्या प्रत्येक अवस्थेमध्यें चित्त एकाग्र केलें असतां योग्याला पंचभूतें वश होतात. चित्त एकाग्र करण्याची रीति अशी आहे कीं, पहिल्यानें स्थूलरूपाचे ठिकाणीं संयम करावा, त्यानंतर सूक्ष्मरूपाच्या ठिकाणीं संमय करावा; याप्रमाणें क्रमानें जो संयम करीत जातो त्याच्या पाठीमागें, जशा वांसराच्या पाठीमागें गायी जातात त्याप्रमाणें पंचभूतें जातात; आणि त्याचे मनोरथ पूर्ण करितात.

**ततोऽणिमादिप्रादुर्भावः कायसंपत्तद्धर्मानभिघातश्च ॥ ४५ ॥**

भूतजय झाला असतां योग्याला अणिमा इत्यादिक आठ सिद्धि प्राप्त होतात. त्यांत; १ परमाणूसारखें सूक्ष्म रूप होणें ही अणिमा सिद्धि जाणावी; २ कापसाच्या गोळ्यासारखा हलकेपणा येणें ही लघिमा; ३ मेरुपर्वतासारखा जडपणा येणें ही गरिमा; ४ बोटानें चंद्रमंडलाला मुद्धां स्पर्श होणें अशा प्रकारची जी शक्ति ती महिमा; ५ तोंडांतून निघेल त्याप्रमाणें संकल्प सिद्ध होणें ही प्राकाम्य; ६ शरीर व अंतःकरण हीं आपल्या स्वाधीन राहणें ही ईशित्व; ७ सर्वठिकाणीं वरचढपणा असणें ह्मणजे सर्व प्राणीमात्र योग्याच्या मनाप्रमाणें वागणारे असल्यामुळें त्याचें भाषण कधींही मोडीत नाहींत ही वशित्वसिद्धि; आणि ८ योग्याला ज्याविषयीं इच्छा उत्पन्न होते ती इच्छा पूर्ण होणें ही आठवी कामावसायित्व सिद्धि जाणावी. पंचभूतें स्वाधीन झाल्यानें समाधीला उपयोगी पडणाऱ्या ह्या आठ सिद्धि प्राप्त होतात. उदाहरण, योग्याला परमाणुरूप प्राप्त झालें असतां तो हिरे इत्यादि कठिन पदार्थांत मुद्धां शिरून राहतो; याचप्रमाणें इतर सिद्धि जाणाव्या. ह्या अणिमादि सिद्धींस समाधीला अनुकूल ह्मणून महासिद्धी असें ह्मणतात, ह्या प्राप्त झाल्यावर योग्याला पुढें सांगितलेली

---

सू० ४४ टी० १ आकृति, गुरुत्व, रूक्षपणा, आच्छादन करणें, स्थिरता, भिन्न भिन्न प्रकारची स्थिति, क्षमा, कृशत्व, काठिनता व सर्वप्राणिभोगभोग्यता, हे पृथ्वीचे गुण आहेत. स्नेह, सूक्ष्मत्व (विरलपणा), शुक्लत्व, मृदुत्व, गुरुत्व, शैत्य, रक्षणशक्ति, पवित्रत्व व संधि करणें हे उदकाचे गुण आहेत. ऊर्ध्व, गति, पचनशक्ति, दहनशक्ति, पवित्र करणे, लघुत्व, प्रभा, तमाचा ध्वस करण्याची शक्ति व प्रकाश हे तेजाचे गुण आहेत. वांकडी गति, पवित्रपणा, दूर सारणें, प्रेरण, बल, चांचल्य, रूपराहित्य व रूक्षता हे वायूचे गुण आहेत. सर्वत्र व्याप्ति, संधीभाव न होणें व कोणाचाही प्रतिबंध नसणे हे तीन गुण आकाशाचे आहेत. वि. भि.

शरीरसंपत्ति प्राप्त होते, आणि शरीराचें रूप इत्यादि जे गुण त्यांचा नाश कशानेंही होत नाहीं. ह्मणजे त्याच्या रूपाला अग्नि जाळूं शकत नाहीं किंवा त्याला वायु शुष्क करूं शकत नाहीं; याप्रमाणें ह्या गुणांचीं फलें समजावीं.

**रूपलावण्यबलवज्रसंहननत्वानि कायसंपत् ॥ ४६ ॥**

रूप ह्मणजे चक्षुरिंद्रियाला आवडणारा गुण, लावण्य ह्मणजे सर्वांगाची सुंदरता, बल ह्मणजे पराक्रम व वज्राप्रमाणें शरीरास कठिनपणा; या प्रकारची शरीरसंपत्ति समजावी. ही योग्यास प्राप्त होते.

**ग्रहणस्वरूपास्मितान्वयार्थवत्त्वसंयमादिन्द्रियजयः ॥ ४७ ॥**

इंद्रियांच्या १ ग्रहण, २ स्वरूप, ३ अस्मिता, ४ अन्वयत्व व ५ अर्थवत्त्व अशा पांच अवस्था प्रत्येकाच्या आहेत. त्यांत षड्ज, ऋषभ वगैरे स्वरमय शब्द; शीत, उष्ण वगैरे स्पर्श; पिंवळा, निळा इत्यादि रूप; गोड, आंबट वगैरे रस; सुरभि (चांगला वास) वगैरे गंध; हे इंद्रियांचे विषय होत. १ या प्रकारच्या विषयांकडे त्या इंद्रियाची प्रवृत्ति होणें याला ग्रहण ह्मणतात. २ इंद्रियांची साधारणपणें शक्ति दृष्टोत्पत्तीस येणें हें स्वरूप; ३ अस्मिता ह्मणजे अहंकार; ४ अन्वयत्व व ५ अर्थवत्त्व यांचा अर्थ मागील (४४ वें) सूत्रांत सांगितला आहे. इंद्रियांच्या ह्या पांच अवस्थांमध्यें संयम केला असतां इंद्रियजय होतो.

**ततो मनोजवित्वं विकरणभावः प्रधानजयश्च ॥ ४८ ॥**

इंद्रियजय झाल्यानंतर मनोजवित्व ह्मणजे मनाच्या वेगाप्रमाणें शरीराला गति प्राप्त होते ह्मणजे योग्याच्या मनांत अमुक ठिकाणीं जावयाचें आहे तर ही गोष्ट मनांत आल्याबरोबर तो त्या इच्छिलेल्या स्थळीं जाऊन पोहोंचतो; विकरण ह्मणजे इंद्रियांना देहाशिवाय आपलीं कार्यें करितां येणें; व सर्व जगत् वश होणें; ह्या गोष्टी इंद्रियजयानें प्राप्त होतात. या सिद्धींना या शास्त्रांत मधुप्रतीका ही संज्ञा आहे; कारण, जसा एवढासा जरी मध खाल्ला असतां तोंडाला गोडी आणितो त्याप्रमाणें ह्या मधुप्रतीका सिद्धी मधुर आहेत.

**सत्वपुरुषान्यतारुयातिमात्रस्य सर्वभावाधिष्ठातृत्वं सर्वज्ञातृत्वं च ॥ ४९ ॥**

पूर्वी जो स्वार्थसंयम ह्मणजे चित्प्रतिबिंबाचे ठिकाणीं संयम सांगितला, त्या स्वार्थसंयमानें चित्ताचे सर्व मल धुऊन जाऊन तें स्वाधीन झाल्यानें वशीकारनांवाचें परवैराग्य प्राप्त होतें; त्यायोगानें योग्याला बुद्धि व पुरुष हे भिन्न आहेत असें ज्ञान होतें, याला अन्यतारुयाति (भेदज्ञान) ह्मणतात. तिच्या योगानें गुण हेच कर्ते आहेत असा अभिमान नाहींसा होतो. अशा स्थितींत असलेल्या योग्यास सर्वभावाधिष्ठातृत्व ह्मणजे गुणांचे परिणाम जे सर्व भावपदार्थ, त्यावर मालकाप्रमाणें सत्ता चालविणें अशी शक्ति व सर्वज्ञातृत्व ह्मणजे भूत, वर्तमान व भविष्य या तिन्ही काळांचें यथार्थरीतीनें भेदज्ञान होणें अशा दोन प्रकारच्या शक्ती प्राप्त होतात. ह्या सिद्धींना या शास्त्रांत विशोका असें नांव आहे.

**तद्वैराग्यादपि दोषबीजक्षये कैवल्यम् ॥ ५० ॥**

विशोका इत्यादि सिद्धींविषयीं सुद्धां जर कांहीं कालानें वैराग्य प्राप्त झालें तर त्या वैराग्यापासून विशोकादि सिद्धीना कारणीभूत जी विवेकख्याति, तिच्याविषयीं सुद्धां परवैराग्य प्राप्त होतें. त्यापासून अविद्यादि क्लेश व त्यांचें बीज जो जन्मजन्मांतरींचा भ्रांति-संस्कार हे समूळ नाहींसे होतात. नंतर कैवल्य (मोक्ष) प्राप्त होतें; ह्मणजे सर्व दुःखांपासून योगी अगदीं मुक्त होतो; त्या वेळेस आत्मा आपल्या स्वरूपांत राहतो.

**स्थान्युपनिमन्त्रणे सङ्गस्मयाकरणं पुनरनिष्टप्रसङ्गात् ॥ ५१ ॥**

चार प्रकारच्या अवस्थाभेदांमुळें १ प्रथमकल्पिक, २ मधुभूमिक, ३ प्रज्ञाज्योति व ४ अतिक्रांतभावनीय असे चार प्रकारचे योगी आहेत. त्यांपैकीं १ अभ्यास करणारा असून ज्यास शुद्धतत्त्वाचें मात्र ज्ञान झालें आहे तो प्रथमकल्पिक योगी होय. २ ज्यास ऋतंभरा नांवाची प्रज्ञा प्राप्त झाली असते तो मधुभूमिक योगी; याला ऋतंभरप्रज्ञ असेंही ह्मणतात. ज्याचे स्वाधीन पंचभूतें व इंद्रियें झालीं असतात तो प्रज्ञाज्योति योगी; व ४ संयम कर-ण्याच्या पदार्थांपलीकडे जो गेला आहे तो अतिक्रांतभावनीय चवथ्या प्रकारचा योगी होय. तो चवथा योगी ज्याच्या सात प्रकारच्या प्रांतभूमिप्रज्ञा (सात पायऱ्या) सांगितल्या आहेत अशा समाधीला जाऊन पोहोंचलेला असतो. तो त्या समाधींच्या शेवटल्या मधुमती-नामक पायरीचा अनुभव घेत असतां त्याजकडे स्वर्गांतील देवता येऊन त्याला योगापासून भ्रष्ट करण्याकरितां अतिसुंदर अप्सरा कन्या व अमृत इत्यादिक देतात. त्या वेळेस योग्यानें त्यांचें ग्रहण करूं नये; व 'काय हो हा माझ्या योगाचा प्रभाव' असें आश्चर्यही मानूं नये. जर कां त्यानें त्या वेळेस त्यांच्याविषयीं आपली इच्छा दर्शविली तर तो तत्काळ योगापासून भ्रष्ट होतो. आणि जर आश्चर्य मानलें तर आपण धन्य झालों असें मानून त्याला समाधीविषयीं उत्साह वाटणार नाहीं; याकरितां योग्यानें त्यांची इच्छा बिलकूल धरूं नये; व त्याबद्दल आश्चर्यही मानूं नये.

**क्षणतत्क्रमयोः संयमाद्विवेकजं ज्ञानम् ॥ २ ॥**

क्षण ह्मणजे कालाचा अगदीं शेवटचा भाग होय; त्यापेक्षां आणखी सूक्ष्म भाग करितां येत नाहीं. अशा क्षणाच्या ठिकाणीं अथवा त्यांची जी परंपरा त्या ठिकाणीं चित्त-संयम केला असतां पूर्वी सांगितलेलें विवेकख्यातिनांवाचें ज्ञान उत्पन्न होतें. याचें तात्पर्य असें आहे कीं, हा क्षण त्या क्षणाच्या पूर्वीचा, व तो क्षण दुसरा आहे. या अशा प्रकारच्या क्षणांच्या पूर्वापरक्रमाचे ठिकाणीं संयम केला असतां अत्यंत सूक्ष्म वस्तु जेथें मिसळून एक अशा वाटत आहेत त्या भिन्न आहेत असें स्पष्ट समजूं लागतें. त्यानंतर प्रकृतिपुरुषांचें भेदज्ञान स्पष्ट होऊन पुरुष मुक्त होतो. हें क्षणसंयमापासून होणारें ज्ञान सर्ववस्तुविषयींचें असतें असें पुढें सांगावयाचें आहे.

**जातिलक्षणदेशैरन्यतानवच्छेदात्तुल्ययोस्ततः प्रतिपत्तिः ॥ ५३ ॥**

ज्या पदार्थाहून हा पदार्थ भिन्न आहे असा भेद पडण्याला कारण १ जाति, २ लक्षण व ३ देश हे आहेत. त्यांत कोठें भेदाचें कारण जाति असते; जसें, ही गाय, हा रेडा, इत्यादि. कोठें जातीनें सारखे असले तरी लक्षणानें भेद होतो; जसें, ही चित्रवर्णाची, ही लालवर्णाची, इत्यादि. कोठें कोठें जाति व लक्षण हीं जरी एक असलीं तथापि तेथें भेद होण्याला कारण देश असतो; जसें, सारख्या प्रमाणाचे ( आकाराचे ) व सारख्या रंगाचे दोन आवळे, त्यांत एक एका ठिकाणचा व दुसरा दुसऱ्या ठिकाणचा असा असतो. यांहून चवथें कारण पदार्थांचा भेद ठरविण्यास असत नाहीं; जसें, पृथ्वीचे पांढऱ्या वर्णाचे दोन परमाणु यांचा भेद ठरवितां येत नाहीं. अशा प्रकारच्या पदार्थांच्या ठिकाणीं भेदज्ञान होण्याकरितां संयम करणाराला भेदज्ञान उत्पन्न होतें. त्या ज्ञानापासून अभ्यासाच्या योगानें सूक्ष्मतत्वांचें सुद्धां भिन्नपणानें ज्ञान होतें. सारांश, ज्या ठिकाणीं भेद कोणत्याही साधनानें ठरवितां येत नाहीं तेथें चित्त एकाग्र केलें असतां त्यांचें सुद्धां भेदज्ञान होतें.

**तारकं सर्वविषयं सर्वथाविषयमक्रमं चेति विवेकजं ज्ञानम् ॥ ५४ ॥**

पूर्वसूत्रांत सांगितल्याप्रमाणें क्षणसंयम करीत गेलें असतां त्या योगानें शेवटच्या भूमिकेंत तारक या नांवाचें विवेकज्ञान उत्पन्न होतें. त्याला तारक अशी संज्ञा असण्याचें कारण, ज्याला कधीं अंत नाहीं अशा घोर संसारसमुद्रापासून तें योग्याला तारून पार नेतें अशा अर्थाच्या धोरणानें त्याला तारक असें नांव दिलें आहे. या ज्ञानाच्या योगानें सर्व वस्तु तळहातावर घेतलेल्या आवळ्याप्रमाणें एकदम त्यांच्या स्वरूपभेदांसुद्धां स्पष्ट दिसूं लागतात; व पुरुषाविषयीं ज्ञान यायोगानें चांगलें होतें.

**सत्वपुरुषयोः शुद्धिसाम्ये कैवल्यमिति ॥ ५५ ॥**

सत्व ह्मणजे बुद्धि व पुरुष ह्मणजे आत्मा यांचीं लक्षणें पूर्वी सांगितलीं. ह्या दोहोंची शुद्धि सारखी झाली असतां योग्याला मोक्ष प्राप्त होतो. त्यांत बुद्धीची शुद्धि ह्मणजे ‘ सर्वकर्त्री बुद्धि आहे ’ असा अभिमान दूर होऊन बुद्धीचा आपल्या कारणांत लय होणें; व पुरुषाची शुद्धि ह्मणजे पुरुष हा भोग भोगणारा नसून त्यावर अज्ञानानें जो ‘ पुरुष भोग भोगतो ’ असा मनाचा खोटा ग्रह झाला आहे तो दूर होणें.

**इति श्रीपातञ्जलयोगशास्त्राभिप्राये विभूतिपादः समाप्तः ॥ ३ ॥**

ॐ तत्सत्परमात्मने नमः ।

# पातञ्जलयोगशास्त्राचा अभिप्राय.

## कैवल्यपादः ॥ ४ ॥

दुसऱ्या व तिसऱ्या पादांत मोक्षप्राप्तीचीं साधनें व सिद्धी पुष्कळ विस्तारानें सांगितल्या, परंतु मोक्षाचें स्वरूप विस्तारेंकरून सांगितलें नाहीं; तें सांगण्याकरितां ह्या कैवल्य-नामक चवथ्या पादाचा आरंभ आहे. त्यांत प्रथम मोक्षाला योग्य चित्त कोणतें, याचा निश्चय करण्याकरितां ज्यांच्या योगानें समाधिसिद्धीचा उत्कर्ष होईल अशा पांच प्रकारच्या सिद्धी सांगतात,–

**जन्मौषधिमन्त्रतपःसमाधिजाः सिद्धयः ॥ १ ॥**

कांहीं सिद्धी प्राप्त होण्यास जन्मांतर ह्मणजे अन्यःजन्म कारण असतें, कांहींस औषधि १ कारण, कितीएकांस मंत्र, कित्येकांस तप व कित्येकांस समाधि कारण असतो. अशा या पांच प्रकारच्या सिद्धी सांगितल्या; परंतु यांला वास्तविक कारण ह्मटलें तर समाधि हेंच शेवटचें मुख्य कारण होय. जन्म इत्यादि कारणें सांगितलीं तीं केवळ स्पष्ट होण्याला मात्र साधनें आहेत, ह्मणजे जशीं रसायनें हीं सर्वांनाच साधत नाहींत, तर कांहींकांनाच साधतात. याचें कारण तरी हेंच आहे कीं, ज्यांना रसायन साधतें, त्यांनीं पूर्वी ह्या जन्मीं, नाहींतर अन्य कोणत्या तरी जन्मीं समाधि साधून आपल्या अविद्यादि क्लेशाचा नाश केलेला असतो, ह्मणून त्यांना ओषधिसिद्धि प्राप्त होते. याचप्रमाणें यक्ष, गंधर्व, पक्षी इत्यादिकांस जन्मापासूनच आकाशांतून गमन करण्याची सिद्धि प्राप्त झालेली असते. कोणांला मंत्रापासून अणिमादि सिद्धी प्राप्त होतात. विश्वामित्र इत्यादिकांस तपानें सिद्धि झाली; व कांहींकांना समाधीपासून सिद्धी प्राप्त होतात, त्या पहिल्या पादांत सांगितल्या. तात्पर्य, सर्व प्रकारच्या सिद्धी योगाभ्यासानेंच प्राप्त होतात; जन्म, औषधि, मंत्र व तप हीं चार फक्त सिद्धि स्पष्ट होण्याला साधनें आहेत; या करितां योगाभ्यासच अवश्य करावा.

**जात्यन्तरपरिणामः प्रकृत्यापूरात् ॥ २ ॥**

आतां नंदीश्वर इत्यादिकांस तर योगाभ्यासानें ह्याच जन्मांत दुसरी जाति वगैरे प्राप्त झाली ह्मणजे मनुष्यपणा जाऊन देवपणा प्राप्त झाला, असें पुराणादिकांत सांगितलें आहे; तेव्हां ह्या जन्मांत ज्या सिद्धी प्राप्त होतात त्या पूर्वजन्मांत केलेल्या योगाभ्यासानेंच प्राप्त होतात हा सिद्धांत कोठें कायम राहिला ? यचें समाधान असें कीं, गव्हाचें बीज पेरिलें तर गहूंच उत्पन्न होतात; त्यापासून बाजरी, हरबरे इत्यादि कधीं उत्पन्न होत

नाहीं. असें असतां जर त्याठिकाणीं दुसऱ्या प्रकारचें धान्य उगवलेलें दृष्टीस पडलें तर त्या ठिकाणीं दुसऱ्या प्रकारचें बीज खास पडलें असावें असा सिद्धांत असतो; त्याचप्रमाणें नंदीश्वर इत्यादि उदाहरणांत मनुष्यपणा प्राप्त होण्यास जी प्रकृति ह्मणजे बीज होतें तें योगाभ्यासानें नाहींसें होऊन त्या ठिकाणीं ज्यायोगानें देवपणा प्राप्त होणारा अशा प्रकृतीची ह्मणजे बीजाची भरती (पुरवठा) झाली; त्यामुळें त्याला ह्याच जन्मांत देवपणा प्राप्त झाला.

**निमित्तमप्रयोजकं प्रकृतीनां वरणभेदस्तु ततः क्षेत्रिकवत् ॥ ३ ॥**

आतां अशी शंका येते कीं, दुसरी जाति वगैरे प्राप्त होण्यास धर्म व अधर्म इत्यादि कारणें पुराणादिकांत सांगितलीं आहेत; आणि येथें तर केवळ दुसऱ्या प्रकृतीची भरती झाली ह्मणजे अन्य जाति वगैरे प्राप्त होते असें सांगतात; हें परस्पर विरुद्ध कसें ? याचें समाधान असें कीं, धर्म व अधर्म इत्यादि जीं कारणें सांगितलीं आहेत, तीं निमित्त-कारणें होत. तीं जाति वगैरे फेरफार करीत नाहींत; तर जसा शेतकरी या शेतांतून त्या शेतांत पाणी न्यावयाचें असलें ह्मणजे पाणी जाण्यास प्रतिबंध करणारा जो मधला उंच भाग तो काढून टाकितो कीं लागलेंच पाणी आपोआप त्या शेतांत चालतें होतें; याशिवाय त्याला आणखी कांहीं दुसरी खटपट करावी लागत नाहीं. त्याप्रमाणें, आकाशामध्यें प्रत्येक क्षणीं अवयवीला (कार्याला) उत्पन्न करण्याकरितां परमाणू (प्रकृति) क्रिया (व्यापार) सतत चालवीत असतात. त्यांत पाटाच्या पाण्याला उंचवटा आड आला असतां जशी त्याची गति बंद होते त्याप्रमाणें मध्यें अविद्या इत्यादिक कांहीं अडचणी आलेल्या असतात त्यांस धर्म व अधर्म हे दूर करितात, त्याबरोबर आपोआपच त्या त्या प्रकृती आपापलीं कार्यें उत्पन्न करूं लागतात; ह्मणजे धर्मानें (पुण्यानें) अधर्माचा (पापाचा) नाश झाला असतां प्रकृती आपणच स्वतः देव इत्यादिकांचें शरीर उत्पन्न करण्यास प्रवृत्त होतात; जसें, नंदीश्वरास देवशरीरप्राप्ति. आणि पापाच्या वृद्धीनें पुण्याचा प्रतिबंध झाला असतां पशु, पक्षी इत्यादि शरीराची उत्पत्ति करितात; जशी नहुषराजास सर्पशरीरप्राप्ति.

**निर्माणचित्तान्यस्मितामात्रात् ॥ ४ ॥**

ज्या वेळेस योगाभ्यास पूर्ण होऊन योगसामर्थ्यानें योग्याला अनेक देह धारण करण्याचें सामर्थ्य येतें; त्या वेळीं तो जर अनेक देह धारण करूं लागला तर जशीं प्रकृतींच्या (पृथ्वी इत्यादिकांच्या) पुरवठ्यानें शरीरें उत्पन्न होतात त्याप्रमाणें तितक्या शरीरांगणीत अस्मिता ह्मणजे अहंकारापासून अनेक चित्तांचीही भरती होते.

**प्रवृत्तिभेदे प्रयोजकं चित्तमेकमनेकेषाम् ॥ ५ ॥**

जसा योगी स्वतांच्या शरीरांतील मन, डोळे, हात, पाय इत्यादिकांस स्वाधीन ठेवून त्यांकडून आपल्या इच्छेस वाटेल तशीं कामें करून घेतो; त्याप्रमाणेंच योगप्रभावें-

करून आपल्या एकट्या चित्ताचा अंमल त्या दुसऱ्या उत्पन्न झालेल्या चित्तांवर चालवून त्यांजकडून आपल्यास अनुकूल अशीं कामें करून घेतो; त्यामुळें अनेक चित्तांचे भिन्न भिन्न अभिप्राय न होतां योग्याला यथेच्छ भोग भोगितां येतात.

तत्र ध्यानजमनाशयम् ॥ ६ ॥

पूर्वी ज्या जन्म, ओषधि वगैरे पांच प्रकारच्या सिद्धी सांगितल्या, त्यांपासून जीं चित्तें सिद्ध होतात त्या सर्वांत समाधीपासून जें चित्त सिद्ध होतें, त्याच्या ठिकाणीं क्लेश व वासना ह्यांचा अगदीं संबंध नसतो ह्मणून तें मोक्षाला योग्य होतें.

कर्माऽशुक्लकृष्णं योगिनस्त्रिविधमितरेषाम् ॥ ७ ॥

कर्मे १ शुक्ल, २ कृष्ण व शुक्लकृष्ण अशीं तीन प्रकारचीं आहेत. त्यांत १ जें केवळ वाणी व मन यांनींच सिद्ध होणारें असें मंत्रजप, अध्ययन वगैरे व ज्यापासून शुभच फल प्राप्त होतें तें शुक्लकर्म; २ जें दुसऱ्यास दुःख देणें, मारणें वगैरे व ज्यापासून अशुभच फल प्राप्त होतें तें कृष्णकर्म; आणि ३ ज्यापासून कांहीं शुक्लकर्म घडतें व कांहीं कृष्ण-कर्महीं घडतें असें सोमयाग इत्यादि तें शुक्लकृष्ण कर्म होय. त्यांत शुक्लकर्म विद्वानांच्या हातून घडतें; कृष्णकर्म असुरांपासून व शुक्लकृष्ण असें मिश्रित कर्म स्वर्गाची इच्छा कर-णारे जे याज्ञिक लोक त्यांच्या हातून घडतें. आतां योगी जो असतो त्याच्या हातून हीं तिन्हीं प्रकारचीं कर्मे घडत नाहींत; ह्मणून त्याचें ह्या तिघांहून निराळ्याच प्रकारचें असें अशुक्लकृष्ण नांवाचें कर्म असतें. यापासून तो कोठेंही बद्ध होत नाहीं.

ततस्तद्विपाकानुगुणानामेवाभिव्यक्तिर्वासनानाम् ॥ ८ ॥

वासना दोन प्रकारच्या आहेत; त्यांत कांहीं वासनांचें जाति, आयुष्य व भोग प्राप्त होणें हें फल आहे ह्मणजे फलानंतर; समाप्त होतात त्या व कांहींकांचें केवळ स्मृति राहणें एवढेंच फल आहे. ह्या शेंकडों जन्मपर्यंत राहतात. ह्या दुसऱ्या प्रकारच्या वासनांपैकीं, ज्या कर्मविपा-काला अनुकूल असतात त्याच प्रकट होतात. याचें तात्पर्य असें कीं, ज्या कर्माच्या योगानें अनेक प्रकारच्या शेंकडों जन्मांपूर्वी देवता इत्यादिकांचें शरीर प्राप्त झालें होतें; त्यासारखेंच जेव्हां पुनः दुसरें शरीर उत्पन्न होऊं लागतें त्या वेळेस त्या शरीरास उत्पन्न करणाऱ्या कर्मफलास अनुकूल असतील अशाच त्या दुसऱ्या प्रकारच्या वासना प्रकट होतात. त्या वेळेस त्याला दुसऱ्या लोकीं असलेल्या पदार्थांचें स्मरण होतें.

जातिदेशकालव्यवहितानामप्यानन्तर्यं स्मृतिसंस्कारयोरेकरूपत्वात् ॥ ९ ॥

यावर अशी शंका येते कीं, शेंकडों जन्म मध्यें निरनिराळे गेल्यानंतर पुनः जर पूर्वीसारखा जन्म प्राप्त झाला तर यांत वास्तविक ह्मटलें ह्मणजे जो अगदीं जवळचा जन्म असेल त्यांतीलच वासना प्रकट व्हाव्या; ज्यांना व्यवधान असेल त्या होऊं नयेत. असें

असतां पूर्वसूत्रांत प्रतिकूल वासना प्रकट होत नाहींत, असें ह्मटलें; हें संभवतें तरी कसें? याचें समाधान असें कीं, ह्या भवचक्राच्या फेऱ्यांत सांपडलेला प्राणी प्रथम कोण्या एका योनीचा अनुभव घेऊन नंतर मध्यें निरनिराळ्या हजारों योनींचा अनुभव घेत घेत पुनः त्याच योनीप्रत जेव्हां येतो, तेव्हां त्या हजारों जन्मांच्या पूर्वी अनुभवलेल्या योनी-मध्यें ज्या वासना आपणांस प्रकट करविणारें असें शरीर, कर्म इत्यादि साधन अनुकूल झाल्यामुळें प्रकट झाल्या होत्या त्या, मध्यंतरीं तशा प्रकारचें प्रकट करविणारें शरीर, कर्म इत्यादि नसल्यामुळें गुप्त होत्या; नंतर जेव्हां त्यांस तशा प्रकारचें प्रकट करविणारें शरीर, कर्म इत्यादि मिळतें तेव्हां त्या पुनः प्रकट होतात. त्या वेळेस जाती, देश व काल हे जरी मध्यें अनेक प्रकारचे पुष्कळ गेले आहेत तथापि त्या वासनांना त्यांचें कांहींच व्यवधान होऊं शकत नाहीं; कारण त्यांना अनुकूल असें जें स्मृति इत्यादि फलांचें साधन त्याविषयीं त्यांचा जवळपणाच असतो; कारण, स्मृति व संस्कार हे दोन्ही एकच आहेत. याचें तात्पर्य असें कीं, प्रथम कर्म करीत असतां त्यापासून चित्तांत वासनारूप संस्कार उत्पन्न होतो; त्या संस्कारामुळें स्मृति, स्मृतीमुळें सुखदुःखांचा अनुभव, व अनुभवामुळें पुनः संस्कार इत्यादि पूर्वीच्या क्रमानें उत्पन्न होतात. आतां यांत वासना व संस्कार हे एकरूप असल्यामुळें व स्मृति ही संस्काराचाच परिणाम (कार्य) असल्यामुळें जेथें स्मृति तेथें संस्कार, व जेथें संस्कार तेथें त्या प्रकारच्या वासना असणारच; ह्मणून फलसाधनभूत स्मृति असल्यामुळें त्यासारख्या वासनाही असणारच; व त्या असतात ह्मणूनच तसें फलही प्राप्त झालेलें असतें.

**तासामनादित्वमाशिषो नित्यत्वात् ॥ १० ॥**

पूर्वसूत्रांत 'पूर्वीच्या अनुकूल तेवढ्याच वासना त्या वेळेस प्रकट होतात' असें सांगितलें; तर येथें अशी शंका येते कीं, अगदीं पहिल्या प्रथम जो अनुभव येतो, तो काय वासने-मुळेंच परंपरेनें उत्पन्न होतो किंवा त्याला कांहीं निमित्तच नसतें? याचें उत्तर असें कीं, वासना ह्या नवीन उत्पन्न होत नसून त्या अनादिसिद्ध ह्मणजे अनादिकालापासून एकसा-रख्या परंपरेनें आल्या आहेत; कारण, प्रत्येक प्राणिमात्राची अशी नेहमीं इच्छा असते कीं, 'मला सुखप्राप्तीचीं साधनें प्राप्त व्हावींत; आणि तीं मला एकदा प्राप्त झाली ह्मणजे माझ्या-पासून तीं कधीं नाहींशीं होऊं नयेत.' अशी प्राण्याला महामोह उत्पन्न करणारी इच्छा नेहमीं होत असतें. आतां ती पूर्वीच्या अनुभवावांचून संभवत नाहीं. जर असंभवामुळें अनुभवाची कल्पना पतकरिली तर त्यापाठीमागून स्मृति व त्या मागून वासनाही गळ्यांत पडली. तात्पर्य, वासनांचें कारण आशा, व आशा ही नित्य असल्यामुळें वासनाही नित्य आहेत. तेव्हां कोणत्याही अनुभवास पूर्वजन्मींच्या वासना कारण, व वासनांमुळें पूर्वजन्म असें सिद्ध झालें.

**हेतुफलाश्रयालम्बनैः संगृहीतत्वादेषामभावे तदभावः ॥ ११ ॥**

आतां अशी शंका येते कीं, वासना ह्या याप्रमाणें अनादि व अनंतावधि असल्या-

मुळें त्यांपासून सुटका कधींच होणार नाहीं व त्यामुळें कैवल्यसुखही प्राप्त होणार नाहीं; तेव्हां योगाभ्यासाचा काय उपयोग ? याचें समाधान असें कीं, वासनांला कारण प्रथमचा अनुभव, त्यालाही कारण राग ह्मणजे इच्छा इत्यादि, रागादिकांचें कारण अविद्या (अज्ञान), याप्रमाणें हे वासनांचे साक्षात् व परंपरेनें हेतु ह्मणजे कारण आहेत. वासनाचे शरीर व स्मृति हें फल; बुद्धि ही त्यांचा आश्रय (ठिकाण); व जें अनुभवाचें आलंबन (आधार) तेंच वासनांचा आधार आहे. हेतु, फल, आश्रय व आलंबन हीं वासनांचीं बीजें असल्यामुळें अनंतावधि वासनांचा संग्रह झाला आहे. आतां ज्ञान व योगानें जर त्या हेतु इत्यादिकांना जळालेल्या बीजांप्रमाणें निरुपयोगी करून टाकिलें तर वासनांला कांहीं मूळच न राहिल्यामुळें पुढें त्यांस अंकुर फुटणार नाहीं, मग अर्थात् फलेंही येणार नाहींत. याप्रमाणें त्यांचा योगानें नाश होऊन मोक्ष प्राप्त होतो.

**अतीतानागतं स्वरूपतोऽस्त्यध्वभेदाद्धर्माणाम् ॥ १२ ॥**

येथें अशी शंका येते कीं, वासना जर अनंतावधि (अगणित) आहेत तर तितक्या गणित त्यांचें आधारभूत चित्तही अगणित असलें पाहिजे. व जर चित्त एकच असेल तर अनेक कालांत असणाऱ्या त्या सर्व वासनांचा उपभोग एककालींच झाला पाहिजे; तो तर होत नाहीं. ह्मणून चित्त अनेक आहे कीं काय ? याचें समाधान असें कीं, जसा कोणीएक प्रवासी मनुष्य किंवा स्वतां आपणच रस्त्यानें चालत असतां कांहीं मार्ग मागें टाकिला; कांहीं हल्लीं चालत आहों; व बाकीचा पुढें यावयाचा आहे. त्यांत मागें मार्ग चालत असतां ज्या वस्तु आपणांस दिसत होत्या त्या हल्लीं दिसत नाहींत, आणि पुढें ज्या मार्गावर आपणांस जावयाचें आहे तेथल्याही वस्तू आपणांस दिसत नाहींत; यावरून त्या वस्तू मुळींच नाहींत असें ह्मणणें अगदीं चुकीचें आहे; कारण, एकादा मनुष्य जर आपल्या जवळच्या उंच पर्वतावर किंवा तेथेंच विमानांत ('बलूनांत) बसून वर गेला असतां त्याला आपण मागें ज्या मार्गावर होतो तेथच्या, आपण हल्लीं आहोंत तेथच्या व आपण पुढें ज्या मार्गावर जाणार आहोंत तेथच्या सर्व वस्तू एका वेळेस दिसूं शकतील. आपणास न दिसण्याचें कारण त्या सर्व वस्तूंचे मार्ग भिन्न भिन्न असल्यामुळें आपल्या दृष्टीस प्रतिबंध होतो. तेंच आपण जर योगाभ्यास करून विभूतिपादांत (सू० ९। ११।१२ त) सांगितलेले जे निरोधपरिणाम इत्यादि तीन परिणाम त्यांच्या ठिकाणीं संयम केला तर आपणांस सुद्धां या ठिकाणींच त्या पर्वतावर असलेल्या किंवा विमानांत बसलेल्या मनुष्यांप्रमाणें एकदम तिन्ही ठिकाणच्या सर्व वस्तू प्रत्यक्ष दिसूं लागतील. ह्मणूनच भगवान् श्रीकृष्णानें गीतेंत ह्मटलें आहे कीं, 'हे अर्जुना ! मी भूत, वर्तमान व भविष्य या तिन्ही काळच्या भूतांना प्रत्यक्ष जाणतों;' असें ह्मटलें. येथें जर भूत व भविष्य काळच्या वस्तू नसत्या तर त्यांबद्दल जाणतेपणा श्रीकृष्णास कसा आला असता ? ह्मणून

तिन्ही मार्गांतील पदार्थ आपापल्या स्वरूपानें कायम असतात. त्यांत फक्त वर्तमानमार्गांतील पदार्थ आपल्या पाहण्यांत येतात. आणि बाकीच्यांचा मार्ग भिन्न पडल्यामुळें आपल्या पाहण्यांत येत नाहींत. तसें चित्त हा धर्मी एकच असून त्याचे वासनारूप धर्म अनेक आहेत; परंतु त्या धर्मांचे भूत, वर्तमान व भविष्य असे तीन प्रकारचे निरनिराळे मार्ग असल्यामुळें वर्तमानमार्गावरील धर्मांचा उपभोग होतो; आणि बाकींच्या दोन मार्गांवरील धर्मांचा उपभोग होत नाहीं. यावरून ते नाहींत असें ह्मणतां येत नाहीं; कारण, योग्याला त्यांचें प्रत्यक्ष ज्ञान आहे. ह्मणून भूत व भविष्य मार्गांवरील धर्म वर्तमानमार्गावरील धर्मांप्रमाणें स्वरूपानेंच आहेत; परंतु मार्ग निराळे पडल्यामुळें एकाच वेळीं त्या सर्वांचा उपभोग होत नाहीं. कारण, धर्मांचा उपभोग होण्याला किंवा पदार्थ स्पष्ट दिसण्याला कारण वर्तमानमार्ग आहे. याकरितां वासना अनंत आहेत ह्मणून चित्त अनंत असलें पाहिजे असें नाहीं; तर तें एकच आहे. मग सर्व वासनांचा उपभोग एका वेळीं कां होत नाहीं? तर त्या वासनारूप धर्मांचे मार्ग निरनिराळे आहेत ह्मणून. सारांश, उपभोग घेणारें चित्त मोक्षापर्यंत एकच असतें असें सर्वांला कबूल केलें पाहिजे.

**ते व्यक्तसूक्ष्मा गुणात्मानः ॥ १३ ॥**

सत्व, रज व तम या तीन गुणांचा एकेक प्रकारचा विशेष संयोग होऊन महत्त्वापासून तें घट इत्यादि कार्यापर्यंत एकेक धर्माची उत्पत्ति झाली आहे. त्यांमध्यें सुद्धां सुख, दुःख व मोह या स्वरूपांनीं सत्त्वादि गुणांची सत्ता स्पष्ट समजण्यांत येते. त्यांत कालभेदानें कांहीं व्यक्त ह्मणजे स्पष्ट होतात व कांहीं सूक्ष्मरूपानें असतात. पुढें जेथपर्यंत त्या तीन गुणांचा संयोग असतो तेथपर्यंत ते सर्व तिन्ही कालांत एकसारख्या स्वरूपानेंच असतात ह्मणून त्यांना नित्य असा व्यवहार होतो. परंतु तो संयोग कां एकदा नष्ट झाला ह्मणजे त्यांचें कार्यरूपत्व जाऊन ते केवळ गुणस्वरूपानेंच असतात. याकरितां ते ( धर्म ) गुणस्वरूपच नित्य आहेत; कारण, ते कार्यरूपानें असतांनाही त्यांमध्यें गुणस्वरूप स्पष्ट होतें; व त्यांची कार्यरूपता गेल्यावरही ते गणस्वरूपच असतात. सारांश, जसें घटरूप कार्याच्या आरंभीं, मध्यें व शेवटीं ( घट फुटल्यानंतरें ) मृत्तिकाच कायम असते ह्मणून मृत्तिकाच नित्य व घट अनित्य, त्याप्रमाणें धर्म हे अनित्य असून त्यांचें गुणस्वरूपच नित्य आहे.

**परिणामैकत्वाद्वस्तुतत्त्वम् ॥ १४ ॥**

आतां जर मृत्तिका, तंतु व दूध या भिन्न भिन्न जातींच्या वस्तूंचे घट, वस्त्र व दहीं असे निरनिराळे परिणाम ( कार्यें ) झालेले दृष्ट आहेत; तिघांमिळून एक परिणाम झालेला कोठेंही दृष्ट नाहीं; तर ‘ सत्वादि तीन गुणांचा संयोग होऊन एकेक धर्म उत्पन्न झाला ’ असें पूर्वसूत्रांत सांगितलें हें कसें? याचें समाधान असें कीं, ज्यास अंग असतें त्यास अंगी असें ह्मणतात व अंग व अंगी यांचा जो संबंध असतो त्यास अंगांगिभाव संबंध असें

ह्मणतात. हा अंगांगिभावसंबंध जेथें असतो ह्मणजे एक अंग व दुसरा अंगी असें जेथें असतें त्याच ठिकाणीं भिन्न भिन्न जातींच्या वस्तूंचा सुद्धां परिणाम एक होतो; जसें, तेल, वाती व अग्नि ह्या तीन निरनिराळ्या पदार्थांपासून दीपकरूप एकच परिणाम होतो. आणि जेथें तो अंगांगिभाव नसतो, तेथें एक परिणाम (धर्म) उत्पन्न होत नाहीं; जसें, मृत्तिका, तंतु व दूध इत्यादि स्थलीं. पहा ! जेव्हां सत्वगुण अंगी (प्रधान) व रज व तम हे दोन गुण-अंगें (अप्रधान) असतात तेव्हां एकच महत्तत्त्व उत्पन्न होतें; रजोगुण अंगी व बाकींचीं अंगें असतां त्या महत्तत्त्वापासून अहंकार उत्पन्न होतो; व तमोगुण अंगी व बाकींचीं अंगें असतां अहंकारापासून शब्द इत्यादि पंचतन्मात्रें उत्पन्न होतात. तसेंच, सत्वगुण अंगी असतां अहंकारापासून ज्ञानेंद्रियें व तम हें अंगी असतां कर्मेंद्रियें व सात्विक व राजस या दोन प्रकारच्या अहंकारांपासून मन हीं उत्पन्न होतात. असेंच पंचतन्मात्रांमध्यें शब्द-तन्मात्र अंगी व बाकींचीं अंगें असतां आकाश, स्पर्शतन्मात्र अंगीं असतां वायु, याप्रमाणें क्रमानें बाकीचे उत्पन्न होतात. सारांश, अंगांगिभाव असला तर अनेक वस्तूंचा एक परिणाम होतो; नाहींतर नाहीं. ह्मणून तीन गुणांमिळून महत्तत्त्व इत्यादि एकेकच परिणाम प्रथम झाला, पृथ्वी, तंतू व दूध यांप्रमाणें अनेक झाले नाहींत. अभिप्राय हा कीं, हे तीन गुणच सर्व पदार्थांचें मूळ कारण असून त्या तिघांमिळून क्रमानेंच एकेक धर्मी व धर्म उत्पन्न होत जातात.

**वस्तुसाम्ये चित्तभेदात्तयोर्विभक्तः पन्थाः ॥ १५ ॥**

एक बौद्धवादी अशी शंका करितो कीं, अहो ! जर विज्ञानाहून ह्मणजे पदार्थाच्या ज्ञानाहून शिवाय पदार्थ निराळा असेल तर तुमचा एक किंवा अनेक हा विचार बरोबर आहे; परंतु विज्ञानाहून (चित्ताहून) जर शिवाय पदार्थच नाहीं तर हें तुमचें ह्मणणें कसें? याचें समाधान असें कीं, स्त्री तर एकच वस्तु असते परंतु तिच्याविषयीं अनेकांची अनेक प्रकारची भावना (बुद्धि) होते. पहा ! नवरा असतो त्याला ती सुखकारक वाटते; सवतीला ती दुःखकारक वाटते; अन्य कामी पुरुषाला ती प्राप्त न झाल्यामुळें खेदकारक वाटते; व जो वैराग्यशील असतो तो तिची उपेक्षा करितो. आतां जर चित्ताहून शिवाय पदार्थ नसतां तर असें एकाच वस्तूंविषयीं भिन्न भिन्न प्रकारचें ज्ञान चित्ताला न होतें. ह्मणून चित्त ह्मणजे पदार्थांचें ज्ञान व पदार्थ हे ज्ञानाहून अगदीं निराळे आहेत, ह्मणजे चित्त हें ग्रहण आहे ह्मणजे पदार्थज्ञानाचें साधन आहे व पदार्थ हे ग्राह्य आहेत; ह्मणून हें अगदींच भिन्न आहेत. याविषयीं आणीक शंका व त्याचें समाधान भाष्यार्थांत विस्तारेंकरून केलें आहे तें पहावें.

**न चैकचित्ततन्त्रं वस्तु तदप्रमाणकं तदा किं स्यात् ॥ १६ ॥**

पुनः दुसरा एक बौद्धवादी अशी शंका करितो कीं, मागील युक्तीनें पदार्थ हा विज्ञानाहून (चित्ताहून) भिन्न ठरतो खरा, परंतु तो चित्तानेंच ग्रहण केला जातो; कारण, ज्या वेळेस विज्ञान असतें त्याच वेळेस त्याचा भास होतो; यावरून विज्ञानानेंच पदार्थाची उत्पत्ति होते

व विज्ञान नसतें त्या वेळेस तो मुळींच नसतो असें सिद्ध होतें. यावर सूत्रकार त्या वाद्याला विचारतात कीं, अरे ! तूं चित्ताधीन जी पदार्थाची स्थिति ह्मणतोस ती काय ? १ एकचित्ताधीन किंवा २ अनेकचित्ताधीन ? त्यांत एकचित्ताधीन पदार्थाची स्थिति ह्मणशील तर ती संभवत नाहीं; कारण, जर एका चित्ताचें कार्य घट इत्यादि वस्तू होतील तर तें चित्त जेव्हां पट इत्यादि वस्तूंत मग्न होईल तेव्हां घटादि पदार्थ सर्व नाहींसे होतील! व ते नष्ट होतात असें ह्मटलें तर पुनः ते दृष्टीस पडतात; आणि 'तेच हे पदार्थ' अशी मनाची खात्री होते. तसेंच एकाचें मन जरी त्या पदार्थावर नसले तरी दुसरा त्या पदार्थाला पहात असतो. ह्मणून एका चित्ताचें कार्य तर पदार्थ नव्हे. आतां अनेक चित्तांचें कार्य पदार्थ ह्मणशील तर तेंही संभवत नाहीं; कारण, पूर्वी एकानें घट पाहिल्यानंतर अनेक चित्तांचा संबंध त्या घटाशीं झाला तर तेथेंच अनेक प्रकारचे घट उत्पन्न व्हावेत; कारण, कारणें अनेक असल्यामुळें कार्यें अनेक झालीं पाहिजेत, परंतु तसें कांहीं होत नाहीं. आणिक दुसरें असें कीं, पोटाकडे पहात असतां पाठ दिसत नाहीं, पाठीवांचून पोट राहूं शकत नाहीं ह्मणून त्या वेळेस पोटही दिसूं नये असें होईल. याकरितां पदार्थ हे स्वप्नांतील भासणाऱ्या वस्तूंप्रमाणें केवळ चित्तानेंच भासणारे असे नव्हत तर चित्ताहून भिन्न असून स्वतंत्र आहेत, चित्ताधीन नाहींत.

**तदुपरागापेक्षित्वाच्चित्तस्य वस्तु ज्ञाताज्ञातम् ॥ १७ ॥**

मोक्षाला हेतु जें विवेकज्ञान तें सांगण्याकरितां आतां चित्त व आत्मा यांच्या स्वरूपांचा विवेकप्रकार दोन सूत्रांनीं सांगतात, विषय हे लोहचुंबकाप्रमाणें जागचे जागीं राहून आकर्षण करणारे आहेत; व चित्ताचा स्वभाव लोखंडाप्रमाणें ओढला जाण्याचा असा आहे. विषयांनीं याला आकर्षण केलें कीं, तें विषयांशीं संबद्ध होऊन विषयाकार होऊन जातें. त्यांत ज्या विषयानें त्याला ओढून घेऊन आपला आकार त्याच्यांत उमटविला आहे तो त्या चित्ताचा ज्ञातविषय होतो; आणि ज्या विषयानें त्याला ओढून न घेतल्यामुळें आपला आकार त्याच्यांत उमटविला नाहीं तो त्या चित्ताचा अज्ञातविषय होतो. याप्रमाणें ज्ञातविषय व अज्ञातविषय असे दोन स्वभाव चित्ताचे झाल्यामुळें चित्त परिणामी आहे.

**सदाज्ञाताश्चित्तवृत्तयस्तत्प्रभोः पुरुषस्यापरिणामित्वात् ॥ १८ ॥**

जसें चित्त ज्ञाताज्ञातविषय असल्यामुळें परिणामी आहे त्याचप्रमाणें पुरुष सुद्धां ज्या वेळेस नील वर्णाला जाणतो त्याच वेळीं पीत वर्णाला जाणत नाहीं ह्मणून तोही परिणामी आहे कीं काय ? तर पुरुष परिणामी नाहीं; कशावरून तर, जसे चित्ताला ज्ञात व अज्ञात असे दोन प्रकारचे विषय आहेत तसे आत्म्याला नाहींत. आत्म्याचा विषय ह्मटला ह्मणजे क्षिप्त, मूढ इत्यादि चित्ताच्या वृत्ती आहेत. त्या त्याला नेहमीं माहीत आहेत; कारण, तो चित्ताचा साक्षी आहे. जर तो परिणामी असता तर त्याला एकादे वेळीं अंधत्व आल्यामुळें

वृत्ती असतांनाही त्याला माहीत झाल्या नसत्या. त्या वेळेस त्याला ज्ञाताज्ञातविषयत्व येऊन 'मी सुखी आहें कीं नाहीं ? मी दुःखी आहें किंवा नाहीं? अथवा मी इच्छितों किंवा नाहीं?' असा संशय आला असता; परंतु असा संशय कधीं येत नाहीं. ह्मणून त्याला वृत्ती कधीं माहीत नाहींत असें नाहीं. त्यावरून पुरुष अपरिणामी आहे. हें सहज सिद्ध झालें.

**न तत्स्वाभासं दृश्यत्वात् ॥ १९॥**

येथें बौद्ध अशी शंका करितो कीं, चित्त हें अग्नीप्रमाणें स्वयंप्रकाश असल्यामुळें तें दुसऱ्या पदार्थालाही प्रकाशित करील, तेणेंकरून पदार्थाचें ज्ञान होईल. मग दुसरा ज्ञान करून घेणारा असा आत्मा कशाला पाहिजे ? यावर समाधान असें कीं, चित्त हें स्वप्रकाश मानून वरचा शंकापक्ष सिद्ध केला; परंतु चित्त हें अग्नीप्रमाणें 'स्वतः प्रकाशित मुळींच होत नाहीं; कारण, तें आत्म्याच्या योगानें प्रकाशित होण्याला योग्य आहे; व आत्मा हा त्याचा प्रकाशक आहे. सारांश, तें प्रकाश्य (प्रकाशानें प्रकाशित होण्याला योग्य) असल्यामुळें त्याला प्रकाशित करणारा प्रकाशक असा आत्मा आवश्यक असलाच पाहिजे.

**एकसमये चोभयानवधारणात् ॥ २० ॥**

आणीक दुसरें कारण असें कीं, चित्ताला आपल्या स्वरूपाचें ज्ञान व पदार्थाचें ज्ञान हीं दोन्ही ज्ञानें एकाच वेळीं होणें संभवत नाहीं ह्मणून चित्त हें स्वतांला प्रकाशित करणारें नाहीं; याकरितां त्याचा प्रकाशक आत्मा आवश्यक असला पाहिजे.

**चित्तान्तरदृश्ये बुद्धिबुद्धेरतिप्रसङ्गः स्मृतिसंकरश्च ॥ २१ ॥**

पुनः बौद्ध अशी शंका करितो कीं, चित्ताला आपलें व पदार्थाचें ज्ञान एका वेळीं होणें संभवत नाहीं ह्मणून त्याला स्वप्रकाश मानीत नाहीं; परंतु तें दुसऱ्या चित्तानें प्रकाशित होईल; मग आत्मा मानण्याचें प्रयोजन काय ? याचें समाधान असें कीं, जर एका चित्ताला प्रकाशित करण्याकरितां दुसरें चित्त मानिलें तर तेंही स्वतः प्रकाशित होण्याला असमर्थ असल्यामुळें त्यालाही प्रकाशित करणारें तिसरेंच चित्त मानावें लागेल. त्याला चवथें, त्याला पांचवें, याप्रमाणें चित्तें अनेक मानावीं लागून शेवटीं चित्ताची समाप्ति ह्मणून कधींच होणार नाहीं; हें एक. आणिक दुसरें असें कीं, स्मृतींचाही सर्व गोंधळ होऊन जाईल. ह्मणजे कोणता एकादा रंग किंवा कोणता एकादा रस बुद्धीमध्यें विषय झाला असतां त्याचें ज्ञान करून देण्याकरितां अनंत बुद्धि उत्पन्न होतील; मग त्यांपासून अनंत संस्कार उत्पन्न झाल्यामुळें एकदम पुष्कळ स्मृतींची उत्पत्ति होईल. नंतर कोणत्या पदार्थाबद्दल ही स्मृति उत्पन्न झाली हें न समजल्यामुळें स्मृतींत गोंधळ पडेल ह्मणजे ही रूपाविषयीं स्मृति क्रां रसाविषयीं याचा निश्चय होणार नाहीं !

**चितेरप्रतिसंक्रमायास्तदाकारापत्तौ बुद्धिसंवेदनम् ॥ २२ ॥**

आतां अशी शंका येते कीं, एका बुद्धीकरितां दुसरी बुद्धि मानण्यांत अनेक दोष

आहेत हें खरें, परंतु आत्मा अगदीं क्रियारहित असल्यामुळें कोणत्याही व्यापारावांचून त्यापासून तरी बुद्धीला ज्ञान कसें होईल ? याचें समाधान असें कीं, आत्मा हा चिद्रूप ह्मणजे ज्ञानस्वरूप असल्यामुळें त्याला चिति असें ह्मणतात. ती चिति कोठेंही इतर ठिकाणीं गमन करीत नाहीं ह्मणजे कोणाशींही मिसळून राहत नाहीं. जसें, सत्व इत्यादि तीन गुण पूर्वी (कै० सू० १४ त) सांगितलेल्या अंगांगिभावामुळें महदादिरूप परिणामांस पावतात, त्याप्रमाणें चिति परिणाम पावत नाहीं; कारण, ती नेहमींच एकरूपानें राहते. ह्मणून जेव्हां बुद्धि जवळ असतां तिच्यामध्यें चितीची छाया ह्मणजे प्रतिबिंब पडतें तेव्हां बुद्धि चेतना-सारखी होते. हें बुद्धींत प्रतिबिंब पडून चिति बुद्धिवृत्तींशीं एकरूपानें भासणें किंवा बुद्धि चैतन्यासारखी दिसणें हीच चितीला तदाकारतापत्ति व हीच बुद्धीला चिच्छायापत्ति लोकांत ह्मणविते. ही तदाकारतापत्ति झाली असतां चितीला ( पुरुषाला ) आपल्या भोग्यरूप बुद्धीचें ज्ञान होतें व चिच्छायापत्ति झाली असतां बुद्धीला आपलें स्वतांचें ज्ञान होतें.

**द्रष्टृदृश्योपरक्तं चित्तं सर्वार्थम् ॥ २३ ॥**

बौद्ध इत्यादिकांला चित्त व आत्मा एकच आहे असा भ्रम झाला आहे, तो भ्रम दूर करण्याकरितां सांगतात, द्रष्टा ह्मणजे पाहणारा किंवा जाणणारा, अर्थात् बुद्धीचा साक्षी चेतन असा आत्मा होय. व दृश्य ह्मणजे पाहण्यास किंवा जाणण्यास योग्य, अर्थात् उप-भोग घेण्याच्या घट, पट इत्यादि अचेतन अशा सर्व वस्तू होत. द्रष्टा व दृश्य या दोन्ही वस्तूंनीं चित्त ह्मणजे बुद्धि प्रतिबिंबित होते ह्मणजे घटादिकांचें प्रतिबिंब बुद्धींत पडून ती घटादिकांच्या आकाराची भासूं लागते; व द्रष्ट्याचें (आत्म्याचें) प्रतिबिंब बुद्धींत पडून ती चेतनासारखीही भासूं लागते. याप्रमाणें द्रष्टा व दृश्य या सर्वांचें प्रतिबिंब बुद्धींत पडून ती सर्वांच्या आकाराची भासते अर्थात् ती सर्व वस्तूंचें ग्रहण करून सर्व व्यवहार करण्याला समर्थ होते, ह्मणून ती (बुद्धि) सर्वार्थ आहे असें सिद्ध होतें. 'सर्वार्थ' या पदाचा अर्थ असा आहे कीं, चेतन व अचेतन ह्या सर्व वस्तू आहेत अर्थ ह्मणजे विषय जिचा ती सर्वार्थ होय. या सूत्राचें तात्पर्य असें आहे कीं, 'बुद्धींत आत्म्याचें प्रतिबिंब पडून ती प्रतिबिंबाकार भासते ह्मणून त्या प्रतिबिंबाच्या ऐक्याच्या भ्रमानें 'चित्तच आत्मा' असा भ्रम सौगत बौद्धांस झाला. जास्वंद वगैरेच्या फुलांजवळ जसा शुद्ध स्फटिकमणि ठेविला असतां तो त्या त्या रंगाचा भासूं लागतो याप्रमाणें चित्ताचा स्वभाव असल्यामुळें सर्व दृश्य वस्तूंच्या आकारास तें ग्रहण करितें ह्मणून 'चित्ताहून शिवाय आणिक कांहीं पदार्थ नाहीं' अशी समजूत विज्ञानवादी बौद्धांची झाली ती ठीकच झाली. परंतु यांमध्यें आपण असा विचार करावयाचा कीं, चित्त हें भोग्य वस्तु आहे; तेव्हां याचा उपभोग घेणारा कोणीतरी अन्य असला पाहिजे. आतां तो कोण असावा.तर, नित्य प्रकाशित राहणारी अशी चिच्छक्ति ही होय. ती चिच्छक्ति दोन प्रकारची; एक नित्योदित ह्मणजे नेहमीं असणारी, व दुसरी

अभिव्यंग्या ह्मणजे कारणानें प्रकट होणारी. नेहमीं असणारी चिच्छक्ति कूटस्थ ह्मजणे मूळचा आत्मा, व प्रकट होणारी चिच्छक्ति ह्मटली ह्मणजे जें बुद्धींत आत्म्याचें प्रतिबिंब पडतें व जें सुख, दुःख इत्यादिक आकाराला प्राप्त होतें ती होय. पुरुषास भोग दोन प्रकारचा; एक चिदवसानतारूप व दुसरा परिणामरूप. त्यांत चिदवसानतारूप ह्मणजे अभिव्यंग्या चिच्छक्ति हा पुरुषाचा मुख्य भोग होय; व आत्म्याच्या जवळ असल्यामुळें जिला चैतन्य प्राप्त झालें आहे अशा बुद्धीचा जो सुखदुःखादि परिणाम तो दुसरा भोग होय. ह्याप्रमाणें पुरुष हा भोक्ता (उपभोग घेणारा) अर्थात् चेतन व बुद्धि ही भोग्य (उपभोग घेण्याला योग्य) अर्थात् अचेतन असा परस्परांचा अगदीं निश्चयानें भेद असल्यामुळें पुरुष व बुद्धि हे दोघे अगदीं भिन्न, आहेत असा मनाचा पक्का निश्चय करून घ्यावा. त्यांत योगाभ्यासाचें यथासांग अनुष्ठान घडून जेव्हां क्लेश इत्यादि मल झडून जाऊन निवात प्रदेशांतील दिव्याच्या ज्योतीप्रमाणें अगदीं निश्चळ ह्मणजे एकाग्र असें समाधींत चित्त होतें तेव्हां बुद्धीहून पुरुष भिन्न आहे असा चित्ताचा निश्चय होतो; याकरितां योगाभ्यास अवश्य करावा.'

**तदसंख्येयवासनाभिश्चित्तमपि परार्थं संहत्यकारित्वात् ॥ २४ ॥**

आतां अशी शंका येते कीं, जर याप्रमाणें चित्त सर्व विषयाचें ग्रहण करून सर्व व्यवहार करण्याला समर्थ आहे, तर ज्यास कांही प्रमाण नाहीं असा द्रष्टा (आत्मा) कशाकरितां व्यर्थ मानितां ? याचें समाधान असें की, तें चित्त याप्रमाणें सर्व व्यवहार करितें खरें, परंतु ते स्वतंत्रपणानें करीत नाही; तेंही दुसऱ्याची मदत घेऊन काम करितें. ती मदत कोणाची ह्मणाल तर ज्यांना मोजवणार नाहीं अशा अनंत वासनांच्या द्वारानें कार्य करितें याकरितां तें परार्थ ह्मणजे दुसऱ्यासाठी आहे. कशावरून ह्मणाल तर असा नियम आपल्या पाहण्यांत येतो की, जें दुसऱ्याची मदत घेऊन काम करणारें असतें ह्मणजे ज्याला दुसऱ्याच्या मदतीवांचून कांहीच काम करितां येत नाहीं; तें दुसऱ्यासाठीं असतें. जसे, आपले आसन, शय्या इत्यादि उपभोगाचे पदार्थ हे जमीन इत्यादि आधारभूत साहाय्य असल्यावांचून आपलें कार्य करूं शकत नाहींत. अथवा जसे सत्वादि तीन गुण, हे एकेक स्वतंत्र असतां कोणतेंही कार्य करूं शकत नाहीत; नंतर तिघे एकमेकांचे जेव्हां साहाय्य घेतात तेव्हां मग सर्व प्रकारचीं कामें करूं शकतात; त्याप्रमाणें चित्त हें परार्थ (दुसऱ्याकरितां) आहे. याप्रमाणें चित्त जर परार्थ ठरलें तर तो दुसरा कोणीतरी चित्ताहून अन्य असला पाहिजे. तो कोण ह्मणाल तर चित्तसाक्षी आत्मा होय. त्याचें कार्य चित्ताला हेंच करावयाचें असतें कीं, मागील सूत्रांत सांगितलेले दोन प्रकारचे भोग व मोक्ष हे पुरुषाला साधून देणें.

**विशेषदर्शिन आत्मभावनाविनिवृत्तिः ॥ २५ ॥**

आतां मोक्षाचें वर्णन करणार त्यांत मोक्षाला योग्य असा अधिकारी कोण, तें प्रथम

सांगतात. याप्रमाणें बुद्धि व पुरुष भिन्न असें सिद्ध झालें. आतां जो या दोहोंमध्यें चित्ताहून आत्मा हा निराळा आहे असा विशेष जाणतो त्याला आत्म्याचे गुण व चित्ताचे दोष हे समजून 'चित्तच आत्मा आहे' अशी जी त्याची समजूत असते ती अगदीं नाहींशी होते; व चित्तच सर्व करणारें जाणणारें, भोगणारें इत्यादि आहे असा अभिमान दूर होतो.

**तदा विवेकनिम्नं कैवल्यप्राग्भारं चित्तम् ॥ २६ ॥**

पूर्वी ज्या वेळीं बुद्धि इत्यादिक अनात्म (आत्म्याहून भिन्न अशा) वस्तूंच्या ठिकाणीं 'हाच आत्मा' असा भ्रम होता त्या वेळेस जें चित्त विषयांत अगदीं गढून जाऊन संसारच परम सुख असें मानीत होतें तें चित्त आतां बुद्धिपुरुषांचें भेदज्ञान झाल्यावर विषयावरून निघून अंतर्मुख असें होऊन मोक्षच मुख्य फल ह्मणजे परम सुख आहे असें पक्कें समजून पुढें सांगावयाचें जें धर्ममेघध्यान त्याविषयीं तत्पर होतें.

**तच्छिद्रेषु प्रत्ययान्तराणि संस्कारेभ्यः ॥ २७ ॥**

आतां तें चित्त आत्मा व चित्त हे दोघे भिन्न आहेत अशा भेदाज्ञानाकडे वळून समाधींत तत्पर होते खरें, तथापि तेथें मध्यें मध्यें त्याला 'व्युत्थान' या शब्दाचा अर्थ पूर्वी (वि० ३ सू० त ९) सांगितला आहे, त्या व्युत्थानअवस्थेंत घडलेले जे वासनारूप संस्कार त्यांपासून 'मी व माझें, जाणतों व जाणत नाहीं' अशा प्रकारचे. जागृतअवस्थेप्रमाणें अनेक दुसरे प्रत्यय (अनुभव) येतात; ते समाधीला विघ्न करणारे होत याकरितां त्यांच्या नाशाचा प्रयत्न अवश्य करावा.

**हानमेषां क्लेशवदुक्तम् ॥ २८ ॥**

पूर्वी (सा० सू० १० व ११ त) अविद्या इत्यादिकांचा नाश करण्याकरितां जो (ज्ञानाग्नीनें जाळण्याचा) उपाय सांगितला, त्याच उपायानें या संस्कारांचा नाश करावा. ह्मणजे अविद्या इत्यादि क्लेश हे जसे अग्नीनें जळालेल्या बीजाप्रमाणें पुनः चित्तांत उत्पन्न होत नाहींत, तसेच संस्कारही तो उपाय केला असतां समाधींत आपलें कार्य करूं शकणार नाहींत.

**प्रसंख्यानेऽप्यकुसीदस्य सर्वथा विवेकख्यातेर्धर्ममेघः समाधिः ॥२९॥**

बुद्धिसत्व (चित्त) व आत्मा या दोघांचें स्पष्टरीतीनें भेदज्ञान होणें याला प्रसंख्यान ह्मणतात; हीच विवेकख्याति होय. ज्ञानाग्नीनें संस्कारांचा नाश झाल्यावर मग प्रसंख्यान ह्मणजे विवेकख्याति उत्पन्न होते. तिच्या योगानें सर्व जगत् आपल्या स्वाधीन ठेवतां यावें अशी सिद्धि प्राप्त होते. परंतु असल्या असंख्यानाची सुद्धां जो योगी इच्छा करीत नाहीं त्याला योगांत विघ्नें उत्पन्न होण्याचें कारणच राहत नाहीं. नंतर नेहमीं विवेकख्यातीचाच उदय झाल्यामुळें धर्ममेघ नांवाचा समाधि सिद्ध होतो. धर्ममेघ ह्मणजे पूर्वी (कै० ४ सू० ७ त) सांगितलेला जो अशुक्लकृष्ण धर्म त्याप्रत जो सिंचन करून वाढवितो, ह्मणजे ज्यापासून मोक्ष-

रूपच जें फल प्राप्त व्हावयाचें असें मोक्षप्राप्तीचें ज्ञान त्याप्रत जो वाढवितो, त्यास धर्ममेघ ह्मणतात.

**ततः क्लेशकर्मनिवृत्तिः ॥ ३० ॥**

धर्ममेघ समाधि सिद्ध झाल्यावर त्यापासून वासनांसुद्धां अविद्या इत्यादि पांच क्लेशांचा जो समूळ नाश होतो. तेव्हां तो योगी जीवंत असतांना क्लेश व कर्म यांपासून मुक्त होतो; अर्थात् जीवन्मुक्त होतो.

**तदा सर्वावरणमलापेतस्य ज्ञानस्याऽऽनन्त्याज्ज्ञेयमल्पम् ॥ ३१ ॥**

ज्ञानाला आच्छादन करणारे जे अविद्यादि मळ ते जीवन्मुक्तअवस्थेंत अगदीं नाहींसे झाल्यामुळें जसा मोठ्या अफाट आकाशामध्यें काजवा चमकला असतां अगदीं लहान दिसतो. त्याप्रमाणें ज्ञान हें अनंत झाल्यामुळें ज्ञेय हें अगदीं लहान होतें. तात्पर्य, ज्ञानापुढें ज्ञेय अगदींच तुच्छ वाटतें.

**ततः कृतार्थाना परिणामक्रमसमाप्तिर्गुणानाम् ॥ ३२ ॥**

सत्वादि तीन गुण हे पुरुषांकरितां असतात. त्यांत भावी (पुढें होणारा) जो पुरुषार्थ तो गुणांला प्रेरणा करीत असतो; आणि त्याप्रमाणें ते गुण कार्यास प्रवृत्त होऊन क्रमानें परिणाम पावत असतात. धर्ममेघसमाधीचा उदय झाल्यानंतर गुणांना कांहींच पुरुषार्थ (काम) शिल्लक न राहिल्यामुळें पुढच्या सूत्रांत सांगावयाचा जो परिणामक्रम त्याचा अगदीं शेवट होतो; ह्मणजे कृतार्थपुरुषाच्या कार्यापासून ते निवृत्त होतात. कारण कार्य झाल्यावर त्या ठिकाणीं उगीच कोणी बसत असतें.

**क्षणप्रतियोगी परिणामोऽपरान्तनिर्ग्राह्यः क्रमः ॥ ३३ ॥**

क्षण ह्मणजे अत्यंत सूक्ष्म कालाचे जे सूक्ष्म अंश ते होत. त्यांचा क्रम समाधिप्रज्ञेनें जाणला जातो. क्षण हें क्रमाचें स्वरूप कथन करणारे आहेत, ह्मणून क्रम हा क्षणप्रतियोगी. झाला. यास प्रत्यक्ष प्रमाण,–प्रथम मातीचा गोळा, नंतर घट, नंतर कपाळ व त्यानंतर पुनः बारीक पूड; हे प्रत्यक्ष परिणाम ( अवस्था ) दृष्टीस पडतात त्यांत त्यांची पहिली अवस्था मातीचा गोळेपणा व शेवटली अवस्था बारीक पूडपणा; याप्रमाणें हा पूर्वींचा व हा त्यानंतरचा अशा मर्यादेच्या ज्ञानानें क्रमाचें ज्ञान साहजिक होतें. सारांश, एका क्षणाच्या अव्यवहित दुसऱ्या क्षणीं जो परिणाम, याप्रमाणें जी परिणामाची परंपरा, अशाला क्रम ह्मणतात

**पुरुषार्थशून्यानां गुणानां प्रतिप्रसवः कैवल्यं**
**स्वरूपप्रतिष्ठा वा चितिशक्तिरिति ॥ ३४ ॥**

पुरुषांचीं भोग व मोक्ष हीं दोन कार्यें करावयाचीं होतीं तीं करून संपल्यानंतर गुणांना

त्या पुरुषाचें दुसरें कांहींच काम न उरल्यामुळें त्यांचा आपल्या कारणामध्यें ( प्रधानामध्यें ) जो लय होणें; अथवा जें पुरुषाचें केवळ आपल्या स्वरूपानें रहाणें त्यास कैवल्य ( मोक्ष ) ह्मणतात. कैवल्य ह्मणजे केवलपणा ह्मणजे एकटें रहाणें; यावरून जेव्हां चित्ताचा बिलकूल संबंध न राहून केवल एकटा पुरुष आपल्या स्वरूपानें राहतो; तोच पुरुषाला मोक्ष असें सिद्ध झालें.

इति श्रीपाताञ्जलयोगशास्त्राभिप्राये कैवल्यपादः समाप्तः ॥ ४ ॥

ॐ शांतिः शांतिः शांतिः

श्रीः ।

# पाताञ्जलयोगसूत्रम् ।

## श्रीमन्महर्षिवेदव्यासप्रणीतभाष्योपेतम् ।

### हेमाडपंतविरचितट्टिप्पणीभाषानुवादसहितं च ।

तच्च

"नानाभाई सदानन्दजी रेळे ऊर्फ हेमाडपंत"

मुम्बय्याम्

इत्यनेन

'गुनिर्व्हर्सल' इत्याख्यमुद्रणालये मुद्रयित्वा प्रकाशितम् ।

शके १८१९, सन १८९७.

किंमत तींन रुपये.

नानाभाई सदानंदजी रेळे, ऊर्फ हेमाडपंत,

पत्ताः—लोहारचाळ, दगडीहवेलीचे मालक—मुंबई.

किंवा

नानाभाई सदानंदजीचे बंगल्यांत, कोळसेवाडी,

कल्याण,

जि० ठाणे.

# प्रस्तावना.

कैवल्यं हि विनोपायैः कृपया यस्य लभ्यते ॥
प्रस्तौमि चिन्मयं वस्तु तदनादि ह्यनन्तकम् ॥१॥

ह्या अचिंत्यरचनारूप विचित्रसृष्टीकडे विचारदृष्टीनें पाहिलें असतां प्रत्येक प्राण्याला 'मला निरंतर सुख व्हावें' अशी नेहमीं इच्छा होत असते. यावरून असा निश्चय होतो कीं, प्राण्याचा सुखप्राप्ति करून घेणें हाच मुख्य पुरुषार्थ आहे. त्यांत सुखें दोन प्रकारचीं; नित्य व अनित्य. त्यांत दुसऱ्या प्रकारचें सुख हें विषयोपभोगापासून उत्पन्न होऊन तत्काळ नष्ट होणारें व परिणामीं दुःखप्रदच असल्यामुळें सुखाभास मात्र आहे. याकरितां त्याच्या प्राप्तीकरितां प्रयत्न करणें ह्मटलें ह्मणजे कणरहित धान्याचा कोंडा कुटीत बसणाऱ्या पुरुषाप्रमाणें केवल श्रम मात्र व्यर्थ होऊन पुनः निरंतर दुःखच भोगावें लागेल. ह्मणून दुसऱ्या प्रकारच्या सुखाच्या प्राप्तीविषयीं व्यर्थ प्रयत्न करीत न बसतां पहिल्या प्रकारच्या नित्य सुखाकरितांच मनुष्यानें नेहमीं प्रयत्न करणें हें त्याचें कर्तव्य कर्म आहे. तें नित्य-सुख कोणतें ह्मणाल तर क्लेश व कर्म यांच्या परिणामरूप ज्या वासना त्यांच्या संबंधा-पासून मुक्त होणें हें होय. यासच कैवल्य, मोक्ष इत्यादि संज्ञा आहेत. मोक्ष हा ज्ञाना-वांचून प्राप्त होणें नाहीं' असा सर्व शास्त्रकारांचा सिद्धांत आहे. ज्ञानप्राप्तीकरितां शास्त्रकारांनीं अधिकारिभेदानें अनेक प्रकारचे उपाय सांगितले आहेत. त्या सर्वांत योग हाच मुख्य उपाय आहे; कारण, 'आत्मज्ञानानें मुक्ति होते; व तें आत्मज्ञान योगावांचून नाहीं' असें स्कंदपुराणांत योगास मुख्योपायत्व प्रतिपादन केलें आहे. गीतेंतही 'तपस्वी, ज्ञाननिष्ठ व कर्मनिष्ठ या सर्वांहून योगी मला अत्यंत प्रिय आहे; याकरितां हे अर्जुना! तूं योगी हो.' असें श्रीकृष्णानें योगाचेंच मुख्यत्व वर्णन केलें आहे. तसाच, 'यमनियमादि साधनसंपत्तियुक्त योग्यानें अभ्यास करून आत्मा नेहमीं समाधींत योजिला असतां ज्या ठिकाणीं निरवधिक सुख आहे अशा माझ्या स्थानाप्रत योगी प्राप्त होतो.' असा मोक्षप्राप्तिस योगाभ्यासच उपाय सांगितला. आतां मोक्षप्राप्तीस दुसरा उपायच नाहीं असें ह्मणणें नाहीं; तर मोक्षप्राप्तीस खात्रीचा उपाय योगावांचून दुसरा नाहीं. ह्मणजे इतर साधनांनीं ज्ञान प्राप्त होऊन संचित व क्रियमाण कर्मांचा जरी नाश झाला तथापि प्रारब्ध कर्मांचा नाश भोगावांचून होत नाहीं. तो भोग भोग-ण्याकरितां कितीएक जन्म घ्यावे लागतील याचा नियम नाहीं. आणि जो योगी आहे तो प्रारब्ध कर्मांचा संपूर्ण नाश होण्याकरितां योगप्रभावानें अनेक देह धारण करून ह्या जन्मांतच प्रारब्धकर्मफलांचा उपभोगानें संपूर्ण नाश करून टाकितो; हें सामर्थ्य दुसऱ्यां-

मध्यें नाहीं. ह्मणूनच कूर्मपुराणांत ' योगाग्नि हा संपूर्ण पातकांप्रत तत्काल जाळून टाकितो; त्यायोगानें उत्कृष्ट ज्ञान प्राप्त होऊन त्यापासून पुरुषास मोक्ष प्राप्त होतो. ' असें योगसामर्थ्य वर्णन केलें आहे. याकरितां परम दयालु भक्तवत्सल परमेश्वरानें भक्तोद्धाराकरितां हिरण्यगर्भ प्रजापतिमुखानें योगशास्त्र प्रकट केलें. आतां तें फारच गहन व विस्तारयुक्त असल्यामुळें अज्ञजनांस त्यापासून कांहींच उपयोग न झाल्यामुळें ते निरंतर दुःखसागरांत तसेंच गटंगळ्या खात राहतील. असा विचार श्रीमद्भगवत्पतंजलिमुनींनीं मनांत आणून परम वात्सल्यानें सर्व योगशास्त्राचें सार १९५ एकशें पंचाण्णव सूत्रांत आणून त्याचे १ समाधिपाद, २ साधनपाद, ३ विभूतिपाद व ४ कैवल्यपाद असे चार भाग केले. त्यांत पहिल्या भागांत योगारूढचित्त ह्मणजे ज्यास योग पूर्ण सिद्ध झाला अशा उत्तम अधिकाऱ्याकरितां क्रियायोग इत्यादि संपूर्ण अंगांची अपेक्षा न बाळगतां केवल अभ्यास व वैराग्य या दोन साधनांनींच सिद्ध होणारा असा योग ह्मणजे चित्तवृत्तिनिरोध, वृत्तिलक्षण, योगोपाय व त्यांचे भेद सांगितले. दुसऱ्या भागांत ज्याचें चित्त वारंवार चंचल होतें, अशा अधिकाऱ्यासही योग सिद्ध व्हावा याकरितां क्रियायोग, क्लेशस्वरूप, कर्मविपाक, हेयदुःखस्वरूप व व्यूहलक्षण हीं सर्व सांगून पुढें विवेकख्याति सिद्ध होण्याकरितां यम, नियम, आसन, प्राणायाम व प्रत्याहार अशीं योगास बहिरंग साधनभूत पांच अंगें पुष्कळ विस्तारानें सांगितलीं. तिसऱ्या भागांत योगास साक्षात् उपयोगी पडणारीं अशीं धारणा, ध्यान व समाधि अशीं तीन अंगें सांगून पुढें परिणाम व चित्तसंयमानें प्राप्त होणाऱ्या अनेक प्रकारच्या सिद्धि सांगितल्या. आणि चवथ्या भागांत मोक्षाचें विस्तारपूर्वक स्वरूपकथन, मोक्षयोग्यचित्ताचें स्वरूप, योगिकर्मस्वरूप, वासनाऽनादित्व इत्यादि सांगितलें. ह्या चार पादांतीलही विषय सूत्रनिबद्ध असल्यामुळें साधारण अधिकाऱ्यांस समजण्यें कठिणच; असें मनांत आणून करुणार्द्रचित्त होऊन साक्षात् भगवान् श्रीवेदव्यास यांनीं भाष्यरूपानें सर्व योगशास्त्राचें सार व सूत्रकाराचें हृद्गत प्रकट केलें. या भाष्याबद्दल योगवार्तिककार जो विज्ञानभिक्षु यानें योगवार्तिक ग्रंथाच्या शेवटीं असा अभिप्राय दिला आहे कीं, ' हजारों योगग्रंथांचें, सर्व उपनिषदांचें व विद्वानांचें ज्याविषयीं तात्पर्य असा सूत्राचा तात्पर्यार्थ श्रीवेदव्यासांनीं सांगितला. असा हा विषय गहन असल्यामुळें ग्रंथकर्त्यानें यथामतीनें जितकें त्याचें विवरण करवलें तितकें केलें व आमचे विद्वान् लोक त्यांत कांहीं दोष असल्यास ते दाखवून हा ग्रंथ आपल्या संग्रहास ठेवितील अशी आशा आहे.

**ग्रंथकर्ता.**

तत्सत्परमात्मने नमः ।

# अथ सभाष्य पातञ्जलयोगसूत्रानुक्रमणिका ।



[1] असा मोठा टाईप जेथे असेल तो विषय त्या सूत्राच्या टिप्पणींत आहे असे समजावे.

## अनुक्रमणिका.

**इति श्रीवेदव्यासकृतभाष्यासहितपातञ्जलयोगसूत्रानुक्रमणिका संपूर्णा ॥**

ॐतत्सत्परमात्मने नमः।

# पातञ्जलयोगसूत्रम्।

## श्रीव्यासभाष्योपेतं भाषानुवादसहितं च।

समाधिपादः ॥ १ ॥

### अथ योगानुशासनम् ॥ १ ॥

**सूत्रार्थः**—येथून पुढें योगशास्त्रास आरंभ करितों.

### भाष्यकृतां मङ्गलाचरणम्।

यस्त्यक्त्वा रूपमाद्यं प्रभवति जगतोऽनेकधाऽनुग्रहाय
प्रक्षीणक्लेशराशिर्विषमविषधरोऽनेकवक्त्रः सुभोगी ॥
सर्वज्ञानप्रसूतिर्भुजगपरिकरः प्रीतये यस्य नित्यं
देवोऽहीशः स वोऽव्यात्सितविमलतनुर्योगदो योगयुक्तः ॥ १ ॥

**अर्थः**—जो आपलें मूळचें रूप सोडून देऊन लोकांवर अनेकप्रकारें अनुग्रह करावा ह्मणून अवतार धारण करितो; ज्याचे सर्व क्लेश अगदींच नष्ट झाले आहेत; जो परमदुःसहविष धारण करणारा; ज्यास अनेक मुखें आहेत; जो सर्वज्ञानाचें उत्पत्तिस्थान; ज्याची प्रीति संपादन करण्याकरितां अनेक भुजंग तत्पर आहेत; ज्याचें शरीर शुभ्र व स्वच्छ आहे; असा योग देणारा योगी श्रीअनंत भगवान् (पतंजलि) तुमचें रक्षण करो.

भाष्यम्—अथेत्ययमधिकारार्थः।योगानुशासनं नाम शास्त्रमधिकृतं वेदितव्यम्।**योगः समाधिः। स च सार्वभौमश्चित्तस्य धर्मः। क्षिप्तं मूढं विक्षिप्तमेकाग्रं निरुद्धमिति चित्त-भूमयः। तत्र विक्षिप्ते चेतसि विक्षेपोपसर्जनीभूतः समाधिर्न योगपक्षे वर्तते। यस्त्वे-काग्रे चेतसि सद्भूतमर्थं प्रद्योतयति क्षिणोति च क्लेशान् कर्मबन्धनानि श्लथयति निरोधमभिमुखं करोति स संप्रज्ञातो योग इत्याख्यायते। स च वितर्कानुगतो वि-चारानुगत आनन्दानुगतोऽस्मितानुगत इत्युपरिष्टात् प्रवेदयिष्यामः। सर्ववृत्तिनिरोधे त्वसंप्रज्ञातः समाधिः॥** ‘तस्य लक्षणाभिधित्सयेदं सूत्रं प्रववृते’ ॥ १ ॥

### भाषान्तरकृन्मङ्गलाचरणम्।

श्रीशं वंदे विधिहरगुरुं सच्चिदानंदमूर्तिं
लक्ष्मीं नौम्यक्षरविभुसदायुक्तचिच्छक्तिरूपाम् ॥

ब्रह्माणं वाथ मम गुरुं भारतीजानिमीशं
कुर्वे सर्वेऽप्यहमतिशयं धाष्टर्यमेव क्षमंताम् ॥ १ ॥

क्काऽहं मूढमतिः क्क चेदमसकृत्सद्भिर्विचारोपगं
सूत्रं श्रीभगवत्पतञ्जलिकृतं तद्भाष्यमाविष्कृतम् ॥
श्रीव्यासेन जगद्गुरुप्रणयिना विज्ञानभिक्ष्वादिभि-
र्व्याख्यारूपमहं तथापि प्रयते कर्तुं तदादर्शनम् ॥ २ ॥

मत्कुलदेवः श्रीशः कर्ता चैतत्प्रयोजकः सोऽपि ॥
तत्प्रेरणेरितोऽहं निजभाषायां करोमि तत्स्फौट्यम् ॥ ३ ॥

**भाष्यार्थः**—या सूत्रांत ' अथ ' या शब्दाचा अर्थ आरंभ असा आहे ह्मणजे श्रीमद्भगवत्पतंजलिमुनींनीं योगानुशासननांवाचें शास्त्र आरंभिलें; तें सर्वसंसारबंधांतून मुक्त होऊं इच्छिणाऱ्या लोकांनीं जाणणें अवश्य आहे. समाधीस योग ह्मणतात. तो सर्वक्षिप्तादि-अवस्थेंत उत्पन्न होणारा असून क्रमानें वाढत वाढत शेवटच्या भूमींत पूर्ण होतो; व जसा उदकाचे ठिकाणीं पातळपणा याप्रमाणें अंतःकरणाचा सामान्य धर्म आहे. क्षिप्त[१], मूढ[२], विक्षिप्त[३], एकाग्र[४] व निरुद्ध[५] अशा पांच चित्ताच्या अवस्था आहेत. त्यांत विक्षिप्त[६] (चंचल) अंतःकरण असतां समाधि थोडा व चंचलपणा फार यामुळें ती भूमि पुढें होणारा जो संप्रज्ञात व असंप्रज्ञात योग त्यास मुळींच साधक होतें नाहीं[७]. आतां जो समाधि एकाग्रअवस्थेंत चित्त असतां परमार्थभूत अर्थाचें ( ध्यानांतील वस्तूचें) प्रकाशन करितो; पुढें सांगितलेल्या अविद्यादि[८] पांचक्लेशांचा नाश करितो; मग धर्माधर्मरूप कर्मबंधनास ( जीं सत्वपुरुषांस बंधास कारण त्यास ) प्रारब्धकर्म उत्पन्न करण्याविषयीं असमर्थ करितो; व निरोधनांवाच्या पांचव्या भूमींत जो

---

**सूत्र १ टीपः**—१ रजोगुणाच्या आधिक्यानें अनेकविषयांवर जाणारें अर्थात् अत्यंत चंचल जें चित्त त्यास क्षिप्त ह्मणतात. २ तमोगुणाच्या आधिक्यानें निद्रादिकांचे ठिकाणीं असणारें तें मूढ. ३ जें सत्वाधिक्यानें समाधि लागत असतांही यत्किंचित् रजोलेशानें अन्यविषयांवर जाणारें, त्यांत चित्तवृत्तिनिरोध क्षिप्तापेक्षां अधिक असतो ह्मणून त्यास विक्षिप्त ह्मणतात. ४ एकाच विषयावर अग्र ह्मणजे शिखा ज्या चित्तरूपी दीपाची तें एकाग्र, कारण यांत शुद्धसत्वगुणामुळें एकाच विषयावर, पुढें सांगावयाच्या ज्या कालमर्यादा तेथपर्यंत निवात प्रदेशांतील दिव्याप्रमाणें अगदीं स्थिर राहणारी अशी चित्तवृत्ति असते. ५ सर्वचित्तवृत्तींचा लय होऊन केवळ संस्कारमात्र शेष राहिला असतो ज्यांत तें निरुद्ध. आतां यांत रजोधर्म जो रागादि त्याचा प्रतिघात ( अटकाव ) करणारा तमोधर्म विषादादि आहे; करितां क्षिप्तापेक्षां मूढाचें ग्रहण पूर्वी केलें नाहीं. ६ तिसऱ्या अवस्थेंतील चित्त. ७ कारण योगाचें फल जें सकल क्लेश दूर करणें तें मुळींच प्राप्त होत नाहीं; तेव्हां क्षिप्त व मूढ या अवस्थेंत क्लेश दूर होणें अत्यंत दूरापास्त ह्मणून भगवान् भाष्यकारांनीं केवल विक्षिप्ताविषयीं विचार करून अतिव्याप्ति दूर केली. ८ अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश यांचीं लक्षणें पुढें सांगूं.

असंप्रज्ञात योग त्याप्रत परवैराग्य उत्पन्न करवून अगदीं समीप करवितो; त्यास संप्रज्ञात योग ह्मणतात. तो सवितर्क[9], सविचार, सानंद व सास्मित अशा चार प्रकारचा, तो पुढें सांगूं. आतां सर्वचित्तवृत्तींचा निरोध[11] ( अंतःकरणांत लय ) झाला असतां असंप्रज्ञात योग ह्मणतात ॥ १ ॥

त्या असंप्रज्ञातयोगाचें लक्षण सांगण्याकरितां हें पुढील सूत्र प्रवृत्त झालें,–

## योगश्चित्तवृत्तिनिरोधः ॥ २ ॥

**सूत्रार्थः**–चित्तवृत्तींच्या निरोधास योग ह्मणतात.

**भाष्यम्–सर्वशब्दाग्रहणात् संप्रज्ञातोऽपि योग इत्याख्यायते। चित्तं हि प्रख्याप्रवृत्तिस्थितिशीलत्वात् त्रिगुणम् । प्रख्यारूपं हि चित्तसत्वं रजस्तमोभ्यां संसृष्टमैश्वर्यविषयप्रियं भवति । तदेव तमसानुविद्धमधर्माज्ञानावैराग्यानैश्वर्योपगं भवति। तदेव प्रक्षीणमोहावरणं सर्वतः प्रद्योतमानमनुविद्धं रजोमात्रया धर्मज्ञानवैराग्यैश्वर्योपगं भवति। तदेव रजोलेशमलापेतं स्वरूपप्रतिष्ठं सत्वपुरुषान्यताख्यातिमात्रं धर्ममेघध्यानोपगं भवति। तत्परं प्रसंख्यानमित्याचक्षते ध्यायिनः । चितिशक्तिरपरिणामिन्यप्रतिसंक्रमा दर्शितविषया शुद्धा चानंता च सत्वगुणात्मिका चेयम् । अतो विपरीता विवेकख्यातिरित्यतस्तस्यां विरक्तं चित्तं तामपि ख्यातिं निरुणद्धि तदवस्थं संस्कारोपगं भवति । स निर्बीजः समाधिः। न तत्र किंचित्संप्रज्ञायत इत्यसंप्रज्ञातः। द्विविधः स योगश्चित्तवृत्तिनिरोध इति॥ 'तदवस्थे चेतसि विषयाभावाद्बुद्धिबोधात्मा पुरुषः किंस्वभाव इति' ॥ २ ॥**

**भाष्यार्थः**–या सूत्रांत 'सर्वचित्तवृत्तींचा निरोध' असें न पढतां, सामान्य 'चित्त'

९ ही संज्ञा अन्वर्थ ( अर्थास अनुसरून ) आहे. 'सं' सम्यक् ह्म० उत्तमप्रकारें 'प्रज्ञायते' साक्षात् केलें जातें ध्येय वस्तु ज्यांत ( निरोधरूप एका विशेषयोगांत ) तो. १० आतां सवितर्कादि तीन अवस्थांत साक्षात्कारजनकत्व (साक्षात्कार उत्पन्न करणें ) साक्षात् नसेल; कारण अविद्यालेशाचा संबंध सर्वत्र असतोच; अशी शंका कोणी करूं नये; कारण, सवितर्कादिक्रमानें साक्षात्कार वाढत वाढत शेवटच्या अस्मितानुगत ( सास्मित ) भूमिकेंत ऋतंभरानामकप्रज्ञेचा उदय होतो. 'ऋतं' ह्म० सत्यास 'भरा' धारण करणारी ह्मणजे जींत विपर्यास मुळीं नाहीं. एवं च चारही भूमींत साक्षात्काराचा संबंध असल्यामुळें साक्षात्कारजनकत्व सर्वांस आहे. ११ संप्रज्ञातयोगांत साक्षात्काररूप जी वृत्ति तिचाही, पुढें सांगावयाचें जें परवैराग्य, त्यानें लय करावयाचा इति विज्ञानभिक्षु.

**सू० २ टीपः**–१ येथें अशी शंका येईल कीं क्षिप्तादिअवस्थांमध्यें यत्किंचित् तरी चित्तवृत्तिनिरोध असतोच; तेव्हां वरील लक्षण क्षिप्तादित्रयास अतिव्याप्त झालें. तर त्याचें समाधान असें कीं, "तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्" याचा अर्थ;–समाधि लागतो त्या वेळेस बुद्धिसाक्षी पुरुषाची निर्विषयचैतन्यमात्र स्थिति असते. तेव्हां याप्रमाणानें स्वरूपांत अवस्थित होण्यास हेतु जो चित्तवृत्तिनिरोध तो अस-

वृत्तीचा निरोध ' इतकेंच लक्षण केलें; ह्मणून संप्रज्ञातासही योग ह्मणतात. चित्त हें सात्विक, राजस व तामस अशा तीन प्रकारचें आहे. त्यांत चित्त वस्तुतः सत्वशीलच परंतु रजोगुण व तमोगुणाच्या संबंधानें त्याचे राजस व तामस असे भेद होतात. आतां रजोगुणानें व तमोगुणानें युक्त असतां अणिमादिऐश्वर्यांत व शब्दादिविषयांत आसक्त होतें; तेंच तमोगुणानें युक्त असतां त्यास अधर्म, अज्ञान, अवैराग्य व दारिद्र्य हीं प्रिय होतात. तेंच जेव्हां मोहरूपी आच्छादन दूर होऊन तमोवृत्तिरहित होतें, तेव्हां त्यास धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य ही प्रिय होतात. पुनः तेंच जेव्हां विक्षेपाचें कारण जो रजोगुण त्याचा यत्किंचित् लेशही न राहतां केवल सत्वगुणसंपन्न होऊन बुद्धि व आत्मा यांचाच विचार करणारें असें होतें, तेव्हां त्यास धर्ममेघध्यान नांवाचें जें ईश्वराचें ध्यान तें मात्र प्रिय होतें. त्या ईश्वरध्यानरूपी धर्ममेघध्यानास योगीलोक परमतत्त्वज्ञानाची ( विवेकख्यातिवैराग्याची ) पराकाष्ठा असें ह्मणतात. आतां पूर्वी जें विवेकख्यातिवैराग्य ह्मणून ह्मटलें त्यास हेतु सांगतात, केवल शक्तिरूपानें असणारी अशी पुरुषनांवाची शक्ति ही; पूर्वधर्माचा नाश झाल्यावर दुसरा धर्म उत्पन्न होणें या प्रकारचा जो परिणाम ( स्थित्यंतर ) यारहित अशी आहे, म्हणून जशी बुद्धि विषयग्रहण करिते तशी चिति विषयग्रहणाकरितां गमन करीत नाहीं, कारण ती क्रियारहित आहे.

---

ला पाहिजे; तो क्षिप्तादिअवस्थांत मुळींच नाहीं; करितां लक्षणसंगति बरोबर आहे. आतां संप्रज्ञातास, असंप्रज्ञातद्वारा स्वरूपावस्थितीविषयीं हेतुत्व स्पष्टच आहे. कारण पूर्वसूत्रावरील ' निरोधमभिमुखं करोति ' ह्म० असंप्रज्ञातयोगाप्रत प्रत्यासन्न(अगदीं समीप) करितो; अथवा 'प्रक्षिणोति च क्लेशान् ' या पूर्वभाष्यानुरोधानें क्लेशकर्मादिदूरकर्तृत्व हें निरोधाचें लक्षण केलें असतां, क्लेशकर्मादिनाशकत्व असून चित्तवृत्तिनिरोधत्व योगाचें लक्षण, असें ह्मटलें ह्मणजे क्षिप्तादिकांची व्यावृत्ति सहज होऊन दोन्ही योगांचें साधारण लक्षण झालें. हें लक्षण घेऊन भाष्यकार क्षिप्तादिभूमित्रयांत अतिव्याप्ति नाहीं याविषयीं हेतु क्रमानें प्रतिपादन करितात,–'चित्तं हीत्यादि'. । वि भि०. २ भाष्यांत प्रख्या ह्म० तत्त्वज्ञान, हें सर्व सात्विकगुणाचें उपलक्षण आहे. प्रवृत्ति ह्म० कर्म, यानें सर्वराजस गुण घ्यावयाचे; व स्थिति ह्मणजे सर्वव्यापारराहित्य अर्थात् निद्रा, यानें सर्व तामसगुण घ्यावयाचे. हे सर्व क्रमानें सत्वरजस्तमःसंज्ञक द्रव्यांचे धर्म आहेत; हे पराश्रित असल्यामुळें रूप, रस इत्यादिकांप्रमाणें ह्यांस गुण ह्मणतात. आणि त्यांचीं आश्रयभूत जीं सत्वादिक द्रव्यें त्यांसही रज्जूस कारणभूत जे तंतू त्यांप्रमाणेंच गुण असे ह्मणतात. तेव्हां प्रख्यादिस्वभावत्वामुळें त्रिगुण ह्म० सत्वादि तीनगुणांनीं निर्मित्त रज्जूप्रमाणें आहे. ३ करितां क्षिप्तावस्थेंत जो वृत्तिनिरोध तो स्वरूपावस्थानास कारण नाहीं अथवा रागादिक्लेशांचा नाशक नाहीं; ह्मणून त्या अवस्थेंत लक्षणाची अतिव्याप्ति नाहीं. ४ त्यांतही लक्षणाची अतिव्याप्ति नाहीं. ५ यांतही अतिव्याप्ति नाहीं. ६ योगलक्षणाची संगति इच्याविषयीं बरोबर आहे. आतां ही सर्व स्थिति जरी अस्मितानुगत जो संप्रज्ञाताचा शेवटचा चवथा भेद यांत होते, वितर्कानुगतादित्रयांत नाहीं; तथापि वितर्कानुगतादित्रय हें त्याचें अंगभूत आहे करितां दोष नाहीं. आतां निरुद्धावस्थेची प्रक्रिया अशी कीं, संप्रज्ञातकालीं संसारहेतुत्वादि दोष पाहूनच इतर वृत्तींचा निरोध झाला; त्यापासून ' विवेकख्यातिनिष्ठा ' ह्म० केवळ सत्वपुरुषांच्या विचाराविषयीं निष्ठा (श्रद्धा) ती सिद्ध झाली, त्यांत ही आत्मसाक्षात्कार झाला नाहीं, ह्मणून विवेकख्यातिविषयीं सुद्धां वैराग्य प्राप्त होऊन सर्ववृत्तींचा निरोध होतो. अशी येथें प्रक्रिया समजावी,

आतां आत्मा जरी परिणामरहित आहे त्यामुळें विषयस्फुरण त्यास संभवत नाहीं तथापि बुद्धीनें विषय त्यास दाखविले आहेत, ह्मणून विषयांसहित बुद्धिवृत्ति चितिमध्ये प्रतिबिंबित होऊन विषयाकार भासते; व परिणामरहित आहे ह्मणूनच सुख, दुःख, मोह इत्यादि रजोगुणानें व तमोगुणानें उत्पन्न होणारे मल तीस नाहींत; तशीच पूर्ण आहे; व विवेकख्याति, सत्वगुणापासून उत्पन्न होणारी करितां या चितिशक्तीहून अगदीं उलट ह्म० परिणाम पावणारी, स्वतः विषयग्रहणास गमन करणारी व जड, तशीच सुखदुःखादिमलयुक्त व परिच्छिन्न अशी आहे; याकरितां या अवस्थेंत आत्मसाक्षात्कार न होणें हा दोष पाहून विवेकख्याति-अवस्थेविषयींही वैराग्ययुक्त झालेलें चित्त त्या विवेकख्यातीस आवरतें ( नष्ट करितें. ) त्या अवस्थेंत असणारें चित्त संस्काराला मात्र अनुसरून संस्कारमात्ररूपानें असतें. त्यास निर्बीज समाधि ह्मणतात; व कांहींएक त्या योगांत जाणलें जात नाहीं ह्मणून त्यास असंप्रज्ञात हें नांव योगिजनांनीं दिलें आहे. याप्रमाणें चित्तवृत्तिनिरोधरूप योग दोन प्रकारचा आहे ॥ २ ॥

आतां असंप्रज्ञातअवस्थेंत चित्त असतां कोणत्याही प्रकारच्या विषयाचें भान नसल्यामुळें बुद्धिसाक्षी पुरुष कोणत्या रूपानें राहतो तें सांगतात,—

## तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम् ॥ ३ ॥

**सूत्रार्थः**—निरोधकाळीं आत्मा चिन्मात्रस्वरूपानें असतो.

**भाष्यम्—स्वरूपप्रतिष्ठा तदानीं चितिशक्तिर्यथा कैवल्ये, व्युत्थानचित्ते तु सति तथापि भवन्ती न तथा ॥ 'कथं तर्हि दर्शितविषयत्वात्' ॥ ३ ॥**

**भाष्यार्थः**—असंप्रज्ञातयोगांत आत्मा केवल आपल्या रूपानें ( प्रकाशरूपानें ) असतो. जसा मोक्षांत दुःखनिवृत्तिच पुरुषार्थ आहे, तसें यांत दुःखनिवृत्ति फल आहे. आतां संप्रज्ञात योगांत चित्त असतांना पुरुष स्वरूपानें ( प्रकाशरूपानें ) राहणारा परंतु असंप्रज्ञात व कैवल्य यांच्याशीं समान नसतो ॥ ३ ॥

आतां ज्या वेळेस बुद्धि विषय ग्रहण करून चितींत प्रतिबिंबित होते त्या वेळेस चिति कोणत्या रूपानें असते तें सांगतात,—

## वृत्तिसारूप्यमितरत्र ॥ ४ ॥

**सूत्रार्थः**—निरोधकाळावांचून इतरवेळीं वृत्तींच्या तादात्म्यरूपानें आत्मा असतो.

**भाष्यम्—व्युत्थाने याश्चित्तवृत्तयस्तदविशिष्टवृत्तिः पुरुषः । तथा च सूत्रम् । एकमेव दर्शनं ख्यातिरेव दर्शनमिति । चित्तमयस्कान्तमणिकल्पं सन्निधिमात्रोपकारि दृश्यत्वेन स्वं भवति पुरुषस्य स्वामिनः । तस्माच्चित्तवृत्तिबोधे पुरुषस्यानादिः सम्बन्धो हेतुः ॥ 'ताः पुनर्निरोद्धव्या बहुत्वे सति चित्तस्य' ॥ ४ ॥**

**भाष्यार्थः**—योगावांचून इतर वेळीं ज्या चित्ताच्या शांत, घोर व मूढ अशा अवस्था त्यांच्याशीं अगदीं समानरूप असा आत्मा असतो. या बुद्धिवृत्ति व आत्मा यांचा व्युत्थानकालीं सारखेपणा असतो अशाविषयीं पंचशिखाचार्यांचें सूत्र प्रमाण आहे. त्यांत असें सांगितलें आहे कीं, लोकांना ख्याति ह्म० बुद्धि, तीच एकाकारानें दिसणें हा भ्रम आहे. आतां अशी शंका येते कीं, जर वृत्ति व तद्बोधात्मा अगदीं भिन्न आहेत तर त्या त्या पुरुषांचाच नियमानें बोध व्हावा ह्यास नियामक काय ? तर याचें समाधान असें कीं, जसा अयस्कांतमणि ( लोहचुंबक ) अग्नि वगैरे ठिकाणीं पडलेल्या लोखंडाचें आकर्षण करून अग्नींतून बाहेर काढून आपल्या जवळ आणितो; परंतु पुरुषाचें लोखंड अग्नींतून निघालें, यास साधनभूत ह्मणून उपकारक होऊन तो पुरुषाचा स्वकीय होतो; तसें चित्तही लोखंडाप्रमाणें इतरविषयांस जवळ केल्यानेंच दृश्यत्वरूप उपकार पुरुषावर करून पुरुषाचें भोगसाधनामुळें (स्वकीय) होतें. अर्थात् चित्त स्व व पुरुष स्वामी या दोहोंचा स्वस्वामिभावसंबंध अनादि आहे; तो अनादि स्वस्वामिभावसंबंधच पुरुषाच्या चित्तवृत्तिदर्शनाविषयीं हेतु आहे ॥ ४ ॥

आतां चित्ताच्या अनेक जरी वृत्ति आहेत तथापि त्यांत योगास साधनभूत व निरुद्ध करण्याच्या वृत्ति किती आहेत ते सांगतात,—

## वृत्तयः पञ्चतय्यः क्लिष्टा अक्लिष्टाः ॥ ५ ॥

**सूत्रार्थः**—चित्ताच्या वृत्ती पांचप्रकारच्या आहेत; आणि त्यांपासून दुःख, सुख प्राप्त होतें.

**भाष्यम्—क्लेशहेतुकाः कर्माशयप्रचये क्षेत्रीभूताः क्लिष्टाः । ख्यातिविषया गुणाधिकारविरोधिन्योऽक्लिष्टाः । क्लिष्टप्रवाहपतिता अप्यक्लिष्टाः । क्लिष्टच्छिद्रेष्वप्यक्लिष्टा भवन्ति, अक्लिष्टच्छिद्रेषु क्लिष्टा इति । तथाजातीयकाः संस्कारा वृत्तिभिरेव क्रियन्ते, संस्कारैश्च वृत्तय इति । एवं वृत्तिसंस्कारचक्रमनिशमावर्तते । तदेवंभूतं चित्तमवसिताधिकारमात्मकल्पेन व्यवतिष्ठते प्रलयं वा गच्छतीति ताः क्लिष्टाश्चाक्लिष्टाश्च पञ्चधा वृत्तयः॥५॥**

**भाष्यार्थः**—ज्या दुःखांसच कारण व धर्माधर्मरूपवासनासमूहांस आश्रय अशा त्या वृत्ति क्लिष्ट ( क्लेश देणाऱ्या ) होत. आणि ज्यांपासून सुख प्राप्त होणारें व ज्या सत्वादिगुणांच्या कार्यांच्या आरंभास प्रतिबंध करणाऱ्या आणि ज्यांत केवळ प्रकृतिपुरुषांचाच विचार असतो त्या अक्लिष्ट होत. अक्लिष्टवृत्तींचा भाग प्रायः असून यत्किंचित् क्लिष्टवृत्तींचा अंश असला तरी तशा मिश्रवृत्तीस अक्लिष्टच ह्मणावयाचें. तसेंच, क्लिष्टवृत्ति पुष्कळ असून अक्लिष्टवृत्ति अगदीं थोडी आहे तर तशाही मिश्रवृत्तींचें क्लिष्टशब्दानेंच ग्रहण होतें. ( ह्मणून क्लिष्टाक्लिष्ट अशा मिश्रवृत्तींचें वेगळें ग्रहण केलें नाहीं. ) आतां या वृत्तींचा निरोध करण्याचें कारण असें कीं, या क्लिष्टाक्लिष्ट वृत्तीच तशा प्रकारचे संस्कार उत्पन्न करितात; व त्या सं-

स्कारांपासून पुनः चित्तवृत्ति उत्पन्न होतात. याप्रमाणें हें वृत्तिसंस्काररूप चक्र निरंतर फिरत राहतें. असें तें या प्रकारचें चित्त, वृत्तींचा निरोध झाल्यावर क्रमानेंच अधिकार समाप्त होऊन नेहमीं व्युत्थानअवस्थेपर्यंत आत्म्याप्रमाणें दुःखरहित राहते; अथवा अभ्यासानें सर्वसंस्कारांचा क्षय झाला असतां आत्यंतिक लयास जातें ॥ ५ ॥

त्या क्लिष्ट व अक्लिष्टवृत्ती पांचप्रकारच्या आहेत; त्या अशा,–

## प्रमाणविपर्ययविकल्पनिद्रास्मृतयः ॥ ६ ॥

**सूत्रार्थः**–प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा आणि स्मृति अशीं पांच चित्तवृत्तींचीं नांवें आहेत.

## तत्र प्रत्यक्षानुमानागमाः प्रमाणानि ॥ ७ ॥

**सूत्रार्थः**–प्रत्यक्ष, अनुमान आणि आगम हीं प्रमाणें आहेत.

**भाष्यम्–इन्द्रियप्रणालिकया चित्तस्य बाह्यवस्तूपरागात्तद्विषया सामान्यविशेषात्मनोऽर्थस्य विशेषावधारणप्रधाना वृत्तिः प्रत्यक्षं प्रमाणम्। फलमविशिष्टः पौरुषेयश्चित्तवृत्तिबोधः। बुद्धेः प्रतिसंवेदी पुरुष इत्युपरिष्टादुपपादयिष्यामः।अनुमेयस्य तुल्यजातीयेष्वनुवृत्तो भिन्नजातीयेभ्यो व्यावृत्तः सम्बन्धो यस्तद्विषया सामान्यावधारणप्रधाना वृत्तिरनुमानम्। यथा देशान्तरप्राप्तेर्गतिमच्चन्द्रतारकं चैत्रवत्। विन्ध्यश्चाप्राप्तिरगतिः। आप्तेन दृष्टोऽनुमितो वार्थः परत्र स्वबोधसंक्रान्तये शब्देनोपदिश्यते, शब्दात्तदर्थविषया वृत्तिः श्रोतुरागमः। यस्याश्रद्धेयार्थो वक्ता न दृष्टानुमितार्थः स आगमः प्लवते। मूलवक्तरि तु दृष्टानुमितार्थे निर्विप्लवः स्यात् ॥ ६ ॥ ७ ॥**

**भाष्यार्थः**–इंद्रियें हींच नाडी ह्म० संचार करण्याचे मार्ग, त्या मार्गांनीं बाह्य (बाहेरील) दिसणाऱ्या वस्तूंचा संयोग होऊन इंद्रियांबरोबर चित्ताचा अर्थाकार परिणाम होऊन सामान्य व विशेष जे अर्थ, त्यांचा विशेष निश्चय होण्यास साधन जी मुख्य वृत्ति तें प्रत्यक्ष प्रमाण होय. प्रत्यक्षप्रमाणास करण ( साधन ) जी पुरुषाचे ठिकाणीं असणारी वृत्ति तिचें फल, ' हा घट ' या आकाराची बिंबरूप चित्तवृत्ति व तिचेंच चैतन्यांत प्रतिबिंब पडून चैतन्यही ' हा घाट ' या आकारासारखें होऊन बोध होणें; करितां चित्तवृत्तींत व यांत अगदींच विशेष सांगतां येत नाहीं. ह्मणून चित्तवृत्तींशीं अगदीं तुल्य, व पुरुषाचे ठिकाणीं वैषयिकनांवाच्या संबंधानें असणारा चित्तवृत्तिविषयक बोध होय. आतां अशी शंका येते कीं, चित्ताविषयीं चित्ताचा विषयाकार परिणामच विषयग्रहणास कारण दृष्ट आहे; परंतु आत्मा अपरिणामी असल्यामुळें वृत्त्याकार होणें त्याविषयीं मुळींच संभवत नाहीं; तेव्हां पुरुष चित्तवृत्तींचा साक्षी व त्यांच्याशीं अगदीं समान, हें कसें ? याचें समाधान असें कीं,–आत्मा हा,

विषयाकारबुद्धीचें प्रतिबिंब त्यांत पडून बुद्धिसारख्या आकाराचा दिसतो; असें आह्मी पुढें सांगणार आहोंत; त्यामुळें बुद्धिसाक्षित्व व विशेषरहितत्व बरोबरच आहे. अनुमेयाचा साध्यवत्त्वामुळें समानप्रकारचे जे पक्ष, त्याठिकाणीं नियमानें असणारा, व विपक्षाचे ठिकाणीं नसणारा, अर्थात् त्याच अनुमेयावर असणारा जो संबंध त्याविषयीं जें ज्ञान त्यापासून उत्पन्न झालेली जी सामान्यनिश्चयास मुख्य साधन वृत्ति, तिला अनुमान ह्मणावें. यास दृष्टांत; जसें, अन्य देशांस गेलीं यावरून चंद्र व नक्षत्रें हीं गमन करणारीं आहेत; जसा चैत्रनामक कोणी एक पुरुष चालणारा ह्मणून अन्यदेशास जातो ह्याप्रमाणें. अथवा विंध्यपर्वत देशांतरास गेला नाहीं यावरून तो गतिमान् नाहीं. (यांतील प्रथम दृष्टांत अन्वयव्याप्तिविषयीं व दुसरा व्यतिरेकव्याप्तीविषयीं.) भ्रम,प्रमाद व विप्रलंभ इत्यादिकांस साधन जे अकुशलत्व इत्यादि दोष, तद्रहित जो पुरुष त्यास आप्त ह्मणतात; त्यानें पाहिलेला किंवा अनुमानानें सिद्ध केलेला जो पदार्थ त्याप्रत, इतरास् ( श्रोत्यास ) आप्तचित्तांत असणारें जें ज्ञान त्यासारखें ज्ञान उत्पन्न करण्याकरितां शब्दानें उपदेश करून त्या शब्दापासून तद्विषयाकार जी श्रोत्याची वृत्ति तीस आगम ह्मणतात. आतां ज्या आगमाचा वक्ता ( सांगणारा ) ज्याचा अर्थ साक्षात् पाहिलेला किंवा अनुमानित नसल्यामुळें श्रद्धेस ( विश्वासास ) अपात्र ( अयोग्य ); जसें–'ज्यास स्वर्गाची इच्छा असेल त्यांनीं जैनमंदिरास वंदन करावें,' इत्यादिक कथन करणारा; असा तो आगमाचा अर्थ दृष्ट किंवा अनुमानित नसल्यामुळें प्रमाणभूतवृत्तींत गणला जात नाहीं. आतां अशी शंका येते कीं, ज्याचा अर्थ दृष्ट नाहीं किंवा अनुमितही नाहीं परंतु श्रुतिमूलक आहे; अशा आधुनिक (अर्वाचीन, नवीन) मनुस्मृति इत्यादि आगमाला प्रामाण्यजनकत्व येणार नाहीं; याचें समाधान,–मन्वादि आगम श्रतिमूलक असून त्या मूलश्रुतींचा वक्ता ईश्वर असल्याकारणानें तो दृष्टानुमितार्थ आहे, तन्मूलक मन्वादि आगमही प्रामाण्यजनक आहे ॥६॥७॥

याप्रमाणें प्रमाणरूप वृत्ती सांगून विपर्ययवृत्तीचें लक्षण सांगतात–

## विपर्ययो मिथ्याज्ञानमतद्रूपप्रतिष्ठम् ॥ ८ ॥

**सूत्रार्थः**–प्रथम कांहीं सारखेपणानें व भीति वगैरे निमित्तानें एका ठिकाणीं, वस्तूचें खरें स्वरूप तें नसून दुसऱ्याच प्रकारच्या वस्तूचें भान होऊन नंतर कांहीं प्रमाणांनीं त्या ज्ञानाचा बाध होतो; त्यांतील पूर्वीचें ज्ञान तो विपर्यय होय.

**भाष्यम्–स कस्मान्न प्रमाणं यतः प्रमाणेन बाध्यते। भूतार्थविषयत्वात्प्रमाणस्य, तत्र प्रमाणेन बाधनमप्रमाणस्य दृष्टम्। तद्यथा, द्विचन्द्रदर्शनं सद्विषयेणैकचन्द्रदर्शनेन बाध्यते इति।सेयं पञ्चपर्वा भवत्यविद्या। अविद्यास्मितारागद्वेषाभिनिवेशाः क्लेशा इति। एत एव स्वसंज्ञाभिस्तमो मोहो महामोहस्तामिस्रान्धतामिस्रे इति। एते चित्तमलप्रसङ्गेनाभिधास्यन्ते ॥ ८ ॥**

**भाष्यार्थः**—शिंपा इत्यादिकांवर रुपें इत्यादिकांचें भान भयानें अथवा त्वरा वगैरे कारणांनीं होणें ह्यास विपर्यय ह्मणतात. यांतही विषय अनुभवसिद्ध असतात; तेव्हां तो प्रमाण कां नाहीं? उत्तर,—यास प्रमाण ह्मणतां येत नाहीं; कारण नंतर कोणत्याही प्रकारें बाध न होणाऱ्या अशा अनुभवसिद्धप्रमाणानें त्याचा बाध होतो; ह्मणजे पूर्वीचें ज्ञान नाहींसें होतें; करितां यास प्रमाण ह्मणतां येत नाहीं. आतां तो बाध्यबाधकभावच उलट कां नसेल ? तर तसें ह्मणतां येत नाहीं; कारण प्रमाणानें झालेल्या ज्ञानांत सद्रूपवस्तु ( सर्वइंद्रियांनीं प्रत्यक्ष होणारा पदार्थ ) व विपर्ययांत त्याहून विरुद्ध ह्मणजे असद्रूप वस्तु असते; त्याकरितां बलवत्त्वास्तव प्रमाणानेंच विपरीतज्ञानाचा बाध दृष्ट आहे[1]. तो असा—डोळ्यावर बोट वगैरे ठेवून दृष्टिदोषानें दोन चंद्रांचें अवलोकन (दर्शन) होऊन पुनः दृष्टिदोष गेल्यानंतर एका चंद्राचें दर्शन होतें. तें नेहमीं राहणारें व विद्यमानवस्तुसंबंधीं असल्यामुळें पूर्वील अविद्यमानविषयांचा बाध होतो, त्याप्रमाणें. आतां जी अविद्या, संसाररूप अनर्थास कारण ती हीच विपर्ययवृत्ति. हिला (अंकुरास बीज याप्रमाणें) पांच प्रतिबंधक असे ग्रंथी आहेत; ते येणें प्रमाणें,—अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश. हे क्लेश देणारे ह्मणून हेही क्लेशसंज्ञक होत; याकरितां हिचा (विपर्ययवृत्तीचा) निरोध केला पाहिजे. हेच पांच क्लेशसंज्ञक आपल्या नांवास अनुरूप यथाक्रमानें तम, मोह, महामोह, तामिस्र व अंधतामिस्र ह्या अशा संज्ञांनीं प्रसिद्ध आहेत, करितां हे अगदींच हेय ( त्याग करण्यास योग्य ) आहेत. हें अविद्यादिपंचक चित्तमलप्रसंगानें पुढें सांगूं ॥ ८ ॥

आतां विकल्पवृत्ति सांगतात,—

## शब्दज्ञानानुपाती वस्तुशून्यो विकल्पः ॥ ९ ॥

**सूत्रार्थः**—ज्याचें शब्दमात्रानेंच ज्ञान होतें; व त्या नांवाची वस्तु तर कोठें नसते; त्यास विकल्प ह्मणतात.

**भाष्यम्—स न प्रमाणोपारोही न विपर्ययोपारोही च । वस्तुशून्यत्वेऽपि शब्दज्ञानमाहात्म्यनिबन्धनो व्यवहारो दृश्यते । तद्यथा, चैतन्यं पुरुषस्य स्वरूपमिति । यदा चितिरेव पुरुषस्तदा किमत्र केन व्यपदिश्यते । भवति च व्यपदेशे वृत्तिः । यथा, चैत्रस्य गौरिति । तथा, प्रतिषिद्धवस्तुधर्मा निष्क्रियः पुरुषः । तिष्ठति बाणः स्थास्यति स्थित इति । गतिनिवृत्तौ धात्वर्थमात्रं गम्यते । तथानुत्पत्तिधर्मा पुरुष इति । उत्पत्तिधर्मस्याभावमात्रमवगम्यते न पुरुषान्वयी धर्मः । तस्माद्विकल्पितः स धर्मस्तेन चास्ति व्यवहार इति ॥ ९ ॥**

---

**सू० ८ टीपः**—१ तसें विपरीत ज्ञान होणें हा बुद्धीचाच धर्म आहे.

**भाष्यार्थः**—तो विकल्प प्रमाण ह्मणतां येत नाहीं, कारण त्यांत प्रत्यक्ष वस्तु नसल्यामुळें त्याचा प्रमाणकोटींत अंतर्भाव होत नाहीं. तसेंच त्याविषयीं शब्दापासून ज्ञान होतें ह्मणून विपर्ययांतही त्याची गणना करितां येत नाहीं; कारण त्यांत जरी प्रत्यक्ष वस्तु नाहींत; तथापि शब्दज्ञानाच्या माहात्म्यानें जसा यथार्थशब्दानें व यथार्थज्ञानानें लोकांत व्यवहार होतो, तसाच विकल्पज्ञानापासूनही व्यवहार होतो. तसा विपरीतज्ञानांत होत नाहीं; कारण विपरीत ज्ञान नाहींसें झाल्यानंतर शुक्तिकेवर रजत असें ज्ञान मुळींच राहत नाहीं. यास प्रथम वस्तुशून्यत्वाविषयीं दृष्टांत, जसें—' चैतन्य हें पुरुषाचें स्वरूप ' अशा प्रकारच्या ज्ञानांत पुरुष हा विशेष्य व चैतन्य हें विशेषण आहे; परंतु जेव्हां ' चितिच पुरुष ' अशा प्रकारचें ज्ञान, यांत विशेष्य कोण, व विशेषण कोणतें ? कारण चिति व पुरुष हे शब्दानें मात्र भिन्न, परंतु वस्तुतः एकच असल्यामुळें विशेष्यविशेषणभावरूप अर्थाचें भान मुळींच नाहीं. आतां शब्दज्ञानांत असतो याविषयीं उदाहरण, जसें—' चैत्राची गाय ' या वाक्यापासून विशेष्यविशेषणभावाचें ज्ञान होतें. आतां शास्त्रीय दुसरा दृष्टांत, जसें,—शास्त्रांनीं निषिद्ध केले आहेत वस्तुभूतसुखादिक धर्म ज्याचे असा. हें एक दुसरें उदाहरण, गेल्या आहेत क्रिया ज्यापासून असा पुरुष. या दोन्ही उदाहरणांत वस्तूंच्या धर्मांचा अभाव व क्रियांचा अभाव पुरुषाच्या ठिकाणीं सांगितला. हा सांख्यसिद्धांतांत असा कांहीं एक पदार्थ सांगितला नाहीं कीं, ज्या योगानें पुरुषांत इतराहून कांहीं विशेष दाखवितां येईल. तर त्यापासून शब्दबोध मात्र होतो. तसेंच, बाण राहतो, राहील व राहिला यांत गतिनिवृत्ति ह्म० गमनाचा अभाव, त्याविषयीं जो विकल्प, त्यांत वर्तमानत्व, भविष्यत्व व भूतत्व यांनीं युक्त असा ' स्था ' धातूचा अर्थ मात्र अनुभवास येतो; परंतु बाणांत गतिनिवृत्तीस अनुकूल अशी कृति मुळींच नाहीं; करितां वस्तुशून्यत्व सहज सिद्ध होतें. तसेंच, ज्यास उत्पत्ति नाहीं तो अनुत्पत्ति ह्म० उत्पत्तिरहिता, असा आहे धर्म ज्याचा असा पुरुष. यांत उत्पत्तिधर्माचा अभाव मात्र ज्ञात होतो. पुरुषावर तो धर्म मुळींच नसल्यामुळें तो अनुत्पत्तिधर्म शाब्दज्ञानांत मात्र असून वस्तुरहित असल्यामुळें विकल्पित झाला; ह्मणून लोकांत तसा व्यवहारही होतो ॥ ९ ॥

आतां निद्रावृत्तीचें लक्षण सांगतात,—

## अभावप्रत्ययालम्बना वृत्तिर्निद्रा ॥ १० ॥

**सूत्रार्थः**—जींत कोणत्याच वस्तूचें भान होत नाहीं; अशा चित्तवृत्तीस निद्रा ह्मणतात.

**भाष्यम्—सा च सम्प्रबोधे प्रत्यवमर्शात् प्रत्ययविशेषः । कथम् । सुखमहमस्वाप्सं प्रसन्नं मे मनः प्रज्ञां मे विशारदीकरोति । दुःखमहमस्वाप्सं स्त्यानं मे मनो भ्रमत्यनवस्थितम् । गाढं मूढोऽहमस्वाप्सं गुरूणि मे गात्राणि । क्लान्तं मे चित्तमलसं मुषितमिव**

**तिष्ठतीति ॥ स खल्वयं प्रबुद्धस्य प्रत्यवमर्शो न स्यादसति प्रत्ययानुभवे, तदाश्रिताः स्मृतयश्च तद्विषया न स्युः । तस्मात्प्रत्ययविशेषो निद्रा । सा च समाधावितरप्रत्ययवन्निरोद्धव्येति ॥ १० ॥**

**भाष्यार्थः**—येथें प्रथम अशी शंका येते कीं, जसा निरोधावस्थेंत व कैवल्यप्रलयांत सर्ववृत्तींचा अभाव असतो, त्याप्रमाणें सर्व सुषुप्त्यवस्थेंतही वृत्तींचा अभाव एवढेंच मानावें; ह्मणजे पृथक् निद्रा मानण्याची गरज नाहीं. त्यास हें उत्तर,—ती निद्रा तर कांहींएक अनुभवांतील विशेषच आहे; कारण जागृतिअवस्थेंत तिचें पुढें सांगण्याच्या उपपत्तिसहित स्मरण असतें; ह्मणून सर्ववृत्तींचा अभाव ह्मणतां येत नाहीं. जेव्हां सत्वगुणसहित तमोगुण प्रकट होतो तेव्हां त्या सात्विकनिद्रेंतून उठलेल्याच्या स्मरणाचा आकार असा असतो कीं, 'मी सुखानें निजलों होतों, माझें निर्मल मन बुद्धीस स्वच्छ करितें;' इत्यादि. आतां जेव्हां रजोगुणाच्या साहाय्यानें तमोगुण प्रकट होतो; तेव्हां, ' मी दुःखानें निजलों होतों, माझ्या मनास कोणतेंच काम करावेंसें वाटत नाहीं; कारण तें अगदीं चंचल होऊन एकसारखें भ्रमत आहे. आतां केवल तमोगुणयुक्त निद्रेंतून उठतो त्या वेळेस 'मला अगदीं गाढ निद्रा लागली होती; माझें सर्व शरीर जड झालें आहे; माझें चित्त अगदीं थकून गेलें आहे; तें कोणतेंही कर्म करण्यास समर्थ नसून दुसऱ्यानें जणू हरणच केलें कीं काय? असें वाटतें. ' आतां अशी शंका येते कीं, जरी स्मरण होतें तथापि सुषुप्तींत अनुभवसिद्धि कशी? त्याचें उत्तर,—जाग्रत् व स्वप्नवृत्तींच्या अभावास कारण जें कोणी त्याचा जर अनुभवच नसता तर जागृत झालेल्या पुरुषास तें स्मरणही न होतें; कारण पूर्वसंस्कारावांचून स्मृति होत नाहीं. तसाच प्रत्ययानुभव नसेल तर प्रत्ययविषयक चित्ताश्रित स्मृतीही होणार नाहींत; कारण एकानें पाहिलेल्या वस्तूचें स्मरण दुसऱ्यास होत नाहीं. त्याकरितां कांहीं प्रत्ययविशेषच निद्रा होय. आतां ही निद्रावृत्ति तमोगुणांत एकाग्र, विषयशून्य व दुःखरहित अशी असतां तिचा निरोध करण्याचें कारण असें कीं, ती निद्रावृत्तिही इतरवृत्तींप्रमाणें सुखदुःखमोहात्मक असल्यामुळें समाधीस प्रतिबंध करणारी आहे; करितां तिचाही समाधींत निरोध केला पाहिजे ॥ १० ॥

आतां स्मृतीचें लक्षण सांगतात,—

## अनुभूतविषयाऽसम्प्रमोषः स्मृतिः ॥ ११ ॥

**सूत्रार्थः**—अनुभवलेल्या विषयांचें पुनः जसेंचें तसेंच ज्ञान होणें, ह्यास स्मृति ह्मणतात.

**भाष्यम्—किं प्रत्ययस्य चित्तं स्मरति आहोस्वित् विषयस्येति। ग्राह्योपरक्तः प्रत्ययो**

---

**सू० १० टीप—१** इत्यादि अनेकप्रकारचें जाग्रत्स्थितींत स्मरण होतें, याकरितां निद्रा ह्मणजे ज्ञानाभाव असें जे कोणी ह्मणतात; तें योग्य नाहीं. वि० मि०.

**ग्राह्यग्रहणोभयाकारनिर्भासस्तथाजातीयकं संस्कारमारभते। स संस्कारः स्वव्यञ्जकाञ्जनस्तदाकारामेव ग्राह्यग्रहणोभयात्मिकां स्मृतिं जनयति। तत्र ग्रहणाकारपूर्वा बुद्धिः, ग्राह्याकारपूर्वा स्मृतिः। सा च द्वयी भावितस्मर्तव्या चाभावितस्मर्तव्या च। स्वप्ने भावितस्मर्तव्या, जाग्रत्समये त्वभावितस्मर्तव्येति। सर्वाः स्मृतयः प्रमाणविपर्ययविकल्पनिद्रास्मृतीनामनुभवात् प्रभवन्ति, सर्वाश्चैता वृत्तयः सुखदुःखमोहात्मिकाः। सुखदुःखमोहाश्च क्लेशेषु व्याख्येयाः । सुखानुशयी रागः । दुःखानुशयी द्वेषः । मोहः पुनरविद्येति। एताः सर्वा वृत्तयो निरोद्धव्याः। आसां निरोधे सम्प्रज्ञातो वा समाधिर्भवति, असम्प्रज्ञातो वेति ॥१ 'अथासां निरोधे क उपाय इति' ॥ ११ ॥**

**भाष्यार्थः**—काय ? चित्त हें केवल विषयांप्रतच स्मरतें, किंवा पूर्वींच्या अनुभवरूप-प्रत्ययाचेंही स्मरण करितें ? कारण ज्ञान हें विशेषणत्वेंकरून घटादिकांनीं आकारित झालें ह्मणून ग्राह्य ग्रहण या उभय आकारानें प्रसिद्ध जो अनुभव 'मी घट जाणतों' अशा प्रकारचा, तो, तशा प्रकारच्याच ह्म० ग्राह्य व ग्रहण या उभयआकाराच्याच संस्कारास उत्पन्न करितो. तो उभयविषयसंस्कार जेव्हां आपणांस प्रकाशित करणाऱ्या कालादिकांनीं प्रकाशित होतो, तेव्हां तो आपल्यासारख्या आकाराच्याच ग्राह्य व ग्रहण या दोघांविषयीं स्मृतीस उत्पन्न करितो. आतां स्मरण व प्रत्यय ह्म० अनुभव यी दोहोंत अत्यंत समानाकारता मानतां येत नाहीं; कारण, त्या दोहोंपैकीं ग्रहणाचा आकार मुख्य, अर्थात् विशेष्य जींत ती बुद्धि होय; हिचें उदाहरण,—'मी घट जाणतों,'हा ग्रहणाकार, यांत घटांऽशीं ज्ञान हें विशेष्य आहे. आतां जींत ग्राह्याकार विशेष्य असतो ती स्मृति; हिचें उदाहरण,' तो घट,' हा ग्राह्याकार जाणावा. या स्मृतिज्ञानांत ग्राह्य हें विशेष्य आहे; तेव्हां हा आकारभेद अनुभवसिद्ध आहे. स्मृतीचेही अवांतर कांहीं भेद आहेत; ते येणेंप्रमाणें—भावित ह्म० सूचविला आहे स्मरणीय(स्मरण करण्याला योग्य असा) अर्थ जिनें तीस भावितस्मर्तव्या स्मृति ह्मणतात; हीहून भिन्न ती अभावितस्मर्तव्या स्मृति; असे दोन आहेत. त्यांचीं उदाहरणें,—स्वप्नांत भावितस्मर्तव्या स्मृति; कारण शास्त्रांत स्वप्नदर्शनच भावी ( पुढें होणाऱ्या ) अर्थाचें सूचक आहे. व जाग्रदवस्थेंत अभावितस्मर्तव्या स्मृति[१]; सर्व प्रकारच्या स्मृती प्रमाणादिक सर्ववृत्तींच्या अनुभवानंतर उत्पन्न होतात; " जशी प्रमाणाभासानें प्रमाणस्मृति." ह्या सर्वप्रमाणादि वृत्ती बुद्धिरूपद्रव्याचे सोन्याच्या प्रतिमेप्रमाणें विषयाकारद्रव्यरूप सुखदुःखमोहात्मक परिणाम आहेत. आतां सुख, दुःख व मोह यांची व्याख्या क्लेशव्याख्यानसूत्रावरच करावी;

---

**सू० ११ टीप**—१ आतां अशीं शंका येते कीं, स्वप्नांत पूर्वी अवलोकन केल्याचें स्मरण नसतें, तेव्हां केवल संस्कारापासन उत्पन्न होणारी जी स्मृति ती स्वप्नांत होण्याचा संभव कसा ? यास समाधान असें कीं, कांहीं अंशानें अनुभव व स्मरण एतदुभयरूपत्व स्वप्नज्ञानांत आहे; व तशाच स्वप्नांशाचें उदाहरण भाष्यकारांनीं दिलें आहे.

ती अशी,–सुखाचा विषय राग ( प्रीति ), दुःखाचा विषय द्वेष, व मोह ह्मणजे अविद्या, तिचें लक्षण पुढें सूत्रकारच सांगणार आहेत. त्यांत दुःख हें स्वभावतःच हेय ह्म० त्याग करण्यास योग्य आहे. सुख हें पदार्थांवर प्रीति उत्पन्न करितें, व त्या प्रियवस्तूचा वियोग झाला असतां दुःख होतें; अशा परंपरेनें दुःख देणारें, करितां दुःखाप्रमाणें सुखही हेय आहे. मोह तर अविद्यारूप असल्यामुळें सकलशोकादिदुःखांस कारण ह्मणून अत्यंत हेय होय. याकरितां या सर्ववृत्तींचा निरोध अवश्य केला पाहिजे. या चित्तवृत्तींचा निरोध झाला असतां संप्रज्ञातनामक समाधि व पुढें अभ्यासानें असंप्रज्ञातनामक समाधि सिद्ध होईल. याप्रमाणें योगाचें सामान्य लक्षण केलें ॥ ११ ॥

आतां चित्तवृत्तींच्या निरोधास साधन कोणतें तें सांगतात,–

## अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः ॥ १२ ॥

**सूत्रार्थः**–अभ्यास आणि वैराग्य यांनीं चित्तवृत्तींचा निरोध होतो.

**भाष्यम्–चित्तनदी नामोभयतोवाहिनी वहति कल्याणाय वहति पापाय च । या तु कैवल्यप्राग्भारा विवेकविषयनिम्ना सा कल्याणवहा। संसारप्राग्भारा विवेकविषयनिम्ना पापवहा । तत्र वैराग्येण विषयस्रोतः खिलीक्रियते । विवेकदर्शनाभ्यासेन विवेकस्रोत उद्घाट्यते। इत्युभयाधीनश्चित्तवृत्तिनिरोधः ॥ १२ ॥**

**भाष्यार्थः**–अभ्यास आणि वैराग्य या दोहोंचा अवांतरव्यापारभेदानें वृत्तिनिरोध करण्याविषयीं समावेशच करावयाचा ( ह्मणजे चित्तवृत्तिनिरोधास दोहोंचें साहाय्य घ्यावयाचें ); कारण समाधिरूपकार्यांत या दोहोंचीही गरज आहे; हें नदीरूपकानें भाष्यकार सांगतात,–जशी नदी स्वभावतः समुद्राकडे व कधीं कधीं धरणादिकानें वळविली असतां उलट पृथ्वीसमोर वाहते; तशी चित्तवृत्तिरूप नदी ही शब्दस्पर्शादिविषयभूमीवरून स्वभावतःच संसारसमुद्राकडे वाहत जाते, त्या विषयभूमीवर वैराग्यानें तिचा प्रवाह उलट दिशेस वळवितां येतो. दोन्हीकडे वाहण्याचें कारण असें कीं, मोक्षाकरितां व संसाराकरितां दोहींकडून वाहते. या दोन प्रवाहांपैकीं, समोर गमन करणाऱ्या व विवेकविषयच आहेत उतरता मार्ग जीस अशा चित्तनदीचा विषयमार्गास गमन करणारा वृत्तिप्रवाह वैराग्यानें कमी केला जातो; आणि विवेकदर्शनाच्या अभ्यासानें विवेकमार्गाप्रत गमन करणारा वृत्तिप्रवाह बलवान् होऊन निरोधनामक कैवल्यसागरास मिळतो. या कारणास्तव अवांतरभेदांनीं चित्तवृत्तींचा निरोध उभयाधीन ( अभ्यास व वैराग्य या दोहोंच्या स्वाधीन ) आहे ॥ १२ ॥

आतां अभ्यासाचें लक्षण सांगतात,–

**सूत्र १२ टीपः–**१ आतां योगास अनेक उपाय पुढें सांगणार आहेत; त्या सर्वांचें सार सांगतात,–

## तत्र स्थितौ यत्नोऽभ्यासः ॥ १३ ॥

**सूत्रार्थः**—चित्ताच्या एकाग्रतेविषयीं जो यत्न त्यास अभ्यास ह्मणतात.

**भाष्यम्**—**चित्तस्यावृत्तिकस्य प्रशान्तवाहिता स्थितिः । तदर्थः प्रयत्नो वीर्यमुत्साहः । तत्संपिपादयिषया तत्साधनानुष्ठानमभ्यासः ॥ १३ ॥**

**भाष्यार्थः**—राजस व तामस वृत्ति खेरीज करून केवळ शुद्धसात्विक अशी जी वृत्तिधारा ( एकाग्रता ) तीस स्थिति ह्मणतात. त्या स्थितिनिमित्त जो प्रयत्न ह्म० उत्सुकता, ती संपादन करण्याच्या इच्छेनें जें श्रद्धा, वीर्य इत्यादिसाधनांचें अनुष्ठान त्यास अभ्यास ह्मणतात ॥ १३ ॥

आतां तो अभ्यास अनेकविघ्नांनीं युक्त आहे तथापि स्थिति संपादन करील असा उपाय सांगतात,—

## स तु दीर्घकालनैरन्तर्य्यसत्कारासेवितो दृढभूमिः ॥ १४ ॥

**सूत्रार्थः**—तो अभ्यास बहुत काळानें, सत्कारपूर्वक व नेहमीं चालविल्यानें पक्का होतो.

**भाष्यम्**—**दीर्घकालासेवितो निरन्तरासेवितस्तपसा ब्रह्मचर्येण विद्यया श्रद्धया च संपादितः सत्कारवान् दृढभूमिर्भवति । व्युत्थानसंस्कारेण द्रागित्येवानभिभूतविषय इत्यर्थः ॥ १४ ॥**

**भाष्यार्थः**—आतां अशी शंका येते कीं, अनादि अशा व्युत्थानसंस्कारानें अभ्यासाचा प्रतिबंध झाल्यानें स्थिति संपादन कशी होईल ? त्याचें समाधान असें कीं,—तो अभ्यास जर पुष्कळ वेळपर्यंत, एकसारखा, तप, ब्रह्मचर्य, विद्या व श्रद्धा अशा साधनांनीं अतिशय आदरानें चालविला असतां पक्का होतो; ह्मणजे पुनःपुनः बाहेर निघूं पाहणाऱ्या ज्या राजस व तामस वृत्ती त्यांच्या संस्कारांनीं पराभव न पावतां, स्थितिच आहे विषय ज्याचा असा ( चित्ताची एकाग्रता करण्यास समर्थ असा ) होतो ॥ १४ ॥

आतां वैराग्याचें लक्षण सांगतात,—

## दृष्टानुश्रविकविषयवितृष्णस्य वशीकारसंज्ञावैराग्यम् ॥ १५ ॥

**सूत्रार्थः**—पाहिलेल्या आणि ऐकलेल्या विषयांविषयीं तृष्णारहित (निरिच्छ) अशी जी उपेक्षाबुद्धि तीस वशीकारसंज्ञावैराग्य ह्मणतात.

**भाष्यम्**—**स्त्रियोऽन्नपानमैश्वर्यमिति दृष्टविषयवितृष्णस्य स्वर्गवैदेहप्रकृतिलयत्वप्राप्तावानुश्रविकविषये वितृष्णस्य दिव्यादिव्यविषयसंयोगेऽपि चित्तस्य विषयदोषदर्शिनः प्रसंख्यानबलादनाभोगात्मिका हेयोपादेयशून्या वशीकारसंज्ञा वैराग्यम् ॥ १५ ॥**

**भाष्यार्थः**—स्त्रिया, खाणेंपिणें, ऐश्वर्य इत्यादिक इहलोकीं प्राप्त होणाऱ्या विषयांविषयीं तृष्णारहित; व स्वर्ग, विदेहत्व व प्रकृतिलीनत्व हे जे आनुश्रविक ह्म० वेदापासून समजलेले विषय त्यांच्या प्राप्तीविषयीं इच्छा नसणारे; अशा पुरुषांच्या विषयदोष जाणणाऱ्या चित्ताची जी ( दिव्य व अदिव्य विषयांचा संयोग झाला असतांही त्यांतील दोष साक्षात् दिसत असल्यामुळें त्यांचा भोग न घेणें; ह्याचाच स्पष्टार्थ, हेयोपादेयशून्या ह्म० विषयांविषयीं द्वेष नसणें व प्रीतिही नसणें; अर्थात् ) उदासीनता हीस वशीकारसंज्ञावैराग्य ह्मणतात. सारांश, रागद्वेषरहित अशा विषयसाक्षात्काराच्या योग्यतेस वशीकारसंज्ञानांवाचें वैराग्य ह्मणावें ॥ १५ ॥

पूर्वी अपरवैराग्य सांगितलें, आतां परवैराग्याचें लक्षण सांगतात;—

## तत्परम्पुरुषख्यातेर्गुणवैतृष्ण्यम् ॥ १६ ॥

**सूत्रार्थः**—आत्मसाक्षात्कारानें संपूर्णगुणांविषयीं तृष्णाराहित्य होणें, यास परवैराग्य ह्मणतात.

**भाष्यम्—दृष्टानुश्रविकविषयदोषदर्शी विरक्तः पुरुषदर्शनाभ्यासात् तच्छुद्धिप्रविवेकाप्यायितबुद्धिर्गुणेभ्यो व्यक्ताव्यक्तधर्मकेभ्यो विरक्त इति तद्द्वयं वैराग्यम् । तत्र यदुत्तरं तज्ज्ञानप्रसादमात्रम् । यस्योदये प्रत्युदितख्यातिरेवं मन्यते । प्राप्तं 'प्रापणीयम् । क्षीणाः क्षतव्याः क्लेशाः । छिन्नः श्लिष्टपर्वा भवसंक्रमो यस्याविच्छेदाज्जनित्वा म्रियते मृत्वा च जायते' इति । ज्ञानस्यैव पराकाष्ठा वैराग्यम् । एतस्यैव हि नान्तरीयकं कैवल्यमिति ॥ ' अथोपायद्वयेन निरुद्धचित्तवृत्तेः कथमुच्यते समाधिरिति' ॥ १६ ॥**

**भाष्यार्थः**—पूर्वी सांगितलेले जे स्त्री, अन्नपानादि दृष्ट विषय व वेदांनीं सांगितलेले जे स्वर्गादि दिव्यविषय, हे परिणामीं विरस, अशा दोषदर्शनानें तज्ज्ञानाविषयीं वैराग्य नसून केवल विषयांविषयींच वैराग्य प्राप्त झालेला, हा अपरवैराग्यवान् पुरुष पूर्वसूत्रांत सांगितला. आतां दुसरा, वारंवार आत्मसाक्षात्कारानें, पुरुष हा शुद्ध, अनंत व अपरिणामी असा, व गुण हे तद्विपरीत आहेत; अशा अतिशयविवेकानें तृप्त आहे बुद्धि ज्याची, आणि स्थूल व सूक्ष्म कार्यांवर राहणारे जे सत्वादि गुण, त्यांपासून ( गुणसहितकार्यांपासून ) वैराग्ययुक्त असा हा परवैराग्यवान् पुरुष होय. अशीं हीं अगदीं परस्परभिन्न दोनप्रकारचीं वैराग्यें; त्यांत जें दुसरें परवैराग्य हें ज्ञान[1]प्रसादमात्र आहे. याचेंच विवरण,—ज्या ज्ञानाचा उदय झाला असतां प्राप्त झालें आहे आत्मज्ञान ज्यास, असा योगी असें मानितो कीं, 'प्राप्त करून घेण्याचें जें ज्ञान तें प्राप्त झालें; नष्ट करण्याचे जे अविद्यादि क्लेश ते नष्ट झाले; ह्मणूनच संबद्ध ( बळकट बांधलेले )

**सू० १६ टीप**—१ चित्तसत्व हें स्वभावतः आरशाप्रमाणें प्रसन्न ह्म० स्वच्छ आहे, परन्तु रजस्तमःसंबंधानें मलिन होतें तेव्हां वैराग्याभ्यासरूप स्वच्छ उदकप्रवाहानें सर्व रज व तमोमल धुतल्यानें अत्यंत स्वच्छ होऊन ज्ञानप्रसाद मात्र व परिशेष ( बाकी ) ज्यांत असें होतें. वाचस्प०.

आहेत धर्माधर्मसमूहरूप ग्रंथी ज्याचे असा ( या देहांतून अन्यदेहांत संचार करणें असा ) जो संसार तो विच्छिन्न झाला ( पुनः जन्मास येणें नाहीं ), तो भवसंक्रम असा कीं, ज्या-योगानें निरंतर उत्पन्न होऊन मरणें, व मरून पुनः उत्पन्न होणें; असा जन्ममरणप्रवाह अतिदुःख देणारा होतो,' इत्यादि. त्या ज्ञानाचीच जी परममर्यादा तीच वैराग्य होय; कारण त्याच वैराग्यानें मोक्ष नियमानें होतो ॥ १६ ॥

आतां अभ्यास व वैराग्य या दोन उपायांनीं राजस व तामस वृत्तींचा निरोध कर-णाऱ्या योग्यास संप्रज्ञातसमाधि साध्य होतो तो कोणत्या प्रकारचा तो सांगतात,—

## वितर्कविचारानन्दास्मितारूपानुगमात्सम्प्रज्ञातः[1] ॥ १७ ॥

**सूत्रार्थः**—साक्षात्कारविशेषरूप जे वितर्क, विचार, आनंद आणि अस्मिता यांनीं अनु-गम झाल्यानें चांगली बुद्धि झाली असतां योग संप्रज्ञातनांवाचा होतो.

**भाष्यम्—वितर्कश्चित्तस्यालम्बने स्थूल आभोगः । सूक्ष्मो विचारः। आनन्दो ह्लादः । एकात्मिका संविदस्मिता । तत्र प्रथमश्चतुष्टयानुगतः समाधिः सवितर्कः । द्वितीयो वितर्कविकलः सविचारः । तृतीयो विचारविकलः सानन्दः । चतुर्थस्तद्विकलोऽस्मितामात्र इति। सर्वयेते सालम्बनाः समाधयः॥ 'अथासंप्रज्ञातसमाधिः किमुपायः किंस्वभावो वेति' ॥ १७ ॥**

**भाष्यार्थः**—चित्ताची धारणा करण्याकरितां जें आलंबन ह्म० आश्रय विराट्शरीरादिक, त्यावर, प्रथम जी चित्ताची स्थूलाकारामुळें स्थूल परिपूर्णता तो वितर्क; व तद्युक्त तो सवितर्क समाधि. त्याच आलंबनावर स्थूलास कारणभूत जी प्रकृति, महत्, अहंकार, पंचतन्मात्र तद्रूप भूतेंद्रियांस अतिसूक्ष्म जे अर्थ तदाकार ह्मणून सूक्ष्म जो चित्ताचा आभोग ( अतिसूक्ष्मांतही परिपूर्णता)नो विचार; व तद्युक्त तो सविचार समाधि. त्याच आलंबनावर सविचारावस्थेंत सत्वगु-णाच्या अतिशयानें चित्तास उत्पन्न होणारा जो ह्लादसंज्ञक सुखविशेष त्यांत जो साक्षा-

---

सू० १७ **टीप**—१ सम्यक् ह्म० संशयविपर्ययरहित अशा उत्तमप्रकारानें प्रकर्षेकरून जाणलें जातें भाव्याचें ( ध्येयवस्तूचें ) रूप ज्यानें, तो संप्रज्ञातसमाधि ह्मणावा. समाधि ह्मणजे एक प्रकारची भावना, तो सवितर्कादिभेदांनीं चार प्रकारचा आहे. ज्याचें चिंतन करावयाचें, त्यावांचून इतर विषय मनांत येऊं न देतां, वरचेवर तीं चिंतनीय वस्तुच चित्तांत आणणें; यास भावना ह्मणतात. भाव्य ( चिंतनीय वस्तु ) दोन प्रकारचें; ईश्वर व तत्त्वें. तीं तत्त्वें ( पदार्थ ) ही दोन प्रकारचीं; जड व अजड (चेतन). जड चोवीस आहेत; व अजड ह्म० चेतन पदार्थ आत्मा होय. इति भोजवृत्ति । आतां चोवीस तत्त्वें, भागवतस्कंध ११ अ० २२ श्लोक १३–१६ यांत सांगितलीं आहेत; तीं हीं,–डोळे, कान, नाक, रसना, त्वक् हीं पांच ज्ञानेंद्रियें; हात, पाय, वाणी पायु (गुद) व शिश्न (जननेंद्रिय) हीं पांच कर्मेंद्रियें; पृथ्वी, अप्, तेजस्, वायु व आकाश हीं पांच महाभूतें; गंध, रस, रूप, स्पर्श व शब्द हे पांच विषय; मनस् ( अंतःकरण), प्रकृति, महत्तत्त्व आणि अहंकार, हीं चार; मिळून चोवीस.

त्कार होतो तो आनंद; व आनंदसहित तो सानंद समाधि. त्या सानंदावस्थेंत असतां 'मी सुखी,' अशी तदाकार (तन्मय) चित्ताची वृत्ति होते. एकच आहे आत्मा विषयत्वेंकरून ज्ींत ती एकात्मिका, अर्थात् एका आलंबनावर जी केवळ पुरुषाकारच संवित् ह्म० साक्षात्कार, ती अस्मिता; अस्मितासहित तो सास्मिता समाधि. त्यांतील पहिला सवितर्क ( वितर्कानुगत ) समाधि वितर्कादि चार भूमिकायुक्त होतो, ह्म० तापलेल्या लोखंडाच्या गोळ्याप्रमाणें एक झाल्यामुळें स्थूल साक्षात्कारांत पुरुषापर्यंत सर्वांचेंच भान होतें. दुसरा सविचार समाधि, वितर्कावस्था जिंकल्यामुळें तिचा विषय खेरीज करून पुढच्या भूमींशीं युक्त होतो. तिसरा आनंदानुगत समाधि विचारभूमिकेचा विषय खेरीज करून दोन भूमिकांनीं युक्त होतो. व चवथा अस्मितानुगत समाधि आनंदभूमिकेचा विषय सोडून आनंदरहित असा केवल अस्मिता मात्र समाधि होतो. हे सर्व समाधि साधारण ह्म० एकाग्रवृत्तियुक्त जो असंप्रज्ञात समाधि त्याहून भिन्न होत ॥ १७ ॥

आतां असंप्रज्ञातयोगाचे उपाय कोणते व तो कोणत्या प्रकारचा हें सांगतात,—

## विरामप्रत्ययाभ्यासपूर्वः संस्कारशेषोऽन्यः ॥ १८ ॥

**सूत्रार्थः**—परवैराग्यानें ' ज्ञानही पुरे, ' अशा अलंबुद्धीचा वारंवार अभ्यास केल्यानें कांहीं संस्कार मात्र शेष राहिला असतो; अशा योगास असंप्रज्ञात समाधि ह्मणतात.

**भाष्यम्—सर्ववृत्तिप्रत्यस्तमये संस्कारशेषो निरोधश्चित्तस्य समाधिरसंप्रज्ञातः । तस्य परं वैराग्यमुपायः । सालम्बनो ह्यभ्यासस्तत्साधनाय न कल्पत इति विरामप्रत्ययो निर्वस्तुक आलम्बनीक्रियते । स चार्थशून्यः । तदभ्यासपूर्वं चित्तं निरालम्बनमभावप्राप्तमिव भवतीत्येष निर्बीजः समाधिरसंप्रज्ञातः। स खल्वयं द्विविध उपायप्रत्ययो भवप्रत्ययश्च । तत्रोपायप्रत्ययो योगिनां भवति ॥ १८ ॥ .**

**भाष्यार्थः**—सर्ववृत्तींचा लय होऊन ज्यांत संस्कार मात्र बाकी राहिला, असा जो चित्ताचा निरोध त्यास असंप्रज्ञात योग ह्मणतात. असंप्रज्ञातयोगास मुख्य साधन ज्ञानाविषयींही अलंबुद्धि ह्म० इच्छा नसणें या अर्थाचें पूर्वी सांगितलेलें गुणवैतृष्ण्यरूप परवैराग्यच आहे; कारण, पुरुषापर्यंत कोणत्याही आलंबनावर ( आश्रयावर ) चित्ताची एकाग्रता करण्याचा अभ्यास असंप्रज्ञातयोगास साक्षात् साधक होत नाहीं; करितां पुरुषख्यातिपर्यंत सर्ववृत्तींविषयीं अलंबुद्धिरूप विरामप्रत्यय ( परवैराग्य ) याचाच असंप्रज्ञातयोगांत साधनत्वानें आश्रय करितात; कारण तो, ज्यांत कांहीं चिंतनीय नाहीं असा आहे; व असंप्रज्ञात योगही ध्येयवस्तुरहितच आहे. वैराग्याभ्यासानें चित्त निर्विषय होऊन वृत्तिरूप कार्यें करीत नसल्यामुळें मृताप्रमाणें होतें; व संस्कारसंज्ञक जें संसाराचें बीज त्याचा असंप्रज्ञातयोग सर्वथा नाश करितो; ह्मणून यास निर्बीज समाधि ह्मणतात. तो असंप्रज्ञात

दोन प्रकारचा आहे. पहिला उपायप्रत्यय ह्म० श्रद्धादिउपायांनीं साध्य होणारा; व दुसरा भवप्रत्यय ह्म० जन्ममात्र कारण, अर्थात् अन्यजन्मीं जन्मतःच साध्य होणारा असा आहे. त्यांतील उपायांनीं साध्य होणारा असंप्रज्ञात योग ह्या लोकीं योग्यांना साध्य होतो. ( करितां मुमुक्षुजनांनीं तोच साधण्याविषयीं प्रयत्न केला पाहिजे ) ॥ १८ ॥

आतां भवप्रत्यय असंप्रज्ञात समाधि कोणकोणांस प्राप्त होतो तें सांगतात,—

## भवप्रत्ययो विदेहप्रकृतिलयानाम् ॥ १९ ॥

**सूत्रार्थः**—विदेह व प्रकृतिलयास गेलेल्या योग्यांस असंप्रज्ञात योग जन्मतःच सिद्ध असतो.

**भाष्यम्—विदेहानां देवानां भवप्रत्ययः । ते हि स्वसंस्कारमात्रोपयोगेन चित्तेन कैवल्यपदमिवानुभवन्तः स्वसंस्कारविपाकं तथाजातीयकमतिवाहयन्ति । तथा प्रकृति-लयाः साधिकारे चेतसि प्रकृतिलीने कैवल्यपदमिवानुभवन्ति, यावन्न पुनरावर्ततेऽअ-धिकारवशाच्चित्तमिति ॥ १९ ॥**

**भाष्यार्थः**—शरीराविषयीं निरपेक्ष आहे बुद्धिवृत्ति ज्यांची ते विदेह[1] महदादि[2] देव, त्यांना साधनावांचूनच असंप्रज्ञात योग जन्म मात्र होण्याचा अवकाश, जन्म झाल्या-बरोबर सिद्ध होतो. आतां ते विदेह देव ब्रह्मदेवाच्या प्रत्येक दिवसांत होणारा जो प्रलय व पुनः सर्ग ( सृष्टि ) त्यांत संस्कार मात्र शेष राहिला आहे ज्याचा अशा निरोधावस्थेंत असणाऱ्या चित्तानें मोक्षपदास प्राप्त झालेल्याप्रमाणें, आणि व्युत्थानसमयीं ( निरुद्ध चित्त न-सतां) आपल्या देहभावप्रापक अशा संस्काराच्या फलास प्रारब्धकर्माधीन होत्साते संपवितात; नंतर मुक्त होतात. ईश्वराच्या उपासनेनें अथवा प्रकृतिदेवतेच्या उपासनेनें जे आवरणवि-शिष्ट ब्रह्मांडांतून निघून लिंगशरीरासह प्रकृत्यावरणांत गेले, ते प्रकृतिलय[3] ( प्रकृतिलीन ) होत. तेही चित्ताचीं कार्यें समाप्त न झाल्यामुळें आपोआपच संस्कारशेष प्रकृतींत लीन झाला असतां असंप्रज्ञातयोगांत कैवल्यपदाप्रमाणें सुखानुभव घेतात; जोंपर्यंत चित्ताचीं कार्यें समाप्त न झाल्यानें चित्त पुनः व्युत्थित ( समाधिरहित ) होत नाहीं तोंपर्यंत; चित्ताचा अधिकार समाप्त झाल्यानंतर तेही मुक्त होतात ॥ १९ ॥

आतां उपायप्रत्यय—असंप्रज्ञातयोगाचे अधिकारी सांगतात,—

---

**सू० १९ टीप**—१ सानंदसमाधींत ज्या संकोचितबुद्धीच्या मनुष्यांना परमेश्वराचा साक्षात्कार होत नाहीं, ते देहाविषयीं अहंकाररहित असल्यामुळें त्यांना विदेह असे ह्मणतात. इति भोजवृत्ति. २ असें वि० भि. ३ सास्मितसमाधींमध्यें संतुष्ट असलेल्या ज्या योग्यांना परमेश्वराचें ज्ञान होत नाहीं; त्यांचें चित्त स्वकारणांत लीन झालें असतां त्यांस प्रकृतिलय असे ह्मणतात. भो० वृ०

## श्रद्धावीर्यस्मृतिसमाधिप्रज्ञापूर्वक इतरेषाम् ॥ २० ॥

**सूत्रार्थः**—विदेह व प्रकृतिलयांहून अन्ययोग्यांस केवळ उत्पन्न झाल्याबरोबर असंप्रज्ञात योग होत नाहीं; तर श्रद्धा, उत्साह, स्मृति, एकाग्रता व विवेकख्याति या द्वारानें होतो.

**भाष्यम्**—**उपायप्रत्ययो योगिनां भवति । श्रद्धा चेतसः संप्रसादः । सा हि जननीव कल्याणी योगिनं पाति । तस्य श्रद्दधानस्य विवेकार्थिनो वीर्यमुपजायते । समुपजातवीर्यस्य स्मृतिरुपतिष्ठते । स्मृत्युपस्थाने च चित्तमनाकुलं समाधीयते । समाहितचितस्य प्रज्ञाविवेक उपावर्तते, येन यथावद्वस्तु जानाति । तदभ्यासात्तद्विषयाच्च वैराग्यादसंप्रज्ञातः समाधिर्भवति॥ते खलु नव योगिनो मृदुमध्याधिमात्रोपाया भवन्ति । तद्यथा,—मृदूपायो मध्योपायोऽधिमात्रोपाय इति । तत्र मृदूपायोऽपि त्रिविधो मृदुसंवेगो मध्यसंवेगस्तीव्रसंवेग इति ।तथा मध्योपायस्तथाऽधिमात्रोपाय इति॥२०॥**

**भाष्यार्थः**—पूर्वी सांगितलेले विदेह व प्रकृतिलीन यांहून इतरे योग्यांना केवल जन्म झाल्याबरोबर असंप्रज्ञात योग साध्य होत नाहीं; तर श्रद्धा इत्यादि पांच उपाय(साधनें) पूर्वी असले पाहिजेत. अंतःकरणाची योगावर प्रीति असणें यास श्रद्धा ह्मणतात. ती श्रद्धा योग्याचें अनेक प्रतिबंध दूर करून 'माता पुत्रास रक्षिते' याप्रमाणें रक्षण करण्यास समर्थ होते, ह्मणजे योगभंग होत नाहीं. पुढें योग्यास श्रद्धेपासून, योगास साधन जें जीव अथवा ईश्वर यां दोहोंपैकीं एकाचें तत्त्वज्ञान, यास विवेक ह्मणतात; त्या विवेकाविषयीं इच्छा असल्यामुळें वीर्य (उत्साह[१]) उत्पन्न होतो. पुढें वीर्यापासून पूर्वी अनुभवलेल्या विषयांचें वरचेवर स्मरण होतें. स्मरणापासून चित्त एकाग्र होऊन समाधिस्थ होतें. चित्त समाधींत असतां संप्रज्ञात योग उत्पन्न होऊन जीव व ब्रह्म या दोहोंपैकीं एकाच्या साक्षात्काराविषयीं विचार उत्पन्न होतो. तो असा कीं, ज्या योगानें खऱ्या वस्तूस जाणतो. अशा प्रकारचा जो प्रज्ञाविवेक ( सत्वपुरुषान्यताख्यातिविवेक ) त्याच्या अभ्यासानें तेच विषय चिंतनांत असल्यामुळें परवैराग्य उत्पन्न होऊन त्यापासून असंप्रज्ञात समाधि होतो. ते योगी नऊ प्रकारचे आहेत; ते असे,—अगदीं थोडा तो मृदु; थोडा नव्हे व अतिशयही नाहीं, तो मध्य; व अधिक प्रमाण ज्यास असतें तो अधिमात्र (अतिशयित). अशा तीन प्रकारचे श्रद्धा इत्यादि उपाय आहेत. ते उपाय करणारे जे ते मृदूपाय, मध्योपाय व अधिमात्रोपाय असे तीन प्रकारचे योगी झाले. ते पुनः मृदुसंवेग ( मृदु आहे उपायांची शीघ्रता[२] ज्यांची ते ), मध्यसंवेग व अधिमात्रसंवेग

---

**सू० २० टीप**—१ धारणारूप प्रयत्न. इति वि० भि० २ कोणी (वाचस्पतिमिश्रादि) संवेग या शब्दाचा अर्थ 'वैराग्य' असा करितात; परंतु तसा अर्थ करणें बरोबर नाहीं; कारण उपायभेदांनीं योगी नऊ प्रकारचे, ते होणार नाहींत. व यदा कदाचित् नवशब्दाचा अर्थ 'नवीन' असा केला तथापि उपायकार्यत्वामुळें वैराग्यास उपायमृदुत्वादिक सोडून स्वतंत्र मृदुत्वादिकांचा असंभव आहे; व संवेगशब्दाचा अर्थ 'वैराग्य' असा मुळींच नाहीं. वि० भि०

( तीव्रसंवेग) असे तीन प्रकारचे आहेत. दुसरेही दोन प्रकारचे मध्योपाय व अधिमात्रोपाय हे प्रत्येक तीन तीन प्रकारचे ह्मणजे मृदुसंवेग मध्यसंवेग व अधिमात्रसंवेग असे आहेत ॥२०॥

अशा नऊ प्रकारच्या योग्यांपैकीं सर्वांसच असंप्रज्ञात योग लवकर साध्य होतो असें नाहीं तर,–

## अधिमात्रोपायानां[1] तीव्रसंवेगानामासन्नः ॥ २१ ॥

**सूत्रार्थः**–नऊ योग्यांपैकीं शेवटच्या अधिमात्रोपाययोग्यांत ज्यांची उपायानुष्ठानांत शीघ्रता तीव्र आहे; त्यांस फारच त्वरेनें असंप्रज्ञात समाधि होतो.

**भाष्यम्–तत्राधिमात्रोपायात्समाधिलाभः समाधिफलं च भवतीति ॥ २१ ॥**

**भाष्यार्थः**–त्या नऊ प्रकारच्या योग्यांपैकीं जे शेवटचे तीव्रसंवेग प्रकारचे योगी, त्यांस समाधि साध्य होतो; परंतु त्यांतील ज्यांचे अतिशय अधिमात्र–उपाय असतील त्यांस समाधि व समाधीचें फल जो मोक्ष तो अतिशय लवकर प्राप्त होतो ॥ २१ ॥

ह्यांचेच तारतम्यानें ( कमीजास्तीपणानें ) भेद सांगतात,–

## मृदुमध्याधिमात्रत्वात्ततोऽपि विशेषः ॥ २२ ॥

**सूत्रार्थः**–पूर्वसूत्रांत सांगितलेल्या तीव्रत्वाच्या मृदुत्व, मध्यत्व व अधिमात्रत्वरूप तीन प्रकारानें पूर्वी सांगितलेल्या त्वरेंतही तरतमरूप ( कमीजास्तीरूप ) विशेष होतो; ह्मणजे आसन्न ( समीप ), आसन्नतर ( अतिशय समीप ) व आसन्नतम ( त्याहीपेक्षां अधिक समीप असा होतो.

**भाष्यम्–मृदुतीव्रो मध्यतीव्रोऽधिमात्रतीव्र इति ततोऽपि विशेषः । तद्विशेषान्मृदुतीव्रसंवेगस्यासन्नः । ततो मध्यतीव्रसंवेगस्यासन्नतरः । तस्मादधिमात्रतीव्रसंवेगस्याधिमात्रोपायस्याप्यासन्नतमः समाधिलाभः समाधिफलं चेति ॥२२ ॥ ‘ किमेतस्मादेवासन्नतमः समाधिर्भवति अथास्य लाभे भवति अन्योऽपि कश्चिदुपायो न वेति’॥**

**भाष्यार्थः**–पूर्वसूत्रांत सांगितलेल्या तीव्रसंवेग योग्यांचे मृदु, मध्य व अधिमात्र असे तीन प्रकारचे भेद असल्यामुळें त्यांच्या समाधिलाभांतही तारतम्य आहे. तें असें,– मृदुतीव्रसंवेग अशा योग्याला समाधि व समाधीचें फल (मोक्ष) लवकर प्राप्त होतात; त्याहूनही मध्यतीव्रसंवेगास त्यापेक्षां लवकर प्राप्त होतात; व अधिमात्रतीव्रसंवेग अशा अधिमात्रोपाय नवव्या योग्यास सर्वांहूनही फार त्वरित प्राप्त होतात. सारांश, अधिमात्र-उपाय व तीव्र-संवेग यांविषयीं मोठा प्रयत्न करावा; याकरितां भेद कथन केले आहेत ॥ २२ ॥

---

सू० २१ टीप–१ ‘ तीव्रसंवेगानामासन्नः’ एवढेंच सूत्र, बाकीचें भाष्य. वा. मि.

आतां या नऊ उपायांहून दुसरा आणिक कांहीं अतिसुगम असा उपायं. आहे किंवा नाहीं तें सांगतात,—

## ईश्वरप्रणिधानाद्वा ॥ २३ ॥

**सूत्रार्थः**—अथवा ईश्वराच्या भक्तीनें समाधिलाभ होतो.

**भाष्यम्—प्रणिधानाद्भक्तिविशेषादावर्जित ईश्वरस्तमनुगृह्णात्यभिध्यानमात्रेण । तदभिध्यानादपि योगिन आसन्नतरः समाधिलाभः फलं च भवतीति ॥ २३ ॥ 'अथ प्रधानपुरुषव्यतिरिक्तः कोऽयमीश्वरो नामेति' ॥**

**भाष्यार्थः**—एका प्रकारच्या विशेषभक्तीनें ह्म० सर्व क्रिया ईश्वरार्पण करणें, व विषय-सुखादिक फलांची इच्छा न करितां सर्व कर्में, आपला परम गुरु जो परमेश्वर त्यास समर्पण करणें, तसेंच मोठ्या प्रेमानें त्याचें ध्यान करणें, अशा प्रकारचें जें प्रणिधान, यानें प्रसन्न होऊन संमुख प्राप्त झालेला ईश्वर त्या योग्यावर पूर्ण कृपा करितो; व 'ह्यास समाधि व मोक्ष हे अत्यंत सुगम असोत,' अशा केवळ त्याच्या इच्छेनेंच योगसाधनांत रोगादिकेंकरून कमीपणा झाला असतांही समाधि व मोक्ष लवकर प्राप्त होतात ॥ २३ ॥

आतां पूर्वसूत्रांत ईश्वरभक्तीनें समाधि व मोक्ष प्राप्त होतात ह्मणून सांगितलें, तर तो ईश्वर, प्रकृति व जीवात्मे यांहून वेगळा कोण आहे ? तें सांगतात,—

## क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेष ईश्वरः ॥ २४ ॥

**सूत्रार्थः**—क्लेश व कर्म यांच्या परिणामरूप—वासनांच्या संबंधानें रहित असा सर्व-पुरुषांहून विशेष ( अधिक श्रेष्ठ ) तो ईश्वर होय.

**भाष्यम्—अविद्यादयः क्लेशाः । कुशलाकुशलानि कर्माणि । तत्फलं विपाकस्तदनुगुणा वासना आशयाः । ते च मनसि वर्तमानाः पुरुषे व्यपदिश्यन्ते 'स हि तत्फलस्य भोक्ता' इति । यथा जयः पराजयो वा योद्धृषु वर्तमानः स्वामिनि व्यपदिश्यते । यो ह्यनेन भोगेनापरामृष्टः स पुरुषविशेष ईश्वरः । कैवल्यं प्राप्तास्तर्हि सन्ति च बहवः केवलिनः । ते हि त्रीणि बन्धनानि छित्त्वा कैवल्यं प्राप्ताः । ईश्वरस्य च तत्संबन्धो न भूतो न भावी । यथा मुक्तस्य पूर्वा बन्धकोटिः प्रज्ञायते नैवमीश्वरस्य । यथा वा प्रकृतिलीनस्योत्तरा बन्धकोटिः संभाव्यते नैवमीश्वरस्य । स तु सदैव मुक्तः सदैवेश्वर इति । योऽसौ प्रकृष्टसत्त्वोपादानादीश्वरस्य शाश्वतिक उत्कर्षः स किं सनिमित्त आहोस्विन्निर्निमित्त इति । तस्य शास्त्रं निमित्तम् । शास्त्रं पुनः किंनिमित्तं, प्रकृष्टसत्त्वनिमित्तम् । एतयोः शास्त्रोत्कर्षयोरीश्वरसत्त्वे वर्तमानयोरनादिः संबन्धः ।**

**एतस्मादेतद्भवति सदैवेश्वरः सदैव मुक्त इति । तच्च तस्यैश्वर्यं साम्यातिशयविनिर्मुक्तं न तावदैश्वर्यान्तरेण तदतिशय्यते । यदेवातिशयि स्यात्तदेव तत्स्यात् । तस्माद्यत्र काष्ठाप्राप्तिरैश्वर्यस्य स ईश्वरः । न च तत्समानमैश्वर्यमस्ति । कस्मात् । द्वयोस्तुल्ययोरेकस्मिन् युगपत्कामितेऽर्थे नवमिदमस्तु पुराणमिदमस्त्विति एकस्य सिद्धावितरस्य प्राकाम्यविघातादूनत्वं प्रसक्तं, द्वयोश्च तुल्ययोर्युगपत् कामितार्थप्राप्तिर्नास्ति, अर्थस्य विरुद्धत्वात् । तस्माद्यस्य साम्यातिशयविनिर्मुक्तमैश्वर्य्यं स ईश्वरः स च पुरुषविशेष इति ॥ ' किंच ' ॥ २४ ॥**

**भाष्यार्थः**–अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश हे पांच क्लेशसंज्ञक, यांचीं लक्षणें पुढें सांगूं. चांगलें किंवा वाईट यांस साधन तीं कर्मे अर्थात् धर्म व अधर्मरूपकर्मे; त्या क्लेश व कर्मांचा जो विपाक ह्म० फल, त्यास अनुसरून असणाऱ्या त्या वासना; आतां त्या अंतःकरणाचे ठिकाणीं असतात; परंतु, 'फल भोगणारा पुरुष' असा पुरुषावर त्यांचा मुख्य व्यवहार होतो. यास दृष्टांत,–जसा, जय अथवा पराजय हे युद्ध करणारे संपादन करितात, अर्थात् ते त्यांसच असतात; परंतु त्यांचा जो मुख्य स्वामी असतो, त्याचा जय किंवा पराजय झाला, असा त्यावर मुख्य व्यवहार होतो. आतां पूर्वीं सांगितलेला जो क्लेशकर्मांच्या फलांचा भोग, त्यानें जो नेहमीं अलिप्त ह्म० ज्याला त्या भोगाचा कधींही संबंध नाहीं असा सकल अन्य पुरुषांहून श्रेष्ठ तो ईश्वर ह्म० केवल इच्छेनेंच सकल जगत् उद्धरण्याविषयीं समर्थ असा आहे. आतां शंका अशी येते कीं, जर केवळ क्लेशादिकांनीं रहित जो तो ईश्वर असें लक्षण केलें; तर, ज्ञान प्राप्त होऊन मुक्त झालेले जे हिरण्यगर्भादिक त्यांसही क्लेशादिकांचा संबंध नसतो; एवंच तेच ईश्वर कीं काय ? तर ते ईश्वर नाहींत. कारण पूर्वीं त्यांनीं प्राकृतिक, वैकारिक व दक्षिणा असे तीन बंध तोडून ते मुक्त झाले; तसा बंध ईश्वरास कधीं झाला नाहीं; हल्लीं नाहीं; व पुढेंही होणारा नाहीं. तेंच स्पष्ट सांगतात; जसा, अविद्यारहित अशा मुक्तास पूर्वबंधनावस्थेविषयीं निश्चय होतो. असा ईश्वरास बंध कधीं नव्हता. तशाच प्रकृतींत लीन झालेल्यास कदाचित् अभिमानसंबंधानें पुनः बंध होण्याचा संभव आहे; असा ईश्वरास नाहीं. तात्पर्य, ईश्वरास पूर्वापर कोटी नाहीं, तो नेहमींच दुःखरहित व नेहमींच अकुंठित अशा इच्छेनें युक्त आहे. आतां अशी शंका येते कीं, ईश्वराचा सर्व पुरुषांपेक्षां अत्यंत श्रेष्ठ अशा सत्वसंबंधानें तन्निमित्त उत्कर्ष (ऐश्वर्य) नित्य आहे असें मानितां, यास कांहीं प्रमाण आहे किंवा नाहीं ? उत्तर सांगतात, त्याच्या नित्य उत्कर्षाविषयीं श्रुति, स्मृति, इतिहास, पुराणें इत्यादि शास्त्र प्रमाण आहे. शास्त्रास प्रामाण्य कोठून ? उत्तर, ईश्वराचा उपाधि जें प्रकृष्टसत्व तेंच शास्त्रास प्रमाण आहे. शास्त्र व उत्कर्ष हीं परमेश्वरसत्वावर विषयत्वेंकरून आणि समवायसंबंधानें असल्यामुळें या दोघांचा परस्पर अनादि संबंध आहे; त्यामुळें ईश्वर सर्वदा ज्ञानी

आणि इच्छेस येईल त्याप्रमाणें करणारा व नेहमीं क्लेशादिकांपासून मुक्त आहे. आतां तें त्याचें ऐश्वर्य असें आहे कीं ज्याच्या बरोबरीचें दुसरें नाहीं, मग त्यापेक्षां अधिक असें दुसरें कोठून असणार? आतां जें अतिशयित असेल तेंच त्या ईश्वराचें ऐश्वर्य होय. सारांश, ज्या ठिकाणीं ऐश्वर्याची परम सीमा, तो ईश्वर जाणावा. आतां त्याच्या बरोबरीचेंही ऐश्वर्य नाहीं; याचें कारण असें कीं, दोघे बरोबरीचे असतील तर, एककालीं दोघांनीं एकाच वस्तूविषयीं 'हें बहुतकाल राहो,' 'हें थोडा काल राहो,' अशा विरुद्ध धर्मांचा संकल्प केला असतां त्यांपैकीं एकाचाच संकल्प सिद्ध होणार अर्थात् इतराचा इच्छाविघात होऊन त्यास कमीपणा आला पाहिजे; कारण, एकावेळीं दोघांस इच्छिलेल्या अर्थाची प्राप्ति इच्छित अर्थ भिन्न असल्यामुळें होत नाहीं. त्याकरितां ज्याच्या ऐश्वर्यास साम्य आणि अतिशय नाहीं तो ईश्वर, तो सर्वपुरुषांहून विशेष ( अतिशयित ) असा आहे ॥ २४ ॥

याप्रमाणें त्याच्या क्रियाशक्तीविषयीं शास्त्र प्रमाण सांगितलें; आतां ज्ञानशक्तीविषयीं अनुमान सांगतात,—

## तत्र निरतिशयं सर्वज्ञबीजम् ॥ २५ ॥

**सूत्रार्थः**—त्याचे ठिकाणीं सर्वज्ञपणाचें बीज पराकाष्ठेचें आहे.

**भाष्यम्—यदिदमतीतानागतप्रत्युत्पन्नप्रत्येकसमुच्चयातीन्द्रियग्रहणमल्पं बह्विति सर्वज्ञबीजमेतद्विवर्धमानं यत्र निरतिशयं स सर्वज्ञः । अस्ति काष्ठाप्राप्तिः सर्वज्ञबीजस्य, सातिशयत्वात्परिमाणवदिति । यत्र काष्ठाप्राप्तिर्ज्ञानस्य स सर्वज्ञः । स च पुरुषविशेष इति सामान्यमात्रोपसंहारे कृतोपक्षयमनुमानं न विशेषप्रतिपत्तौ समर्थमिति तस्य संज्ञादिविशेषप्रतिपत्तिरागमतः पर्य्यन्वेष्या । तस्यात्मानुग्रहाभावेऽपि भूतानुग्रहः प्रयोजनम् । ज्ञानधर्मोपदेशेन कल्पप्रलयमहाप्रलयेषु संसारिणः पुरुषानुद्धरिष्यामीति। तथा चोक्तम् । आदिविद्वान्निर्माणचित्तमधिष्ठाय कारुण्याद्भगवान् परमर्षिरासुरये जिज्ञासमानाय तन्त्रं प्रोवाचेति ॥ २५ ॥**

**भाष्यार्थः**—जें भूत, भविष्य आणि वर्तमान कालचें प्रत्येक वस्तूविषयीं व एकंदर वस्तूंविषयीं इंद्रियांस न होणारें असें थोडें अथवा फार ज्ञान हें सर्वज्ञपणाचें चिह्न (ज्ञापक) आहे. तें असें कीं, हें सर्वज्ञबीज कोठें थोडें, कोठें फार, याप्रमाणें वाढत वाढत ज्याठिकाणीं पराकाष्ठेचें असतें तो सर्वज्ञ होय. कारण सर्वज्ञत्वाची सीमा कोठें तरी असलीच पाहिजे. जशी परमाणूवर अल्पत्वाची व आकाशावर परममहत्त्वाची तशी ज्ञानाची पराकाष्ठा जेथें होते, तो सर्वज्ञ व तोच पुरुषविशेष ईश्वर होय. आतां जरी सामान्यज्ञानाविषयीं अनुमान चारितार्थ होऊन उपक्षीणशक्ति ( बलहीन ) झाल्यामुळें नामादिकांचें विशेष ज्ञान करून देण्यास समर्थ

नाहीं; तथापि ईश्वराच्या विष्णु इत्यादि विशेषसंज्ञा शास्त्रादिकांत प्रसिद्ध आहेत त्या जाणाव्या. आतां ईश्वरास स्वतःस जरी उपकाराची गरज नाहीं; तथापि भूतांवर ( स्वभक्तांवर ) कृपा करणें हें प्रयोजन आहे; कारण त्याचा असा संकल्प आहे कीं, 'संसारांत सांपडलेल्या माझ्या भक्तांस' ज्ञान व धर्म यांच्या उपदेशानें दैनंदिन ( ब्रह्मदेवाच्या एका दिवसांत होणाऱ्या प्रलयांत व महाप्रलयांत ( ज्यांत ब्रह्मदेवाचाही लय होतो त्यांत ) उद्धरून दुःखांतून मुक्त करीन.' आपलें कांहीं प्रयोजन नसून केवळ भक्तांवर अनुग्रह करावयाचा एवढ्याकरितांच ईश्वराची प्रवृत्ति, याविषयीं सांख्यशास्त्रांत पंचशिखाचार्यांचें वाक्य आहे; तें असें, पूर्वीं सृष्टीच्या आरंभीं प्रकट झालेला भगवान् विष्णु यानें योगबलानें निर्माण केलेल्या चित्तांत स्वांशानें प्रवेश करून कपिलनामक परमऋषि होऊन करुणेनें तत्त्वजिज्ञासु जो आसुरि त्याजकारणें तत्त्वज्ञान कथन केलें ॥ २५ ॥

याप्रमाणें ईश्वराच्या क्रियाशक्तीविषयीं व ज्ञानशक्तीविषयीं प्रमाण व अनुमान सांगून त्याचा प्रभाव सांगतात,—

## स एष पूर्वेषामपि गुरुः कालेनाऽनवच्छेदात् ॥ २६ ॥

**सूत्रार्थः**—तो ईश्वर, ब्रह्मादिक जे पूर्वपुरुष त्यांचाही गुरु ( उपदेष्टा ) आहे; कारण, त्याची अवस्थिति कालानें परिमित नाहीं.

**भाष्यम्—पूर्वे हि गुरवः कालेनावच्छेद्यन्ते । यत्रावच्छेदार्थेन कालो नोपावर्त्तते स एष पूर्वेषामपि गुरुः । यथास्य सर्गस्यादौ प्रकर्षगत्या सिद्धः तथाऽतिक्रान्तसर्गादिष्वपि प्रत्येतव्यः ॥ २६ ॥**

**भाष्यार्थः**—अगदीं पूर्वसर्गाच्या आरंभीं उत्पन्न झालेले ब्रह्मादिक गुरु हे पुराणादिप्रमाणानें द्विपरार्ध वर्षें इत्यादि आयुष्यानें परिमित आहेत; असें कालपरिमाण ईश्वरास नसल्यामुळें तो ह्या ब्रह्मादिकांचाही पिता, अंतर्यामी व विद्येनें ज्ञानचक्षु देणारा असा आहे. तो जसा ह्या सर्गाच्या आरंभीं ज्ञानाच्या उत्कर्षप्राप्तीनें स्वतःसिद्ध, याप्रमाणेंच पूर्वींच्या अतिक्रांत ( गेल्या ) सर्गांतही असाच जाणावा ॥ २६ ॥

याप्रमाणें त्याचा प्रभाव सांगून आतां त्याच्या उपासनेचे उपाय सांगणार, त्यांस उपकारक असा मंत्र सांगतात,—

## तस्य वाचकः प्रणवः ॥ २७ ॥

**सूत्रार्थः**—त्या ईश्वराचा स्वरूपबोधक प्रणव आहे.

**भाष्यम्—वाच्य ईश्वरः प्रणवस्य । किमस्य सङ्केतकृतं वाच्यवाचकत्वमथ प्रदीपप्रकाशवदवस्थितमिति । स्थितोऽस्य वाच्यस्य वाचकेन सह सम्बधः । सङ्केतस्त्वीश्वरस्य स्थितमेवार्थमभिनयति । यथावस्थितः पितापुत्रयोः सम्बन्धः सङ्केतेनावद्यो-**

**त्यते 'अयमस्य पिता,अयंमस्य पुत्र' इति । सर्गान्तरेष्वपि वाच्यवाचकशक्त्यपेक्षस्तथैव सङ्केतः क्रियते । सम्प्रतिपत्तिनित्यतया नित्यः शब्दार्थसम्बन्ध इत्यागमिनः प्रतिजानते, विज्ञातवाच्यवाचकत्वस्य योगिनः ॥ २७॥**

**भाष्यार्थः**–प्रणव ( ओंकार ) हा ईश्वराचें नांव व ईश्वर हा प्रणवाचा अर्थ आहे. आतां शंका अशी करितात कीं, ईश्वर वाच्य व प्रणव वाचक, या उभयतांची वाच्यवाचकशक्ति, ही काय, पित्यानें ठेविलेल्या देवदत्त इत्यादि नांवांप्रमाणें नवीन संकेतानें कल्पिलेली; अथवा दीपाचा प्रकाश जसा स्वाभाविक तशी स्वाभाविकच आहे ? सिद्धांत करितात, शब्दाचा व अर्थाचा संबंध नित्य आहे. संकेतानें फक्त 'ईश्वर'. हा अर्थ स्पष्ट प्रकाशित केला जातो; जसा, ' हा याचा पिता, ' ' हा याचा पुत्र ' इत्यादि पितापुत्रांचा संबंध नित्य आहे तो संकेतानें फक्त दाखविला जातो. तशी वाच्यवाचकशक्ति नित्य आहे. आतां ही वाच्यवाचकशक्ति लौकिकसंकेतित ( लोकांनीं नवीन कल्पिलेली ) नाहीं तर अन्यसर्गांतही सर्वज्ञ, पूर्वसिद्ध जी पदार्थशक्ति तिला अनुसरूनच संकेत करितात. त्यासदृश ( त्यासारख्या ) व्यवहारपरंपरेनें शब्द व अर्थ यांचा संबंध नित्य असा शाब्दिक ( व्याकरणशास्त्रवेत्ते ) निश्चय करितात; व वाच्यवाचकत्वांचा असें योगी लोक मानितात ॥ २७ ॥

आतां उपासनाप्रकार सांगतात,–

---

**सू० २७ टीप–१** अथर्ववेदांतील मांडूक्योपनिषदांत असें सांगितलें आहे कीं,–' ॐ ' हें अक्षर जें सर्वमय आहे त्याचें उपव्याख्यान करितोः–हा जो सर्व प्रपंच आहे, तो ॐकाररूप आहे. भूत, वर्तमान व भविष्य हें सर्व ॐकाररूप आहे; आणि जें कांहीं ह्या त्रिकालांवांचून आहे तें सुद्धां ॐकाररूप आहे ॥ १ ॥ हें सर्व ब्रह्मरूप आहे, हा आत्मा पण ब्रह्मरूप आहे. या आत्म्याचे चार पाद आहेत ॥ २ ॥ जागृतस्थान, बाह्य पदार्थांचें जाणणें, सात अंगें, एकोणवीस मुखें, स्थूल भोगाचा भोक्ता, आणि वैश्वानर हा प्रथम पाद आहे. मूर्धा, नेत्र, प्राण, धड, मूत्रस्थान, पाय व मुख हीं सात अंगें, आणि पांच प्राण, पांच कर्मेंद्रिय, पांच ज्ञानेंद्रिय व चार अंःतकरणभेद हीं एकोणीस मुखें होत. हीं एकोणवीस भोगांला साधन असल्यामुळें ह्या मुखांनींच स्थूलशब्दादिकांचा बाह्यवृत्तीनें जागृदवस्थेंत भोग होतो ॥ ३ ॥ स्वप्नावस्था, अंतःप्रज्ञ ( तैजस अंतःकरणाची वृत्ति बाहेर न जातां आंतले आंतच ज्ञानाकारपरिणामास पावते; आणि विश्वाची बाहेर जाते, ह्मणून तैजस अंतःकरणास अंतःप्रज्ञ व विश्वास बहिःप्रज्ञ असें ह्मणतात ), सात अंगवाला, ( हीं अंगें मनोमय आहेत ), एकोणवीस मुखवाला ( हीं मुखेंही मनोमयच आहेत ), सूक्ष्म ( वासनामय ) भोगांचा भोक्ता, आणि तैजस हा आत्म्याचा द्वितीय पाद आहे ॥४॥ ज्या वेळेस निद्रावश होऊन कांहींएक इच्छित नाहीं, व कांहींएक स्वप्न पाहत नाहीं, त्या वेळेस त्याला सुषुप्त ( सुषुप्त्यवस्थेस प्राप्त झालेला ) असें ह्मणतात. सुषुप्त्यवस्था, एकीभूत, प्रज्ञाघन ( जागृदवस्थेचें व स्वप्नावस्थेचें ज्ञान हें, घन ह्मणजे ज्यांत एक अविद्यारूप होऊन गेलें असतें तें ), आनंदमय, आनंदभोक्ता, चेतोमुख आणि प्राज्ञ, हा आत्म्याचा तृतीय पाद आहे ॥५॥ हाच सर्वेश्वर, हाच सर्वज्ञ, हाच सर्वांचा अंतर्यामी, हाच सर्वांचें उत्पत्तिस्थान, व हाच सर्वभूतांचा स्वामी आहे ॥६॥ जो अंतःप्रज्ञ, बहिष्प्रज्ञ, उभयतःप्रज्ञ, प्रज्ञानघन, प्रज्ञ व अप्रज्ञही नाहीं; जो अदृष्ट, अव्यवहार्य, अग्राह्य, अलक्षण, अचिंत्य, अव्यपदेश्य, ऐकात्म्य, प्रत्ययसार, प्रपंचोपशम, शांत, शिव व अद्वैत असा आहे. हा आत्म्याचा चतुर्थ पाद मानितात. तोच आत्मा व तोच जाणण्यास योग्य आहे ॥ ७ ॥ तो हा आत्मा ॐकार अक्षररूप आहे. प्रणवाच्या

## तज्जपस्तदर्थभावनम् ॥ २८ ॥

**सूत्रार्थः**–त्या प्रणवाचा जप तसेंच त्याच्या अर्थाचें चिंतन करणें, हें ईश्वरप्रणिधान ( ईश्वरभक्ति ) होय.

**भाष्यम्–प्रणवस्य जपः प्रणवाभिधेयस्य चेश्वरस्य भावना तदस्य योगिनः प्रणवं जपतः प्रणवार्थं च भावयतश्चित्तमेकाग्रं सम्पद्यते । तथा चोक्तम् । 'स्वाध्यायाद्योगमासीत योगात्स्वाध्यायमामनेत् । स्वाध्याययोगसंपत्त्या परमात्मा प्रकाशते' इति ॥ 'किंचास्य भवति' ॥ २८ ॥**

**भाष्यार्थः**–प्रणवाचा जप, व तद्वाच्य जो ईश्वर त्याचें वरचेवर चित्तांत चिंतन या-

---

( ॐकाराच्या ) मात्रा आत्म्याचे पाद आहेत, व आत्म्याचे पाद प्रणवाच्या मात्रा आहेत. अकार, उकार व मकार हे प्रणवाच्या तीन मात्रा आहेत ॥ ८ ॥ जागरितस्थान वैश्वानर हा अकार आहे. जसा अकार ॐकाराची प्रथम मात्रा आहे, तसा वैश्वानर हा आत्म्याचा प्रथम पाद आहे. ह्या दोघांचें अभेदानें जो चिंतन करितो, त्याच्या सर्व कामना पूर्ण होतात, आणि तो सर्वांत मुख्य होतो ॥ ९ ॥ स्वप्नस्थान तैजस हा उकार आहे. हा उकार प्रणवाची द्वितीय मात्रा आहे. उत्कर्षामुळें ( अकारापेक्षां मकाराच्या अगदीं समीप राहतो ह्मणून ) व उभयपणामुळें ( अकार व मकार ह्या दोहोंच्या मध्यें राहतो ह्मणून ) तो आपल्या उपासकाच्या ( तैजस व उकार ह्या दोहोंचें अभेदानें चिंतन करणाऱ्याच्या ) ज्ञानाचा उत्कर्ष करितो, त्यामुळें त्या उपासकाची समदृष्टि होते; व पुनः त्याच्या कुळांत ब्रह्मज्ञानरहित असा कोणी होत नाहीं॥१०॥ सुषुप्तस्थान प्राज्ञ मकार आहे. मकार हा ॐकाराची तृतीय मात्रा आहे. मकाराच्या बरोबर प्राज्ञाचें अभेदानें चिंतन करणारा ईश्वराशीं ऐक्य पावतो ॥११॥ अमात्र हा ॐकाराची चौथी मात्रा आहे. तो अव्यवहार्य, प्रपंचोपशम, शिव व अद्वैत असा आहे. ह्याप्रमाणें हा ॐकार आत्म्याचें रूप आहे. हा अमात्र व आत्मा यांचा अभेद चिंतन करणारा ब्रह्मसरूप होतो ॥ १२ ॥ इति माण्डूक्योपनिषद्भाषांतरं समाप्तम् ॥

**ओ३म्**—**अ, उ, म्** हीं तीन अक्षरें मिळून हा ॐकार झाला आहे.
**अ**—विराट्, अग्नि, विश्व. **उ**—हिरण्यगर्भ, वायु, तेज. **म्**–ईश्वर, आदित्य, प्राज्ञ.

**अ**
- **विराट्**—तो परमात्मा नानाप्रकारच्या जगतांस करणारा आहे.
- **अग्नि**—तो परमात्मा ज्ञानस्वरूपी आणि सर्वव्यापक आहे.
- **विश्व**—ज्यामध्यें सर्व जगत् प्रवेश करून राहिलें आहे आणि जो सर्वांत श्रेष्ठ आहे.

**उ**
- **हिरण्यगर्भः**—हिरण्यगर्भ जो परमात्मा सूर्यादिलोकांस प्रकाश करणारा आहे ह्मणजे सूर्यादिलोक जे प्रकाश करणारे आहेत त्यांस तो परमात्मा उत्पन्न करणारा आहे.
- **वायुः**—तो परमात्मा बलवान् आणि सर्व जगताचें धारण करणारा आहे.
- **तैजसः**—तो परमात्मा प्रकाशस्वरूप आणि सर्व जगतास प्रकाशक आहे.

**म्**
- **ईश्वरः**—तो परमात्मा सर्व जगताचा उत्पन्न करणारा, सर्वशक्तिमान्, धनी आणि न्यायकारी आहे.
- **आदित्यः**—तो परमात्मा नाशरहित आहे.
- **प्राज्ञः**—तो परमात्मा ज्ञानस्वरूपी सर्वज्ञ आहे.

प्रमाणें प्रणवाचा जप करणारा, व प्रणवाच्या अर्थाचें वारंवार ध्यान करणारा योगी याचें अंतःकरण एकाग्र होतें. 'याविषयीं विष्णुपुराणांतील प्रमाण सांगतात,– वेद अथवा प्रणव यांचा जप व अर्थाची भावना करून योगाभ्यास करावा; व समाधिस्थ होऊन प्रणवजप व अर्थाचें भावन ( चिंतन ) करावें. अशा ह्या स्वाध्यायाच्या व योगांच्या बलानें ईश्वराचा साक्षात्कार होतो ॥ २८ ॥

आतां उपासनेचें फळ सांगतात,–

## ततः प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यन्तरायाभावश्च. ॥ २९॥

**सूत्रार्थः**–त्या ईश्वरभक्तीनें आत्म्याचा साक्षात्कार होतो, व सर्व विघ्न दूर होतात.

**भाष्यम्–ये तावदन्तराया व्याधिप्रभृतयस्ते तावदीश्वरप्रणिधानान्न भवन्ति। स्वरूपदर्शनमप्यस्य भवति । यथैवेश्वरः पुरुषः शुद्धः प्रसन्नः केवलोऽनुपसर्गस्तथाऽयमपि बुद्धेः प्रतिसंवेदी यः पुरुष इत्येवमधिगच्छति ।' अथ केऽन्तराया ये चित्तस्य विक्षेपकाः । के पुनस्ते कियन्तो वेति' ॥ २९ ॥**

**भाष्यार्थः**–पूर्वी सांगितलेल्या ईश्वराच्या भक्तीनें योगांत होणारे व्याधि इत्यादिक विघ्न होत नाहींत; आणि जीवाच्या खऱ्या रूपाचा साक्षात्कार होतो. व जसा ईश्वर चैतन्ययुक्त, पापपुण्यविवर्जित, दुःखरहित, केवल ज्ञानस्वरूप व उपद्रवरहित; तसा हाही, जो बुद्धिवृत्तीचा साक्षी पुरुष आहे, असा निश्चय होतो ॥ २९ ॥

आतां चित्तास विक्षिप्त करणारे विघ्न कोणते व किती ते सांगतात,–

## व्याधिस्त्यानसंशयप्रमादाऽऽलस्याविरतिभ्रान्तिदर्शनालब्धभूमिकत्वाऽनवस्थितत्वानि चित्तविक्षेपास्तेऽन्तरायाः ॥ ३० ॥

**सूत्रार्थः**–रोग, योगांत अप्रवृत्ति, संशय, प्रमाद, आळस, अवैराग्य, भ्रमदर्शन आणि अनवस्थिति हे चित्ताचे विक्षेप योगांत विघ्न करणारे आहेत.

**भाष्यम्–नवाऽन्तरायाश्चित्तस्य विक्षेपाः सहैते चित्तवृत्तिभिर्भवन्त्येतेषामभावे न भवन्ति वृत्तयःपूर्वोक्ताश्चित्तवृत्तयः।व्याधिर्धातुरसकरणवैषम्यम्।स्त्यानमकर्मण्यता चित्तस्य। संशय उभयकोटिस्पृक् विज्ञानं स्यादिदमेवं नैवं स्यादिति । प्रमादः समाधिसाधनानामभावनम् । आलस्यं कायस्य चित्तस्य च गुरुत्वादप्रवृत्तिः । अविरतिश्चित्तस्य विषयसम्प्रयोगात्मा गर्द्धः।भ्रान्तिदर्शनं विपर्ययज्ञानम्।अलब्धभूमिकत्वं समाधिभूमेरलाभः । अनवस्थितत्वं यल्लब्धायां भूमौ चित्तस्याप्रतिष्ठा । समाधिप्रति-**

**लम्भे हि सति तदवस्थितं स्यादिति। एते चित्तविक्षेपा नव योगमला योगप्रतिपक्षा योगान्तराया इत्यभिधीयन्ते ॥ ३० ॥**

**भाष्यार्थः**—हे सूत्रांत सांगितलेले नऊ अंतराय ( विघ्न ) हेच चित्ताचे विक्षेपक आहेत. कारण, हे अगदीं चित्तवृत्तींच्या बरोबर उत्पन्न होतात; व हे नसतां चित्तवृत्ती नसतात. यावरून चित्तास चंचल होण्यास कारण ज्या अनेक चित्तवृत्ती त्यांस हेच अंतराय कारण आहेत. शरीरधारण करणारे ह्मणून धातु ( वात, कफ, पित्त ), भक्षण केलेल्या पदार्थांचा परिणाम ते रस, नेत्र इत्यादिक व मन इत्यादि इंद्रियें तीं करण, यांच्यांत बदल होणें, यास व्याधि ह्मणतात. योगानुष्ठान करण्यास चित्तांचें सामर्थ्य नसणें त्यास स्त्यान ह्मणतात. 'असें असेल' किंवा 'असें नसेल' अशा दोन्ही प्रकारच्या ज्ञानाचा आश्रय करणारा तो संशय. योगाच्या साधनाविषयीं सावध न राहणें तो प्रमाद. कफादिकांनीं देहाच्या व तमोगुणानें, चित्ताच्या जडपणामुळें योगाविषयीं प्रवृत्ति न होणें यास आलस्य ह्मणतात. अविरति ह्म० चित्ताची विषयभोगाविषयीं अति उत्कट इच्छा. भ्रांतिदर्शन ह्म० विपरीत ज्ञान; जसें, शिंपेवर रुपें भासणें. अलब्धभूमिकत्व ह्म० अनेक प्रकारचीं योगाचीं साधनें केलीं असतांही पुढें सांगावयाच्या मधुमती इत्यादि भूमींपैकीं एकीचाही लाभ न होणें. कदाचित् एकादी भूमि साध्य झाली असतां चित्त साक्षात्कारापर्यंत तींत स्थिर न राहणें यास अनवस्थितत्व ह्मणतात. आतां समाधि निष्पन्न ( साध्य ) झाल्यावर ( साक्षात्कार झाल्यावर ) तर चित्त स्थिर होईलच. याप्रमाणें हे नऊ चित्तविक्षेप, योगास प्रतिबंध करणारे ह्मणून योगाचे अंतराय असे ह्मणवितात ॥ ३० ॥

आतां हे नऊ व्याध्यादिक केवळ योगास अंतरायच आहेत असें नाहीं तर दुःख इत्यादि विघ्नांस हेतूही आहेत, ते सांगतात,—

## दुःखदौर्मनस्याङ्गमेजयत्वश्वासप्रश्वासा विक्षेपसहभुवः ॥ ३१ ॥

**सूत्रार्थः**—दुःख, दौर्मनस्य, शरीराचा कांप व श्वास प्रश्वास हे विक्षेपांच्या बरोबर उत्पन्न होणारे आहेत.

**भाष्यम्—दुःखमाध्यात्मिकमाधिभौतिकमाधिदैविकं च । येनाभिहताः प्राणिनस्तदुपघाताय प्रयतन्ते तद्दुःखम् । दौर्मनस्यमिच्छाभिघाताच्चेतसः क्षोभः । यदङ्गान्येजयति कम्पयति तदङ्गमेजयत्वम् । प्राणो यद्बाह्यं वायुमाचामति स श्वासः । यत्कौष्ठ्यं वायुं निस्सारयति स प्रश्वासः । एते विक्षेपसहभुवो विक्षिप्तचित्तस्यैते भव-**

---

**सूत्र ३० टी०**—१आमवात इत्यादिकांनीं देहाला कर्म करण्याचें सामर्थ्य नसलें तरी योगसाधनास चित्त समर्थ असण्याचा संभव आहे, ह्मणून 'चित्ताचें' असें ह्मटलें. विज्ञा० भि०.

न्ति । समाहितचित्तस्यैते न भवन्ति । अथैते विक्षेपाः समाधिप्रतिपक्षास्ताभ्यामेवाभ्यासवैराग्याभ्यां निरोद्धव्याः ॥' तत्राभ्यासस्य विषयमुपसंहरन्निदमाह' ॥३१॥

**भाष्यार्थः**—आत्म्यास उद्देशून होणारें तें आध्यात्मिक दुःख. तें दोन प्रकारचें, शारीर व मानस. त्यांत व्याध्यादिकांपासून होणारें शारीर; काम, क्रोध इत्यादिकांपासून होणारें मानस. व्याघ्रादिकप्राण्यांपासून होणारें आधिभौतिक. व ग्रहादिकांपासून होणारें आधिदैविक. असें तीन प्रकारचें दुःख. आतां सामान्य लक्षण ह्मटलें ह्मणजे, ज्याचे योगानें प्राणी पीडित होऊन त्याच्या नाशाविषयीं प्रयत्न करितात तें दुःख. दौर्मनस्य ह्म० इच्छेचा भंग झाल्यामुळें चित्त चंचल होणें. अंगमेजयत्व ह्म० अंगाचा कंप होणें. पुरुषाच्या प्रयत्नावांचून स्वतःच प्राण बाहेरचा वायु पितो तेव्हां तो श्वासविकार समजावा. तसाच पोटांतील वायु बाहेर सोडतो त्यास प्रश्वास ह्मणतात. हे दुःखादि व्याध्यादिविक्षेपांबरोबर चित्त विक्षिप्त असतां उत्पन्न होतात, व चित्त समाधिस्थ असतां हे होत नाहींत; याकरितां हे विक्षेप समाधीस प्रतिबंधक ह्मणून पूर्वीं सांगितलेल्या अभ्यास व वैराग्यानें यांचा निरोध अवश्य करावा॥३१॥

आतां त्या दोहोंपैकीं अभ्यास हा जीवेश्वरसाधारण आहे हें पुढील सूत्रांत सांगतात,—

## तत्प्रतिषेधार्थमेकतत्त्वाभ्यासः ॥ ३२ ॥

**सूत्रार्थः**—त्या विक्षेपांचा नाश करण्याकरितां एकतत्त्वाचा अभ्यास करावा.

भाष्यम्—विक्षेपप्रतिषेधार्थमेकतत्त्वावलम्बनं चित्तमभ्यसेत् । यस्य तु प्रत्यर्थनियतं प्रत्ययमात्रं क्षणिकं च चित्तं तस्य सर्वमेव चित्तमेकाग्रम् । नास्त्येव विक्षिप्तम् । यदि पुनरिदं सर्वतः प्रत्याहृत्य एकस्मिन्नर्थे समाधीयते तदा भवत्येकाग्रमित्यतो न प्रत्यर्थनियतम् । योऽपि सदृशप्रत्ययप्रवाहेण चित्तमेकाग्रं मन्यते तस्यैकाग्रता यदि प्रवाहचित्तस्य धर्मस्तदैकं नास्ति प्रवाहचित्तं क्षणिकत्वात् । अथ प्रवाहांशस्यैव प्रत्ययस्य धर्मः स सर्वः सदृशप्रत्ययप्रवाही वा विसदृशप्रत्ययप्रवाही वा प्रत्यर्थनियतत्वादेकाग्र एवेति विक्षिप्तचित्तानुपपत्तिः । तस्मादेकमनेकार्थमवस्थितं चित्तमिति । यदि च चित्तेनैकेनानन्विताः स्वभावभिन्नाः प्रत्यया जायेरन् । अथ कथमन्यप्रत्ययदृष्टस्यान्यः स्मर्ता भवेत् । अन्यप्रत्ययोपचितस्य च कर्माशयस्यान्यः प्रत्यय उपभोक्ता भवेत् । कथंचित् समाधीयमानमप्येतद्गोमयपायसीयं न्यायमाक्षिपति । किंच स्वात्मानुभवापह्नवश्चित्तस्यान्यत्वे प्राप्नोति । कथं ' यदहमद्राक्षं तत् स्पृशामि, ' ' यच्चास्प्राक्षं तत्पश्यामि ' इत्यहमिति प्रत्ययः । कथमत्यन्तभिन्नेषु चित्तेषु वर्तमानः सामान्यमेकं प्रत्ययिनमाश्रयेत । स्वानुभवग्राह्यश्चायमभेदात्मा अहमिति प्रत्ययः ।

---

सूत्र ३१ टी०–१ भूतें ह्मणजे व्याघ्रादि प्राणी, त्यांस उद्देशून होणारें दुःख आधिभौतिक. विज्ञा०भि०.

**न च प्रत्यक्षस्य माहात्म्यं प्रमाणान्तरेणाभिभूयते । प्रमाणान्तरं च प्रत्यक्षबलेनैव व्यवहारं लभते । तस्मादेकमनेकार्थमवस्थितं च चित्तं यस्येदं शास्त्रेण परिकर्म निर्दिश्यते ॥ 'तत्कथम्' ॥ ३२ ॥**

**भाष्यार्थः**—पूर्वी सांगितलेल्या विक्षेपांच्या प्रतिबंधाकरितां कोणा एका मोठ्या वस्तूवर चित्त स्थिर राहील असा वरचेवर अभ्यास करावा. आतां ज्या बौद्धाच्या मतानें प्रत्येक वस्तूच्या ठिकाणीं भिन्न व नियमानें राहणारें, अर्थात् या पदार्थाहून दुसऱ्या पदार्थावर न जाणारें, केवळ ज्ञानमात्र, व प्रतिक्षणीं नवीन उत्पन्न होणारें असें चित्त आहे; त्याच्या मतानें सर्व चित्त नेहमीं एकाग्र असल्यामुळें विक्षिप्त चित्त मुळींच नाहीं; तेव्हां योगाभ्यासाचा उपदेश त्याचे मतें अगदीं व्यर्थच झाला. आतां आमच्या मतानें एका चित्ताची क्रमानें अनेक विषयांवर प्रवृत्ति होते, ती सर्वांवरून आवरून केवळ एका लक्ष्यावर स्थिर होण्याकरितां चित्त समाधिस्थ करावें ह्मणजे एकाग्र होतें, अशा समाधिकथनास सार्थक्य आलें. याकरितां तें स्थिर मानतां येत नाहीं. आतां त्यावर दुसऱ्या क्षणिक विज्ञानवादी बौद्धानें पूर्वी सांगितलेला दोष वारण करण्याकरितां जो चित्तप्रवाह ( चित्ताची परंपरा ) मानिली आहे, ह्म० एका क्षणिक चित्ताचा एकाग्रतेविषयीं प्रयत्न न होवो; परंतु चित्तांची परंपरा अक्षणिक आहे, तीवर विक्षेप दूर करून एकाग्रता स्थापन करितों असें मानिलें आहे; तेंही मानतां येत नाहीं. कारण, त्याच्या मतांत जर एकाग्रता ही चित्तपरंपरेचा धर्म आहे; तर त्या प्रत्येक चित्तास क्षणिकत्व असल्यामुळें चित्तप्रवाहांत तो धर्म येऊं शकत नाहीं; कारण, एका अखंड चित्ताप्रमाणें धर्माची अनुवृत्ति परंपरेंत येत नाहीं. आतां कदाचित् चित्तप्रवाहांतील अंश जें प्रत्येक चित्त, त्याचाच धर्म असें मानशील तर तो काय समानचित्तप्रवाहांत असणारा? किंवा विजातीय चित्तप्रवाहांत असणारा ? अथवा कोणत्याही प्रवाहांत असो, परंतु प्रतिवस्तूस नियत असें चित्त एकाग्र असल्यामुळें पुनः योगोपदेशाची अनुपपत्ति झाली. त्याकरितां तें मतही दूषित झालें. तेव्हां एक चित्त अनेक अर्थांवर ( विषयांवर ) स्थिर असतें असा सिद्धांत झाला. आतां दुसरें असें कीं, जर प्रत्यय (अनुभव) हे नित्य भिन्न व अनेकचित्तांपासून उत्पन्न होणारे असे स्वीकारल्यामुळें एकचित्ताचा आश्रय न करणारे असे झाले; तर मग त्याच्या मतांत चित्ताहून आत्मा शिवाय नसल्यामुळें एका अनुभवांत जाणलेल्याचें स्मरण दुसऱ्यास कसें होईल व अन्यानें संपादिलेल्या कर्मफळाचा उपभोग घेणारा अन्य प्रत्यय कसा होईल ? आणखी दोष असा कीं, कोणत्याही प्रकारानें ह्मणजे एकानें, खीर गायीपासून होते, अशा सामान्य ज्ञानानें गायीपासून शेण पडलेलें पाहून ही खीर आहे; कारण, ' गायीचा विकार ह्मणून, ' असें अनुमान केलें; तर हें न्यायमत खरें तथापि कसें तरी दूपणाचें समाधान करणारें असल्यामुळें आभासत्वानें त्याज्य होतें. आतां पहिल्या अनुमानांत गव्यत्व हा हेतु प्रसिद्ध तरी आहे; तसा, एका परंपरेपासून उत्पन्न झालेले जे अनुभव, त्यांच्या संस्कारापासून उत्पन्न ज्या स्मृति त्याही एका परंपरेपासून उत्पन्न

झालेल्या; असा हेतुही प्रसिद्ध नाहीं. तसाच दुसरा दोष असा कीं, बौद्धाचा जो आत्म्याविषयीं अनुभव, तोही प्रत्येकक्षणीं चित्त भिन्न मानल्यामुळें अपलापच समजावयाचा; कारण, 'पूर्वी मीं जें पाहिलें, त्यास हल्लीं स्पर्श करितों; व ज्यास स्पर्श केला होता, त्यास हल्लीं पहातों.' असा अनेक काळांतील 'मी' असा अनुभवाचा अंश अनेकचित्तांचे ठिकाणीं अभेदपणानें कसा? तसाच तुझ्या मतें अगदीं भिन्न व क्षणिक अशा चित्तांचे ठिकाणीं विषयत्वेंकरून राहणारा अनुभव सामान्य एका चित्ताचा आश्रय कसा करील ? आणि 'मी' असा अनुभव तर भेदरहित अशा आकारानें आपल्या प्रत्यक्ष अनुभवास येतो, करितां अप्रमाण ह्मणतां येत नाहीं. आतां जो जो पदार्थ सत्तावान् तो तो क्षणिक, अशा अनुभवानें पूर्वीचा अनुभव सत्तावान् ह्मणून क्षणिक, करितां तोही प्रमाण नाहीं; अशी शंका करूं नये; कारण, प्रत्यक्षप्रमाण इतरप्रमाणांनीं बाधित होत नाहीं; कारण, इतर प्रमाणांस प्रथम सिद्ध होऊन व्यवहारांत येण्यास प्रत्यक्ष-प्रमाणच मुख्य साधन आहे; (ह्मणून उपजीव्यविरोधास्तव बाध होत नाहीं.) आतां ज्याअर्थी चित्तस्थिरतेविषयीं पुढील सूत्रानें उपाय सांगतात, त्यावरून चित्त एक असून अनेक वि-षयांवर स्थिर राहणारें असें सिद्ध होतें ॥ ३२ ॥

आतां तीं चित्तस्थिरतेचीं साधनें कोणतीं ? व तीं केलीं असतां फल काय तें सांगतात,—

## मैत्रीकरुणामुदितोपेक्षाणां सुखदुःखपुण्यापुण्यविषयाणां भावनातश्चित्तप्रसादनम् ॥ ३३ ॥

**सूत्रार्थः**—सुखी प्राण्याबरोबर मैत्री, दुःखी प्राण्यावर दया, पुण्यवानाला पाहून आ-नंद व पाप्याची उपेक्षा, असें केलें असतां चित्त निर्मळ होतें.

**भाष्यम्—तत्र सर्वप्राणिषु सुखसंभोगापन्नेषु मैत्रीं भावयेत् । दुःखितेषु करु-णाम् । पुण्यात्मकेषु मुदिताम् । अपुण्यशीलेषूपेक्षाम् । एवमस्य भावयतः शुक्लो धर्म उपजायते । ततश्च चित्तं प्रसीदति । प्रसन्नमेकाग्रं स्थितिपदं लभते ॥ ३३ ॥**

**भाष्यार्थः**—त्यांत सुखी व ऐश्वर्यसंपन्न अशा साधूंच्या ठिकाणीं यांना सुख आहे असें मानून स्नेह करावा, ह्मणजे त्यांचा हेवा करूं नये. दुःखी प्राण्यांवर यांचीं दुःखें कशीं दूर होतील अशा चिंतनानें दया करावी;[1] ह्मणजे त्यांविषयीं उदासीन राहूं नये. पुण्यवान् प्राण्यांविषयीं त्यांचें पुण्य अनुमोदून आनंदित व्हावें; 'काय हे पुण्यवान्' असा द्वेष करूं नये. व पुण्यरहितप्राण्यांविषयीं उदासीन असावें; ह्म० त्यांविषयीं आनंद नसावा, व द्वेषही नसावा. अशा मैत्री इत्यादि साधनांनीं राजस व तामस धर्म नष्ट होऊन शुद्ध सात्विक असा धर्म उत्पन्न होतो; अनंतर अंतःकरण प्रसन्न होतें ( योगाविषयीं उमेद येते ). चित्त प्रसन्न झालें असतां एकाग्र होऊन स्थिर होतें ॥ ३३ ॥

---

**सूत्र ३३ टीप**—१ हें अदृष्टद्वारां मुख्य फल सांगितलें; असेंच रागद्वेषनिवृत्तिरूप दृष्टद्वारक फलही सम-जावें. याप्रमाणें गीतेंत सांगितलें आहे,—'रागद्वेषविमुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् । आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ।' यांत रागद्वेषनिवृत्तिद्वारें सांगितलें आहे.

आतां चित्ताच्या प्रसन्नतेस दुसरा उपाय सांगतात,—

## प्रच्छर्दनविधारणाभ्यां वा प्राणस्य ॥ ३४ ॥

**सूत्रार्थः**—अथवा नाकावाटें वायु बाहेर सोडणें व आंत ओढून घेणें, असें केल्यानें चित्त एकाग्र होतें.

**भाष्यम्—कौष्ठ्यस्य वायोर्नासिकापुटाभ्यां प्रयत्नविशेषाद्वमनं प्रच्छर्दनं विधारणं प्राणायामः । ताभ्यां वा मनसः स्थितिं संपादयेत् ॥ ३४ ॥**

**भाष्यार्थः**—पोटांतील वायु दोन्ही नाकपुड्यांतून बाहेर (या शास्त्रांत पुढें सांगितलेल्या विशेषप्रयत्नानें) सोडणें यास रेचन ह्मणतात. व एका नाकपुडीनें[1] बाहेरीलें[2] वायूचें आकर्षण करून कांहीं एक नियमित कालपर्यंत कोंडून ठेवणें; या दोहोंपैकीं आंत ओढून घेण्यास पूरक व कोंडून ठेवण्यास कुंभक ह्मणतात. या पूरक, कुंभक व रेचक या तिघांमिळून एक प्राणायाम[3] होतो. या प्राणायामांनीं अथवा मनाची स्थिरता संपादन करावी ॥ ३४ ॥

मनास स्थिर करण्यास तसेंच दुसरें साधन सांगतात,—

## विषयवती वा प्रवृत्तिरुत्पन्ना मनसः स्थितिनिबन्धनी॥३५॥

**सूत्रार्थः**—किंवा विषयवती प्रवृत्ति उत्पन्न झाली असतां मन स्थिर होतें.

**भाष्यम्—नासिकाग्रे धारयतोऽस्य या दिव्यगन्धसंवित्सा गन्धप्रवृत्तिः । जिह्वाग्रे रससंवित् । तालुनि रूपसंवित् । जिह्वामध्ये स्पर्शसंवित् । जिह्वामूले शब्दसंवित् । इत्येताः प्रवृत्तय उत्पन्नाश्चित्तं स्थितौ निबध्नन्ति । संशयं विधमन्ति । समाधिप्रज्ञायां च द्वारीभवन्तीति । एतेन चन्द्रादित्यग्रहमणिप्रदीपरत्नादिषु प्रवृत्तिरुत्पन्ना विषयवत्येव वेदितव्या । यद्यपि हि तत्तच्छास्त्रानुमानाचार्योपदेशैरवगतमर्थतत्त्वं सद्भूतमेव भवति । एतेषां यथाभूतार्थप्रतिपादनसामर्थ्यात् । तथापि यावदेकदेशोऽपि कश्चिन्न स्वकरणसंवेद्यो भवति तावत्सर्वं परोक्षमिवापवर्गादिषु सूक्ष्मेष्वर्थेषु न दृढां बुद्धिमुत्पादयति । तस्माच्छास्त्रानुमानाचार्योपदेशोपोद्बलनार्थमेवावश्यं कश्चिद्विशेषः प्रत्यक्षीकर्तव्यः । तत्र तदुपदिष्टार्थैकदेशप्रत्यक्षत्वे सति सर्वं सुसूक्ष्मविषयमप्याऽपवर्गात् श्रद्धीयते । एतदर्थमेवेदं चित्तपरिकर्म निर्दिश्यते । अनियतासु वृत्तिषु तद्विषयायां वशीकारसंज्ञायामुपजातायां समर्थं स्यात्तस्य तस्यार्थस्य प्रत्यक्षीकरणायेति । तथा च सति श्रद्धावीर्यस्मृतिसमाधयोऽस्याप्रतिबन्धेन भविष्यन्तीति ॥ ३५ ॥**

---

सूत्र ३४ टी०—१ डाव्या किंवा उजव्या एका नाकपुडीनें. २ पूर्वीं बाहेरील वायूचें पूरण केल्याखेरीज कुंभक करणें असंभवनीय आहे. ३ 'प्राणायामश्च विज्ञेयो रेचकपूरककुंभकाः' इत्यादिस्मृतींनीं तिन्ही मिळूनच एक प्राणायाम सांगितला.

**भाष्यार्थः**—ज्यानें वास येतो अशा नाकाच्या शेवटच्या भागावर चित्ताची धारणा करणाऱ्या योग्यास जें, या पृथ्वीतलावर कधीं न आलेल्या दिव्य ह्म० अति उत्तम अ-शा गंधाचें ( वासाचें ) प्रत्यक्ष ज्ञान होतें; त्यास ' गंधप्रवृत्ति ' अशी या शास्त्रांतील संज्ञा आहे. ज्यानें गोड, खारट इत्यादि स्वाद समजतो अशा जिभेच्या शेवटच्या भागावर चि-त्ताचें धारण करणाऱ्यास जें दिव्यरसाचें साक्षात् ज्ञान होतें; त्यास ' रसप्रवृत्ति ' ह्मणतात. तालूच्या (टाळूच्या) ठिकाणीं चित्ताचें संयमन केलें असतां जें दिव्यरूपाचें ज्ञान होतें; त्यास 'रूपप्रवृत्ति' ह्मणतात. जिभेच्या मध्यभागीं चित्त धारण केलें असतां जें दिव्यस्पर्शाचें प्रत्यक्ष ज्ञान होतें; त्यास 'स्पर्शप्रवृत्ति' ह्मणतात. जिभेच्या मूळाशीं चित्तसंयमन केलें असतां जें दिव्य-शब्दाचें प्रत्यक्ष ज्ञान होतें; त्यास 'शब्दप्रवृत्ति' ह्मणतात. अशा ह्या गंधादिविषययुक्त प्रवृत्ती ( साक्षात् ज्ञान ) झाल्या असतां थोडक्याच काळांत त्या चित्तास विश्वास उत्पन्न करवून यांहीपेक्षां सूक्ष्म ( लहान ) अशा वस्तूवर चित्तास स्थिर करितात. व शास्त्रांत जे दुसऱ्या अर्थांविषयीं संशय, त्यास दूर करितात. नंतर समाधींत सत्व व पुरुष यांचा विचार करीत असतां जो साक्षात्कार त्याविषयीं परवैराग्य उत्पन्न करण्यास द्वार ( निमित्त ) होतात. ( आ-तां वर ज्या प्रवृत्ती सांगितल्या; त्यांत रूप हें विषय असल्याकारणानें इतर शास्त्रांत जें चित्त स्थिर होण्याकरितां चंद्र, सूर्य, नक्षत्रें, रत्नाचे दीप व रत्नें इत्यादिकांचें ध्यान सांगितलें आहे, त्यांतही रूपच मुख्य असल्यामुळें रूपप्रवृत्तींतच त्यांचें ग्रहण होतें असें जाणावें; त्यामुळें वरील लक्षणांत कमीपणा नाहीं.) आतां अशी शंका येते कीं जरी यथार्थ सांगणाऱ्या अशा त्या त्या शास्त्रांनीं, आपल्या अनुमानांनीं, व आचार्यांच्या उपदेशांनीं परमार्थाविषयीं निश्चय झाल्यानंतर त्याबद्दल संशय राहणारच नाहीं असें आहे; तथापि जोंपर्यंत सर्वशास्त्रांत सांगितलेल्या पदार्थांपैकीं एकही पदार्थाचा साक्षात्कार नेत्र, मन इत्यादिकांनीं झाला नाहीं, तोंपर्यंत सर्व-शास्त्रांविषयीं संदेह राहून अश्रद्धेनें मोक्ष इत्यादि अति सूक्ष्म अर्थांविषयीं मनाचा दृढ निश्च-य होणार नाहीं; त्याकरितां शास्त्र, अनुमान व आचार्योपदेश यांनीं निश्चित केलेल्या अ-र्थांविषयीं संशय दूर होण्याकरितांच कांहींएक विषयाचें प्रत्यक्ष अवश्य करून घ्यावें. त्यांत शा-स्त्रांत सांगितलेल्या अर्थाचा कांहींएक भाग डोळे, मन इत्यादिकांनीं प्रत्यक्ष झाला असतां मोक्षासुद्धां सर्व अतिसूक्ष्मपदार्थांविषयीं ' हें याचप्रमाणें ' असा विश्वास पटतो. हे योगावर श्रद्धा बसण्याकरितांच चित्तस्थिरतेचे उपाय सांगितले. आतां अव्यवस्थित अशा चित्तवृ-त्तींमध्यें त्या त्या गंध इत्यादि दिव्यविषयांच्या प्रत्यक्षानें त्यांतील दोष समजून त्यांविषयीं पू-र्वीं सांगितलेलें वशीकारसंज्ञा वैराग्य ( दिव्यादिव्यविषयांचीं दोषदर्शनानें मुळीं इच्छा नसणें ) उत्पन्न झालें असतां त्या त्या पुढील भूमींतील वस्तु प्रत्यक्ष करून देण्याविषयीं चित्त समर्थ होईल. आणि वैराग्य उत्पन्न झाल्यावर चित्ताचा योगावर विश्वास, त्याविषयीं उमेद, पुनः पुनः पूर्वीं अनुभविलेल्या अर्थांचें स्मरण व सर्वचित्तवृत्तींचा लय हे क्रमानें कांहीं अडथळा न येतां सिद्ध होतील ॥ ३५ ॥

आतां पुनः दुसरा उपाय सांगतात,—

## विशोका वा ज्योतिष्मती ॥ ३६ ॥

**सूत्रार्थः**—अथवा ज्योतिष्मतीनांवाची दुःखरहित अशी संविद्रूपप्रवृत्ति उत्पन्न झाली असतां मनाची एकाग्रता होते.

**भाष्यम्—प्रवृत्तिरुत्पन्ना मनसः स्थितिनिबन्धनीत्यनुवर्तते । हृदयपुण्डरीके धारयतो या बुद्धिसंवित् । बुद्धिसत्त्वं हि भास्वरमाकाशकल्पं तत्र स्थितिवैशारद्यात्प्रवृत्तिः सूर्येन्दुग्रहमणिप्रभारूपाकारेण विकल्पते । तथास्मितायां समापन्नं चित्तं निस्तरङ्गमहोदधिकल्पं शान्तमनन्तमस्मितामात्रं भवति । यत्रेदमुक्तं 'तमणुमात्रमात्मानमनुविद्याऽस्मीत्येवं तावत्संप्रजानीते । इत्येषा द्वयी विशोका विषयवती अस्मितामात्रा च प्रवृत्तिर्ज्योतिष्मतीत्युच्यते, यया योगिनश्चित्तं स्थितिपदं लभते इति ॥ ३६ ॥**

**भाष्यार्थः**—' गंध इत्यादिक दिव्यविषयांचा साक्षात्कार मनास स्थिर करितो ' अशा अर्थाच्या पूर्वसूत्रांतील चार पदांचा येथेंही संबंध करावयाचा. पोट आणि ऊर यांमध्यें खालीं तोंड करून असणारें असें आठपाकळ्यांचें कमल, तें रेचकप्राणायामानें वर मुख करवून त्या हृदयकमलावर चित्ताचें धारण करणारास जी बुद्धिसंवित् ह्म० बुद्धिसाक्षात्कार होतो; ( त्यानें सुद्धां चित्त स्थिर होतें. ) आतां तें बुद्धिसत्व असें आहे कीं, तें आपणास व दुसऱ्यास प्रकाशित करणारें, तेजोमय व आकाशाप्रमाणें व्यापक असें आहे; त्या बुद्धिसत्वाचे ठिकाणीं शुद्ध एकाग्रता झाल्यामुळें बुद्धिप्रवृत्ति सूर्य, चंद्र, अन्य ग्रह, व मणिप्रभा यांच्यासारख्या आकारानें विशेषेंकरून उत्पन्न होते. तसेंच अस्मितावस्थेंत ह्मणजे आत्मतत्वाचे ठिकाणीं धारण केलेलें चित्त तदाकार झालेलें ह्मणूनच लाटारहित अशा मोठ्या समुद्राप्रमाणें शांत ( शोकादिनिमित्त जो क्षोभ तद्रहित ), विस्तृत, व्यापक व ' आहें ' एवढाच मात्र आकार ज्याचा ह्म० अन्याकाररहित असें होतें. याविषयीं पंचशिखाचार्यांनींही असें सांगितलें आहे कीं, ज्या अवस्थेंत आत्मा हा श्रवणमननांनीं अतिसूक्ष्म असा

**सूत्र ३६ टी०**—१ पोट आणि ऊर यांच्यामध्यें खालीं तोंड केलेलें व आठपाकळ्यांचें असें कमल आहे; ते रेचकप्राणायामानें वर तोंड करवून त्याच्या ठिकाणीं चित्त धारण केलें असतां स्थिर होतें. त्याचा प्रकार असा,—त्या कमलामध्यें सूर्यमंडलात्मक अकार आहे, तें जागरितस्थान जाणावें. त्याच्या वरतीं चंद्रमंडलात्मक उकार आहे; तें स्वप्नस्थान जाणावें. त्याच्या वरतीं अग्निमंडलात्मक मकार आहे तें सुषुप्तिस्थान समजावें. त्याच्या वरतीं परब्रह्म आकाशात्मक नादरूपी तुरीयस्थान आहे; त्याची योगी अर्धमात्रा सांगतात. तें स्थान, कमलाच्या मध्यभागीं चहूंकडून व्यापलेल्या अशा हजार शाखांनीं युक्त अशी जी मनाच्या संचारास मार्ग देणारी नाडी, तिचें मूळ आहे. भोंपळ्याच्या वेलाप्रमाणें जी ती नाडी, तिची वर तोंड केलेली अशी एक शाखा आहे; तिला सुषुम्ना नाडी व ब्रह्मनाडी असें ह्मणतात. तिनें बाहेरील सुद्धां सूर्य इत्यादि मंडळें व्यापिलीं आहेत. तीच मनोवहा ( मनास धारण करणारी ) नाडी चित्ताचें आश्रयभूत स्थान आहे. करितां योगभ्यास करणारांनीं तेथें चित्त ठेविलें असतां चित्ताचा साक्षात्कार होतो. विज्ञा० भि०, वाच० मि०.

निश्चयेंकरून 'अस्मि' एवढ्याच मात्र आकारानें साक्षात् जाणला जातो, ती अस्मितावस्था होय. ह्या विषयवती व अस्मितामात्र अशा दोघींस शोकरहित ज्योतिष्मती असें ह्मणतात; जिच्या योगानें योग्याचें चित्त स्थिर होतें ॥ ३६ ॥

असाच आणिक दुसरा उपाय सांगतात,–

## वीतरागविषयं वा चित्तम् ॥ ३७ ॥

**सूत्रार्थः**–किंवा वीतरागविषयांत चित्ताचा संयम केल्यानें एकाग्रता प्राप्त होते.

**भाष्यम्–वीतरागचित्तालम्बनोपरक्तं वा योगिनश्चित्तं स्थितिपदं लभते॥३७॥**

**भाष्यार्थः**–रागरहित ( विषयाविषयीं निरिच्छ असें ) जें सनकादिकांचें चित्त त्या ठिकाणीं चित्ताचें धारण केलें असतां तदाकार झालेलें चित्त विरक्त होऊन समाधीस योग्य होतें ॥ ३७ ॥

तसाच पुनः दुसरा उपाय सांगतात,–

## स्वप्ननिद्राज्ञानालम्बनं वा ॥ ३८ ॥

**सूत्रार्थः**–अथवा स्वप्न आणि सुषुप्ति ( गाढ निद्रा ) ह्या अवस्थांच्या ज्ञानाचा आश्रय केल्यानें चित्त एकाग्र होतें.[१]

**भाष्यम्–स्वप्नज्ञानालम्बनं निद्राज्ञानालम्बनं वा तदाकारं योगिनश्चित्तं स्थितिपदं लभते इति ॥ ३८ ॥**

**भाष्यार्थः**–ज्या वेळीं बाह्यइंद्रियांचे सर्व व्यापार बंद होऊन केवल मनानेंच आत्म्याला भोग असतो त्यास स्वप्न ह्मणतात. निद्रेचें लक्षण पूर्वी सांगितलें. या दोहोंपैकीं अथवा एकाच्या ज्ञानाचा आश्रय चित्तास असतां ( संसार हा स्वप्नाप्रमाणें क्षणभंगुर आहे अशी भावना केली असतां ) चित्त स्थिर होतें ॥ ३८ ॥

---

**सूत्र ३८ टी०–१** स्वप्नावस्थेंतील ज्ञान आहे विषय ज्याला असें जें चित्त ह्मणजे प्रपंचाच्या ज्ञानामध्ये स्वप्नदृष्टियुक्त केलेलें ('दीर्घस्वप्नमिमं विद्धि दीर्घं वा स्वप्नविभ्रमम् ॥' अर्थ,–प्रपंच हा मोठ्या स्वप्नाप्रमाणें अथवा मोठ्या चित्तविभ्रमाप्रमाणें समज; असें या स्मृतींत सांगितल्याप्रमाणें झालेलें; आतां ही दृष्टि वार्णाचे ठिकाणी कामदुघत्वादि गुणांनीं धेनूच्या दृष्टीसारखी क्षणभंगुरविषयत्वादिगुणेंकरून जाग्रत् ज्ञानामध्यें स्वप्नदृष्टिरूपा अशी समजावी. ) हेंही वैराग्यास उत्पन्न करून चित्तस्थैर्याला कारण होतें; असा अभिप्राय जाणावा. तसेंच निद्रारूप, ज्ञान आहे आश्रय ज्याला असें चित्त करून सर्व जीव आपलें स्वरूप विसरून केवल निजले आहेत, अशा दृष्टीनें चित्त युक्त करावें. 'ब्रह्माद्यं स्थावरान्तं च प्रसुप्तं यस्य मायया । तस्य विष्णोः प्रसादेन यदि कश्चित् प्रमुच्यते ॥ चराचरं लय इव प्रसुप्तमिव पश्यताम् । किं मृषा व्यवहारेषु न विरक्तं भवेन्मनः॥' याचा अर्थ,–ज्याच्या इच्छारूप मायेनें ब्रह्मापासून तृणापर्यंत जगत् निद्रिस्ताप्रमाणें आहे; त्या महाविष्णूच्या प्रसादेंकरून जर कोणी एखादा मुक्त होण्याची इच्छा करितो, त्यानें जडाजड हें जगत् प्रलयकालाप्रमाणें निजलेलें पहावें. असें केलें असतां निष्कारण व्यवहाराविषयीं चित्त विरक्त ( वैराग्यशीळ ) कां होणार नाहीं ? विज्ञा० भि०.

दुसरें आणखी साधन सांगतात,—

## यथाभिमतध्यानाद्वा ॥ ३९ ॥

**सूत्रार्थः**—अथवा आपणास प्रिय अशा वस्तूच्या ध्यानानें चित्त स्थिर होतें.

**भाष्यम्—यदेवाभिमतं तदेव ध्यायेत् । तत्र लब्धस्थितिकमन्यत्रापि स्थितिपदं लभत इति ॥ ३९ ॥**

**भाष्यार्थः**—किंवा जें आपणास प्रिय असेल त्या बाह्य विष्णुइत्यादिवस्तूंविषयीं अथवा शरीरांत नाडीचक्र इत्यादि ठिकाणीं ध्यान केलें असतां चित्त स्थिर होतें ॥ ३९ ॥

आतां साधनाचें फल सांगतात,—

## परमाणुपरममहत्त्वान्तोऽस्य वशीकारः ॥ ४० ॥

**सूत्रार्थः**—अशा उपायानें स्थिर झालेल्या चित्ताला परमाणूपासून आरंभ करून तें परम महत् परिमाणापर्यंत सर्व वस्तू ग्राह्य होतात.

**भाष्यम्—सूक्ष्मे निविशमानस्य परमाण्वन्तं स्थितिपदं लभत इति । स्थूले निविशमानस्य परममहत्त्वान्तं स्थितिपदं चित्तस्य । एवं तामुभयीं कोटिमनुधावतो योऽस्याप्रतिघातः स परो वशीकारः । तद्वशीकारात्परिपूर्णं योगिनश्चित्तं न पुनरभ्यासकृतं परिकर्माऽपेक्षत इति ॥ 'अथ लब्धस्थितिकस्य चेतसः किंस्वरूपा किंविषया वा समापत्तिरिति तदुच्यते' ॥ ४० ॥**

**भाष्यार्थः**—अति लहान वस्तूच्या ठिकाणीं चित्ताची स्थिरता करणाऱ्या योग्याची परमाणूपर्यंत[1] चित्ताची स्थिरता होते. व अति मोठ्या वस्तूवर चित्त स्थिर करणाऱ्या योग्याचें चित्त, मोठें आहे परिमाण ज्याचें अशा आकाशादिकांपर्यंत स्थिर होतें. याप्रमाणें स्थूल व सूक्ष्मरूप जे दोन पक्ष त्या दोहोंप्रत संचार करणाऱ्या चित्ताचा कोणत्याही प्रकारें प्रतिबंध न होणें यास परवशीकार म्हणतात. ( या परशब्दग्रहणानें अपरही दुसरा वशीकार आहे; असें सिद्ध होतें. ) आतां त्यापेक्षां याला पूरत्व म्ह० श्रेष्ठत्व असण्याचें कारण असें कीं. या परवशीकारानें स्थितीविषयीं कोणत्याही साधनाची गरज लागत नाहीं, असें योग्याचें चित्त पुनः दुसऱ्या अभ्यासानें साध्य होणाऱ्या साधनाची इच्छा करीत नाहीं[3] ॥ ४० ॥

आतां स्थिर झालेल्या चित्ताची त्या त्या वस्तूचे ठिकाणीं तदाकारता होते; तिचें स्वरूप काय ? व तिचे विषय काय हें सांगतात,—

---

सूत्र ४० टी०—१ 'जालांतरगते भानौ यत्सूक्ष्मं दृश्यते रजः। तस्य षष्ठितमो भागः परमाणुः स उच्यते॥ अर्थ,—गवाक्ष ( धारे ) इत्यादि ठिकाणीं पडलेल्या सूर्यकिरणांत जो रजःकण दिसतो; त्याचा साठावा भाग तो परमाणु समजावा. २ योग्याची उपेक्षाबुद्धि. भोजवृत्ति. ज्यांत अभ्यास व वैराग्याची अपेक्षा असते तो ३ म्हणून हा पर ( उत्कृष्ट ) वशीकार, व अन्य निकृष्ट वशीकार समजावा. विज्ञा० भि०.

## क्षीणवृत्तेरभिजातस्येव मणेर्ग्रहीतृग्रहण-ग्राह्येषु तत्स्थतदञ्जनता समापत्तिः ॥ ४१ ॥

**सूत्रार्थः**—रजोगुणाच्या वृत्ती क्षीण झाल्या आहेत ज्यांत असें जें योग्याचें चित्त तें स्फटिकमण्याप्रमाणें स्वच्छ असतें. ग्रहण करणारा, ग्रहण करण्याचें साधन आणि ग्रहण करण्याला योग्य वस्तु, ह्या तिघांचा संयोग झाल्यानें त्या चित्ताची जी स्थिति ती विषयाकारता जाणली जाते, तिला समापत्ति ह्मणतात.

**भाष्यम्**—क्षीणवृत्तेरिति प्रत्यस्तमितप्रत्ययस्येत्यर्थः। अभिजातस्येव मणेरिति दृष्टान्तोपादानम्। यथा स्फटिक उपाश्रयभेदात्तत्तद्रूपोपरक्त उपायाश्रयरूपाकारेण निर्भासते। तथा ग्राह्यालम्बनोपरक्तं चित्तं ग्राह्यसमापन्नं ग्राह्यस्वरूपाकारेण निर्भासते। भूतसूक्ष्मोपरक्तं भूतसूक्ष्मसमापन्नं भूतसूक्ष्मस्वरूपाभासं भवति। तथा स्थूलालम्बनोपरक्तं स्थूलरूपसमापन्नं स्थूलरूपाभासं भवति। तथा विश्वभेदोपरक्तं विश्वभेदसमापन्नं विश्वरूपाभासं भवति। तथा ग्रहणेष्वपीन्द्रियेष्वपि द्रष्टव्यम्। ग्रहणालम्बनोपरक्तं ग्रहणसमापन्नं ग्रहणस्वरूपाकारेण निर्भासते। तथा ग्रहीतृपुरुषालम्बनोपरक्तं ग्रहीतृपुरुषसमापन्नं ग्रहीतृपुरुषस्वरूपाकारेण निर्भासते। तथा मुक्तपुरुषालम्बनोपरक्तं मुक्तपुरुषसमापन्नं मुक्तपुरुषस्वरूपाकारेण निर्भासते। तदेवमभिजातमणिकल्पस्य चेतसो ग्रहीतृग्रहणग्राह्येषु पुरुषेन्द्रियभूतेषु या तत्स्थतदञ्जनता तेषु स्थितस्य तदाकारापत्तिः सा समापत्तिरित्युच्यते ॥ ४१ ॥

**भाष्यार्थः**—सूत्रांत 'क्षीणवृत्तेः' असें जें पद त्याचा अर्थ, समापत्तीवांचून इतर सर्व वृत्ती लीन झाल्या आहेत ज्याच्या अशा चित्ताची. तसेंच 'अभिजातस्येव मणेः' ह्या पदांनीं दृष्टांत सांगितला तो असा,—जसा शुद्ध स्फटिकमणि जास्वंद इत्यादि लाल, पिंवळ्या वगैरे फुलांवर ठेविला असतां त्यात्या फुलाच्या निमित्तभेदानें ते ते रंग त्यांत प्रतिबिंबित होऊन स्फटिकमणि त्यात्या जवळ ठेविलेल्या पदार्थाच्या आकारानें भासतो; तसें, ज्यावर चित्ताची एकाग्रता केली असेल, तें ग्राह्य ( ध्येय ) त्या ग्राह्याचें प्रतिबिंब चित्तांत पडून ग्राह्यांचे स्वरूपाकार जसजसे असतील तसतशाच आकारानें चित्त भासतें. तें असें,—भूतसूक्ष्म ह्म० पंचभूतांस कारण जीं पांच तन्मात्रें, तीं महत्तत्व, अहंकार, व प्रकृति यांचे ठिकाणीं चित्त धारण केलें असतां तत्समानाकार होऊन त्याप्रमाणेंच भासतें. स्थूल ह्म० महाभूतें यांनीं अर्पित जें प्रतिबिंब, त्यानें तत्समानाकार होऊन चित्त महाभूतांच्या स्वरूपाप्रमाणें प्रतीत होतें. तसेंच स्थावर, जंगम, इत्यादिक जे विश्वाचे अवांतर भेद त्यांनीं प्रतिबिंबित झालेलें चित्त तत्समानाकार होऊन त्या त्या आकृतीनें भासतें. समा-

पत्तींत याप्रमाणें सूक्ष्म, स्थूल व विश्वभेद असे तीन भेद झाले. ह्या ग्राह्याविषयीं सांगितलेला प्रकार ग्रहण ह्म० इंद्रियें यांविषयींही जाणावा. उदाहरणार्थ–इंद्रियांचें सूक्ष्म बुद्धि व अहंकार यांनीं चित्त प्रतिबिंबित झालें असतां तत्समानाकार होऊन त्या ग्रहणाकारानें भासतें. असेंच सूक्ष्म, स्थूल व विश्वभेद या तीन भेदांनीं ग्रहीता ह्म० पुरुष ( साक्षी ) त्याच्या आश्रयानें चित्त प्रतिबिंबित झाल्यामुळें त्याच्या सारख्या स्वरूपानें भासतें. याचप्रमाणें मुक्तपुरुषाच्या आश्रयानें चित्त प्रतिबिंबित होऊन तत्समानाकार वाटतें. याप्रमाणें शुद्ध स्फटिकमण्याप्रमाणें चित्ताची ग्रहीतृ, ग्रहण व ग्राह्य ह्मणजे आत्मा, इंद्रिय व विषय यांच्या ठिकाणीं जी 'तत्स्थतदञ्जनता' ह्म० ग्रहणादिकांच्या ठिकाणीं राहणाऱ्या चित्ताची तन्मयता तीस समापत्ति ह्मणतात ॥ ४१ ॥

आतां पूर्वी सामान्यप्रकारची समापत्ति सांगितली; त्यांत ग्रहीतृसमापत्तींत स्थूल, सूक्ष्म असे विषय विशेष नसल्यामुळें ती एकच प्रकारची. परंतु ग्राह्य व ग्रहण समापत्तीचे विशेष भेद असल्यामुळें ते विशेष भेद या पुढील तीन सूत्रांनीं सांगतात,–

## तत्र शब्दार्थज्ञानविकल्पैः सङ्कीर्णा सवितर्का समापत्तिः ॥ ४२ ॥

**सूत्रार्थः**–त्यांत शब्द व अर्थ यांच्या ज्ञानाच्या विकल्पानें मिश्रित जी समापत्ति होते तिला सवितर्क समापत्ति ह्मणतात.

**भाष्यम्–तद्यथा, गौरिति शब्दो गौरित्यर्थो गौरिति ज्ञानमित्यविभागेन विभक्तानामपि ग्रहणं दृष्टम् । विभज्यमानाश्चान्ये शब्दधर्मा अन्येऽर्थधर्मा अन्ये विज्ञानधर्मा इत्येतेषां विभक्तः पन्थाः । तत्र समापन्नस्य योगिनो यो गवाद्यर्थः समाधिप्रज्ञायां समारूढः स चेच्छब्दार्थज्ञानविकल्पानुविद्ध उपावर्तते सा संकीर्णा समापत्तिः सवितर्केत्युच्यते । 'यदा पुनः शब्दसंकेतस्मृतिपरिशुद्धौ श्रुतानुमानज्ञानविकल्पशून्यायां समाधिप्रज्ञायां स्वरूपमात्रेणावस्थितोऽर्थस्तत्स्वरूपाकारमात्रतयैवावच्छिद्यते । सा च निर्वितर्का समापत्तिः। तत्परं प्रत्यक्षम् । तच्च श्रुतानुमानयोर्बीजम्। ततः श्रुतानुमाने प्रभवतः । न च श्रुतानुमानज्ञानसहभूतं तद्दर्शनम् । तस्मादसंकीर्णं प्रमाणान्तरेण योगिनो निर्वितर्कसमाधिजं दर्शनमिति ।।' निर्वितर्कायाः समापत्तेरस्याः सूत्रे लक्षणं द्योत्यते ' ॥ ४२ ॥**

**भाष्यार्थः**–त्यांत स्थूलविषयक समापत्ति अशी कीं–गौरिति ह्म० 'गाय' असा श-

---

सूत्र ४१ टी०–१ ग्रेथें संप्रज्ञातरूप फल जीपासून लवकर प्राप्त होतें; अशा पूर्वीच्या प्रज्ञेस समापत्ति ह्मणतात; हीं शास्त्रांतील परिभाषा (संकेत) प्रसंगांत सांगितली. व ती असंप्रज्ञातअवस्था सोडून संप्रज्ञातस्वरूपाचा परिचय करून देणारी ह्मणूनच तिला संप्रज्ञातयोग असें पुढें 'ता एव सबीजः समाधिः' अशा सूत्रानें सांगणार आहेत.

ब्द, गौरिति अर्थ व गौरिति ज्ञान, या तिघांचा वस्तुतः भेद असून अभेदेंकरून ग्रहण लोकांत दृष्ट आहे. आणि शब्दधर्म ( शब्दत्व ), अर्थधर्म व ज्ञानधर्म तर लोकांत अगदीं विभागलेले आहेत; तेव्हां शब्द, अर्थ व ज्ञान यांचा स्वरूप जाणण्याचा मार्ग परस्परांहून अगदींच भिन्न आहे. आतां स्थूलविषय गाय इत्यादिक वस्तूचें आलंबन ( आश्रय ) करून समाधि लावणाऱ्या योग्यास समाधींत साक्षात् झालेला जो गवादि अर्थ; तो जर शब्द, अर्थ व ज्ञान या तिन्ही प्रकारानें अर्थात् विकल्पानें ह्म० ' ही गाय भासते' अशा शब्दार्थज्ञानांच्या ऐक्यभ्रांतीनें तीनही विषय येऊं लागले तर त्या विकल्पमिश्रित समापत्तीस सवितर्का समापत्ति ह्मणतात. आतां जर, अमुकास अमुक ह्मणावयाचें हा शब्दसंकेत; जसें ' गाय. यां शब्दसंकेताचें स्मरण नष्ट होऊन तन्निमित्त जो आगम व अनुमान यांच्या ज्ञानांचा विकल्प ( शंका ) त्यानें रहित अशी समाधींतील बुद्धि असतां शब्दस्वरूपमात्रानेंच मनावर ठसलेला जो अर्थ तेवढ्या अर्थाविषयीं मात्र चित्त तत्पर होऊन शब्दसंकेत सोडून देतें. तेव्हां समाधींत त्याविषयीं विकल्प ( शंका ) उत्पन्न होत नाहीं; तीस निर्वितर्का समापत्ति ह्मणतात. तें अत्यंत प्रत्यक्ष होय; कारण तेथें आरोपितवस्तूचा गंधही नसतो. आणि तेंच प्रत्यक्ष श्रवण व मननास कारण होय; ह्मणजे प्रत्यक्षापासून आगम व अनुमान उत्पन्न होतात. आणि श्रुत व अनुमान यांच्यापासून, समापत्तींत होणाऱ्या प्रत्यक्षज्ञानाप्रमाणें पूर्ण ज्ञान होणें संभवत नाहीं; याकरितांच अमिश्रित अशा अन्यप्रमाणांनीं योग्यास निर्वितर्क समाधींत प्रत्यक्ष दर्शन होतें॥४२॥

आतां निर्वितर्कसमापत्तीचें लक्षण सांगतात;—

## स्मृतिपरिशुद्धौ स्वरूपशून्येवार्थमात्रनिर्भासा निर्वितर्का ॥ ४३॥

**सूत्रार्थः**—आणि शब्द व अर्थ यांचें स्मरण दूर होऊन व विषय ग्रहण करण्याविषयीं स्वरूपरहित होत्सातें चित्त केवळ ग्राह्यरूपानेंच जाणवतें त्यास निर्वितर्क समापत्ति ह्मणतात.

**भाष्यम्—या शब्दसंकेतश्रुतानुमानज्ञानविकल्पस्मृतिपरिशुद्धौ ग्राह्यस्वरूपोपरक्ता प्रज्ञा स्वमिव प्रज्ञारूपं ग्रहणात्मकं त्यक्त्वा पदार्थमात्रस्वरूपा ग्राह्यस्वरूपापन्नेव भवति सा निर्वितर्का समापत्तिः । तथा च व्याख्यातम्। तस्या एकबुद्ध्युपक्रमो ह्यर्थात्मा अणुप्रचयविशेषात्मा गवादिर्घटादिर्वा लोकः । स च संस्थानविशेषो भूतसूक्ष्माणां साधारणो धर्म आत्मभूतः फलेन व्यक्तेनानुमितः स्वव्यञ्जकाञ्जनः प्रादुर्भवति धर्म्मान्तरस्य कपालादेरुदये च तिरो भवति । स एव धर्मोऽवयवीत्युच्यते । योऽसावेकश्च महांश्चाणीयांश्च स्पर्शवांश्च क्रियाधर्मकश्चानित्यश्च तेनावयविना व्यवहाराः क्रियन्ते । यस्य पुनरवस्तुकः स प्रचयविशेषः सूक्ष्मं च कारणमनुपलभ्यन्तस्यावयव्यभावात् अतद्रूपप्रतिष्ठं मिथ्याज्ञानमिति प्रायेण सर्वमेव प्राप्तं मिथ्याज्ञानमिति ।**

**तदा च सम्यग् ज्ञानमपि किं स्यात् विषयाभावात् । यद्यदुपलभ्यते तत्तदवयवित्वे-नाघ्रातं तस्मादस्त्यवयवी यो महत्त्वादिव्यवहारापन्नः समापत्तेर्निर्वितर्काया विषयो भवति ॥ ४३ ॥**

**भाष्यार्थः**—शब्दसंकेतापासून श्रुत ह्म० ऐकिलेलें व अनुमान ह्म० तर्कानें जाणलेलें ज्ञान, त्याविषयीं जी विकल्परूप स्मृति ह्म० चिंतन तें दूर विषयस्वरूपानें प्रतिबिंबित जी बुद्धि ती आपलें ग्रहणात्मक प्रज्ञारूप ग्रहण न करितां केवल अर्थाविषयीं मात्र तत्पर होणारी ह्मणजे ग्राह्य (विषय) याच्या आकारासारखी होते; तीस निर्वितर्क समापत्ति ह्मणतात. याप्रमाणेंच पूर्वींच्या आचार्यांनीं सांगितलें आहे. त्या निर्वितर्क समापत्तीचा एक ( नि-श्चल ) अशा बुद्धीचा उपक्रम ( आरंभ ), दृश्यस्वरूप, अणूंचा प्रचय ह्म० स्थूलपरिणामविशेष तत्स्वरूप जो घटादिक अचेतन किंवा गवादिक चेतन हा आलंबन होय. आणि तो स्थूल अव-यवी स्वकारण जे भूतसूक्ष्म ह्म० पंचतन्मात्रादि, त्या प्रत्येकावर राहणारा साधारण धर्म व त्यांच्याशीं नेहमीं अभिन्न असा आहे. हें त्याच्या स्पष्ट कार्यावरून अनुमान होतें. व आ-आपणास स्पष्ट होण्यास जें कारण त्यासही हेतु होऊन घटादिरूपानें प्रकट होतो. व कांहीं निमित्तानें फुटला असतां पूर्वअवस्थेस प्राप्त होतो. तोच अवयवी अवयवांचा धर्म ह्मणवितो. तसेच, जो हा एक, मोठा, अतिलहान, स्पर्शवान्, क्रियाधर्मक व अनित्य इत्यादि व्यवहार त्या अवयवीनें केले जातात. आतां ज्याच्या मतानें तो पूर्वी सांगितलेला प्रच-यनिमित्तक विशेष ह्म० अवयवी तो अवस्तुक ह्म० तुच्छ व सूक्ष्म अवयवाख्य कारण हें प्र-त्यक्ष दिसत नाहीं; त्याच्या मतें अवयवी नसल्यामुळें बहुतकरून सर्वच मिथ्याज्ञान असें सहज आलें; कारण मिथ्याज्ञानाचें स्वरूपच असें आहे कीं, वस्तुतः त्या पदार्थाचें तें रूप नसून त्या ठिकाणीं तो भासणें; त्या वेळेस सर्वाला मिथ्याज्ञानत्व असल्यामुळें उत्तम प्रकारचें ज्ञान तरी कसें होणार ? कारण त्याच्या मतें कोठेंच विषय नाहींत. कारण, जें जें प्रत्यक्ष होतें; तो तो अवयवी असें त्यानें स्वीकारलें. तेव्हां सिद्धांत असा झाला कीं अवयवी मिथ्याभूत नाहीं. व जो महत्त्व इत्यादि व्यवहारास प्राप्त झाला, तो निर्वितर्कसमापत्तीस विषय होतो ॥ ४३ ॥

आतां पूर्व दोन सूत्रांनीं स्थूलविषयांत समापत्तीचे दोन प्रकार सांगून सूक्ष्मविषयां-तही तिचे दोन भेद आहेत ते सांगतात;—

## एतयैव सविचारा निर्विचारा च सूक्ष्मविषया व्याख्याता ॥४४॥

**सूत्रार्थः**—सवितर्क आणि निर्वितर्क समापत्तींचें वर्णन करण्यांत सूक्ष्मविषयक सवि-चार व निर्विचार समापत्तींचाही निर्णय झाला.

**भाष्यम्**—**तत्र भूतसूक्ष्मेष्वभिव्यक्तधर्मकेषु देशकालनिमित्तानुभवावच्छिन्नेषु या समापत्तिः सा सविचारेत्युच्यते । तत्राप्येकबुद्धिनिर्ग्राह्यमेवोदितधर्मविशिष्टं भूतसू-**

क्ष्ममालम्बनीभूतं समाधिप्रज्ञायामुपतिष्ठते। या पुनः सर्वथा सर्वतः शान्तोदिताव्यपदेश्यधर्मानवच्छिन्नेषु सर्वधर्मानुपातिषु सर्वधर्मात्मकेषु समापत्तिः सा निर्विचारेत्युच्यते। एवंस्वरूपं हि तद्भूतसूक्ष्मम्। एतेनैव स्वरूपेणालम्बनीभूतमेव समाधिप्रज्ञास्वरूपमुपरञ्जयति, प्रज्ञा च स्वरूपशून्येव अर्थमात्रा यदा भवति तदा निर्विचारेत्युच्यते। तत्र महद्वस्तुविषया सवितर्का निर्वितर्का च, सूक्ष्मविषया सविचारा निर्विचारा च। एवमुभयोरेतयैव निर्वितर्कया विकल्पहानिर्व्याख्यातेति ॥ ४४ ॥

भाष्यार्थः—जीं वर्तमानधर्मांनीं युक्त, तसेंच देशकालनिमित्तांनीं विशेष अनुभवास येणारीं अशीं जीं पंचभूतें व इंद्रियें यांचीं सूक्ष्म कारणें (तन्मात्रापासून तें प्रकृतीपर्यंत,) यांचे ठिकाणीं जी समापत्ति ती सविचारा अशी ह्मणविते. तींतही पूर्वीं सांगितल्याप्रमाणें अवयवांहून शिवाय केवल बुद्धीनेंच ग्रहण करण्यास योग्य, सांगितलेल्या धर्मांनीं युक्त व चित्तास धारण करण्यास आश्रय असें भूतसूक्ष्म समाधिप्रज्ञेंत आरूढ होतें. आतां जीं सर्वप्रकारें सर्वस्वरूपांनीं देशकालांच्या मर्यादेखेरीज, भूत, वर्तमान व भविष्य अशा धर्मांनीं रहित असून सर्वधर्मांत असणारीं व सर्वधर्मस्वरूप, यांत जी समापत्ति तीस निर्विचारा समापत्ति ह्मणतात. याप्रकारचेंच त्या भूतसूक्ष्माचें स्वरूप आहे. याच स्वरूपानें आश्रयभूत जें समाधींत प्रज्ञास्वरूप, तें तत्समानाकार होतें. आतां समाधींतील बुद्धि ही स्वरूपावांचून जेव्हां अर्थतत्पर मात्र होते तेव्हां तीस निर्विचारा असें ह्मणतात. त्यांत जींत स्थूल विषय आहेत ती सविचारा; व सूक्ष्मविषय आहेत ती निर्वितर्का. सविचार व निर्विचार या दोहोंची विकल्पहानि या पूर्वीं सांगितलेल्या निर्वितर्क समापत्तीनेंच सूत्रकारांनीं प्रायः सांगितली ॥ ४४ ॥

आतां सूक्ष्मविषयांत निर्वितर्क ह्मणून सांगितलें; तो सूक्ष्मविषय कोठपर्यंत तो सांगतात;—

## सूक्ष्मविषयत्वं चालिङ्गपर्यवसानम् ॥ ४५ ॥

**सूत्रार्थः**—लयाच्या क्रमानें प्रकृतींत सूक्ष्मविषयत्वाचें पर्यवसान होतें.

**भाष्यम्**—पार्थिवस्याणोर्गन्धतन्मात्रं सूक्ष्मो विषयः आप्यस्य रसतन्मात्रं तैजसस्य रूपतन्मात्रं वायवीयस्य स्पर्शतन्मात्रमाकाशस्य शब्दतन्मात्रमिति, तेषामहङ्कारः, अस्यापि लिङ्गमात्रं सूक्ष्मो विषयः। लिङ्गमात्रस्याप्यलिङ्गं सूक्ष्मो विषयः। न चालिङ्गात्परं सूक्ष्ममस्ति। नन्वस्ति पुरुषः सूक्ष्म इति। सत्यम्। यथा लिङ्गात्परमलिङ्गस्य सौक्ष्म्यं, न चैवं पुरुषस्य किं तु लिङ्गस्यान्वयि कारणं पुरुषो न भवति। हेतुस्तु भवतीति। अतः प्रधाने सौक्ष्म्यं निरतिशयं व्याख्यातम् ॥ ४५ ॥

भाष्यार्थः—पृथ्वीच्या परमाणूचा गंधतन्मात्र सूक्ष्म विषय, उदकाच्या परमाणूचा

रसतन्मात्र, तेजाच्या परमाणूचा रूपतन्मात्र, वायूच्या परमाणूचा स्पर्शतन्मात्र व आकाशाच्या अणूचा शब्दतन्मात्र सूक्ष्म विषय होय. या पंचतन्मात्रांचा अहंकार सूक्ष्म विषय, व याचाही महत्तत्त्व सूक्ष्म विषय; व महत्तत्त्वाचाही प्रकृति सूक्ष्म विषय. आतां प्रकृतीपेक्षां सूक्ष्म कांहीं नाहीं. पुरुष आहे परंतु जशी महत्त्वत्वापेक्षां प्रकृति अतिसूक्ष्म, तसा पुरुष नाहीं. कारण येथें उपादानकारणत्वेंकरून सूक्ष्मत्व विवक्षित आहे. तर पुरुष हा महत्तत्त्वास निमित्तकारण आहे, उपादानकारण नाहीं; ह्मणून प्रधानावरच सूक्ष्मत्व निरतिशय ( निर्मर्याद ) आहे; हें सिद्ध झालें ॥ ४५ ॥

आतां या समापत्तींचा प्रस्तुत काय उपयोग तो सांगतात,—

## ता एव सबीजः समाधिः ॥ ४६ ॥

**सूत्रार्थः**—पूर्वी सांगितलेल्या चार प्रकारच्या समापत्तींस सबीज समाधि ह्मणतात.

**भाष्यम्—ताश्चतस्रः समापत्तयो बहिर्वस्तुबीजा इति समाधिरपि सबीजः । तत्र स्थूलेऽर्थे सवितर्को निर्वितर्कः । सूक्ष्मेऽर्थे सविचारो निर्विचार इति चतुर्धोपसंख्यातः समाधिरिति ॥ ४६ ॥**

**भाष्यार्थः**—त्या चार समापत्ती बहिर्वस्तुबीजा ह्म० बाहेर आहेत संस्कारादिदुःखबीजें ज्यांपासून अशा; ह्मणून तो समाधिही सबीज समजावा. त्यांत स्थूलपदार्थावर सवितर्क व निर्वितर्क, व सूक्ष्मअर्थावर सविचार व निर्विचार याप्रमाणें चार प्रकारचा समाधि सांगितला ॥ ४६ ॥

आतां सांगितलेल्या समापत्तींपैकीं निर्विचारसमापत्तींत कांहीं एक विशेष आहे तो सांगतात,—

## निर्विचारवैशारद्येऽध्यात्मप्रसादः ॥ ४७ ॥

**सूत्रार्थः**—निर्विचारसमापत्तीच्या स्वच्छस्थितिरूपत्वामुळें योग्याला अध्यात्मप्रसाद प्राप्त होतो.

**भाष्यम्—अशुद्ध्यावरणमलापेतस्य प्रकाशात्मनो बुद्धिसत्वस्य रजस्तमोभ्यामनभिभूतः स्वच्छः स्थितिप्रवाहो वैशारद्यम् । यदा निर्विचारस्य समाधेर्वैशारद्यमिदं जायते तदा योगिनो भवत्यध्यात्मप्रसादो भूतार्थविषयः क्रमाननुरोधिस्फुटप्रज्ञालोकः । तथा चोक्तम् । प्रज्ञाप्रसादमारुह्य अशोच्यः शोचतो जनान् । भूमिष्ठानिव शैलस्थः सर्वान् प्राज्ञोऽनुपश्यति ॥ ४७ ॥**

---

सू० ४६ टी०—१अवांतरभेदांनीं पांच समापत्ती होतात; त्या अशा,—ग्राह्य व ग्रहण त्यांच्या स्थूलसूक्ष्मभेदांनीं सवितर्कादि चार, ग्रहीत्यांच्या ठिकाणीं पांचवी; व आनंदानुगत धरून अवांतरभेदानें सप्रज्ञात योग सहा प्रकारचाच होतो. विज्ञा० भि०.

भाष्यार्थः—रजोगुण व तमोगुण यांच्या वृद्धीस कारण जी पापादि अशुद्धि तीच आच्छादणारा मल होय; त्यानें रहित ह्मणूनच प्रकाशस्वभाव (प्रकाशरूप) असें जें बुद्धिसत्त्व त्याचा, कारण नष्ट झालें ह्मणूनच रजस्तमोगुणांनीं पराभूत न होणारा ह्मणून स्वच्छ ह्म० ध्येयवस्तूच्या प्रतिबिंबाचें ग्रहण करणारा जो स्थितीचा प्रवाह ह्म० चित्ताची एकाग्रता, यास वैशारद्य असें ह्मणतात. हें वैशारद्य (निर्मलत्व) पूर्वी सांगितलेल्या निर्विचारसमाधीचें जेव्हां होतें, तेव्हां योग्यास बुद्धिविषयक प्रसाद होतो. तो प्रसाद असा कीं,—ज्यांत सत्यच विषय असतात; व एका वेळींच सर्व अर्थाचें ग्रहण होतें; व प्रत्यक्षबुद्धीचा प्रकाश होतो. असेंच अन्य-ठिकाणींही सांगितलें आहे; कीं,—योगी पर्वतावर चढल्याप्रमाणें प्रज्ञाप्रसादावर आरूढ होऊन "मी दुःखी,' 'मी पापी' इत्यादि रीतीनें आपणाविषयीं शोक न करणारा होत्साता भूमीवरील सर्व लोकांस दुःखसमुद्रांत निमग्न झालेले असे पहातो ॥ ४७ ॥

आतां पूर्वसूत्रांत सांगितलेल्या समाधींत झालेल्या प्रज्ञेच्या अर्थास अनुसरून शास्त्रांतील संज्ञा सांगतात,—

## ऋतम्भरा तत्र प्रज्ञा ॥ ४८ ॥

**सूत्रार्थः**—ह्या अध्यात्मप्रसादांत जी बुद्धि उत्पन्न होते तिला ऋतंभरा प्रज्ञा म्हणतात.

**भाष्यम्—तस्मिन्समाहितचित्तस्य या प्रज्ञा जायते तस्या ऋतंभरेति संज्ञा भवति । अन्वर्था च सा । सत्यमेव बिभर्ति, न तत्र विपर्यासज्ञानगन्धोऽप्यस्तीति । तथा चोक्तम् । आगमेनाऽनुमानेन ध्यानाभ्यासरसेन च । त्रिधा प्रकल्पयन् प्रज्ञां लभते योगमुत्तममिति ॥ 'सा पुनः' ॥ ४८ ॥**

भाष्यार्थः—पूर्वी सांगितलेल्या सबीजसमाधींत समाधिस्थ झालेल्या चित्ताची जी प्रज्ञा तीस ऋतंभरा ही संज्ञा होते. ती अर्थास अनुसरून आहे; ह्मणजे सत्यच ग्रहण करिते; कधींही विपरीतज्ञानाचा तेथें लेशही नसतो. हेंच अन्यत्र सांगितलें; कीं,—आगमानें व अनुमानानें व आदरानें चिंतन वरचेवर करणें यानें, अर्थात् श्रवण, मनन व निदिध्यासन या तिहींनीं सबीजयोगकाळीं विपरीतज्ञानरहित अशी प्रज्ञा उत्पन्न करवून या प्रज्ञेपासून परवैराग्यद्वारानें पुढें सांगावयाचा जो उत्तम निर्बीजयोग तो प्राप्त होतो ॥ ४८ ॥

आतां ती प्रज्ञा इतरप्रज्ञांपेक्षां विलक्षण आहे ती सांगतात,—

## श्रुतानुमानप्रज्ञाभ्यामन्यविषया विशेषार्थत्वात् ॥ ४९ ॥

**सूत्रार्थः**—समाधीपासून उत्पन्न झालेली बुद्धि, ऐकलेल्या आणि अनुमान केलेल्या विषयांहून विलक्षणअर्थाला विषय करिते.

**भाष्यम्—श्रुतमागमविज्ञानं तत्सामान्यविषयम् । न ह्यागमेन शक्यो विशेषोऽभि-**

**धातुम् । कस्मात् । न हि विशेषेण कृतसंकेतः शब्द इति । तथाऽनुमानं सामान्यविषयमेव । यत्र प्राप्तिस्तत्र गतिः । यत्राप्राप्तिस्तत्र न भवति गतिरित्युक्तम् । अनुमानेन च सामान्येनोपसंहारः । तस्माच्छ्रुतानुमानविषयो न विशेषः कश्चिदस्तीति । न चास्य सूक्ष्मव्यवहितविप्रकृष्टस्य वस्तुनो लोकप्रत्यक्षेण ग्रहणम् । न चास्य विशेषस्याप्रमाणकस्याभावोऽस्तीति । समाधिप्रज्ञानिर्ग्राह्य एव स विशेषो भवति भूतसूक्ष्मगतो वा पुरुषगतो वा । तस्माच्छ्रुतानुमानप्रज्ञाभ्यामन्यविषया सा प्रज्ञा विशेषार्थत्वादिति । समाधिप्रज्ञाप्रतिलम्भे योगिनः प्रज्ञाकृतः संस्कारो नवो नवो जायते ॥ ४९ ॥**

**भाष्यार्थः**—श्रुत म्ह० ऐकून झालेलें ज्ञान, तें सामान्यविषय आहे; म्हणून त्या आगमज्ञानानें विशेष सांगणें शक्य नाहीं ( सांगतां येणार नाहीं ). कारण ( आगमज्ञानांत कांहीं विशेषशब्दांचा संकेत नसतो; त्यामुळें ) शाब्दबोधांत त्या त्या पदार्थांतील विशेष भासत नाहीं. तसेंच, अनुमानज्ञानही सामान्यविषयच आहे. जेथें प्राप्ति होते तेथें गति होते; आणि जेथें प्राप्ति नाहीं तेथें गति होत नाहीं; असें पूर्वी ( स० सू० ७ यांत ) सांगितलें. आणि अनुमानानें सामान्यतः ज्ञान होतें. तेव्हां श्रुत व अनुमान यांच्या विषयांत विशेष कांहीं नाहीं. तसेंच सूक्ष्म, व्यवहित व दूर वस्तूचें लौकिकप्रत्यक्षानें ग्रहण होत नाहीं. आतां तो विशेष अप्रमाण म्हणून त्याचा अभावच असें म्हणतां येत नाहीं; ( कारण, 'ज्याचा विशेष नाहीं असें सामान्य नाहीं,' या न्यायानें सर्व वस्तूंत विशेष आहेच.) तो विशेष कोणींही ग्राह्य नाहीं; तर समाधिप्रज्ञेनींच तो विशेष ग्राह्य आहे. आतां स्थूलाचा विशेष कदाचित् लोकप्रत्यक्षास येईल; परंतु भूतसूक्ष्मगत विशेष किंवा पुरुषगत विशेष लौकिकप्रत्यक्षगोचर होणार नाहीं. त्याकरितां श्रुत व अनुमानप्रज्ञांच्या विषयांहून अन्य विषय समाधिप्रज्ञेचा आहे. ती समाधिप्रज्ञा योग्यास प्राप्त झाली असतां तीपासून नवीन नवीन संस्कार उत्पन्न होतात ॥४९॥

आतां या समाधिप्रज्ञेचें फल सांगतात,—

## तज्जः संस्कारोऽन्यसंस्कारप्रतिबन्धी ॥ ५० ॥

**सूत्रार्थः**—निर्विचारसमाधीपासून उत्पन्न झालेला संस्कार व्युत्थानसंस्काराचा बाधक होतो.

**भाष्यम्**—**समाधिप्रज्ञाभवः संस्कारो व्युत्थानसंस्काराशयम्बाधते । व्युथानसंस्काराभिभवात्तत्प्रभवाः प्रत्यया न भवन्ति । प्रत्ययनिरोधे समाधिरुपतिष्ठते । ततः समाधिजा प्रज्ञा ततः प्रज्ञाकृताः संस्कारा इति नवः संस्काराशयो जायते ।**

---

सू० ४९ टीपः—१ येथें शंका अशी येते कीं, व्यवहित व अति दूर पदार्थांचा संबंध नसल्यामुळें समाधींत प्रत्यक्षप्राह्यत्व तरी कसें होणार ? याचें समाधान असें,—आमचें अंतःकरण व्यापक असल्यामुळें अतीत व अनागत वस्तूंची स्वरूपतः सत्ता असल्यामुळें नेहमीं सर्व अर्थांचा संनिकर्ष ( संबंध ) आहे म्हणून, तोच योगजधर्मानें व्यवहितातीतादिज्ञानाचें प्रतिबंधक जें तम, त्यास दूर करितो. विज्ञा० भि०.

**ततः प्रज्ञा ततश्च संस्कारा इति । कथमसौ संस्कारातिशयश्चित्तं साधिकारं न करिष्यतीति । न ते प्रज्ञाकृताः संस्काराः क्लेशक्षये हेतुत्वाच्चित्तमधिकारविशिष्टं कुर्वन्ति । चित्तं हि ते स्वकार्यादवसादयन्ति । ख्यातिपर्यवसानं हि चित्तचेष्टितमिति ॥ 'किंचाऽस्य भवति' ॥ ५० ॥**

**भाष्यार्थः**—आरंभीं निर्विचारसमाधिप्रज्ञेपासून उत्पन्न झालेला संस्कार, पुढें व्युत्थानकालीं उत्पन्न होणाऱ्या संस्काराचा बाध (प्रतिबंध) करितो. व्युत्थानसंस्काराचा नाश झाल्यामुळें त्यापासून उत्पन्न होणारे अनुभव होत नाहींत. अनुभवाच्या अभावीं समाधि सिद्ध होतो. नंतर समाधीपासून प्रज्ञा उत्पन्न होते; आणि नंतर प्रज्ञेपासून संस्कार उत्पन्न होतात. त्या नवीन संस्कारांपासून प्रज्ञा, व त्यानंतर तीपासून संस्कार. याप्रमाणें पुनः पुनः संस्कारांची वृद्धि होऊन सर्व क्लेशांचा नाश होतो. आतां येथें अशी शंका येते कीं, याप्रमाणें संस्कारांचा अतिशय ( उत्कर्ष ) झाल्यावर तो चित्तास स्वकार्यजननाविषयीं समर्थ कसा करणार नाहीं ? याचें समाधान असें कीं,—ते प्रज्ञासंस्कार चित्तास स्वकार्यउत्पत्तीविषयीं समर्थ करीत नाहींत; कारण ते पुनः जन्म येण्यास कारण जे अविद्यादि क्लेश त्यांचा नाश करणारे आहेत. आणि उलट ते चित्तास स्वकर्तव्यापासून विवेकख्यातीपर्यंत दूर करीत असतात; कारण चित्ताचा व्यापार विवेकख्यातीपर्यंतच आहे; पुढें नाहीं ॥ ५० ॥

पूर्वी 'क्षीणवृत्तेः' इत्यादिसूत्रांनीं संप्रज्ञातयोगाचीं फळें वगैरे सांगितलीं; आतां असंप्रज्ञातयोगाचें फलादिक सांगतात,—

## तस्याऽपि निरोधे सर्वनिरोधान्निर्बीजः समाधिः ॥ ५१ ॥

**सूत्रार्थः**—त्या संप्रज्ञातसमाधिप्रज्ञेच्या संस्काराचाही निरोध झाल्यानें सर्ववृत्तींचा निरोध होऊन निर्बीजसमाधि सिद्ध होतो.

**भाष्यम्—स न केवलं समाधिप्रज्ञाविरोधी, प्रज्ञाकृतानां संस्काराणामपि प्रतिबन्धी भवति । कस्मात् । निरोधजः संस्कारः समाधिजान् संस्कारान् बाधत इति ।**

---

**सू० ५० टीप**—१ प्रारब्धकर्माचेही अतिक्रमण करून अतिशीघ्र मोक्ष होणें हें केवल ज्ञानानें असाध्य आहे; तें ह्या दोन्ही योगांनीं सिद्ध होतें ह्मणून हें ह्याचें मुख्य फल आहे. कारण, 'योगाग्नीनें शीघ्र दग्ध केला आहे कर्मसमूह ज्यानें' इत्यादि वाक्यांत दाहक्रियेंत प्रारब्धकर्मे अतिरिक्त करून इतर कर्मांचा दाह होतो, असा संकोच करण्यास प्रमाण नाहीं. आणि 'जीवन्मुक्ताला प्रारब्धकर्माचा भोग होईतोंपर्यंत विदेहकैवल्य नाहीं' इत्यादि ज्ञानिमात्रविषयक श्रुतींची अन्यप्रकारानें उपपत्ति होत नाहीं; ह्मणून 'ज्ञानाग्नि हा सर्वकर्मांचा दाह करितो' अशा गीतादिवचनांत प्रारब्धकर्मभिन्न असा संकोच करावयाचा. विज्ञा० भि०. २ विवेकख्याति उत्पन्न झाली असतां इतर पुरुषार्थ कांहीं न राहिल्यामुळें ती विवेकख्यातिप्रज्ञा त्या संस्काराच्या अतिशयानें वरचेवर उत्पन्न होऊन परवैराग्यद्वारानें ( चित्त विषयांविषयीं विरक्त झाल्यामुळें ) समाप्त होतें. वि० भि०.

निरोधस्थितिकालक्रमानुभवेन निरोधचित्तकृतसंस्कारास्तित्वमनुमेयम् । व्युत्थाननिरोधसमाधिप्रभवैः सह कैवल्यभागीयैः संस्कारैश्चित्तं स्वस्यां प्रकृताववस्थितायां प्रविलीयते। तस्मात्ते संस्काराश्चित्तस्याधिकारविरोधेन स्थितिहेतवो यस्मादवसिताधिकारं सह कैवल्यभागीयैः संस्कारैश्चित्तं विनिवर्तते। तस्मिन्निवृत्ते पुरुषः स्वरूपमतिष्ठः। अतः शुद्धो मुक्त इत्युच्यते ॥ ५१ ॥

**भाष्यार्थः**—तो निर्बीज समाधि ( असंप्रज्ञातयोग ) केवल समाधिप्रज्ञेचाच प्रतिबंधक असें नाहीं; तर प्रज्ञाकृत जे संस्कार त्यांचाही प्रतिबंधक आहे. कारण निरोध ह्म० परवैराग्य त्यापासून उत्पन्न झालेला संस्कार प्रज्ञा व तत्संस्कारांस अगदीं नष्ट करितो. आतां जरी निरोधावस्थेंत संस्कार असतात यास प्रमाण प्रत्यक्ष नाहीं; तथापि असंप्रज्ञातअवस्थेंत मुहूर्त, ( दोन घटिका ), अहोरात्र ( दिवस व रात्रि ) व महिना इत्यादि क्रमानें जी कालवृद्धि तिच्या अनुभवावरून निरोधावस्थचित्तापासून उत्पन्न होणाऱ्या संस्काराचें अस्तित्व ( सत्ता ) अनुमानानें जाणावी. कारण संस्काराच्या वृद्धीवांचून समाधीची कालवृद्धि होणें संभवत नाहीं. आतां असंप्रज्ञाताची व्युत्थानअवस्था ह्मणजे समाधिप्रज्ञात्र होय; ती व असंप्रज्ञात या दोहोंपासून उत्पन्न झालेले, त्यांसह जे मोक्षापर्यंत असणारे संस्कार, त्यांसहित चित्त, आपली प्रकृति ह्म० कारण लीन झालें असतां आपोआपच नष्ट होतें; तेव्हां निरोधसंस्कारांचाही नाश होतो; ह्मणून, ते निरोधसंस्कार चित्ताच्या स्थितीस अधिकारविरोधेंकरून कारण आहेत; ज्या योगानें चित्त अधिकार ( स्वकार्यक्षमत्व ) समाप्त होऊन मोक्षास हेतु जे संस्कार त्यांसह निवृत्त होतें. तें निवृत्त झालें असतां पुरुष मुक्त झाला असें ह्मणतात; कारण त्या वेळेस पररूपांनीं प्रतिबिंबित जे दुःखादि त्यांपासून मुक्त व शुद्धसत्वसंबंधानें पुण्यपापांपासून सुद्धां मुक्त असतो ॥ ५१ ॥

## इति श्रीव्यासदेवकृतभाष्यसहिते टिप्पण्यादियुतभाषान्तरोपेते च पातञ्जले सांख्यप्रवचने योगशास्त्रे समाधिपादः समाप्तः ॥ १ ॥

---

सू० ५१ टी०–१ निरोधच साक्षात् प्रज्ञासंस्काराचें विलापन करितो असें नाहीं तर, निरोधपरंपरेनें उत्पन्न झालेला अतिदृढ असा संस्कार, तोच प्रज्ञासंस्काराचें अत्यंत विलापन करितो. विज्ञा० भि०.

ॐतत्सत्परमात्मने नमः ।

# पातञ्जलयोगसूत्रम् ।

## श्रीव्यासभाष्योपेतं भाषानुवादसहितं च ।

### साधनपादः ॥ २ ॥

**भाष्यम्**—उद्दिष्टः समाहितचित्तस्य योगः कथं व्युथितचित्तोऽपि योगयुक्तः स्यादित्येतदारभ्यते ॥

**भाष्यार्थः**—प्रथमपादांत योगारूढचित्त ह्मणजे ज्यास योग पूर्ण सिद्ध झाला अशा उत्तम अधिकाऱ्यास अभ्यास व वैराग्य या साधनानेंच केवल, क्रियायोगादि सकल अंगांच्या निरपेक्षतेनें योग सांगितला. परंतु ज्याचें चित्त वरचेवर विक्षिप्त होतें; असा अधिकारीही योगयुक्त कोणत्या उपायानें होईल तें सांगतात,—

**तपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि क्रियायोगः ॥ १ ॥**

**सूत्रार्थः**—तप[१], स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान ह्यांस क्रियायोग ह्मणतात.

**भाष्यम्**—नातपस्विनो योगः सिध्यति । अनादिकर्मक्लेशवासनाचित्रा प्रत्युपस्थितविषयजाला चाशुद्धिर्नान्तरेण तपः सम्भेदमापद्यते इति तपस उपादानम् । तच्च चित्तप्रसादनमबाधमानमनेनासेव्यमिति मन्यते । स्वाध्यायः प्रणवादिपवित्राणाञ्जपो मोक्षशास्त्राध्ययनं वा । ईश्वरप्रणिधानं सर्वक्रियाणां परमगुरावर्पणं तत्फलसंन्यासो वा । स हि क्रियायोगः ॥ १ ॥

**भाष्यार्थः**—तपश्चर्यारहित मनुष्यास योग सिद्ध होत नाहीं; कारण, अनादि जे कर्मक्लेश व वासना त्यांनीं अनेक प्रकारची व जींत विषयरूप जाळें असणारें अशी अशुद्धि ह्मणजे पाप योगास प्रतिबंध करणारें, तपावांचून नाश पावत नाहीं. याकरितां साधनामध्यें

---

**सू० १ टीप–१** अधिकारभेदानें साधनांचा भेद गरुडपुराणादिकांत सांगितला आहे. तो असा,– ''योगवृक्षावर चढण्याची इच्छा करणाऱ्या यतींस कर्म व ज्ञान हीं साधनें सांगितलीं आहेत. व ज्यांनीं योगवृक्षावर आरोहण केलें; त्यांकरितां ब्राह्मकर्मांचा त्याग व ज्ञान हीं मुख्य साधनें आहेत.' तसाच 'जो मुनि योगरूपवृक्षावर आरोहण करण्याची इच्छा करितो, त्यास कर्म हें योगास साधन आहे; व तोच योगारूढ झाल्यावर त्यास शम ( शांति ) साधन आहे'• असा भेद गीतेंत सांगितला. २ कृच्छ्रसांतपन, चांद्रायण इत्यादि व्रतें करणें.

तपाचें ग्रहण केलें आहे. आतां तें तप, योग्यानें योगाविषयीं चित्ताची उत्सुकता जेणेंकरून कायम राहील असेंच बेतानें करावें; असें परमऋषि मानितात. 'स्वाध्याय ह्मणजे पापाचा नाश करणाऱ्या प्रणव, गायत्री, अष्टाक्षर इत्यादि पवित्रांचा जप करणें; अथवा ब्रह्मसूत्र इत्यादि मोक्षशास्त्राचा अभ्यास करणें. ईश्वरप्रणिधान येथें पूर्वपादांत सांगितलें त्याहून वेगळ्या प्रकारचें घ्यावयाचें तें असें, लौकिक व वैदिक सर्व कर्मांचें परमेश्वराचे ठिकाणीं समर्पण[3] करणें, किंवा सर्व कर्मफलांचा भोक्ता ईश्वर आहे अशी भावना करणें, हें होय. (त्यास कर्मफलसंन्यास ह्मणतात;) तोच क्रियायोग होय ॥ १ ॥

या योगाचें प्रयोजन सांगतात,–

## समाधिभावनार्थः क्लेशतनूकरणार्थश्च ॥ २ ॥

**सूत्रार्थः**–समाधीची प्राप्ति होण्याकरितां आणि क्लेश कमी करण्याकरितां हा क्रियायोग साधावा.

**भाष्यम्–स हि आसेव्यमानः समाधिं भावयति, क्लेशांश्च प्रतनूकरोति । प्रतनूकृतान् क्लेशान् प्रसंख्यानाग्निना दग्धबीजकल्पानप्रसवधर्मिणः करिष्यतीति । तेषां तनूकरणात्पुनः क्लेशैरपरामृष्टा सत्वपुरुषान्यतामात्रख्यातिः सूक्ष्मा प्रज्ञा समाप्ताधिकारा प्रतिप्रसवाय कल्पिष्यते इति ॥ 'अथ के क्लेशाः कियन्तो वेति' ॥ २ ॥**

**भाष्यार्थः**–तो चांगल्या रीतीनें ( निष्कामादिरूपानें ) सेव्यमान असा कर्मयोग समाधीस सिद्ध करितो; व पुढें सांगावयाचे जे क्लेश त्यांस अनायासानें कमी कमी करितो. व शुष्क इंधनाप्रमाणें तनु ( कृश ) केलेल्या क्लेशांप्रत तो कर्मयोग, स्वतः प्रज्वलित जो विवेकख्यातिरूप अग्नि त्यानें जळाल्यामुळें पुनः अंकुर न येणाऱ्या अशा बीजाप्रमाणें अप्रसवस्वभाव ( संस्कारांस उत्पन्न न करणारे ) असे करील. ते क्लेश अगदींच कमी झाल्यामुळें त्यांनीं अनभिभूत व तिचा सूक्ष्म विषय असल्यामुळें सूक्ष्म, साक्षात्कार करून देणारी अशी प्रज्ञा ( बुद्धि ) ही क्रमानेंच तिचें कर्तव्य कांहींच न राहिल्यामुळें शेवटच्या असंप्रज्ञातसमाधींत पुनः उत्पन्न न होण्याविषयीं समर्थ होईल ॥ २ ॥

आतां ते पूर्वीं सांगितलेले क्लेश कोणते व किती प्रकारचे ते सांगतात,–

## अविद्यास्मितारागद्वेषाभिनिवेशाः क्लेशाः ॥ ३ ॥

**सूत्रार्थः**–अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश हे पांच क्लेश आहेत.

**भाष्यम्–क्लेशा इति पञ्च विपर्यया इत्यर्थः । ते स्पन्दमाना गुणाधिकारं द्रढ-**

---

सू० १ टी०–३ अर्पणप्रकार गीतेंत सांगितला तो असा, 'यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ॥ यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्' सारांश, हे अर्जुना! जें कांहीं करशील तें सर्व मला अर्पण कर.

यन्ति, परिणाममवस्थापयन्ति, कार्यकारणस्रोत उन्नमयन्ति, कर्मविपाकं चाभिनिर्हरन्ति इति परस्परानुग्रहतन्त्रा भूत्वा ॥ ३ ॥

**भाष्यार्थः**—ते अविद्यादि विपर्यय ( विपरीतज्ञानभूत ) पांच क्लेश होत. ( यांत क्लेश कोणते व किती, या प्रश्नांचीं उत्तरें आलीं.) आतां ते क्लेश लब्धवृत्तिक ( व्यापार करणारे ) दृष्ट व अदृष्टद्वारा सत्त्वादिगुणांच्या कार्यारंभसामर्थ्यास दृढ करितात. तसेच, गुणांचा परिणाम जो वैषम्यरूप त्यास स्थिर करितात. त्यानंतर महदादिरूपकार्यकारणप्रवाहास उत्पन्न करितात. इतके सर्व व्यापार, कर्मांचा विपाक ( फल ) जो जात्यायुर्भोगलक्षण त्यास उत्पन्न करण्याकरितां करीत असतात. व तेही स्वतंत्र असतां नव्हे तर, अविद्येपासून राग, व रागापासून अविद्या, याप्रमाणें परस्पराधीन होत्साता! तात्पर्य, एकमेकांच्या साहाय्यानेंच क्लेशांना स्थैर्य, व स्थैर्यामुळें विपाकपरंपरेचा निर्वाह होतो ॥ ३ ॥

आतां जरी अविद्यादिकांस क्लेशत्व हा धर्म सारखा आहे तथापि सर्व क्लेशांला मूळ कारण अविद्या असल्यामुळें तिचें प्राधान्य सांगतात,—

## अविद्याक्षेत्रमुत्तरेषां प्रसुप्ततनुविच्छिन्नोदाराणाम् ॥ ४ ॥

**सूत्रार्थः**—अस्मितादि चार क्लेशांचें उत्पत्तिस्थान ( मूळ ) अविद्या आहे. ह्या क्लेशांच्या प्रसुप्त, तनु, विच्छिन्न आणि उदार अशा चार अवस्था आहेत.

**भाष्यम्**—अत्राविद्या क्षेत्रं प्रसवभूमिरुत्तरेषामस्मितादीनां चतुर्विधकल्पितानां प्रसुप्ततनुविच्छिन्नोदाराणाम् । तत्र का प्रसुप्तिः । चेतसि शक्तिमात्रप्रतिष्ठानां बीजभावोपगमः । तस्य प्रबोध आलम्बने संमुखीभावः । प्रसंख्यानवतो दग्धक्लेशबीजस्य संमुखीभूतेऽप्यालम्बने नासौ पुनरस्ति, दग्धबीजस्य कुतः प्ररोह इति । अतः क्षीणक्लेशः कुशलश्चरमदेह इत्युच्यते । तत्रैव सा दग्धबीजभावा पञ्चमी क्लेशावस्था नान्यत्रेति सतां क्लेशानां तदा बीजसामर्थ्यं दग्धमिति विषयस्य संमुखीभावेऽपि सति न भवत्येषां प्रबोध इत्युक्ता प्रसुप्तिर्दग्धबीजानामप्ररोहश्च । तनुत्वमुच्यते । प्रतिपक्षभावनोपहताः क्लेशास्तनवो भवन्ति । तथा विच्छिद्य विच्छिद्य तेन तेनात्मना पुनः समुदाचरन्तीति विच्छिन्नाः । कथं, रागकाले क्रोधस्यादर्शनात् । न हि रागकाले क्रोधः समुदाचरति । रागश्च क्वचिद्दृश्यमानो न विषयान्तरे नास्ति । नैकस्यां स्त्रियां चैत्रो रक्त इति अन्यासु स्त्रीषु विरक्तः । किंतु तत्र रागो लब्धवृत्तिः । अन्यत्र भविष्यद्वृत्तिरिति । स हि तदा प्रसुप्ततनुविच्छिन्नो भवति । विषये यो लब्धवृत्तिः स उदारः । सर्व एवैते क्लेशविषयत्वं नातिक्रामन्ति । कस्तर्हि विच्छिन्नः प्रसुप्तस्तनुरुदारो वा क्लेश इति । उच्यते सत्यमेवैतत् । किंतु विशिष्टानामेवैतेषां विच्छिन्नादित्वं यथैव प्रतिपक्षभावना-

तो निवृत्तस्तथैव स्वव्यञ्जकाञ्जनेनाभिव्यक्त इति सर्व एवामी क्लेशा अविद्याभेदाः। कस्मात्सर्वेष्वविद्यैवाभिप्लवते यदविद्यया वस्त्वाकार्यते तदेवानुशेरते क्लेशा विपर्यासप्रत्ययकाले उपलभ्यन्ते क्षीयमाणाश्चाविद्यामनुक्षीयन्त इति ॥ 'तत्राविद्यास्वरूपमुच्यते' ॥ ४ ॥

**भाष्यार्थः**—या पांच क्लेशांमध्यें अविद्या ही, पुढचे जे प्रसुप्त[1], तनु[2], विच्छिन्न[3] व उदार[4] असे चार प्रकारचे कल्पिलेले अस्मिता, राग इत्यादि चार क्लेश यांचें क्षेत्र ह्म० प्रसवभूमि[5] ( उत्पत्तिस्थान ) आहे. त्या चार भेदांपैकीं प्रसुप्ति कोणती ? तर अंतःकरणांत केवळ शक्तीनेंच ( कांहींएक अवस्थेवांचून ) राहिलेले जे अस्मितादिक त्यांचा बीजभावोपगम ह्मणजे स्वकार्य उत्पन्न करण्याचें सामर्थ्य यास प्रसुप्ति ह्मणतात; व तद्विशिष्ट तो प्रसुप्त क्लेश होय. त्या प्रसुप्तक्लेशाची आपापल्या विषयांमध्यें जी अभिव्यक्ति ( प्रकटता ) यास प्रबोध ह्मणतात. आतां विवेकानें साक्षात्कार झालेला अशा जीवन्मुक्ताचें क्लेशबीज दग्ध झाल्यामुळें विषय जवळ असतांही हा क्लेशांचा संमुखीभाव ( प्रादुर्भाव ) पुनः होत नाहीं; कारण जळालेल्या बीजांस अंकूर कोठून उत्पन्न होणार ? याकरितां ज्याचे क्लेश क्षीण झाले आहेत अशा ज्ञान्यांचा देह क्षेमकारक व शेवटचा[6] असें समजावें. आणि त्या चरम ( शेवटच्या ) देहांतच ती, दग्ध आहे बीजभाव जींत अशी पांचवी क्लेशावस्था, अन्यठिकाणीं नाहीं; कारण आतां दुसरा जन्म नाहीं[7]. याकरितां क्लेश सूक्ष्मरूपानें असतांही त्या चरमदेहांत कार्यजननसामर्थ्य नष्ट झाल्यामुळें विषय सन्निध असतांनाही त्या क्लेशाची स्वस्वविषयांत प्रकटता होत नाहीं; याकरितां या अवस्थेस प्रसुप्ति, व दग्धबीजांना अंकुराभाव असें सांगितलें. आतां तनुत्व सांगतों. क्लेशांचा प्रतिपक्षी ( शत्रु ) जो क्रियायोग त्याच्या अनुष्ठानानें

---

**सू० ४ टी०–१** जे क्लेश चित्तभूमिकेंत असून त्यास कोणी जागृत करणारा नसल्यामुळें आपलें कार्य करूं शकत नाहींत, त्यांस प्रसुप्त क्लेश ह्मणतात. जसें बाल्यावस्थेंत लहान मुलांना वासनारूप क्लेश असूनही त्यांचा अभिव्यंजक कोणी नसल्यामुळें स्पष्ट होत नाहींत; त्याप्रमाणें. असें भो० वृ०. २ जे क्लेश आपापल्या विरुद्धपक्षानुष्ठानानें शिथिल झाली आहे कार्यसंपादनशक्ति ज्यांची असे वासनाशेष असल्यामुळें अंतःकरणांत असूनही कार्यापुर्ती सामुग्री नसल्यामुळें स्वकार्य करण्याविषयीं असमर्थ असतात; त्यास तनु ह्मणतात. असें भो० वृ०. ३ जे कोणीएका बलवान् क्लेशानें पराभूत होऊन राहतात; जसा द्वेषावस्थेंत राग, व रागावस्थेंत द्वेष; ह्या परस्पर विरुद्ध अशा दोहोंचा एकवेळीं कधीं संभव नाहीं ते विच्छिन्न; असें भो० वृ०. ४ जे साहाय्य मिळाल्यामुळें आपापलीं कार्यें संपादन करितात; ते उदार. असें भो० वृ०. ५ निमित्तकारणालाही प्रसवभूमित्व केवळ प्राधान्यामुळेंच गौण समजावें. असें वि०भि०,वाच०मि०. ६ 'बीजान्यग्न्युपदग्धानि न रोहन्ति यथा पुनः॥ ज्ञानदग्धैस्तथा क्लेशैर्नात्मा संपद्यते पुनः ॥' अर्थ;– ज्ञानानें दग्ध अशा क्लेशरूप बीजहेतूंनीं आत्मा ह्मणजे देह पुनः उत्पन्न होत नाहीं; कारण क्लेशसंज्ञक बीजच जळून गेलें. असें विज्ञा०. ७ दग्ध आहे बीज जींत अशा अवस्थेच्या पुरुषास पुनः प्रसव नाहीं; व त्याची प्रसवभूमि जी अविद्या तीही नाहीं. असा अभिप्राय. असें विज्ञा०.

उपहत (क्षीण) झालेले क्लेश तनु ह्मणजे विवेकख्यातीचा प्रतिबंध करण्याविषयीं असमर्थ होतात. व यासच तनुत्व ह्मणतात. तसेच ते ह्या क्लेशांतील कोणीएकानें पराभव केल्यामुळें अथवा अतिशय विषय सेवन केल्यामुळें थांबून थांबून त्या त्या स्वरूपानें (पूर्वीप्रमाणें पुनः प्रकट होतात; याकरितां त्यांस विच्छिन्न असें ह्मणतात. कशावरून तर, रागाच्या) वेळीं क्रोध नसतो; व परस्परविरोधी असल्याकारणानें क्रोध उत्पन्नही होत नाहीं. यावरून क्रोधाची विच्छिन्नता सिद्ध झाली. तसाच राग (विषयेच्छा) हा एकाविषयीं असतां दुसऱ्या विषयांवर नसतो असें नाहीं; जसा, चैत्रनामक कोणी एक पुरुष एका स्त्रीच्या ठिकाणीं प्रीतियुक्त असल्यामुळें दुसऱ्या स्त्रीविषयीं विरक्त (प्रीतिरहित), असें होत नाहीं; तर फक्त त्याविषयाविषयीं राग उत्पन्न झाला असतो, व इतर ठिकाणीं व्हावयाचा असतो. आतां तो राग त्या वेळेस अन्याठिकाणीं प्रसुप्त किंवा तनु अथवा विच्छिन्न यांतून कोणीतरी एक अवश्य असतोच. त्यांपैकीं विच्छिन्न राग घेऊन या ठिकाणीं उदाहरण दिलें. आतां विषयाच्या ठिकाणीं जो राग लब्धवृत्ति[१०] (स्थिर झालेला) त्यास उदार ह्मणतात. (आतां जरी प्रसुप्त व विच्छिन्न हे दुःखजनक नसल्यामुळें त्यांस क्लेश ह्मणतां येत नाहीं; तथापि उदारादिअवस्थेंत प्रसुप्तादिकांना दुःखदत्व आहे ह्मणून ह्यांस क्लेशत्व[११] कायमच आहे.) आतां जर सर्वक्लेशांचें तें तें स्वरूप भिन्न भिन्न कालांत असणार तर कोणता विच्छिन्न व कोणता प्रसुप्त क्लेश याप्रमाणें विभाग कसा सांगतां येईल ? याचें समाधान असें कीं, जरी प्रसुप्तादिरूपानें चारही क्लेशांचें ऐक्य, हें ह्मणणें बरोबर आहे; तथापि अवस्थाभेदामुळें क्लेशांचा विच्छिन्नादि विशेष विविक्षित आहे. जसा एका पुरुषाचा बालक, तरुण व वृद्ध इत्यादि विभाग त्याप्रमाणें आपणास व्यक्त करणाऱ्या अशा विषयध्यानरूप अंजनानें अभिव्यक्त (प्रकट) झालेला उदार क्लेश आहे; याकरितां मुमुक्षूंनीं प्रतिपक्षभावनेप्रमाणें (तद्विरुद्धाचरणाप्रमाणें) विषयसंगत्यागही केला पाहिजे. याकरितां सर्व हे क्लेश अविद्याकारणानें अविद्येचेच भेद आहेत; कारण सर्व क्लेशांत अविद्याच व्याप्त आहे. व अविद्या ज्या वस्तूचें आलंबन करिते; त्या ठिकाणीं क्लेशही स्थिर होतात; व विपरीतज्ञानकालीं ते वृद्ध होतात. आणि अविद्या नष्ट झाली कीं तेही नष्ट होतात ॥ ४ ॥

---

**सू० ४ टी०–** ८ अथवा उत्तम ज्ञान (श्रवणादिरूप दर्शन) हें अविद्येचा प्रतिपक्ष, याचप्रमाणें अस्मितावस्थेंत भेददर्शन; मध्यस्थपणा रागद्वेषांविषयीं; व अभिनिवेशाची अनुबंधबुद्धिनिवृत्ति; यांच्या भावनेनें उपहत; ते तनु. असें वाच० मि०. ९ येथें भाष्यांत 'विच्छिद्य विच्छिद्य पुनः समुदाचरन्ति' यांचें त्वरेनें पौनःपुन्य दाखविणाऱ्या भाष्यकारानें विच्छिन्न प्रसुप्ताहून भिन्न असें सांगितलें; कारण, प्रसुप्ति ह्मणजे क्लेशांची व्यंजकाच्या विलंबानें एक, दोन, तीन इत्यादि अनेकजन्मांच्या व्यापारानें व बहुकालानें प्रकटता न होणें ती. व विच्छिन्नता तर थोडक्या प्रतिबंधामुळें क्लेशप्रवाहाची थोडक्या कालांत मध्यें मध्यें अभिव्यक्ति न होणें; ती होय. तसाच 'तेन तेनात्मना' इतक्यानें तनुअवस्थेहून भेद सांगितला. विज्ञा०, वाच०. १० लब्धस्वाभाविकवृत्ति, असा अर्थ. असें विज्ञा०. ११ क्लेशजननयोग्यत्व.

आतां पांच क्लेशांचीं लक्षणें पांच सूत्रांनीं सांगणार, त्यांत अविद्येचें लक्षण सांगतात,–

**अनित्याशुचिदुःखानात्मसु नित्यशुचिसुखात्मख्यातिरविद्या ॥५॥**

**सूत्रार्थः**–अनित्याच्या ठिकाणीं नित्य अशी बुद्धि, अपवित्राच्या ठिकाणीं पवित्र अशी बुद्धि, दुःखाच्या ठिकाणीं सुख अशी बुद्धि आणि अनात्म्याच्या ठिकाणीं आत्मा अशी बुद्धि करणें ह्यासच अविद्या किंवा मोह असें ह्मणतात.

**भाष्यम्**–अनित्ये कार्ये नित्यख्यातिः । तद्यथा ध्रुवा पृथिवी, ध्रुवा सचन्द्रतारका द्यौः, अमृता दिवौकस इति । तथाऽशुचौ परमबीभत्से काये शुचिख्यातिः । उक्तश्च 'स्थानाद्बीजादुपष्टम्भान्निःस्यन्दान्निधनादपि । कायमाधेयशौचत्वात्पण्डिता ह्यशुचिं विदुः'॥ इत्यशुचौ शुचिख्यातिर्दृश्यते । नवेयं शशाङ्कलेखा कमनीयेयं कन्या मध्वमृतावयवनिर्मितेव चन्द्रं भित्त्वा निःसृतेव ज्ञायते । नीलोत्पलपत्रायताक्षी हावगर्भाभ्यां लोचनाभ्यां जीवलोकमाश्वासयन्तीवेति कस्य केनाभिसम्बन्धः । भवति चैवमशुचौ शुचिविपर्यासप्रत्यय इति । एतेनापुण्ये पुण्यप्रत्ययस्तथैवानर्थे चार्थप्रत्ययो व्याख्यातः । तथा दुःखे सुखख्यातिं वक्ष्यति । परिणामतापसंस्कारदुःखैर्गुणवृत्तिविरोधाच्च दुःखमेव सर्वं विवेकिन इति तत्र सुखख्यातिरविद्या । तथा अनात्मन्यात्मख्यातिर्बाह्योपकरणेषु चेतनाचेतनेषु भोगाधिष्ठाने वा शरीरे पुरुषोपकरणे वा मनस्यनात्मन्यात्मख्यातिरिति । तथैतदत्रोक्तं 'व्यक्तमव्यक्तं वा सत्वमात्मत्वेनाभिप्रतीत्य तस्य सम्पदमनुनन्दत्यात्मसम्पदं मन्वानस्तस्य व्यापदमनुशोचत्यात्मव्यापदं मन्वानः सर्वोऽप्रतिबुद्ध इत्येषा चतुष्पदा भवत्यविद्या मूलमस्य क्लेशसन्तानस्य कर्माशयस्य च सविपाकस्येति । तस्याश्चामित्रगोष्पदवद्वस्तुसतत्वं विज्ञेयम् । यथा नामित्रो मित्राभावो न मित्रमात्रं किन्तु तद्विरुद्धः सपत्नः। यथा वाऽगोष्पदं न गोष्पदाभावो न गोष्पदमात्रं किन्तु देश एव ताभ्यामन्यद्वस्त्वन्तरम् । एवमविद्या न प्रमाणं न प्रमाणाभावः किन्तु विद्याविपरीतं ज्ञानान्तरमविद्येति ॥ ५॥

**भाष्यार्थः**–अनित्यकार्याचे ठिकाणीं नित्यत्व कथन करणें; तें जसें, पृथ्वी नित्य, चंद्र व नक्षत्रें यांसहित स्वर्ग नित्य, व स्वर्गांत राहणारेही मृत्युरहित ह्मणजे कधींच नाश न पावणारे असे आहेत. याप्रमाणें तसेंच, अपवित्र व अत्यंत निंद्य अशा देहाच्या ठिकाणीं पवित्रता प्रतिपादन करणें. याप्रमाणेंच भगवान् व्यासांनीं सांगितलें आहे कीं, 'मूत्रादिकांनीं व्याप्त असें मातेचें उदर हें स्थान, मातापित्यांचें रक्त व वीर्य हें बीज, खाण्याच्या व पिण्याच्या पदार्थांचा रसादिभाव हा उपष्टंभ (पोषक), अशा सामुग्रीनें शरीर निर्माण होतें. पुढें शरीरांतून मलमूत्रादि वाहणें, आणि शेवटीं मरणानंतरही अपवित्र! असें स्वभावतः अशुचि असूनही अंगरागादिकेंकरून सुगंधीप्रमाणें वाटणारें, याकरितां ज्ञाते लोक यास अपवित्र

जाणतात.' पूर्वीं सांगितलेल्या हेतूंनीं अपवित्र अशा शरीराचे ठिकाणीं शुचिख्याति लोकांत दृष्ट आहे. जसें, 'खरोखर ही स्त्री नवीन चंद्राची जणू लेखाच होय. ही सुंदर कन्या स्वादु अमृताच्या अवयवांनीं निर्माण केलेली अशी, चंद्राचा भेद करूनच निघाली असावी; असें वाटतें. नीलकमलाप्रमाणें जिचे विशाल नेत्र, शृंगारलीलायुक्तनेत्रांनीं सर्व जीवांचें समाधान करणारी.' इत्यादि. यांत अपवित्र व परमनिंद्य अशा स्त्रीदेहाचा व अंधकारास नष्ट करणाऱ्या चंद्रलेखा इत्यादिकांचा संबंध काय? परंतु याप्रमाणें लोकांत अशुचिपदार्थांच्या ठिकाणीं शुचिपणाचा विपरीत विश्वास होतोच. या अशुचिपदार्थांवर शुचिख्यातिप्रदर्शनानें, अपुण्य जें हिंसादि, त्यावर संसारांतून मुक्त करणाऱ्या पुण्यकर्मांच्या पुण्याचा विश्वास; या प्रमाणेंच मिळविणें, रक्षण करणें इत्यादि अनेक दुःखें असल्यामुळें अनर्थप्राय जें धनादि यावर अर्थाचा प्रत्यय कथित झाला; कारण सर्वांना निंद्यत्व असल्यामुळें अशुचित्व आहे. तशीच दुःखाचे ठिकाणीं सुखख्याति सांगतात,– आतां विचारी पुरुषास परिणामीं सर्व दुःख देणारें ह्मणून दुःखच सर्व आहे; याकरितां त्या ठिकाणीं सुखख्याति ही अविद्या होय. तसेंच अनात्म्याच्या ठिकाणीं आत्मा अशी बुद्धि; ह्मणजे बाह्य जे साधनभूत, अजड किंवा जड; अथवा भोगाधिष्ठान जें शरीर, किंवा पुरुषोपकरण जें मन इत्यादि अनात्म्यावर आत्मबुद्धि, ही अविद्या होय. तसेंच पंचशिखाचार्यांनें याविषयीं असें सांगितलें आहे कीं, व्यक्त ह्मणजे पुत्र, दारा, पशु इत्यादि चेतन, किंवा अव्यक्त ह्मणजे शय्या, आसन इत्यादि अचेतन दृश्यपदार्थांस आत्मत्वेंकरून मानून व त्यांस संपत्ति असें समजतो; व ती आपली संपत्ति मानून तिचा नाश होणार करितां शोक करितो. व शोकामुळें मोह पावतो ( मूढ होतो. ) अशीं हीं अविद्येचीं चार स्थानें आहेत. व पूर्वीं सांगितलेल्या क्लेशसंतानास व फलविशिष्टवासनांस मूल कारण अविद्याच आहे. आतां तिला 'अमित्र, अगोष्पद' या शब्दांप्रमाणें वस्तुसतत्व ह्मणजे वस्तुत्व जाणावें. जसें, 'नामित्र' या शब्दाचा अर्थ, अमित्र ह्मणजे शत्रु, तद्रहित मित्र, असा नसून शत्रुसमान सपत्न ( सापत्न बंधु ) असा आहे. अथवा जसें, 'अगोष्पद' शब्द गोष्पदभिन्न असून गोष्पसदृश जो गोष्पदाभाव व गोष्पद यांहून अन्य विपुल देश, तद्वाचक आहे. त्यांप्रमाणें अविद्या ही विद्या (ज्ञान) किंवा केवल ज्ञानाभाव नसून विद्याविरुद्ध असें एकप्रकारचें ज्ञान आहे ॥ ५ ॥

आतां अविद्येनंतर होणारें जें तिचें कार्य अस्मिता ती सांगतात,–

## दृग्दर्शनशक्त्योरेकात्मतेवाऽस्मिता ॥ ६ ॥

**सूत्रार्थः**–पुरुष आणि बुद्धि या दोघांच्या एकात्मतेस अस्मिता ह्मणतात.

**भाष्यम्**–पुरुषो दृक्शक्तिर्बुद्धिर्दर्शनशक्तिरित्येतयोरेकस्वरूपापत्तिरिवाऽस्मिता क्लेश उच्यते । भोग्यभोक्तृशक्त्योरत्यन्तविभक्तयोरत्यन्तासङ्कीर्णयोरविभागप्राप्ताविव

**व सत्यां भोगः कल्पते । स्वरूपप्रतिलम्भे तु तयोः कैवल्यमेव भवति । कुतो भोग इति । तथा चोक्तम् । बुद्धितः परं पुरुषमाकारशीलविद्यादिभिर्विविक्तमपश्यन् कुर्यात्तत्रात्मबुद्धिं मोहेनेति ॥ ६ ॥**

**भाष्यार्थः**–दृक्शक्ति तो पुरुष व ज्यायोगानें भोग होतो असें साधन जी दर्शनशक्ति ती बुद्धि. या दोहोंची एकस्वरूपापत्ति ह्मणजे तादात्म्य (एकीभाव) तत्तुल्य एकाकार जो क्लेश त्यास अस्मिता ह्मणतात. परस्परांचे धर्म अत्यंत भिन्न असल्यामुळें दोघेही अत्यंत विभक्त ( भिन्न ) अशा पुरुष व बुद्धीची एकाकारता झाली असतांच भोग संभवतो. भेदग्रह झाल्यावर तर परवैराग्यामुळें परस्परांचा वियोगच होतो. तेव्हां भोगाची संभावना कोठून असणार ? याकरितां भोग एकात्मतेवांचून संभवत नाहीं; त्याच्या उपपत्तीकरितां एकात्मतारोपास प्रमाण भोग होय. अस्मितेचें स्वरूप व अविद्येपासून अस्मिता उत्पन्न होते अशाविषयीं पंचशिखाचार्यांचें वाक्य आहे; तें असें, 'वस्तुतः अविचारी पुरुष, बुद्धीहून पुरुष पृथक् व आकृति, स्वभाव, विद्या इत्यादिकांचा व पुरुषाचा कांहीं संबंध नसतां आकारशीलविद्यादिकांच्या ठिकाणीं मोहानें ( पूर्वसूत्रांत सांगितलेल्या अविद्येनें ) आत्मबुद्धि ह्मणजे 'शांताद्याकारवान् मी आहें, जाग्रदादिस्वभाव मी आहें, विद्यादिमान् मी आहें,' अशा प्रकारची अस्मिता करितो.' ॥ ६ ॥

आतां अस्मिता सांगून तिचें कार्य जो राग त्याचें लक्षण सांगतात,–

## सुखानुशयी रागः ॥ ७ ॥

**सूत्रार्थः**–सुखाचा अनुभव घेतल्यानंतर मागाहून जी त्या सुखाची किंवा त्याच्या साधनाची इच्छा त्यास राग असें ह्मणतात.

**भाष्यम्–सुखाभिज्ञस्य सुखानुस्मृतिपूर्वः सुखे तत्साधने वा यो गर्धस्तृष्णा लोभः स राग इति ॥ ७ ॥**

**भाष्यार्थः**–कांहीं सुखाचा अनुभव ज्यानें घेतला आहे; त्याला त्या सुखाचें स्मरण झाल्यानंतर त्या सुखाविषयीं अथवा त्याच्या साधनाविषयीं जो गर्ध ह्मणजे अति उत्कट इच्छा व लोभ त्यास राग ह्मणतात ॥ ७ ॥

आतां रागानंतर उत्पन्न होणारा जो द्वेष त्याचें लक्षण सांगतात,–

## दुःखानुशयी द्वेषः ॥ ८ ॥

**सूत्रार्थः**–दुःखाचा अनुभव घेतल्यानंतर मागाहून स्मरण होऊन जो त्या दुःखाविषयीं किंवा त्याच्या साधनाविषयीं क्रोध त्यास द्वेष असें ह्मणतात.

**भाष्यम्–दुःखाभिज्ञस्य दुःखानुस्मृतिपूर्वो दुःखे तत्साधने वा यः प्रतिघो मन्युर्जिघांसा क्रोधः स द्वेषः ॥ ८ ॥**

**भाष्यार्थः**—कांहीं दुःखाचा अनुभव घेतलेल्या पुरुषास त्या दुःखाचें पूर्वीं स्मरण होऊन दुःखाविषयीं अथवा दुःखसाधनाविषयीं जो प्रतिघ ह्मणजे प्रतिकार, क्रोध किंवा उद्विग्नता त्यास द्वेष ह्मणतात ॥ ८ ॥

आतां अभिनिवेशाचें लक्षण सांगतात,—

## स्वरसवाही विदुषोऽपि तथा रूढोऽभिनिवेशः ॥ ९ ॥

**सूत्रार्थः**—अत्यंत सूक्ष्म जिवापासून तें ब्रह्मापर्यंत सर्व प्राण्यांला स्वभावतः मरणापासून जें भय वाटत असतें त्यास अभिनिवेश ह्मणतात.

**भाष्यम्—सर्वस्य प्राणिन इयमात्माशीर्नित्या भवति, 'मानभूवं भूयासम्' इति। न चाऽननुभूतमरणधर्मकस्यैषा भवत्यात्माशीः । एतया च पूर्वजन्मानुभवः प्रतीयते। स चायमभिनिवेशः क्लेशः स्वरसवाही क्रमेरपि जातमात्रस्य प्रत्यक्षानुमानागमैरसंभावितो मरणत्रास उच्छेददृष्ट्यात्मकः पूर्वजन्मानुभूतं मरणदुःखमनुमापयति । यथा चायमत्यन्तमूढेषु दृश्यते क्लेशस्तथा विदुषोऽपि विज्ञातपूर्वापरान्तस्य रूढः । कस्मात्, समाना हि तयोः कुशलाकुशलयोर्मरणदुःखानुभवादियं वासनेति ॥ ९ ॥**

**भाष्यार्थः**—विद्वान् असो, किंवा मूर्ख असो; सर्वप्रकारच्या प्राण्यांची अशी नेहमीं आशीः ह्मणजे प्रार्थना ( एका प्रकारची इच्छा ) असते कीं, 'मी नसावें असें नाहीं तर मी असावें ह्मणजे नित्य जीवंत असावें.' आतां अशा प्रकारची इच्छा, ज्यानें कधीं मरणधर्माचा ( मरणाचा ) अनुभव घेतला नाहीं; त्यास कधीं होणार नाहीं. या अशा प्रकारच्या इच्छेवरून पूर्वजन्मांतील मरणदुःखाचा अनुभव त्याच्या कारणावरून अनुमित होतो. पूर्वीं सांगितलेली प्रार्थना ही अभिनिवेशनांवाचा क्लेश होय. तो अभिनिवेशनामक क्लेशच स्वरसवाही ह्मणजे स्वाभाविक ( स्वभावतःच ) वासनारूपप्रवाहानें वाहणारा, मरणदुःखाचें प्रत्यक्ष, तत्संबंधी अनुमान व शास्त्रइत्यादिकांनीं असंभावित ( कधीं कल्पनेंत न येणारा ), अत्यंत मूढ अशा कृमि ह्मणजे क्षुद्रप्राण्यालाही मरणत्रास ( मरणदुःख ), उच्छेददृष्टीचा कार्यभूत असा पूर्वजन्मीं अनुभविलेल्या मरणदुःखाचें अनुमान करवितो. जसा हा मरणत्रास अत्यंत मूढप्राण्याच्या ठिकाणीं दिसतो; तसा, विज्ञात ह्मणजे संप्रज्ञातयोगानें साक्षात् केला आहे प्रपंचाचा आदि व अंत ज्यानें अशा अर्थात् तत्त्वज्ञासही वर्तमान असतो. कशावरून तर, विद्वान् व अविद्वान् या दोहोंसही मरणदुःखाचा अनुभव असतो; त्यामुळें खरोखर ही वासना ( संस्कार ) दोघांचीही समान आहे ॥ ९ ॥

आतां पूर्वीं क्रियायोग क्लेशतनूकरणार्थ ( क्लेशनाशाकरितां ) ह्मणून सांगितला; त्यांत क्लेश तनू करणाऱ्याचें फळ सांगतात,—

## ते प्रतिप्रसवहेयाः सूक्ष्माः ॥ १० ॥

**सूत्रार्थः**—ते क्लेश साधनानें सूक्ष्म झाल्यावर चित्ताच्या लयानें त्याग करण्याला योग्य आहेत.

**भाष्यम्—ते पञ्च क्लेशा दग्धबीजकल्पा योगिनश्चरिताधिकारे चेतसि प्रलीने सह तेन वाऽस्तङ्गच्छन्ति ॥ 'स्थितानान्तु बीजभावोपगतानाम्' ॥ १० ॥**

**भाष्यार्थः**—अंकुरोत्पत्तीविषयीं असमर्थ अशा जळालेल्या बीजाप्रमाणें ते अविद्यादि पांच क्लेश, योग्याचें समाप्त आहे अधिकार ज्याचा असें अंतःकरण प्रलीन झालें असतां त्यासह अस्तास जातात ह्मणजे नष्ट होतात ॥ १० ॥

आतां स्थित ह्मणजे बीजभावास प्राप्त झालेले जे स्थूल क्लेश त्यांचा त्यागोपाय सांगतात,—

## ध्यानहेयास्तद्वृत्तयः ॥ ११ ॥

**सूत्रार्थः**—क्लेशांच्या स्थूल वृत्ती त्या ध्यानानें त्याग करण्याला योग्य आहेत.

**भाष्यम्—क्लेशानां या वृत्तयः स्थूलास्ताः क्रियायोगेन तनूकृताः सत्यः प्रसंख्यानेन ध्यानेन हातव्याः, यावत् सूक्ष्मीकृता यावद्दग्धबीजकल्पा इति । यथा च वस्त्राणां स्थूलो मलः पूर्वं निर्धूयते, पश्चात् सूक्ष्मो यत्नेनोपायेन चाऽपनीयते तथा स्वल्पप्रतिपक्षाः स्थूला वृत्तयः क्लेशानाम् । सूक्ष्मास्तु महाप्रतिपक्षा इति ॥ ११ ॥**

**भाष्यार्थः**—बीजभावास प्राप्त झालेल्या क्लेशांच्या ज्या स्थूल ह्म० अभिव्यक्त आहे अवस्था ज्यांची अशा वृत्ती, त्या प्रथम पूर्वीं सांगितलेल्या क्रियायोगानें अल्प केल्या असतां पुढें समाधींतील प्रज्ञारूपध्यानेंकरून त्यक्त कराव्या; त्या सूक्ष्मीकृत ह्मणजे दग्धबीजाप्रमाणें होईपर्यंत. जसा वस्त्रांचा मोठा मल पूर्वीं वाऱ्यानें झटकून टाकतात; आणि नंतर सूक्ष्म मल दगडावर आपटणें वगैरे प्रयत्नानें व रिठे, साबण वगैरे साधनानें दूर करितात; त्याप्रमाणें क्लेशांच्या स्थूल वृत्ती, स्वल्प ह्मणजे क्रियायोगानें तनू होतात; परंतु सूक्ष्म वृत्ती दूर करण्यास, अतिदुष्कर असा प्रसंख्यानरूप अग्नि व असंप्रज्ञातयोगानें साध्य होणारा असा चित्तनाश हीं साधनें लागतात ॥ ११ ॥

आतां क्लेशांचें निरूपण करून तन्मूलच कर्माशय, हें सांगतात,—

## क्लेशमूलः कर्माशयो दृष्टादृष्टजन्मवेदनीयः ॥ १२ ॥

**सूत्रार्थः**—कर्माशयाला कारण क्लेश आहेत. त्या कर्माशयाचे दोन प्रकार आहेत, एक दृष्टजन्मवेदनीय व दुसरा अदृष्टजन्मवेदनीय.

भाष्यम्–तत्र पुण्यापुण्यकर्माशयः कामलोभमोहक्रोधप्रसवः स दृष्टजन्मवेदनीयश्चादृष्टजन्मवेदनीयश्च। तत्र तीव्रसंवेगेन मन्त्रतपःसमाधिभिर्निर्वर्तित ईश्वरदेवतामहर्षिमहानुभावानामाराधनाद्वा यः परिनिष्पन्नः स सद्यः परिपच्यते पुण्यकर्माशय इति। तथा तीव्रक्लेशेन भीतव्याधितकृपणेषु विश्वासोपगतेषु वा महानुभावेषु वा तपस्विषु कृतः पुनःपुनरपकारः स चापि पापकर्म्माशयः सद्य एव परिपच्यते। यथा नन्दीश्वरः कुमारो मनुष्यपरिणामं हित्वा देवत्वेन परिणतः। तथा नहुषोऽपि देवानामिन्द्रः स्वकं परिणामं हित्वा तिर्यक्त्वेन परिणत इति। तत्र नारकाणां नास्ति दृष्टजन्मवेदनीयः कर्माशयः। क्षीणक्लेशानामपि नास्त्यदृष्टजन्मवेदनीयः कर्माशय इति ॥ १२ ॥

भाष्यार्थः–त्या चित्तांत धर्माधर्मरूप कर्माशय हा काम, लोभ, मोह व क्रोध हे क्लेश आहेत मूल कारण ज्यास असा दोन प्रकारचा आहे. एक तर ह्या जन्मांतच वेदनीय ह्मणजे भोग्य (भोगला जाणारा;) व दुसरा अन्यजन्मांत भोग्य. त्यांत दृष्टजन्मभोग्याचें उदाहरण,– जसा, तीव्रसंवेगानें व मंत्र, तप व समाधि या साधनांनीं आचरित किंवा ईश्वरादिकांच्या सेवेनें संपादित केलेला पुण्यकर्माशय तो तत्काल परिपक्व होतो, तसाच, तीव्रक्लेशानें भ्यालेला, व्याधिग्रस्त व दीन यांविषयीं किंवा विश्वास पावलेल्याविषयीं अथवा तपस्वी, साधु यांविषयीं वारंवार केलेला अपराध तो पापकर्माशय, तोही या जन्मींच परिपक्व होतो. यांस दृष्टांत, नंदीश्वर हा बाल्यअवस्थेंत व मनुष्यदेहांतच मनुष्यदेहकारण टाकून देवत्व पावला. तसाच नहुषराजाही देवांचा स्वामी झाला असतांही आपल्या देवशरीरकारणाचा त्याग करून तिर्यक्त्व (अजगरत्व) पावला. आतां जे कुंभीपाकादिनरकांत पचणारे त्यास दृष्टजन्मभोग्य कर्माशय नाहीं; (कारण, धर्म किंवा अधर्म यांची उत्पत्तीच नाहीं.) व तसाच; ज्यांचे क्लेश क्षीण झाले आहेत; त्यांसही पुढील जन्मांत कर्माशय भोग्य नाहीं ॥ १२ ॥

आतां, केवल कर्माशयांविषयींच क्लेश कारण आहे असें नाहीं; तर त्यांच्या फलाविषयींही कारण आहे. याकरितां तीं फलें दुःखोत्पत्तीविषयीं क्लेशांना साक्षात् परंपरेनें द्वारें आहेत असें सांगतात,–

## सति मूले तद्विपाको जात्यायुर्भोगः ॥ १३ ॥

सूत्रार्थः–क्लेशरूप मूळ राहिलें असतां कर्माचें फळ जाति, आयुष्य आणि भोग हीं होतात.

भाष्यम्–सत्सु क्लेशेषु कर्माशयो विपाकारम्भी भवति नोच्छिन्नक्लेशमूलः। यथा तुषावनद्धाः शालितण्डुला अदग्धबीजभावाः प्ररोहसमर्था भवन्ति नापनीततुषा द-

ग्धबीजभावा वा । तथा क्लेशावनद्धः कर्माशयो विपाकप्ररोही भवति नापनीतक्लेशो न प्रसंख्यानदग्धक्लेशबीजभावो वेति । स च विपाकस्त्रिविधो जातिरायुर्भोग इति । तत्रेदं विचार्य्यते, किमेकं कर्म एकस्य जन्मनः कारणमथैकं कर्माऽनेकं जन्माऽऽक्षिपतीति । द्वितीया विचारणा, किमनेकं कर्म अनेकं जन्म निर्वर्तयति, अथानेकं कमैकं जन्म निर्वर्तयतीति । न तावदेकं कर्मैकस्य जन्मनः कारणम् । कस्मात्, अनादिकालप्रचितस्याऽसंख्येयस्याऽवशिष्टकर्मणः सांप्रतिकस्य च फलक्रमानियमादनाश्वासो लोकस्य प्रसक्तः स चानिष्ट इति । नचैकं कर्माऽनेकस्य जन्मनः कारणम् । कस्मात्, अनेकेषु कर्मसु एकैकमेव कर्माऽनेकस्य जन्मनः कारणमित्यवशिष्टस्य विपाककालाभावः प्रसक्तः स चाप्यनिष्ट इति । न चानेकं कर्माऽनेकस्य जन्मनः कारणं, कस्मात्तदनेकं जन्म युगपन्न संभवतीति क्रमेण वाच्यम् । तथा च पूर्वदोषानुषङ्गः।तस्माज्जन्मप्रायणान्तरे कृतः पुण्यापुण्यकर्माशयप्रचयो विचित्रः प्रधानोपसर्ज्जनभावेनावस्थितः प्रायणाभिव्यक्त एकप्रघट्टकेन मिलित्वा न मरणं प्रसाध्य संमूर्च्छित एकमेव जन्म करोति । तच्च जन्म तेनैव कर्मणा लब्धायुष्कं भवति । तस्मिन्नायुषि तेनैव कर्मणा भोगः संपद्यत इति । असौ कर्माशयो जन्मायुर्भोगहेतुत्वात्त्रिविपाकोऽभिधीयत इति । अत एकभविकः कर्माशय उक्त इति । दृष्टजन्मवेदनीयस्त्वेकविपाकारम्भी भोगहेतुत्वाद्द्विविपाकारम्भी वाऽऽयुर्भोगहेतुत्वात् । नन्दीश्वरवन्नहुषवद्वेति । क्लेशकर्मविपाकानुभवनिर्मिताभिस्तु वासनाभिरनादिकालसंमूर्च्छितमिदं चित्तं चित्रीकृतमिव सर्वतो मत्स्यजालं ग्रन्थिभिरिवाततमित्येता अनेकभवपूर्विका वासनाः । यस्त्वयं कर्माशय एष एवैकभविक उक्त इति । ये संस्काराः स्मृतिहेतवस्ता वासनास्ताश्चानादिकालीना इति । यस्त्वसावेकभविकः कर्माशयः स नियतविपाकश्चानियतविपाकश्च । तत्रादृष्टजन्मवेदनीयस्य नियतविपाकस्यैवायं नियमो न त्वदृष्टजन्मवेदनीयस्यानियतविपाकस्य । कस्मात् । यो ह्यदृष्टजन्मवेदनीयोऽनियतविपाकस्तस्य त्रयी गतिः कृतस्याऽविपाकस्य नाशः प्रधानकर्मण्यावापगमनं वा नियतविपाकप्रधानकर्मणाऽभिभूतस्य वा चिरमवस्थानमिति । तत्र कृतस्याविपक्वस्य नाशो यथा, शुक्लकर्मोदयादिहैव नाशः कृष्णस्य । यत्रेदमुक्तम् । 'द्वे द्वे ह वै कर्मणी वेदितव्ये पापकस्यैको राशिः पुण्यकृतोऽपहन्ति तदिच्छस्व कर्माणि सुकृतानि कर्तुमिहैव ते कर्म कवयो वेदयन्ते ।' प्रधानकर्मण्यावापगमनं यत्रेदमुक्तम् । स्यात्स्वल्पः सङ्करः सपरिहारः सप्रत्यवमर्शः कुशलस्य नाऽपकर्षायाऽलम् । कस्मात् । कुशलं हि मे बह्वन्यदस्ति यत्रायमावापगतः स्वर्गेऽप्यपकर्षमल्पं करिष्यतीति । नियतविपाकप्रधानकर्मणाऽभिभूतस्य वा चिरमवस्था-

नम् । कथम् । अदृष्टजन्मवेदनीयस्यैव नियतविपाकस्य कर्मणः समानं मरणमभिव्यक्तिकारणमुक्तम् । न त्वदृष्टजन्मवेदनीयस्यानियतविपाकस्य । यत्त्वदृष्टजन्मवेदनीयं कर्माऽनियतविपाकं तन्नश्येदावापं वा गच्छेत् । अभिभूतं वा चिरमप्युपासीत यावत्समानं कर्माभिव्यञ्जकं निमित्तमस्य न विपाकाभिमुखं करोतीति । तद्विपाकस्यैव देशकालनिमित्तानवधारणादियं कर्मगतिश्चित्रा दुर्विज्ञाना चेति । नचोत्सर्गस्याऽपवादान्निवृत्तिरित्येकभविकः कर्माशयोऽनुज्ञायत इति ॥ १३ ॥

**भाष्यार्थः**—अविद्यादि क्लेश असले तर धर्माधर्मरूप कर्माशयाच्या परिणामास आरंभ होतो; व त्याचें मूल जे क्लेश ते ज्ञानाग्नीनें सर्वथा दग्ध झाले असतां होत नाहीं. जसें, साल न काढलेले किंवा न जळालेले साळीचे तांदूळ अंकुर उत्पन्न होण्यास समर्थ होतात ( त्यास अंकुर उत्पन्न होतात;) व तेच वरील साल काढल्यानंतर किंवा बीजभाव दग्ध झाला असतां अंकुरोत्पत्तीस समर्थ होत नाहींत. त्याप्रमाणें क्लेशयुक्त कर्माशयास विपाकरूप अंकुर येतात; व सर्वथा क्लेशरहित किंवा योगाग्नीनें क्लेशांचा बीजभाव जळून गेला असतां येत नाहीत. आतां तो विपाक ( कर्माशयाचें फल ) जन्म, आयुष्य व भोग असा तीन प्रकारचा आहे. त्यांत असें विचारणें आहे कीं, काय, एक कर्म एकाच जन्मास निमित्त? अथवा एक कर्म अनेक जन्मांस फलदानाकरितां उत्पन्न करितें? (ही एक विचारणा.) आतां दुसरी विचारणा ( संशय ) अशी कीं, काय, अनेक कर्मे अनेकजन्मांस उत्पन्न करितात? किंवा अनेक कर्मे एक जन्म करितात? (असे चार संशय.) त्यांत एक कर्म एका जन्मास कारण तर ह्मणतां येत नाहीं; कारण, अनादिकालापासून प्रत्येक जन्मांत सांठवत गेलेलें ह्मणून भोगल्यावांचूनच अपरिमित शेष ( शिलक ) राहिलेलें कर्म व सांप्रतचें कर्म, यांच्या फलक्रमाचा (अनंतकर्मामध्यें अमुककर्माचें फल प्रथम किंवा अमुकाचें अनंतर याप्रमाणें) नियम नसल्यामुळें लोकांना पुण्यानुष्ठानाच्या फलाबद्दल अविश्वास प्राप्त झाला; व तो तर इष्ट नाहीं. दुसरें, एक कर्म अनेकजन्मांला कारण, हेंही ह्मणतां येत नाहीं; कारण, अनेककर्मामध्यें एकएकच कर्म अनेकजन्मांला कारण होणार; तेव्हां अवशिष्टकर्मांच्या जन्मरूपविपाकास काल मुळींच मिळणार नाहीं असें होणार; हेंही इष्ट नाहीं. तिसरें, अनेक कर्मे एका जन्माला कारण असें ह्मणतां येत नाहीं; कारण, तें अनेक जन्म एककालीं संभवत नाहीं[1]; यामुळें क्रमानेंच ह्मटला पाहिजे. तेव्हां प्रथमपक्षांतील अनाश्वास (अविश्वास) प्रसंग आला ! त्याकरितां सिद्धांत हा कीं, जन्मापासून मरणापर्यंत मध्यें केलेला अनेक प्रकारचा पुण्यापुण्यरूप कर्माशयसमूह

---

**सूत्र १३ टीप**–१ एककाळी अनेक जन्म संभवत नाही, हे अयोग्याविषयी; योगी तर, प्रारब्धकर्माचा क्षय होण्याकरितां एककाली अनेक देह धारण करून भोगाने कर्मक्षय करितात.(अयोग्याविषयीच,)जर एकवेळीं हजार कर्मे हजार जन्म करितील; तर त्यानतर हजार कर्मे क्षय होऊन शेष राहिलेल्या कर्माचा विपाककाल व फलक्रमानियम होईल. परंतु जन्म एकवेळी मुळीच नाही. वाच०.

गौणप्रधानभावास प्राप्त होऊन व मरणकालीं आरब्धकर्माच्या भोगसमाप्तीनें अवकाश सांपडून एककालीं व एकप्रयत्नानें स्वफलदानाकरितां मरण प्राप्त झाल्यानंतर अतिवेगानें एकच जन्म करितो. तेंच जन्म त्याच कर्मानें लब्धायु (प्राप्त आहे आयुष्य ज्यास असें) होतें. व त्या आयुष्यांत त्याच कर्मानें भोग मिळतो. याप्रमाणें हा कर्माशय जन्म, आयुष्य व भोग ह्यांस हेतु असल्यामुळें ह्यांस त्रिविपाक ( तीन आहेत फलें ज्याचीं असा ) ह्मणतात. ह्मणून पूर्व आचार्यांनीं एकभविक ह्मणजे एक आहे भव ( जन्म ) ज्यांत असा कर्माशय सांगितला. आतां एकजन्मांतच फलद होणारा कर्माशय केवल भोगहेतूमुळें एकविपाकारंभी अथवा आयुष्य व भोग या हेतूंनीं द्विविपाकारंभी होतो. यास दृष्टांत; जसें, नहुषराजाला दीर्घायुष्यत्व इंद्रत्वसंपादक (इंद्रपद प्राप्त करवून देणाऱ्या) कर्मानेंच मिळालें, ह्मणून ब्राह्मणछलरूपपापानें केवल सर्पभोगरूप एकच विपाक उत्पन्न झाला. व नंदीश्वरास आठवर्षांच्या आयुष्यांतच तीव्रसंवेगाधिमात्र उपायानें देवांस असणारें आयुष्य व भोग हे दोन विपाक उत्पन्न झाले. क्लेश व कर्म यांच्या विपाकाच्या चित्तवृत्तिसमूहरूप अनुभवानें उत्पन्न केलेल्या ज्ञानरूपवासनांनीं अनादिकालाच्या ठिकाणीं वृद्ध ( पुष्ट ) झालेलें, व अनेक प्रकारच्या वासनांनीं पटाप्रमाणें सर्वबाजूंनीं चित्रित झालेलें चित्त, अनेक गांठी देऊन मोठ्या तयार केलेल्या माशाच्या जाळ्याप्रमाणें असतें; याकरितां ह्या वासना अनेकभवपूर्विक (अनेक जन्म आहे पूर्वीं ज्यांना अशा) आहेत. आणि जो हा धर्माधर्मरूप कर्माशय तो एकभविक (एक आहे भव ह्मणजे जन्म ज्यास असा) सांगितला. स्मरणास कारणभूत जे संस्कार त्याच वासना, व त्या अनादिकालापासून उत्पन्न होऊन परंपरेनें प्राप्त झाल्या आहेत. आतां जो हा एकभविक कर्माशय तो नियतविपाक ह्मणजे कांहींएक विघ्नावांचून नियमानें होणारा आहे विपाक ज्याचा तो, व त्याहून विपरीत तो अनियतविपाक, असा दोन प्रकारचा आहे. त्यांत अदृष्टजन्मवेदनीय व नियतविपाक अशा कर्माशयाचाच एकभविक हा नियम; अदृष्टजन्मवेदनीय व अनियतविपाकाचा नाहीं. कारण, जो अदृष्टजन्मवेदनीय नियतविपाक, त्याच्या तीन गति (प्रकार) आहेत. त्या अशा, केलेल्या कर्माशयाचा अविपक्व (फलांवांचूनच) नाश होणें, ही एक; दुसरी, प्रधानकर्में जीं यागादि, त्यांमध्यें ह्मणजे त्यांबरोबरेंच अंगभूत जीं पशुहिंसादि कर्में यांची अविरुद्ध फलप्राप्ति;

---

**सूत्र १३ टीप**–२ जें अतिशय फलोत्कट होऊन त्वरितच फल देईल; तें प्रधान. आणि जें कांहीं अवकाशानें देईल तें उपसर्जन ह्मणजे गौण. वाच०. ३ त्यांत नंदीश्वर व नहुष या दोहोंचा मनुष्यशरीरानेंच वार्द्धक्यादिअवस्थे प्रमाणें देवरूप व सर्परूप परिणाम झाला. ह्मणून दुसरा जन्म नव्हे; कारण, अपूर्व देह उत्पन्न झाला नाहीं. विज्ञा०. ४ नाहीं तर, मनुष्ययोनीनंतर देव अथवा पशुपक्ष्यादिकांच्या योनिभोगाची उपपत्ति होणार नाहीं; व मनुष्यजन्मांत तर त्या वासनांची अनुपपत्ति. याप्रमाणें भववासनांचाही मनुष्यजन्मानेंच क्षय असा अर्थ. वि० भि०. ५ जसें, धान्यबीजांबरोबर उत्पन्न झालेल्या तृणबीजांची, त्या धान्याबरोबरच संग्रहांत स्थापना झाल्यामुळें पुन धान्यबीजांबरोबरच पेरणी होते; स्वतंत्र करावी लागत नाहीं. त्याप्रमाणें, दुसऱ्या प्रधानकर्माबरोबर अंगभावानें अनुष्ठित कर्माचें फलदान बरोबरच समजावें. विज्ञा०.

तिसरी, नियतविपाक जें प्रधान कर्म हें स्वविरुद्ध फल देणारें असलें तर त्यानें स्वफलदानाविषयीं पराभूत होऊन कांहीं जन्मपर्यंत अत्यंत गाढ निद्रिस्ताप्रमाणें राहणें. त्यांतील पहिली गति जी कृतकर्मांचा फलांवांचून नाश; तो असा,—शुक्ल कर्म ह्मणजे धर्म, त्याच्या उदयानें ह्यात्र लोकांत कृष्ण ह्मणजे अधर्म याचा नाश होतो. याविषयीं श्रुतींत सांगितलें आहे,— "पुण्यरूप व पापरूप अशीं दोन कर्मे सर्वपुरुषांनीं अवश्य जाणावीत; कारण, पुण्यनिर्मित मुख्य राशि पापराशीचा नाश करितो; त्याकरितां पुण्यकर्मे करण्याविषयींच अवश्य इच्छा कर. तीं कर्मे तुला ह्याच लोकीं आहेत; अन्यलोकीं नाहींत; असें विद्वान् प्रतिपादन करितात." याप्रमाणें. आतां ज्याविषयीं पंचशिखाचार्यानें सांगितलें, तें हें पुढें सांगावयाचेंच प्रधानकर्मांत आवापगमन जाणावें. तें असें, 'हिंसादिकर्मांपासून उत्पन्न झालेल्या पातकाशीं यज्ञादिकर्मांपासून उत्पन्न झालेल्या अपूर्वाचा (पुण्याचा) थोडाच मिश्रीभाव होणार; व तोही थोड्याच प्रायश्चित्तानें परिहार (दूर) करण्यास शक्य आहे. जरी कदाचित् प्रमादेंकरून प्रायश्चित्त केलें नाहीं; तथापि तो 'सप्रत्यवमर्श' ह्मणजे सहन करण्याजोगा आहे. याकरितां तो अल्प संकर कोणत्याही प्रकारानें कुशलकर्मांचा नाश करण्यास समर्थ नाहीं. कारण, तो पुण्यवान् असें सांगतो कीं, 'माझें पुण्य पुष्कळ आहे; व ज्या ठिकाणीं हा थोडासा पापाचा संकर पुण्याबरोबर झाला आहे; तो स्वर्गांतही कुशलह्रानि अति थोडीच करील.' आतां तिसऱ्या गतींत प्राधान्य ह्मणजे बलवत्त्व घ्यावयाचें, अंगित्व नाहीं. तें बलवत्त्व असें, नियमित विपाकत्व असल्यामुळें इतरास फलदानास अवकाश न मिळाल्यामुळें नियतविपाक कर्म तें प्रधान (बलीय), व अनियतविपाक अप्रधान (दुर्बल). अशा प्रधानकर्मानें पराभूत झालेल्या अप्रधान कर्मांची केवल बीजभावानें चिरकाल विपाकावांचूनच स्थिति असणें. येथें शंका अशी येते कीं, पूर्वीं प्रायणानें ह्मणजे मरणानेंच कर्माशय विशेष अभिव्यक्त होतो असें सांगितलें व आतां चिरकाल अवस्थित असतो, असें पूर्वापरविरुद्ध कसें? याचें उत्तर असें कीं, पूर्वीं मरण अभिव्यक्तीस कारण ह्मणून जें सांगितलें, तें अदृष्टजन्मवेदनीय नियतविपाककर्मासच, अनियतविपाककर्मास नाहीं; एवंच परस्पर विरोध नाहीं. आतां जें अदृष्टजन्मवेदनीय अनियतविपाककर्म असतें तें क्वचित् विपाकावांचून नाश पावतें; कोठें कोठें प्रधानकर्माबरोबर तृणबीजांप्रमाणें अविरुद्ध फल देणारें होतें; व कदाचित् इष्ट फल देण्याकरितां, जोंपर्यंत आपणास अनुकूल असें व कर्माची अभिव्यक्ति करणारें निमित्त फलोन्मुख करीत नाहीं; तोंपर्यंत प्रतीक्षा करीत (वाट पहात) राहील. त्या प्रधानकर्मानें अभिभूत झालेल्या विपाकाचीच कर्मगति, कोणत्या देशांत, कोणत्या वेळीं व कोणत्या निमित्तानें होणार; असा निश्चय करण्यास अशक्य

---

सू० १३ टी०–६ याप्रमाणें दृष्टही आहे; तें असें, अतिशय पुण्यानें प्राप्त झालेल्या सुखरूप अमृताच्या डोहांत बुड्या मारणारा पुण्यवान् पुरुष यत्किंचित् पापलेशानें उपपादित जो दुःखरूप अग्निकण त्यास सहज सहन करितो. वाच०. ७ ज्योतिष्टोमादियागांत. ८ प्रधानकर्मफलाबरोबरच उपकारिपणानें, फलदातृत्वानें नाहीं; कारण या पक्षांत प्रधानशब्द अंगित्वेंकरून ग्रहण केलेला नाहीं.

असल्यामुळें ही अभिभूत कर्मगति चित्रा ह्मणजे अद्भुतरूप व जाणण्यास अत्यंत कठिन आहे. आतां क्वचित् अपवाद असला तरी उत्सर्गाची सर्वत्र हानि होते असें नाहीं. त्याकरितां कर्माशयाचें एकभविकत्व स्वाभाविकच आहे असें आह्मी मानितों ॥ १३ ॥

आतां सांगितलेलें कर्म व कर्मविपाक यांनीं होणाऱ्या क्लेशांचें मुख्य फल सांगतात,–

## ते ह्लादपरितापफलाः पुण्यापुण्यहेतुत्वात् ॥ १४ ॥

**सूत्रार्थः**–ते जाति, आयुष्य आणि भोग जर पुण्यापासून झाले तर सुख उत्पन्न करितात, आणि पापापासून झाले असले तर दुःख उत्पन्न करितात.

**भाष्यम्–ते जन्मायुर्भोगाः पुण्यहेतुकाः सुखफलाः, अपुण्यहेतुका दुःखफला इति॥ 'यथा चेदं दुःखं प्रतिकूलात्मकमेवं विषयसुखकालेऽपि दुःखमस्त्येव प्रतिकूलात्मकं योगिनः। कथं तदुपपाद्यते'॥ १४॥**

**भाष्यार्थः**–ते जन्म, आयुष्य व भोग पुण्यकर्मानें झाले असतां त्यापासून सुखरूप फल मिळतें; व पापकर्मानें झाले असल्यास दुःखरूप फल देतात॥ १४ ॥

आतां अशी शंका येते कीं, जसें हें दिसणारें रोगादि दुःख सर्वप्राण्यांस प्रतिकूल असल्यामुळें नकोसें वाटतें; याप्रमाणें सर्वठिकाणीं विषयसुखकालींही योग्यांस दुःख वाटतेंच हें कसें? तें सांगतात,–

## परिणामतापसंस्कारदुःखैर्गुणवृत्तिविरोधाच्च दुःखमेव सर्वं विवेकिनः ॥ १५ ॥

**सूत्रार्थः**–परिणाम, ताप व संस्कार या दुःखानें व परस्पर अत्यंत विरुद्ध अशा ज्या सुखदुःखमोहरूप गुणांच्या वृत्ती त्यांनीं विवेकी पुरुषाला सर्वच दुःख ह्मणजे प्रतिकूल वाटतें.

**भाष्यम्–सर्वस्यायं रागानुविद्धश्चेतनाचेतनसाधनाधीनः सुखाऽनुभव इति तत्राऽस्ति रागजः कर्माशयः। तथा च द्वेष्टि दुःखसाधनानि मुह्यति चेति द्वेषमोहकृतोऽप्यस्ति। तथा चोक्तम्। नानुपहत्य भूतान्युपभोगः सम्भवतीति हिंसाकृतोऽप्यस्ति शारीरः कर्माशय इति। विषयसुखं चाविद्येत्युक्तम्। या भोगेष्विन्द्रियाणां तृप्तेरुपशान्तिस्तत्सुखम्। या लौल्यादनुपशान्तिस्तद्दुःखम्। न चेन्द्रियाणां भोगाभ्यासेन वैतृष्ण्यं कर्तुं शक्यम्। कस्मात्। यतो भोगाभ्यासमनु विवर्द्धन्ते रागाः कौशलानि चेन्द्रियाणामिति। तस्मादनुपायः सुखस्य भोगाभ्यास इति। स खल्वयं वृश्चिकविषभीत इवाशीविषेण दष्टो यः सुखार्थी विषयाननुवासितो महति दुःखपङ्के मग्न इति। एषा परिणामदुःखता नाम प्रतिकूला सुखावस्थायामपि योगिनमेव क्लिश्नाति। अथ का तापदुःखता। सर्वस्य द्वेषानुविद्धश्चेतनाचेतनसाधनाधीनस्तापानुभव इति**

तत्रास्ति द्वेषजः कर्माशयः । सुखसाधनानि च प्रार्थयमानः कायेन वाचा मनसा च परिस्पन्दते ततः परमनुगृह्णात्युपहन्ति चेति परानुग्रहपीडाभ्यां धर्माधर्मावुपचिनोति । स कर्माशयो लोभान्मोहाच्च भवतीत्येषा तापदुःखतोच्यते । का पुनः संस्कारदुःखता । सुखानुभवात्सुखसंस्कारातिशयो दुःखानुभवादपि दुःखसंस्कारातिशय इति । एवं कर्मभ्यो विपाकेऽनुभूयमाने सुखे दुःखे वा पुनः कर्माशयप्रचय इति । एवमिदमनादिदुःखस्रोतो विप्रसृतं योगिनमेव प्रतिकूलात्मकत्वादुद्वेजयति । कस्मात् । अक्षिपात्रकल्पो हि विद्वानिति । यथोर्णातन्तुरक्षिपात्रे न्यस्तः स्पर्शेन दुःखयति तान्येषु गात्रावयवेषु एवमेतानि दुःखान्यक्षिपात्रकल्पं योगिनमेव क्लिश्नन्ति नेतरं प्रतिपत्तारम् । इतरं तु स्वकर्मोपहृतं दुःखमुपात्तमुपात्तं त्यजन्तं त्यक्तं त्यक्तमुपाददानमनादिवासनाविचित्रया चित्तवृत्त्या समन्ततोऽनुविद्धमिवाविद्यया हातव्य एवाहङ्कारममकारानुपातिनं जातं जातं बाह्याध्यात्मिकोभयनिमित्तास्त्रिपर्वाणस्तापा अनुप्लवन्ते तदेवमनादिदुःखस्रोतसा व्यूह्यमानमात्मानं भूतग्रामं दृष्ट्वा योगी सर्वदुःखक्षयकारणं सम्यग्दर्शनं शरणं प्रपद्यत इति गुणवृत्तिविरोधाच्च दुःखमेव सर्वं विवेकिनः । प्रख्याप्रवृत्तिस्थितिरूपा बुद्धिगुणाः परस्परानुग्रहतन्त्रीभूत्वा शान्तं घोरं मूढं वा प्रत्ययं त्रिगुणमेवारभन्ते चलञ्च गुणवृत्तमिति क्षिप्रपरिणामि चित्तमुक्तम् । रूपातिशया वृत्त्यातिशयाश्च परस्परेण विरुध्यन्ते । सामान्यानि त्वतिशयैः सह प्रवर्तन्ते । एवमेते गुणा इतरेतराश्रयेणोपार्जितसुखदुःखमोहप्रत्यया इति सर्वे सर्वरूपा भवन्ति । गुणप्रधानभावकृतस्त्वेषां विशेष इति । तस्माद्दुःखमेव सर्वं विवेकिन इति । तदस्य महतो दुःखसमुदायस्य प्रभवबीजमविद्या, तस्याश्च सम्यग्दर्शनमभावहेतुः । यथा चिकित्साशास्त्रं चतुर्व्यूहं रोगो रोगहेतुरारोग्यं भैषज्यमित्येवमिदमपि शास्त्रं चतुर्व्यूहमेव । तद्यथा, संसारः संसारहेतुर्मोक्षो मोक्षोपाय इति । तत्र दुःखबहुलः संसारो हेयः । प्रधानपुरुषयोः संयोगो हेयहेतुः । संयोगस्याऽऽत्यन्तिकी निवृत्तिर्हानम् । हानोपायः सम्यग्दर्शनम् । तत्र हातुः स्वरूपमुपादेयं हेयं वा न भवितुमर्हति । हाने तस्योच्छेदवादप्रसङ्गः । उपादाने च हेतुवादः । उभयप्रत्याख्याने शाश्वतवाद इत्येतत्सम्यग्दर्शनम् ॥ 'तदेतच्छास्त्रं चतुर्व्यूहमित्यभिधीयते' ॥ १५ ॥

**भाष्यार्थः**—सर्वप्राणिमात्रांस खरोखर प्रथम कोणत्याही पदार्थावर प्रीति असल्यावांचून त्यापासून सुख होत नाहीं; व सुखापासून कोणाचा संतोष होत नाहीं; असें नाहीं. तेव्हां त्या सुखानुभवाच्या वेळीं त्या सुखाविषयीं प्रथम इच्छा उत्पन्न होते. रागापासून ( इच्छेपासून ) 'हें सुखं मला निरंतर असो, कधींही नाश न पावो;' इत्यादि संकल्पात्मक

मानस कर्माशय ( धर्माधर्मरूप ) होतो. पुढें कर्माशयापासून जन्मादि दुःखें; हें पूर्वी सांगितलेंच आहे. तसाच त्या वेळेस सुखाचा अनुभव घेणारा, दुःखसाधनांचा, प्रतिकूल असल्यामुळें द्वेष करितो; व दुःखाचा परिहार न झाल्यामुळें मोह पावतो. यावरून रागापासून उत्पन्न होणाऱ्या कर्माशयाप्रमाणें द्वेष व मोह यांपासून उत्पन्न होणारा कर्माशयही त्या वेळेस असतोच. याप्रमाणें ह्मणजे सुख रागानुबद्ध आहे असें 'सुखानुशयी रागः' या सूत्रावर आह्मीं सांगितलें. याप्रमाणें मानससंकल्पात्मक कर्माशय व त्यापासून होणारीं दुःखेंही सांगितलीं. आतां शारीरही कर्माशय सांगतों; तो असा,—सुखभोगकालीं कोणत्याही प्राण्याचा नाश केल्यावांचून शरीरपुष्ट्यादिसुखाचा उपभोग संभवत नाहीं; या कारणास्तव हिंसेपासून उत्पन्न झालेला शारीरही कर्माशय सुखकालीं असतोच. आणि विषयसुख हें परिणामीं दुःख देणारें, करितां तें अविद्यारूप क्लेश, असें पूर्वींच सांगितलें. आतां जी भोगाविषयीं इंद्रियांच्या तृप्तीची उपशांति ह्मणजे चित्ताच्या व्यापाराची समाप्ति, तीच सुख होय. आणि जी इंद्रियांच्या लौल्यानें ह्मणजे भोगतृष्णेनें चित्ताची अनुपशांति ह्मणजे वृत्तिचांचल्य, त्यास दुःख ह्मणतात. आतां इंद्रियांचें तृष्णाराहित्य भोगाभ्यासानें करणें शक्य नाहीं; कारण ज्यामुळें, भोगाभ्यास जसा जसा अधिक करावा तसतशीं, तृष्णा कमी न होतां, राग ( क्लेश ) व इंद्रियांची कुशलता हीं अधिकच वाढत जातात. त्याकरितां भोगाभ्यास सुखास उपाय नाहीं. तर तो, जसा विंच्वाच्या विषानें भ्यालेला मनुष्य त्याच्या निवृत्तिरूपसुखाची इच्छा करीत असतां त्यास अतिउग्रविषाच्या सर्पानें दंश केला ह्मणजे अतिदुःखांत मग्न होतो. त्याप्रमाणें कामादिक्षुद्रदुःखानें भीत (भ्यालेला) ह्मणून तन्निवृत्त्याख्य सुखाची इच्छा करणारा अशा पुरुषास स्त्रीपुत्रादिभयरूप महासर्पानें दंश केला असतां विषयांचा उपभोग घेत परिणामीं मोठ्या दुःखरूप चिखलांत गढून जातो. अयोग्यास परिणामींच हा दुःखसमूह द्वेष्य होतो, व योग्यास उपभोगकालींच अनर्थहेतुदर्शनानें दुःख करितो. (असा मोठा दोघांत भेद आहे.) आतां तापरूप दुःखता कोणती? त्याचें उत्तर,—सर्वांला, द्वेषानें व्याप्त जीं चेतन आणि अचेतन साधनें तदधीन तापानुभव असतोच; करितां त्या ठिकाणींही द्वेषापासून उत्पन्न झालेला कर्माशय असतोच. तेथेंही सुखसाधनाची इच्छा करणारा प्रथम मनानें व्यापार केल्यानंतर वाणीनें, त्यानंतर देहानें चेष्टा करितो. त्यानंतर दुसऱ्यावर मोठा अनुग्रह (कृपा) किंवा दुसऱ्याला पीडा देतो. या रीतीनें दुसऱ्यावर अनुग्रह व पीडा यांयोगानें पुण्य व पातक यांचा संग्रह करितो. तो संतापकाळचा कर्माशय लोभापासून व मोहापासून उत्पन्न होतो; ह्मणून ह्यास तापदुःखता असें ह्मणतात. आतां संस्कारदुःखता कोणती? उत्तर,—सुखानुभवापासून सुखसंस्कारातिशय, व दुःखानुभवापासून सुद्धां दुःखसंस्कारातिशय उत्पन्न होतो. (याचें तात्पर्य असें कीं, प्रथम सुखदुःखांच्या अनुभवांनीं तो संस्काराशय जागृत नसतो; नंतर कालादिविशेषांनीं तो जागृत होतो; त्यानंतर स्मृति, तीपासून राग व द्वेष, त्यांपासून प्रवृत्ति, त्यानंतर पुनः दुःख. याप्रमाणें येथें क्रम समजावा.) याप्रमाणें धर्माधर्मरूपसंस्कारांपासून

सुद्धां सुखरूप अथवा दुःखरूप फलाचा उपभोग होत असतां पुनः कर्म व त्यापासून उत्पन्न होणारें फल यांचा संचय होतच असतो. याप्रमाणें अनादिपरंपरेनें चालत आलेला व विस्तीर्ण असा हा दुःखप्रवाह विवेकी योग्यासच प्रतिकूल वाटल्यामुळें मनास उद्वेग उत्पन्न करितो. कारण, विवेकी (योगी) हा नेत्रांतील गोलकाप्रमाणें आहे. ह्मणजे जसा एकादा ऊर्णातंतु (बकऱ्याचा केंस किंवा दुसरा एकादा बारीकसा केंस) डोळ्यांत गेला असतां त्याच्या स्पर्शानें दुःख होतें (तो डोळ्यांत खुपतो;) त्याप्रमाणें पुढें उत्पन्न होणारीं तीं सर्व दुःखें योग्याच्याच सर्व शरीरास, लहानसा केंस सुद्धां जसा डोळ्यांत खुपतो, त्याप्रमाणें तीं प्राप्त होण्याच्या पूर्वींच अतिशय क्लेश देतात; तशीं इतरास (मूर्खजनास) नाहीं. आतां इतर ह्मणजे जो योगी नव्हे त्याप्रत तर, तो स्वकर्मानें जें जें प्राप्त होईल त्यांस उपभोगानें सारणारा व जें जें संपलें असेल त्यांचें ग्रहण करणारा, आणि अनादिसिद्ध वासनांच्या योगानें (नानारूप) अशी जी अविद्या तिणें जणूं चोहोंकडून व्याप्तच झाला आहे कीं काय ह्मणूनच सर्वथा त्याग करण्याला योग्य अशा देह व इंद्रियांचे ठिकाणीं सुद्धां 'मी' व 'माझें' अशी बुद्धि धारण करणारा असा असल्यामुळें वारंवार बाह्य (आधिदैविक व आधिभौतिक) व आध्यात्मिक या उभयनिमित्तांनीं प्राप्त होणारे, व आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक अशीं तीन आहेत पर्वें ज्यांना असे (त्रिविध) ताप व्याप्त करितात. (तात्पर्य,—'योग्यास भावी परिणाम पूर्वींच माहित असतो ह्मणून तो तसलीं कर्मेंच करीत नाहीं; व अयोग्यास भावी परिणाम काय, हें माहित नसल्यामुळें तो कर्में तर करून जातो; त्यानंतर केल्या कर्मांचा बरा वाईट परिणाम कांहीं तरी झालाच पाहिजे; त्यामुळें त्रिविध ताप हे त्यास प्राप्त होतातच; ते त्याच्यानें नंतर कांहीं केल्यानें दूर करवत नाहींत.') याप्रमाणें अनादि अशा दुःखप्रवाहानें आपण व सर्व प्राणिमात्र वाहून जात आहेत असें पाहून योगी भावी सर्वदुःखांचा नाश करणारें असें साधन पूर्वींच प्राप्त करवून घेतो. याकरितां सत्वादिगुणांच्या वृत्तींचा परस्पर विरोध (ह्मणजे एका वेळेस एकठिकाणीं अनेकांची स्थिति न होणें असें) असल्यामुळें विवेकी जो आहे त्याला सर्वच दुःखमय वाटतें. आतां तो गुणवृत्तिविरोध असा,— प्रख्या ह्मणजे प्रकाश, प्रवृत्ति ह्म० क्रिया, व स्थिति ह्म० स्तंभ; एतद्रूप जे बुद्धिरूपानें परिणत झालेले (परिणामास पावलेले) सत्वादिक गुण ते परस्परांच्या साहाय्यानें शांत, घोर अथवा मूढ अशा वृत्ती त्रिगुणच ह्मणजे सुखदुःखमोहयुक्तच उत्पन्न करितात. (तात्पर्य, जी एकादी वृत्ति शांत अथवा घोर किंवा मूढ होते ती सर्वही त्रिगुणच असते; केवल एकएक गुणाची अशी नसते.) आतां येथें अशी शंका येते कीं, सुखकालीं सुद्धां थोडेंसें दुःख नियमानें असतेंच असें पूर्वीं ह्मटलें, तर असें मानण्यास प्रमाण काय? उत्तर,—प्रदीपाच्या अवयवांप्रमाणें बुद्धीचे अवयव जे गुण त्यांची क्रिया प्रतिक्षणीं भिन्न भिन्न होत असल्यामुळें शास्त्रकारांनीं चित्तास क्षिप्रपरिणामी (क्षणोक्षणीं भिन्न भिन्न परिणाम पावणारें) असें ह्मटलें आहे. त्यांतही एकच प्रत्यय खरा, परंतु शांत, घोर व

मूढ अशा विरुद्ध वृत्ती उत्पन्न होण्याचें कारण, बुद्धीच्या रूपांचे उत्कर्ष व वृत्तींचे उत्कर्ष हेच परस्पर विरोध करितात; त्यामुळें वर सांगितलेल्या अनेक विरुद्ध वृत्ती उत्पन्न होतात. (धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य; आणि अधर्म, अज्ञान, अवैराग्य व अनैश्वर्य, अशीं बुद्धीचीं भावरूप आठ रूपें व शांत, घोर इत्यादि द्रव्यरूप वृत्ती आहेत.) (तो विरोध असा,—उत्कर्ष पावलेले धर्मादिक अधर्मादिकांशीं विरोध करितात, ह्मणजे ज्या वेळेस धर्मादिकांचा उत्कर्ष त्या वेळेस अधर्मादिक मुळींच असत नाहींत.) आतां ज्या वेळेस कांहीं अपकृष्ट (हीनबल) व कांहीं अतिशय (बलिष्ठ) असे असतात, त्या वेळेस अपकृष्ट व उत्कृष्ट हे दोघे बरोबर एके ठिकाणीं राहतात; कारण उत्कृष्टांबरोबर अपकृष्ट, सामर्थ्य नसल्यामुळें विरोध न करितां मुकाट्यानें उत्कृष्टांबरोबर राहतात. जसे हे सत्वादिगुण एकमेकांच्या साहाय्यानें सुखदुःखमोहरूप असे होतात त्याप्रमाणेंच सर्व पदार्थ सुद्धां सर्वरूप (सुखदुःखमोहरूपच) आहेत. आतां यांमध्यें एक गौण व एक प्रधान असा विशेष आहे त्यामुळें विवेकी जो आहे त्याला सर्वच दुःखमय असें वाटतें. आतां ह्या सर्व अति महत् दुःखसमुदायाचें उत्पत्तिकारण पाहिलें तर अविद्या ही होय; व इचाही अभाव (नाश) होण्याला मुख्य साधन सम्यग्दर्शन (उत्तम शास्त्र) हें होय. आतां या योगशास्त्राला उत्तमशास्त्रत्व कसें तें सांगतात,—जसें चिकित्सा (वैद्य) शास्त्रांत रोग, रोगहेतु, आरोग्य व औषध असे चार व्यूह (विचार किंवा अंगें) आहेत, त्याप्रमाणें या शास्त्रांतही चार व्यूह आहेत; ते असे,—संसार, संसारहेतु, मोक्ष व मोक्षप्राप्तीचा उपाय हे होत. आतां त्यांत अतिशय दुःखांनीं व्यापिलेला संसार हा हेय (त्याज्य) होय; प्रधान (बुद्धि) व पुरुष यांचा संयोग हा हेयहेतु ह्मणजे संसारास कारण होय; संयोगाची अगदीं सर्वथा निवृत्ति होणें हें हान (दुःखत्याग) हाच मोक्ष होय; व हानाचा (मोक्षाचा) उपाय ज्यांत सांगितला तें सम्यग् दर्शन (उत्तम शास्त्र) होय; (अर्थात् प्रकृति व पुरुष यांच्या विवेकापासून झालेला जो साक्षात्कार तोच हानोपाय (मोक्षोपाय) होय. व तो साक्षात्कार, या शास्त्रांत सांगितलेला जो असंप्रज्ञात योग त्यानें तर फारच लवकर होतो. याकरितां या शास्त्राला सम्यग्दर्शनत्व सिद्ध होतें. आणि मोक्षाकरितां या शास्त्राचा अभ्यास अवश्य केला पाहिजे. असा भाष्यकाराचा अभिप्राय होय.) आतां त्यांत 'हाता' ह्मणजे हान करणारा अर्थात् पुरुष याचें स्वरूप उपादेय (ग्राह्य) किंवा हेय यांपैकीं कांहींच होण्याला योग्य नाहीं; कारण, स्वरूपाचें हान असें ह्मटलें तर स्वरूपोच्छेदवादप्रसंग (आत्मस्वरूपाचाच नाश करणें अशा प्रकारच्या वादाची प्राप्ति) येणार; व स्वरूपाचें उपादान असें ह्मणावें तर सकारणतावाद प्राप्त होणार ह्मणजे स्वरूप उपादेय (उत्पाद्य) झाल्यामुळें कार्यत्वास्तव अनित्यत्व येऊन मोक्षापासूनच च्युत होणार; एवढ्याकरितां दोन्ही मतांचा त्याग केला ह्मणजे अर्थात् आत्मा नित्य हाच वाद सिद्ध झाला; या हेतूनें या योगशास्त्रालाच सम्यग्दर्शन असें ह्मणतात ॥ १५ ॥

आतां हें शास्त्र चतुर्व्यूह असें ह्मटलें ते चार व्यूह क्रमानेंच सूत्रकार सांगतात,—

## हेयं दुःखमनागतम् ॥ १६ ॥

सूत्रार्थः–पुढें प्राप्त होणारें ( च ) दुःख दूर करण्याला योग्य आहे.

**भाष्यम्–दुःखमतीतमुपभोगेनातिवाहितं न हेयपक्षे वर्त्तते । वर्त्तमानं च स्वक्षणे भोगारूढमिति न तत् क्षणान्तरे हेयतामापद्यते । तस्माद्यदेवाऽनागतं दुःखं तदेवाक्षिपात्रकल्पं योगिनं क्लिश्नाति नेतरं प्रतिपत्तारम् । तदेव हेयतामापद्यते । तस्मादेव हेयमित्युच्यते ॥ 'तस्यैव कारणं प्रतिनिर्दिश्यते' ॥ १६ ॥**

भाष्यार्थः–या शास्त्रांत चार व्यूह सांगितले, त्यांत प्रथम 'हेय' ह्मणून एक व्यूह सांगितला; तर तें 'हेय' या पदानें मुख्यदुःख घ्यावयाचें. त्यांत अतीत ह्मणजे भूतकालिक (मागें गेलेलें) दुःख तर उपभोगानें संपविलें ( अर्थात् क्षीण झालें ) ह्मणून तें हेयकोटींत येत नाहीं. (ह्मणजे त्याच्या नाशाविषयीं प्रयत्न करावयास नको.) तसेंच वर्तमान ह्मणजे सध्यां प्राप्त झालेलें दुःख सुद्धां हेयकोटींत नव्हे; कारण त्याचा हल्लीं • उपभोग, होत आहे ह्मणून आपण त्याच्या नाशाकरितां जो प्रयत्न करणार तेथपर्यंत तें मुळींच राहत नाहीं. तेव्हां आतां राहतांपैकीं राहिलें दुःख अनागत ह्मणजे भावी ( पुढें प्राप्त होणारें ) तेंच हेय होय. तेंच भावी दुःख डोळ्यांत खुपणाऱ्या ऊर्णातंतूप्रमाणें योग्याप्रत क्लेश देतें; इतर प्रतिपत्ता ह्मणजे शब्दादिकेंकरून भावी दुःख हल्लीं कळत असतांही पुनः अज्ञानाप्रमाणें तिकडे लक्ष न देणारा अशा पुरुषास तें भावी दुःख क्लेशकारक होत नाहीं. तात्पर्य, तें अनागत (भावी) दुःखच हेयकोटींत प्राप्त होतें त्यामुळेंच त्या अनागतदुःखाला हेय ह्मणतात ॥१६॥

आतां त्याचें कारण सूत्रकार सांगतात,–

## द्रष्टृदृश्ययोः संयोगो हेयहेतुः ॥ १७ ॥

सूत्रार्थः–द्रष्टा (पुरुष) व दृश्य या दोहोंचा संयोग हा हेयास (दुःखरूपसंसारास) हेतु आहे.

**भाष्यम्–द्रष्टा बुद्धेः प्रतिसंवेदी पुरुषः। दृश्या बुद्धिसत्वोपारूढाः सर्वे धर्माः। तदेतद्दृश्यमयस्कान्तमणिकल्पं सन्निधिमात्रोपकारिदृश्यत्वेन भवति पुरुषस्य स्वं दृशिरूपस्य स्वामिनः। अनुभवकर्मविषयतामापन्नमन्यस्वरूपेण प्रतिलब्धात्मकं स्वतन्त्रमपि परार्थत्वात्परतन्त्रम् । तयोर्दृग्दर्शनशक्त्योरनादिरर्थकृतः संयोगो हेयहेतुर्दुःखस्य कारणमित्यर्थः । तथा चोक्तम् । तत्संयोगहेतुविवर्जनात्स्यादयमात्यन्तिको दुःखप्रतीकारः। कस्मात् । दुःखहेतोः परिहार्य्यस्य प्रतीकारदर्शनात् । तद्यथा। पादतलस्य भेद्यता, कण्टकस्य भेत्तृत्वं, परिहारः कण्टकस्य पादानधिष्ठानम्पादत्राणव्यवहितेन वाऽधिष्ठानम्। एतत्त्रयं यो वेद लोके स तत्र प्रतीकारमारभमाणो भेदजं दुःखं नाप्नोति।**

**कस्मात् । त्रित्वोपलब्धिसामर्थ्यादिति । अत्रापि तापकस्य रजसः सत्वमेव तप्यम् । कस्मात् । तपिक्रियायाः कर्मस्थत्वात् सत्त्वे कर्मणि तपिक्रिया नाऽपरिणामिनि निष्क्रिये क्षेत्रज्ञे दर्शितविषयत्वात् । सत्त्वे तु तप्यमाने तदाकारानुरोधी पुरुषोऽनुतप्यत इति दृश्यते ॥ 'दृश्यस्वरूपमुच्यते' ॥ १७ ॥**

**भाष्यार्थः**—बुद्धिसाक्षी पुरुष तो द्रष्टा; व त्याल्या इंद्रियांच्या व्यापारानें बुद्धीच्या ठिकाणीं आरूढ ह्मणजे प्रतिबिंबित झालेला शब्दादिक सर्व धर्म व बुद्धिसत्व ( बुद्धि ) हें सर्व दृश्य होय. तें हें दृश्य लोहचुंबकमण्याप्रमाणें केवळ अन्य पदार्थ जवळ मात्र करण्यास साधक व स्वतांही दृश्य असल्यामुळें तें केवळ ज्ञानस्वरूप जो स्वामी पुरुष त्याचें स्व ( आत्मीय ) होतें. ( आतां येथें अशी शंका येते कीं, दृश्य ( बुद्धि ) स्व, व त्याला एक अन्य स्वामी ह्मणजे तें परतंत्र, असें मानण्याचें कारण काय ? ह्मणजे तीच बुद्धि स्वतः द्रष्ट्री असें कां मानूं नये ? तर असें मानतां येत नाहीं; कारण, तें, भोगरूप जो अनुभव तद्रूप जें पुरुषाचें कर्म, तद्विषयतेप्रत ( भोग्यवस्तुत्वाप्रत ) प्राप्त झालें यामुळें जरी अन्यस्वरूपानें ( पुरुषचैतन्यानें ) त्याला स्थिति प्राप्त झाली आहे, ह्मणून तें स्वतंत्र आहे; असें आहे तथापि त्याचा सर्व व्यापार पुरुषार्थाकरितांच, ह्मणून तें परतंत्रच होय. ( ह्मणजे तें दुसऱ्याचें स्व होय. ) त्या दृक्शक्ति व दर्शनशक्तीचा ( बुद्धिपुरुषांचा ) संयोग पुरुषार्थाकरितां अनादि आहे; व तोच हेयहेतु होय, ह्मणजे दुःखाचें कारण होय, असा अभिप्राय समजावा. याच प्रमाणें पंचशिखाचार्यांनीं सांगितलें आहे कीं,— 'त्या बुद्धिपुरुषांचा संयोग हाच जन्ममरणरूपदुःखास कारण आहे; त्याचा अगदीं उच्छेद करून टाकिला असतां दुःखाचाही अगदीं उच्छेद होईल.' ( आतां अशी शंका येते कीं, अनादिकालापासून प्रवृत्त झालेला जो दुःखहेतुसंयोग त्याचा उच्छेद कसा व्हावा ? तर याचें उत्तर असें कीं, ) परिहार करण्यास शक्य असा जो दुःखहेतु त्याचा उच्छेद झालेलाही पाहण्यांत आहे; तो असा,—पायाचा खालचा भाग ( तळपाय ) ह्याचा, कांटा मोडला असतां दुःख पावणें असा धर्म आहे; व कांट्याचा धर्म, पायांस टोंचला असतां दुःखहेतु असा आहे. आतां दुःखाचा परिहार दोन प्रकारानें, एक तर कांट्यावर मुळींच पाय न टाकणें हा, किंवा दुसरा, त्यावर जोडा इत्यादिक घालून चालणें, हा होय. आतां जेथें दुःख होतें तें स्थान, दुःखाचें कारण व त्या दुःखाचा परिहार, हे तीन ज्यास माहित आहेत तो तत्काळ त्या त्या दुःखाचा उच्छेद करितो; ह्मणून पायांत कांटा मोडल्यापासून होणारें दुःख त्यास मुळींच प्राप्त होत नाहीं. जसें हें बाह्यदुःखांत सांगितलेलें त्रय माहित असलें ह्मणजे दुःख होत नाहीं; तसेंच अंतर्दुःखही ज्ञात्यास प्राप्त होत नाहीं; कारण, अंतर्दुःखाचेंही परिहार इत्यादि त्रय त्याला माहित असतें ह्मणून. आतां दृष्टांताप्रमाणें येथें सुद्धां, बुद्धीचा राजस अंश तो तापक ( ताप देणारा ),

सत्वांश तोच तप्य (ताप पांवणारा), (व बुद्धिपुरुषांचा वियोग होणें हा परिहार; याप्रमाणें त्रय आहे. ) आतां वर स्त्वच तप्य ह्मणून सांगितलें, तेथें पुरुष कां तप्य होऊं नये? तर पुरुष तप्य होत नाहीं; कारण, 'तप' ह्या धातूला कर्मस्थत्व ह्मणजे कर्मतंत्रत्व आहे; तात्पर्य, तप धातु हा सकर्मक आहे; तेव्हां सत्त्व कर्म असतां तपधातूचा प्रयोग परिणामरहित व क्रियारहित अशा क्षेत्रज्ञाचे ( आत्म्याचे ) ठिकाणीं होत नाहीं. आतां बुद्धिसत्वानें सर्व विषय पुरुषास निवेदन केले ह्मणून ज्या वेळेस सत्व ताप पावत असतें त्या वेळेस प्रतिबिंबरूपानें पुरुष बुद्धिसत्वसमानाकार होतो ह्मणून मूढलोकांना पुरुषच ताप पावतो असे दिसतें ॥ १७ ॥

आतां दृश्याचें स्वरूप सांगतात,–

## प्रकाशक्रियास्थितिशीलं भूतेन्द्रियात्मकम्भोगापवर्गार्थं दृश्यम् ॥ १८ ॥

**सूत्रार्थः**–प्रकाश, क्रिया आणि स्थिति हे ज्याचा स्वभाव आहे, भूत आणि इंद्रियें हीं ज्याचे स्वाभिन्न परिणाम आहेत; आणि जें पुरुषाला :भोग तसाच मोक्ष देण्याला प्रवृत्त आहे, त्यास दृश्य असें ह्मणतात.

**भाष्यम्– प्रकाशशीलं सत्वं क्रियाशीलं रजः स्थितिशीलन्तम इति एते गुणाः परस्परोपरक्तप्रविभागाः परिणामिनः संयोगविभागधर्माण इतरेतरोपाश्रयेणोपार्जितमूर्तयः परस्पराङ्गाङ्गित्वेऽप्यसम्भिन्नशक्तिप्रविभागास्तुल्यजातीयातुल्यजातीयशक्तिभेदानुपातिनः प्रधानवेलायामुपदर्शितसन्निधाना गुणत्वेऽपि च व्यापारमात्रेण प्रधानान्तर्नीतानुमितास्तिताः पुरुषार्थकर्तव्यतया प्रत्युक्तसामर्थ्याः सन्निधिमात्रोपकारिणोऽयस्कान्तमणिकल्पाः प्रत्ययमन्तरेणैकतमस्य वृत्तिमनुवर्तमानाः प्रधानशब्दवाच्या भवन्ति । एतद्दृश्यमित्युच्यते । तदेतद्भूतेन्द्रियात्मकम्भूतभावेन पृथिव्यादिना सूक्ष्मस्थूलेन परिणमते, तथेन्द्रियभावेन श्रोत्रादिना सूक्ष्मस्थूलेन परिणमत इति । तत्तु नाप्रयोजनमपि तु प्रयोजनमुररीकृत्य प्रवर्तत इति । भोगापवर्गार्थं हि तद्दृश्यं पुरुषस्येति । तत्रेष्टानिष्टगुणस्वरूपावधारणमविभागापन्नम्भोगो भोक्तुः स्वरूपावधारणमपवर्ग इति द्वयोरतिरिक्तमन्यद्दर्शनन्नास्ति । तथा चोक्तम् । अयन्तु खलु त्रिषु गुणेषु कर्तृष्वकर्तरि च पुरुषे तुल्याऽतुल्यजातीये चतुर्थे तत्क्रियासाक्षिण्युपनीयमानान् सर्वभावानुपपन्नाननुपश्यन्नदर्शनमन्यच्छङ्कत इति । तावेतौ भोगापवर्गौ बुद्धिकृतौ बुद्धावेव प्रवर्तमानौ कथं पुरुषेऽपदिश्येते इति । यथा विजयः पराजयो वा योद्धृषु वर्तमानः**

**स्वामिन्यपदिश्यते 'स हि तस्य फलस्य भोक्ता' इति एवम्बन्धमोक्षौ बुद्धावेव वर्तमानौ पुरुषेऽपदिश्येते 'स हि तत्फलस्य भोक्ता' इति । बुद्धेरेव पुरुषार्थापरिसमाप्तिर्बन्धस्तदर्थावसायो मोक्ष इति । एतेन ग्रहणधारणोहापोहतत्त्वज्ञानाभिनिवेशा बुद्धौ वर्तमानाः पुरुषेऽध्यारोपितसद्भावाः 'स हि तत्फलस्य भोक्ता' इति । दृश्यानान्तु गुणानां स्वरूपभेदावधारणार्थमिदमारभ्यते' ॥ १८ ॥**

**भाष्यार्थः**–प्रकाश करणें हा सत्वाचा स्वभाव ( धर्म ), रजोगुणाचा स्वभाव यत्न व चलन ( हालणें चालणें ), तमाचा स्वभाव स्थिति ह्मणजे प्रकाशही नाहीं आणि यत्न व चलनही नाहीं अशा प्रकारचा आहे. याप्रमाणें हे सत्वादि तीन गुण, एकमेकांशीं संमिश्र झालेले व त्यांत एकेकाचा भाग सर्वांत अधिक असावयाचा ( ह्मणजे सत्वगुणाचा भाग सर्वांत अधिक असला तर त्यांत रजोगुणाचा व तमोगुणाचा भाग थोडा थोडा संसृष्ट (एकत्र) झालेला असावयाचा; असाच रजोगुणाचा भाग सर्वांत अधिक असला तर त्यांत सत्व व तमाचा भाग थोडा थोडा असावयाचा; असाच तमोगुणाचा प्रकार.) अशा प्रकारचे; व परिणाम ( अवस्थांतर पावणारे; तसेच परस्परांत एकत्र होणारे व पुनः परस्परांपासून विभाग पावणारे; तसेच सर्व गुण एकमेकांच्या साहाय्यानें अवयवी (घटादिक कार्य) उत्पन्न करणारे (त्यावरून गुणांना द्रव्यत्व सिद्ध होतें. ); तसेच ते एक अंग व एक अंगी अशा धर्मानें त्या सर्वांनीं जरी एका द्रव्याला उत्पन्न केलें तथापि त्यांत प्रकाश हा गुण सत्वाचाच, क्रिया ( यत्न, चलन इत्यादिक ) गुण हा रजाचाच, व स्थितिगुण हा तमाचाच; ह्मणून प्रकाशादिशक्तिविभागाचें संमिश्रण ( एकीभाव ) कधींही होत नाहीं; तसेच, सत्वादिक हे व्यक्तिरूपानें अनंत आहेत, परंतु त्यांवर असणारी जी सत्वत्व, रजस्त्व व तमस्त्व, अशा प्रकारची जाति तिच्या योगानें जे, तुल्यजातीय व विजातीय असे सहकारिशक्तिभेद (अनेकांनीं मिळून एक कार्य करावयाचें असे सामर्थ्यविशेष ) त्यांनीं ते एकमेकांचें साहाय्य घेऊन कार्य उत्पन्न करण्यास समर्थ होणारे; तसेच ते आपआपल्या प्रधानावस्थेंत विकारांमध्यें स्पष्ट होणारे, ( दिव्यशरीर उत्पन्न करावयाचें असतां सत्वगुण प्रधान, व रज व तम हीं अंगें; मनुष्यशरीर उत्पन्न करावयाचें असतां रजोगुण प्रधान व सत्व व तम हीं अंगें; तसेंच तिर्यक्छरीर उत्पन्न करावयाचें असतां तमोगुण प्रधान व सत्व व रज हीं अंगें, याप्रमाणें व्यक्त होणारे ); तसेच, एकमेकांच्या प्रधानावस्थेंत त्यांस एकमेकांचें अंगत्व असतें त्या वेळीं सुद्धां प्रधानांत गुप्तरीतीनें असले तरी त्यांच्या नुसत्या व्यापारानेंच ज्यांच्या सत्तेचें अनुमान होऊं शकतें असे; तसेच, पुरुषार्थाकरितांच केवळ ज्यांच्या शक्तीचें प्रयोजन आहे ( पुरुषार्थ कां एकदा संपला ह्मणजे गुणांचें कार्य करणें बंद होतें ) असे; तसेच, जसा लोखंडास आकर्षण करणें हा लोहचुंबकाचा स्वभाव त्याप्रमाणें चित्ताचें आकर्षण करणें हा ( गुणांचा ) विषयांची स्वभावच ह्मणावयाचा;

तेवढ्या जवळ आणण्यानेंच पुरुषावर उपकार करणारे असे; तसेच, ज्या वेळेस त्यांची अभिव्यक्ति नसते ( त्यांस प्राधान्य नसतें ) त्या वेळेस अन्य प्रधानगुणाच्या अनुरोधानें वागणारे असे 'प्रधान' या शब्दानें प्रसिद्ध आहेत ( सत्वादि तीन गुणांस प्रधान असें ह्मणतात.) यालाच दृश्य असें ह्मणतात. तें हें दृश्य भूत व इंद्रिय अशा भेदानें दोन प्रकारचें; त्यांत भूताचा शब्दादि पंचतन्मात्र हा सूक्ष्म परिणाम, व पृथिव्यादि पंच महाभूतें हा स्थूल परिणाम होय. आणि इंद्रियाचा महत् व अहंकार हा सूक्ष्म परिणाम व श्रोत्रादि पांच ज्ञानेंद्रियें, वाग् इत्यादि पांच कर्मेंद्रियें अशीं दहा व अकरावें मन हा स्थूल परिणाम होय. आतां हें गुणत्रयात्मक दृश्य जें भूतेंद्रियरूपानें प्रवृत्त झालें आहे हें कांहीं प्रयोजनांवांचूनच प्रवृत्त झालें आहे असें नाहीं; तर प्रयोजनाचा स्वीकार करूनच प्रवृत्त झालें आहे. तें प्रयोजन कोणतें ह्मणाल तर, पुरुषास भोग व अपवर्ग प्राप्त व्हावा याकरितां तें दृश्य आहे. त्यांत इष्ट व अनिष्ट जे गुण ह्मणजे सुखदुःखादिक त्यांविषयीं भोक्त्याची ( पुरुषाची ) तदाकार बुद्धिवृत्ति होणें यास भोग ह्मणतात; व विवेकख्यातीनें स्वस्वरूपाचा निश्चय करणें ( पुरुषसाक्षात्कार होणें ) यास अपवर्ग ( मोक्ष ) ह्मणतात. या भोग व अपवर्ग दोन कारणांवांचून दृश्याचें दुसरें प्रयोजनच नाहीं. याप्रमाणें पंचशिखाचार्यांनींही सांगितलें आहे; तें असें,—'काय हो ! खरोखर, हा मूढ जन लोकांत वास्तविक हे तीन गुणच कर्ते असतां या तीनगुणांहून अतिरिक्त असा जो चवथा जाग्रदादिअवस्थांचा केवळ साक्षी मात्र पुरुष त्याचे ठिकाणीं बुद्धीनें समर्पण केलेले जे गुणपरिणाम त्यांप्रत—स्वच्छत्व, सूक्ष्मत्व-इत्यादि गुणांनीं बुद्धिपुरुषांचें साजात्य आहे तथापि जडत्व, परिणामित्व इत्यादिगुणांनीं विजातीयत्व आहे हा विचार न करितां—पुरुषाचेच ठिकाणीं उपपन्न ( युक्तिसिद्ध ) आहेत असे समजून गुणांहून अन्य चैतन्य आहे अशी संभावना मुळींच करीत नाहीं ! ' आतां ते भोग व अपवर्ग हे बुद्धिकृत असल्यामुळें बुद्धीच्याच ठिकाणीं वर्तमान असणार; असें असतां त्यांचा पुरुषावर व्यवहार कसा होतो ? याचें समाधान असें कीं, जसा ' जय किंवा पराजय हा युद्ध करणारांवरच अवलंबून असतो ह्मणजे युद्ध करणारांचाच जय किंवा पराजय होतो खरा परंतु त्यांचा स्वामी जो राजा इत्यादिक त्याचाच जय किंवा पराजय झाला असा लोकांत व्यवहार होतो;' त्याप्रमाणें बंध व मोक्ष हे बुद्धीच्याच ठिकाणीं वर्तमान खरे परंतु 'तोच त्या फलाचा भोक्ता ( उपभोग घेणारा),' असा पुरुषाचे ठिकाणीं व्यवहार होतो. आतां पुरुषार्थाची समाप्ति न होणें हाच बुद्धीला बंध व पुरुषार्थाची समाप्ति हा मोक्ष होय. याचप्रमाणें, ग्रहण ह्मणजे स्वरूपमात्रानेंच अर्थाचें ज्ञान, धारणा ह्मणजे चिंतन, ऊह ह्मणजे अर्थाच्या ठिकाणीं असणाऱ्या विशेषांचें वितर्कण ( तर्क ), अपोह ह्मणजे ज्याविषयीं वितर्क केला असेल त्यांमधील कितीऐकांचें विचारानें निराकरण करणें, तत्त्वज्ञान ह्मणजे वितर्कितांमध्येंच कांहींएकाचा विचारानें निश्चय करणें, व अभिनिवेश ह्मणजे तदाकारता होऊन जाणें, इत्यादिक हे सुद्धां बुद्धीच्याच ठिकाणीं वर्तमान

असून पुरुषाचे ठिकाणीं त्यांची 'तोच त्या फलाचा भोक्ता' अशा प्रकारची सत्ता आरोपित समजावी ॥ १८ ॥

आतां त्या दृश्यगुणाचें स्वरूप कसें आहे याचा निश्चय करण्याकरितां ह्या पुढील सूत्राचा आरंभ आहे,–

## विशेषाविशेषलिङ्गमात्रालिङ्गानि गुणपर्वाणि ॥ १९ ॥

**सूत्रार्थः**–विशेष, अविशेष, लिंगमात्र आणि अलिंग ह्या चार, गुणांच्या विशेष अवस्था आहेत.

**भाष्यम्**–तत्राकाशवाय्वग्न्युदकभूमयो भूतानि । शब्दस्पर्शरूपरसगन्धतन्मात्राणामविशेषाणां विशेषाः । तथा श्रोत्रत्वक्चक्षुर्जिह्वाघ्राणानि बुद्धीन्द्रियाणि, वाक्पाणिपादपायूपस्थानि कर्मेन्द्रियाण्येकादशम्मनः सर्वार्थमित्येतान्यस्मितालक्षणस्याविशेषस्य विशेषाः । गुणानामेष षोडशको विशेषपरिणामः । षडविशेषाः । तद्यथा । शब्दतन्मात्रं स्पर्शतन्मात्रं रूपतन्मात्रं रसतन्मात्रं गन्धतन्मात्रं चेत्येकद्वित्रिचतुष्पञ्चलक्षणाः । शब्दादयः पञ्चाविशेषाः षष्ठश्चाविशेषोऽस्मितामात्र इति । एते सत्तामात्रस्यात्मनो महतः षडविशेषपरिणामाः । यत्तत्परमविशेषेभ्यो लिङ्गमात्रम्महत्तत्त्वं तस्मिन्नेते सत्तामात्रे महत्यात्मन्यवस्थाय विवृद्धिकाष्ठामनुभवन्ति । प्रतिसंसृज्यमानाश्च तस्मिन्नेव सत्तामात्रे महत्यात्मन्यवस्थाय यत्तन्निःसत्तासत्तं निःसदसद्व्यक्तमलिङ्गम्प्रधानन्तत्प्रतियन्तीत्येष तेषां लिङ्गमात्रः परिणामो निःसत्तासत्तञ्चालिङ्गपरिणाम इत्यलिङ्गावस्थायां न पुरुषार्थो हेतुर्नालिङ्गावस्थायामादौ पुरुषार्थता कारणम्भवतीति । न तस्याः पुरुषार्थता कारणं भवतीति नासौ पुरुषार्थकृतेति नित्याख्यायते । त्रयाणां त्ववस्थाविशेषाणामादौ पुरुषार्थता कारणम्भवति । स चार्थो हेतुर्निमित्तङ्कारणम्भवतीत्यनित्याख्यायते । गुणास्तु सर्वधर्मानुपातिनो न प्रत्यस्तमयन्ते नोपजायन्ते । व्यक्तिभिरेवातीतानागतव्ययागमवतीभिर्गुणान्वयिनीभिरुपजनापायधर्मका इव प्रत्यवभासन्ते । यथा देवदत्तो दरिद्राति । कस्मात् । यतोऽस्य म्रियन्ते गाव इति । गवामेव मरणात्तस्य दरिद्राणं न स्वरूपहानादिति समः समाधिः । लिङ्गमात्रमलिङ्गस्य प्रत्यासन्नन्तत्र तत्संसृष्टं विविच्यन्ते, क्रमानतिवृत्तेः । तथा षडविशेषा लिङ्गमात्रे संसृष्टा विविच्यन्ते, परिणामक्रमनियमात् । तथा तेष्वविशेषेषु भूतेन्द्रियाणि संसृष्टानि विविच्यन्ते । तथा चोक्तं पुरस्तान्न विशेषेभ्यः परन्तत्त्वान्तरमस्तीति विशेषाणां नास्ति तत्त्वान्तरपरिणामस्तेषां तु धर्मलक्षणावस्थापरिणामा व्याख्यापिष्यन्ते ॥ 'व्याख्यातं दृश्यमथ द्रष्टुः स्वरूपावधारणार्थमिदमारभ्यते' ॥१९॥

**भाष्यार्थः**—पूर्वी जे अवतरणांत 'दृश्य गुण' ह्मणून ह्मटले, त्यांत आकाश, वायु, अग्नि, उदक व पृथ्वी हीं पांच भूतें; व शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हीं पांच तन्मात्रें आहेत. हीं आकाशादिक भूतांपेक्षां फारच सूक्ष्म आहेत ह्मणून या शब्दादितन्मात्रांना अविशेष अशी संज्ञा; व या अविशेषांचे क्रमानेंच आकाशादि भूतें हीं विशेषसंज्ञक परिणाम आहेत. तसेंच श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिह्वा व घ्राण हीं पांच बुद्धींद्रियें; वाचा, हात, पाय, गुद व जननेंद्रिय हीं पांच ज्ञानेंद्रियें; मिळून दहा. तसेंच ह्या वर सांगितलेल्या दहा इंद्रियांचे व्यापार नीट चालावे याकरितां अर्थात् ज्याच्या साहाय्यावांचून कोणत्याही इंद्रियाचा व्यापार चालवयाचा नाहीं असें अकरावें मन; हीं अस्मिताधर्म ह्मणजे अहंकाररूप अविशेषाचे विशेष परिणाम आहेत. दहा इंद्रियें, एक मन व पांच आकाशादि भूतें हीं सर्व मिळून सोळा; हे गुणांचे विशेषसंज्ञक परिणाम होत. तसेंच गुणांचे सहा अविशेष परिणाम आहेत; ते असे,—शब्दतन्मात्र, स्पर्शतन्मात्र, रूपतन्मात्र, रसतन्मात्र व गंधतन्मात्र; याप्रमाणें पांच एकेक धर्मानें वाढत गेलेले ह्मणजे आकाशांत शब्द हा एकच गुण; वायूंत शब्द व स्पर्श असे दोन गुण; अग्नींत शब्द, स्पर्श व रूप असे तीन गुण; उदकांत शब्द, स्पर्श, रूप व रस असे चार गुण; आणि पृथ्वींत शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध असे पांच गुण. याप्रमाणें हे शब्दादि पांच अविशेष, व सहावा अविशेष अस्मितामात्र (मूळचा अहंकार). हे सहा, सत्तामात्र आहे स्वरूप ज्याचें ह्मणजे अत्यंत सूक्ष्मरूप व सर्वविकारांचे मूळभूत अशा महत्तत्त्वाचे (बुद्धीचे) अविशेष परिणाम होत. (तात्पर्य, या शास्त्रांत पांच भूतें, दहा इंद्रियें व मन मिळून सोळा, यांस विशेष ही संज्ञा; व पंचतन्मात्र व अहंकार या सहांना अविशेष ही संज्ञा.) तें महत्तत्त्व कसें आहे ह्मणाल तर, जें या सहा अविशेषांच्या पूर्वी उत्पन्न झालेलें व जें लिंगमात्र ह्मणजे सर्ववस्तूंला व्यक्त मात्र करणारें असें. त्या सत्तामात्र व सर्वविकारांचें स्वरूपभूत अशा महत्तत्त्वाचे ठिकाणीं हे पूर्वी सांगितलेले अविशेष व विशेष (अनागतावस्थेनें) राहून वृद्धि पावतात. (तात्पर्य, जसा प्रथम वेळूच्या बीजाला अंकुर फुटतो, नंतर त्याला एक पर्व (पेर) फुटतें, नंतर दुसरें, नंतर तिसरें; याप्रमाणें तो जसा वाढत् जातो, तसा जगताचा मूळचा अंकुर जें महत्तत्त्व, त्याला अविशेष हीं अनेक पर्वें (पेरें) फुटलीं; नंतर विशेष हीं अनेक पर्वें फुटलीं; या रीतीनें ह्या जगद्रूपवृक्षाची वृद्धि झाली.) (या शास्त्रांत महत्तत्त्वास लिंगमात्र ही संज्ञा होय.) तसेंच ते विशेषाविशेष याप्रमाणें वाढल्यानंतर पुनः क्रमानें प्रलयकालीं त्याच सत्तामात्र अशा महत्तत्त्वाच्या ठिकाणीं (अतीतावस्थेनें) राहून त्यासह जें प्रधाननांवाचें मूलकारण ह्मणजे प्रकृति, तीमध्यें लीन होतात. आतां तें प्रधान असें आहे कीं, ज्याचे ठिकाणीं सत्ता व असत्ता हे दोन्ही धर्म नाहींत; तसेंच जें सत् नाहीं व असत्‌ही नाहीं; (येथें निःसत्ताऽसत्त व निःसदसत् या दोन विशेषणांत व्यावहारिक व पारमार्थिक अशा दोन भेदांनीं निषेध केला आहे असें समजावें; यामुळें वेदान्तसिद्धान्ताचा मुळींच विरोध नाहीं.) तसेंच

जें अव्यक्त ह्मणून ज्याला अलिंग अशी संज्ञा आहे. आतां त्यांत गुणांना महत्तत्त्वाची साम्यावस्था प्राप्त झाली असतां तो गुणांचा लिंगमात्र परिणाम जाणावा; व प्रधानाची साम्यावस्था प्राप्त झाली असतां तो गुणांचा अलिंग परिणाम समजावा. आतां ज्या वेळेस गुणांना प्रधानसाम्यावस्था प्राप्त होते ह्मणजे गुण प्रधानांत लीन होतात त्या वेळेस शब्दाद्युपभोगरूप पुरुषार्थ हेतु मुळींच असत नाहीं; कारण, अलिंगावस्था प्राप्त होण्याच्या पूर्वी, जी अवस्था प्राप्त झाली नसेल ती प्राप्त करून घेण्याचा पुरुषार्थ त्या वेळेस कारण असो; परंतु अलिंगावस्था प्राप्त झाल्यानंतर तो हेतु मुळींच राहत नाहीं. (तात्पर्य, व्यक्तावस्थेमध्यें गुणांपासून शब्दाद्युपभोगरूप पुरुषार्थ उत्पन्न होतो ह्मणून त्या वेळेस जी अवस्था प्राप्त झाली नसेल ती प्राप्त होणें हा पुरुषार्थ कारण असो; परंतु प्रधानसाम्यावस्था प्राप्त झाल्यानंतर तीपासून उत्पन्न होणारा असा कांहीं एक पुरुषार्थ राहत नाहीं.) ह्मणून तिला पुरुषार्थता कारण होत नाहीं. यावरून असें सिद्ध झालें कीं, ती पुरुषार्थाकरितां नव्हे; ह्मणून तिला नित्य असें ह्मणतात. तसेंच लिंग, अविशेष व विशेष ह्या तीन अवस्थांच्या पूर्वी पुरुषार्थता कारण होते आणि तो पुरुषार्थ हेतु निमित्तकारण असतो, ह्मणून त्यांना अनित्य असें ह्मणतात. आतां सत्वादि गुण तर सर्वविकारांत अनुगत असतात ह्मणून त्यांची उत्पत्ति व नाश हीं दोन्ही नाहींत. ( तर मग त्यांची उत्पत्ति वगैरे वर्णन केली आहे तिची उपपत्ति कशी? याचें समाधान असें कीं, ) कार्यांमध्येंच केवळ स्पष्ट होणारे व नष्ट झालेल्या कार्यांबरोबर विनाश पावणारे ह्मणजे स्पष्ट न दिसणारे, तसेच पुढें उत्पन्न होणाऱ्या कार्यांबरोबर उत्पन्न होणारे ह्मणजे स्पष्ट दिसणारे असे जे गुणधर्म, त्यांयोगानें ते उत्पन्न होणारे व विनाश पावणारे असे भासतात; (वस्तुतः त्यांना स्वतां जन्म किंवा विनाश हे कांहीं नाहींत.) यांस दृष्टांत,— जसा 'देवदत्तनांवाचा पुरुष दरिद्री झाला; याचें कारण, त्याच्या गायी मेल्या.' आतां या दृष्टांतांत वस्तुतः पाहिलें असतां केवळ गायींच्या मरणामुळें 'देवदत्त दरिद्री' असें ह्मटलें; कांहीं त्याच्या स्वरूपांत फेरबदल झाला ह्मणून ह्मटलें नाहीं; याप्रमाणेंच गुण व प्रकृति यांच्या उत्पत्तिविनाशांविषयींही समाधान असेंच समजावें. आतां लिंगमात्र ( महत्तत्त्व ) हें अलिंग ह्मणजे प्रधान याचें अव्यवहित (साक्षत्) कार्य होय; त्यांत लिंगमात्र हें अलिंगाचे ठिकाणीं प्रथमतः अव्यक्तरूपानें मिळालेलें असतें व नंतर विभक्त होतें; येथेंही उत्पत्तिक्रम नियमानें असला पाहिजे; कारण, पौर्वापर्य ( पूर्वी व नंतर असा ) क्रम कोठेंही सोडतां येत नाहीं. तशाच क्रमानें सहा अविशेष (अहंकार व पंचतन्मात्र ) हे प्रथम लिंगमात्राचे ठिकाणीं अव्यक्तरूपानें मिळालेले असतात, नंतर लिंगमात्राहून विभक्त होतात असें समजावें; कारण, परिणामक्रमही नियमानें सोडतां येत नाहीं. तशाच रीतीनें त्या अविशेषांचे ठिकाणीं इंद्रियें हीं प्रथम अव्यक्तरूपानें अविभक्त असतात; नंतर विभक्त होतात असें समजावें. याप्रमाणें आह्मीं याच सूत्रांत आरंभीं सांगितलें कीं, 'विशेषांहून अन्य अवांतरभेदानें दुसरें भिन्न तत्त्व

उत्पन्न होत नाहीं.' याकरितां ( जसे अविशेषांचे विशेष हे तत्त्वांतरपरिणाम आहेत त्याप्रमाणें ) विशेषांचा तत्त्वांतररूप परिणाम नाहीं. आतां त्यांचा जो धर्मलक्षणावस्थारूप परिणाम आहे त्याची व्याख्या सूत्रकारच पुढें सांगणार आहेत ॥ १९ ॥

दृश्याची व्याख्या सांगितली; आतां द्रष्ट्याच्या स्वरूपाचा निश्चय करण्याकरितां ह्या पुढील सूत्राचा आरंभ आहे,–

## द्रष्टा दृशिमात्रः शुद्धोऽपि प्रत्ययानुपश्यः ॥ २० ॥

**सूत्रार्थः**–द्रष्टा हा केवल चेतनारूप तसाच शुद्ध ( अपरिणामी ) असा असतांही बुद्धिवृत्ति विषयोपरक्त झाल्यामुळें केवल तिच्या सान्निध्यानेंच हा विषयोपरक्त असा वाटतो.

**भाष्यम्–दृशिमात्र इति दृक्शक्तिरेव विशेषणापरामृष्टेत्यर्थः । स पुरुषो बुद्धेः प्रतिसंवेदी स बुद्धेर्न सरूपो नात्यन्तं विरूप इति। न तावत्सरूपः। कस्मात् । ज्ञाताज्ञातविषयत्वात् परिणामिनी हि बुद्धिस्तस्याश्च विषयो गवादिर्घटादिर्ज्ञातश्चाज्ञातश्चेति परिणामित्वन्दर्शयति । सदाज्ञातविषयत्वन्तु पुरुषस्याऽपरिणामित्वम्परिदीपयति । कस्मात् । न हि बुद्धिश्च नाम पुरुषविषयश्च स्यादगृहीता चेति सिद्धं पुरुषस्य सदाज्ञातविषयत्वन्ततश्चापरिणामित्वमिति । किञ्च परार्था बुद्धिः संहत्यकारित्वात् स्वार्थः पुरुष इति । तथा सर्वार्थाध्यवसायकत्वात्त्रिगुणा बुद्धिस्त्रिगुणत्वादचेतनेति गुणानां तूपद्रष्टा पुरुष इत्यतो न सरूपः । अस्तु तर्हि विरूप इति । नात्यन्तं विरूपः । कस्मात् । शुद्धोऽप्यसौ प्रत्ययानुपश्यो यतः।प्रत्ययं बौद्धमनुपश्यति। तमनुपश्यन्नतदात्मापि तदात्मक इव प्रत्यवभासते। तथा चोक्तम् ।'अपरिणामिनी हि भोक्तृत्वशक्तिरप्रतिसंक्रमा च परिणामिन्यर्थे प्रतिसंक्रान्तेव तद्वृत्तिमनुपतति तस्याश्च प्राप्तचैतन्योपग्रहरूपाया बुद्धिवृत्तेरनुकारमात्रतया बुद्धिवृत्त्यविशिष्टा हि ज्ञानवृत्तिरित्याख्यायते ॥२०॥**

**भाष्यार्थः**–सूत्रांत जें ' दृशिमात्र ' असें ह्मटलें; याचा अर्थ, दृक्शक्तिरूपच (केवळ ज्ञानस्वरूपच, ) ह्मणजे वैशेषिकशास्त्रांत सांगितलेले जे रूप, रस, गंध इत्यादि विशेष गुण त्यांनीं तिन्ही कालांतही असंबद्ध, असा आहे. (तात्पर्य, जसें अग्नीचें ग्रहण ( ज्ञान ) उष्णस्पर्शानें जरी कदाचित् न झालें तथापि चक्षुरिंद्रियानें त्याचें ग्रहण होतें; तसें द्रष्टा ( पुरुष ) याचें ग्रहण इतर साधनानें होत नाहीं; तर तो केवळ ज्ञानानेंच ग्राह्य आहे, ह्मणून त्याचें ज्ञान हेंच स्वरूप आहे. ) तो पुरुष ( द्रष्टा ) बुद्धीचा प्रतिसंवेदी ह्मणजे साक्षी आहे. ( तात्पर्य, संवेदन ह्मणजे अर्थाकार वृत्ति, ती बुद्धीच्या ठिकाणीं आहे; ह्मणून ती संवेदिनी, व तिचें जें प्रतिसंवेदन ह्मणजे प्रतिबिंब, तें ज्या ठिकाणीं आहे तो प्रतिसंवेदी;

अर्थात् पुरुष हा उदक इत्यादिकांप्रमाणें प्रतिबिंबदर्शक व त्यांत विषयाकार बुद्धि ही प्रतिबिंब होय. ) तो पुरुष बुद्धीशीं सरूप (समानरूप) नाहीं, व अगदीं विरूपही नाहीं. त्यांत सरूप नाहीं असें ह्मणण्याचें कारण, बुद्धि ही ज्ञातविषय व अज्ञातविषय अशी दोन प्रकारची असल्यामुळें परिणामिनी (विनाशी) आहे. ती ज्ञाताज्ञातविषय अशी कीं, गो इत्यादिक चेतन व घट इत्यादिक अचेतन हे तिचे ज्ञात व अज्ञात विषय आहेत; ह्मणजे ज्यांचें बुद्धीनें ग्रहण केलें ते तिचे ज्ञात विषय; व ज्यांचें बुद्धीनें ग्रहण केलें नाहीं ते तिचे अज्ञात विषय होत. ह्मणून या ज्ञात व अज्ञात विषयांवरून बुद्धीचे ठिकाणीं परिणामित्व आहे असें अनुमान होतें. ( याचा अभिप्राय असा,—बुद्धि परिणामिनी आहे ह्मणून ती कधीं शब्दाद्याकार होतें व कधीं होतही नाहीं, हें बरोबर जुळतें; कारण, परिणामशब्दाचा अर्थ अवस्थांतर असा आहे. ) आतां पुरुष हा नेहमीं ज्ञातच आहे विषय ज्याचा अशा एकाच रूपानें असतो ह्मणून तो परिणामरहित आहे असें अनुमान होतें. (आतां पुरुषाचा स्वविषय जी बुद्धिवृत्ति ती प्रलयकालीं नसते ह्मणून पुरुषाला अज्ञातविषयत्व आलें व त्यानंतर परिणामित्वही आलेंच अशी शंका करूं नये; ) कारण, बुद्धिवृत्ति ही प्रलयकालीं पुरुषविषय असून ग्रहण केली जात नाहीं असें नाहीं ( तर ती त्या वेळेस नसतेच ह्मणून तिचें ग्रहण होत नाहीं.) यावरून पुरुषाला नेहमीं ज्ञातविषयत्व व त्यानंतर त्याला अपरिणामित्व हें, सिद्ध झालें. पुरुष बुद्धीशीं सरूप नाहीं यास आणखी दुसरें एक कारण असें कीं, बुद्धि ही परार्थ ह्मणजे आपल्याहून भिन्न अशाचें भोगादिसाधन आहे. कशावरून ? तर, (जशी शय्यादिकांच्या शयनादिकार्यास भूमि इत्यादिकांची अपेक्षा असते त्याप्रमाणें) बुद्धीचा विषयग्रहणादिरूप जो सर्व व्यापार तो इंद्रियादिकांच्या अपेक्षेनें (साहाय्यानें) होत असतो ह्मणून. व पुरुष हा स्वार्थ आहे (सुखादिक असतां त्याच्या प्रकाशाकरितां पुरुष इतर साहाय्य करणारांची अपेक्षा करीत नाहीं. तसेंच, सर्वार्थ ( सुखदुःखमोहात्मक जे तीन गुण त्यांप्रत ) ग्रहण करणारी बुद्धि सुद्धां तदाकार होते, ह्मणून तीही त्रिगुणच आहे असें अनुमान होतें, व ती त्रिगुण आहे ह्मणून पृथ्वी इत्यादिकांप्रमाणें चेतनरहित आहे हें एक बुद्धिपुरुषांचें सारूप्य नसण्याला तिसरें कारण. तसेंच पुरुष हा गुणांचा उपद्रष्टा आहे ( ह्मणजे साक्षात् विषय ग्रहण करणारी जी बुद्धि, तिच्या सान्निध्यानें बुद्धिवृत्तिप्रतिबिंब त्यांत पडतें एवढ्यानेंच तो गुणद्रष्टा होतो; बुद्धीसारखा गुणाकारपरिणामानें होत नाहीं; ) हें एक आणीक पुरुष बुद्धीशीं सरूप नसण्याचें कारण. तर मग पुरुष बुद्धीशीं विरूपच आहे कीं काय ? तर असें नाहीं; तर तो बुद्धीशीं अत्यंत विरूप नाहीं; कशावरून ? ज्या कारणास्तव तो शुद्ध म्हणजे त्रिगुणरहित असूनही प्रत्ययानुपश्य आहे ह्मणून. प्रत्ययानुपश्य याचा अर्थ, प्रत्यय म्हणजे बुद्धिवृत्ति, तिजप्रत पाहणारा. ज्या वेळेस तो त्या बुद्धिवृत्तीप्रत पाहतो त्या वेळेस तो वस्तुतः बुद्धीशीं असरूप असतांही तत्सरूप अशासारखा भासतो. (तात्पर्य, जास्वंदीच्या फुलावर स्फटिकमणि ठेविला तर तो जसा

जास्वंदीच्या फुलासारखा दिसतो; त्याप्रमाणें पुरुष बुद्धीचें अनुकरण करणारा होतो.)' असेंच पंचशिखाचार्यांनीं सांगितलें आहे कीं, ' भोक्तृशक्ति ही बुद्धीसारखी परिणाम पावणारी नाहीं, तशीच, जशी बुद्धि स्वविषयांत उपरक्त (तदाकार) होते त्याप्रमाणें भोक्तृशक्ति नाहीं; असें असून ती, परिणामी असा जो आपला विषय बुद्धि, तिच्या ठिकाणीं प्रतिबिंबरूपानें उपरक्त झाल्याप्रमाणें होऊन विषयाद्याकार जी बुद्धिवृत्ति तीप्रत चेतनासारखें करिते. नंतर प्राप्त झाली आहे चैतन्याची साम्यता जिला अशा बुद्धिवृत्तीचें अनुकरण करणारी एवढ्याचमुळें भोक्तृशक्ति बुद्धिवृत्तीशीं अगदीं अभिन्न आहे असें म्हणतात. ( सारांश, जसा निर्मळ पाण्यांत चंद्र निमग्न झालेला नसून आंत जें प्रतिबिंब पडलेलें असतें त्यामुळें तो निमग्न झाल्यासारखा वाटतो, त्याप्रमाणें चितिशक्ति ही असंक्रांत ( भिन्न ) असतांही तिच्यांत जें बुद्धिवृत्तिप्रतिबिंब पडलेलें असतें त्यामुळें ती बुद्धिस्वरूपाप्रत प्राप्त झाल्यासारखी होऊन बुद्धिवृत्तीचें अनुकरण करिते. ) ॥ २० ॥

आतां बुद्धीहून वेगळा द्रष्टा आहे याविषयीं सूत्रकार प्रमाण सांगतात,–

## तदर्थ एव दृश्यस्यात्मा ॥ २१ ॥

**सूत्रार्थः**–दृश्याचें स्वरूप पुरुषाच्या प्रयोजनाकरितांच आहे.

**भाष्यम्–दृशिरूपस्य पुरुषस्य कर्मविषयतामापन्नं दृश्यमिति तदर्थ एव दृश्यस्यात्मा भवति, स्वरूपम्भवतीत्यर्थः ॥ 'तत्स्वरूपं तु पररूपेण प्रतिलब्धात्मकम्भोगापवर्गार्थतायां कृतायां पुरुषेण न दृश्यत इति स्वरूपहानाद्दृश्यनाशः प्राप्तो नतु विनश्यति कस्मात्' ॥ २१ ॥**

**भाष्यार्थः**–दृशिरूप ( ज्ञानस्वरूप ) जो पुरुष त्याचें दर्शनरूप जें कर्म त्या कर्मविषयतेप्रत दृश्य प्राप्त झालें म्हणून त्या पुरुषाच्या भोग व अपवर्गरूप प्रयोजनाकरितांच दृश्याचा आत्मा म्हणजे स्वरूप आहे ॥ २१ ॥

शंका, जर तें दृश्यस्वरूप पुरुषाचें दर्शनरूप प्रयोजन ( कार्य ) केल्यामुळें त्या पुरुषप्रयोजनाविषयीं त्याला सत्ता (स्थिति अर्थात् विश्रांति) प्राप्त झाली; व भोग व अपवर्गरूप पुरुषार्थ केल्यामुळें पुरुषही त्याकडे पाहत नाहीं; म्हणून, गुणादिकांचा स्वरूपत्यागेंकरून अत्यंत उच्छेदच प्राप्त झाला; तो कां होत नाहीं ? त्यावर समाधान सांगतात,–

## कृतार्थम्प्रति नष्टमप्यनष्टन्तदन्यसाधारणत्वात् ॥ २२ ॥

**सूत्रार्थः**–तें दृश्य, ज्याला विवेकख्याति झाली आहे असल्या कृतार्थ पुरुषाप्रत जरी नष्ट ( व्यापाररहित ) झालें तथापि त्याचा संबंध सर्वत्र असल्यामुळें अन्य अकृतार्थ पुरुषांप्रत तें अनष्ट असतें.

'भाष्यम्—कृतार्थमेकं पुरुषं प्रति दृश्यमष्टमपि नाशं प्राप्तमप्यनष्टन्तदन्यपुरुषसाधारणत्वात् कुशलं पुरुषं प्रति नाशं प्राप्तमप्यकुशलान् पुरुषान् प्रत्यकृतार्थमिति तेषां दृशेः कर्मविषयतामापन्नं लभते एवं पररूपेणात्मरूपमिति । अतश्च दृग्दर्शनशक्त्योर्नित्यत्वादनादिः संयोगो व्याख्यात इति । तथा चोक्तम् । धर्मिणामनादिसंयोगाद्धर्ममात्राणामप्यनादिः संयोग इति ॥ २२ ॥ 'संयोगस्वरूपाभिधित्सयेदं सूत्रम्प्रववृते' ॥

**भाष्यार्थः**—बुद्धीनें संपविलें आहे प्रयोजन ज्याचें असें दृश्य ( गुणादिक ) एका ( मुक्त ) पुरुषांप्रत जरी नष्ट झालें ह्मणजे नाहींसें झालें तरी तें सर्वपुरुषसाधारण असल्यामुळें ( म्हणजे कृतार्थ पुरुषांला एक दृश्य व अकृतार्थ पुरुषांला दुसरेंच एक दृश्य असें नाहीं, तर सर्वसाधारण एकच दृश्य आहे; व त्या अकृतार्थपुरुषांचें त्यांस प्रयोजन असल्यामुळें ) तें नाश पावत नाहीं. (ह्मणजे जसें एकाद्या राजाचें राज्य नष्ट झालें ह्मणजे तें नाश पावतें असें नाहीं, तर तें दुसऱ्या राजाचें राज्य असतेंच. त्याप्रमाणें) मुक्तपुरुषाप्रत जरी नाहींसें झालें तथापि जे (अकृतार्थ) संसारी पुरुष असतात त्यांचें त्याला प्रयोजन असतेंच ह्मणून तें दृक्शक्तीच्या दर्शनरूपकर्मविषयतेप्रत प्राप्त होऊन पुरुषाच्या दर्शनरूपानें स्वरूपास प्राप्त होतें. याकरितांच दृक्शक्ति ( पुरुष ), दर्शनशक्ति (बुद्धि ) या दोहोंस नित्यता असल्यामुळें त्यांचा संयोगही अनादि असा सांगितला आहे. असेंच पूर्वी सांगितलें आहे कीं, 'धर्मी जे गुण त्यांचा जर पुरुषांशीं सह अनादि संयोग आहे; तर त्यांवर असणाऱ्या सामान्यधर्मांचाही अनादिच संयोग असला पाहिजे. ( तात्पर्य, सामान्यधर्म व धर्मी यांचा नेहमीं अभेद असतो; त्यांत धर्मी जे गुण त्यांना नित्यत्व असल्यावांचून त्यांवर असणाऱ्या सामान्यधर्मांस अनादित्व संभवत नाहीं. ) ॥ २२ ॥

द्रष्टा व दृश्य यांचें स्वरूप सांगितलें; आतां त्यांच्या संयोगाचें स्वरूप सांगण्याकरितां ह्या पुढील सूत्राची प्रवृत्ति आहे,—

## स्वस्वामिशक्त्योः स्वरूपोपलब्धिहेतुः संयोगः ॥ २३ ॥

**सूत्रार्थः**—स्व ह्मणजे दृश्य अर्थात् जड, व स्वामी ह्मणजे द्रष्टा अर्थात् चेतन, या दोहोंची क्रमानेंच जी भोग्य व भोक्ता अशी प्रतीति, याचें कारण स्वस्वामिभावनामक संयोग आहे.

भाष्यम्—'पुरुषः स्वामी दृश्येन स्वेन दर्शनार्थं संयुक्तस्तस्मात्संयोगाद्दृश्यस्योपलब्धिर्या स भोगः । या तु द्रष्टुः स्वरूपोपलब्धिः सोऽपवर्गः । दर्शनकार्यावसानः संयोग इति दर्शनं वियोगस्य कारणमुक्तम् । दर्शनमदर्शनस्य प्रतिद्वन्द्वीत्यदर्शनं सं-

योगनिमित्तमुक्तम् । नात्र दर्शनं मोक्षकारणमदर्शनाभावादेव बन्धाभावः स मोक्ष इति दर्शनस्य भावे बन्धकारणस्यादर्शनस्य नाश इत्यतो दर्शनज्ञानङ्कैवल्यकारणमुक्तम्। किञ्चेदमदर्शनं नाम किं गुणानामधिकार आहोस्विद्दृशिरूपस्य स्वामिनो दर्शितविषयस्य प्रधानचित्तस्यानुत्पादः स्वस्मिन् दृश्ये विद्यमाने यो दर्शनाभावः किमर्थवत्ता गुणानामथाविद्या स्वचित्तेन सह निरुद्धा स्वचित्तस्योत्पत्तिबीजं किं स्थितिसंस्कारक्षये गतिसंस्काराभिव्यक्तिः । यत्रेदमुक्तम् । प्रधानं स्थित्यैव वर्तमानं विकाराकरणादप्रधानं स्यात्तथा गत्यैव वर्तमानं विकारनित्यत्वादप्रधानं स्यात् । उभयथा चास्य वृत्तिः प्रधानव्यवहारं लभते नान्यथा कारणान्तरेष्वपि कल्पितेष्वेष समानश्चर्चः । दर्शनशक्तिरेवादर्शनमित्येके 'प्रधानस्यात्मख्यापनार्था प्रवृत्तिः' इति श्रुतेः। सर्वबोध्यबोधसमर्थः प्राक् प्रवृत्तेः पुरुषो न पश्यति सर्वकार्यकरणसमर्थं दृश्यन्तदा न दृश्यत इति उभयस्याप्यदर्शनन्धर्म इत्येके । तत्रेदं दृश्यस्य स्वात्मभूतमपि पुरुषप्रत्ययमपेक्ष्य दर्शनं दृश्यधर्मत्वेन भवति तथा पुरुषस्यानात्मभूतमपि दृश्यप्रत्ययापेक्षं पुरुषधर्मत्वेनेवादर्शनमवभासते। दर्शनं ज्ञानमेवादर्शनमिति केचिदभिदधति । इत्येते शास्त्रगता विकल्पास्तत्र विकल्पबहुत्वमेतत्सर्वपुरुषाणां गुणसंयोगे साधारणविषयं यस्तु प्रत्यक्चेतनस्य स्वबुद्धिसंयोगः ॥ २३ ॥

**भाष्यार्थः**—पुरुष हा स्वामी व दृश्य हें त्याचें स्व ( स्वकीय ); या दृश्याशीं पुरुष हा स्वदर्शनाकरितां संयुक्त ( संयोगयुक्त ) होतो. त्या संयोगापासून जी दृश्याची उपलब्धि ह्मणजे प्राप्ति किंवा लाभ, ह्यासच भोग असें ह्मणतात; व जी द्रष्टा ह्मणजे पुरुष याच्या स्वरूपाची उपलब्धि तोच अपवर्ग ह्मणजे मोक्ष होय. संयोग हा पुरुषाच्या दर्शनरूपकार्यापर्यंतच असतो; ह्मणून पुरुषदर्शन हें दृश्याच्या वियोगाला निमित्त असें या सूत्रांत सांगितलें; व तसेंच दर्शन हें अदर्शनाचें विरोधी याकरितां पुरुषदर्शनाचा अभावच संयोगास हेतु असेंही ह्मटलें. आतां आह्मी या शास्त्रांत दर्शन ( तत्त्वज्ञान ) मोक्षास कारण म्हणत नाहीं; तर पुढें ज्याचें स्वरूप सांगावयाचें आहे अशा अदर्शनाच्या अभावामुळेंच जो पुरुषाला बंधाचा ( दृश्यसंयोगाचा ) अभाव तो कारण, व तोच मोक्ष असें आम्ही मानितों. ( यावरून मोक्षाला कांहींएक निमित्त नसल्यामुळें म्हणजे कांहींएक निमित्तानें उत्पन्न होतो असें नसल्यामुळें त्याला नित्यत्व सिद्ध झालें. ) तसेंच दर्शनाचा भाव ( सत्ता ) असतां बंधास कारण जें अदर्शन त्याचा नाश होतो, म्हणून दर्शनज्ञान हें मोक्षाला कारण असें या शास्त्रांत सांगितलें. ( आतां पुढें उत्तरसूत्रानें असाधारण ( मुख्य ) जें संयोगहेतु अदर्शन तें सांगावयाचें आहे; त्यापूर्वी येणाऱ्या सर्व संशयांचें निराकरण करण्याकरितां आठ प्रश्न क्रमानें विचारतात,—) १ पहिला प्रश्न, काय, हें 'अदर्शन' ह्मणजे तुह्मी . गुणांच्या अधि-

कारास. ( कार्य करण्याच्या सामर्थ्यास ) ह्मणतां ? २ किंवा, ज्ञानस्वरूप जो स्वामी ( पुरुष ) त्याच्या दर्शितविषय ह्मणजे स्वामीस दाखविले आहेत शब्दादिविषय ज्यानें अशा चित्ताची अनुत्पत्तिच, ह्मणजे चित्तांत दृश्य, पुरुषार्थरूपानें शब्दादिवृत्ति व सत्वपुरुषान्यतावृत्ति असतां जो चित्तवृत्तींचा अभाव त्याला अदर्शन ह्मणतां ? ३ किंवा, गुणांची अर्थवत्ता (ह्मणजे सत्कार्यवादाच्या सिद्धीकरितां भावी जे भोग व अपवर्ग यांचें स्वकारण जे गुण यांचे ठिकाणीं अवस्थान हेंच अदर्शन ? ४ अथवा, अविद्या प्रलयकालीं स्वचित्ताबरोबर गुणांच्या ठिकाणीं लीन झालेली वासनारूपानें स्वाश्रयचित्ताच्या उत्पत्तीला बीज ( कारण, ) अर्थात् अविद्यावासनाच अदर्शन मानितां कीं काय ? ( हाच पक्ष सिद्धांती ठरणार आहे. ) ५ किंवा, साम्यपरिणामाला हेतु जो प्रधानाच्या ठिकाणीं असणारा स्थितिनांवाचा संस्कार त्याचा नाश असतां, महत् , अहंकार इत्यादि विसदृशपरिणामाला हेतु जो गतिनांवाचा संस्कार त्याची अभिव्यक्तिच अदर्शन कीं काय ? हे स्थिति व गतिनांवांचे दोन संस्कार इतर ठिकाणींही सांगितले आहेत; कीं, प्रधान जर केवळ स्थितीनेंच राहील तर विकार उत्पन्न करीत नसल्यामुळें तें प्रधान होणार नांहीं; ( कारण, कोणत्याही वस्तूचें जें मूलकारण त्याला प्रधान म्हणतात. ) तसेंच जर केवळ गतीनेंच राहील तर त्या वेळेस महदादिकांना सुद्धां नित्यत्व येऊन या सर्वांत मूलकारण कोणतें ? याविषयीं संशय उत्पन्न होऊन तें अप्रधान होईल ! याकरितां तें केवळ एकाच संस्कारानें राहत नाहीं तर तें स्थिति व गति या दोन्ही संस्कारांमिळून राहतें, म्हणून त्याला 'प्रधान' असा व्यवहार प्राप्त होतो; अन्य तऱ्हेनें प्राप्त होत नाहीं. आतां हा स्थितिगतींचा विचार केवळ मूळकारणाविषयींच आहे असें नाहीं; तर, विकाररूप जीं महदादिक अन्य कारणें त्यांविषयीं सुद्धां हा विचार समानच आहे. तो विचार असा,—जर मृत्तिका इत्यादिक केवळ स्थितीनेंच ( निवृत्तीनेंच ) राहील ह्मणजे कांहीं विकार उत्पन्न करणार नाहीं; तर त्या वेळेस घटाची उत्पत्ति न झाल्यामुळें मृत्तिका इत्यादिकांना कारणत्व येणार नाहीं. तसेंच जर मृत्तिका इत्यादिक केवळ गतीनेंच ( प्रवृत्तीनेंच ) राहील तर त्या वेळेस मृत्तिका व घट या दोघांला समानच काल असल्यामुळें कार्य अमुक व कारण अमुक अशी व्यवस्था होणार नाहीं. याकरितां विकाररूपकारणांची सुद्धां स्थिति व गति या उभयसंस्कारांनींच अवस्थिति आहे. ६ किंवा, पुरुषाकारणें आपलें स्वरूप दाखविण्याविषयीं जें प्रधानाचें सामर्थ्य तेंच अदर्शन, असें एका आचार्यांचें मत आहे; तें अदर्शन तुह्मीं ह्मणतां कीं काय ? 'पुरुषाकारणें आत्मस्वरूप दाखवावें याकरितां प्रधानाची प्रवृत्ति आहे' अशी श्रुतिही यास प्रमाण आहे. ७ अथवा, सर्वबोधाविषयीं समर्थ असतां पुरुष प्रधानप्रवृत्तीच्या पूर्वी पहात नाहीं; हें एक पुरुषसंबंधी अदर्शन, आणि दुसरें, सर्वकार्यांच्या उत्पत्तीविषयीं समर्थ असूनही दृश्य (प्रधान) प्रधानप्रवृत्तीच्या पूर्वी पुरुषानें पाहिलें जात नाहीं हें दृश्याच्या संबंधानें अदर्शन; याप्रमाणें दोघांचेंही अदर्शन हा धर्म, व हेंच अदर्शन असें

कोणी एकाचें मत आहे; तरं तें अदर्शन तुह्मी ह्मणतां कीं काय ? तर हें अदर्शन ह्मणतां येत नाहीं; कारण, त्या दोन्ही अदर्शनांमध्यें हें एक अदर्शन दृश्यस्वरूपभूत असलें तरी तें पुरुषबोधाच्या अभावामुळें दृश्यधर्मत्वानें दर्शन होतें. तसेंच, पुरुष हा निर्धर्म व सदा प्रकाशस्वरूप असल्यामुळें अनात्मभूत असें सुद्धां अदर्शन पुरुषधर्मत्वानेंच लौकिकबुद्धीनें भासमान होतें; याचें कारण, दृश्याच्या ठिकाणीं असणाऱ्या प्रत्ययाचा अभाव आहे ह्मणून. ८ किंवा, शब्दादिकांचें दर्शनज्ञानच अदर्शन असें कोणी म्हणतात तें ? असें सांख्यशास्त्रामध्यें अनेक प्रकारचे अज्ञानभेद सांगितले आहेत. त्यांत अदर्शनाविषयीं जे अनेक विकल्प व अनेक भेद सांगितले आहेत; हे गुणपुरुषांच्या सामान्यसंयोगास हेतु ह्मटले पाहिजेत, विशेषसंयोगास नाहींत; कारण, गुणांचा संयोग सर्वपुरुषसाधारण असल्यामुळें अनेक पुरुषांस अनेक विचित्र भोग मिळण्याची उपपत्ति होऊं शकत नाहीं; याकरितां जो बुद्धीचा व चेतनाचा प्रत्यक् ह्मणजे असाधारण ( विशेष ) संयोग ( एकेक चेतनाचा एकेक स्वबुद्धीशीं संयोग ) तो भोगवैचित्र्यास कारण आहे ॥२३॥

आतां त्या बुद्धि व चेतनाच्या विशेषसंयोगास कारण कोण, तें सांगतात,—

## तस्य हेतुरविद्या ॥ २४ ॥

**सूत्रार्थः**—त्या संयोगाचें कारण अविद्या आहे.

**भाष्यम्—बुद्धिसंयोगस्य हेतुर्विपर्ययज्ञानवासनेत्यर्थः । विपर्ययज्ञानवासनावासिता न कार्यनिष्ठां पुरुषख्यातिं बुद्धिः प्राप्नोति । साधिकारा पुनरावर्तते । सा तु पुरुषान्यताख्यातिपर्यवसाना कार्यनिष्ठां प्राप्नोति चरिताधिकारा निवृत्तादर्शना बन्धकारणाभावान्न पुनरावर्तते । अत्र कश्चित् षण्डकोपाख्यानेनोद्घाटयति 'मुग्धया भार्ययाऽभिधीयते षण्डक आर्यपुत्रापत्यवती मे भगिनी किमर्थन्नाहमिति । स तामाह मृतस्तेऽहमपत्यमुत्पादयिष्यामीति तथेदं विद्यमानं ज्ञानं चित्तनिवृत्तिं न करोति विनष्टं करिष्यतीति का प्रत्याशा'। तत्राचार्यदेशीयो वक्ति । ननु बुद्धिनिवृत्तिरेव मोक्षोऽदर्शनकारणाभावात् । बुद्धिनिवृत्तिस्तच्चादर्शनं बन्धकारणं दर्शनान्निवर्तते । तत्र चित्तनिवृत्तिरेव मोक्षः किमर्थमस्थान एवास्य मतिविभ्रमः ॥ २४ ॥ 'हेयं दुःखं हेयकारणञ्च संयोगाख्यं सनिमित्तमुक्तमतः परं हानं वक्तव्यम्' ॥**

**भाष्यार्थः**—पुरुषाचा व बुद्धीचा संयोग होण्यास कारण ( अविद्या ह्मणजे ) विपर्ययज्ञानवासना होय. ( तात्पर्य, इतरसर्गांतील अविद्या स्वचित्ताबरोबर निरुद्ध झाली असतांही प्रधानाच्या ठिकाणीं तिची वासना असतेच; त्या वासनेनें युक्त असें तें प्रधान त्या त्या पुरुषाशीं संयोग पावणारी अशीच बुद्धि उत्पन्न करितें. याप्रमाणेंच पूर्व पूर्व सर्गांत समजावें. ) याप्रमाणें ती बुद्धि विपर्ययज्ञानवासनेच्या जोरानें पुरुषख्यातिरूप कार्यनिष्ठेप्रत

ह्मणजे आपल्या कर्तव्याच्या परमावधीप्रत प्राप्त होत नाहीं ह्मणून ती आपलें काम शिलक आहे तेथपर्यंत पुनः पुनः पुरुषाशीं संयुक्त होते. याप्रमाणें ती पुरुषान्यताख्यातीपर्यंत राहून नंतर परवैराग्य उत्पन्न झाल्यामुळें तिचें कर्तव्य समाप्त होतें. नंतर ती, सर्व कार्यें समाप्त होऊन अविद्येची निवृत्ति झाली ह्मणून संयोगनांवाच्या बंधाचें कारणही नष्ट झालें यामुळें पुनः पुरुषाशीं संयुक्त होत नाहीं. येथें कोणीएक ( नास्तिक ) षंडकोपाख्यानाचा ( एका नपुंसकपुरुषाच्या कथेचा) दृष्टांत देऊन उपहासपूर्वक एक शंका करितो; त्यांतील दृष्टांत असा,– ' एक सुंदर स्त्री आपल्या नपुंसक अशा नवऱ्यास ह्मणते, हे आर्यपुत्र ! (हें नवऱ्यास संबोधन देत असतात.) अहो स्वामी ! माझ्या बहिणीस मुलें आहेत, मला कां नाहींत ? त्यावर तो नपुंसक बोलतो; मी मेल्यावर तुझ्या ठिकाणीं अपत्य उत्पन्न करीन.' ' या दृष्टांताप्रमाणें, हें विद्यमान असणारें ज्ञान चित्ताची निवृत्ति करीत नाहीं; तर नष्ट झालेलें ज्ञान चित्तनिवृत्ति करील असें तुह्मी ह्मणतां; तर याविषयीं आशा कशाला बाळगिली पाहिजे ?' यावर एक थोड्या योग्यतेनें कमी नाहींतर आचार्यांच्याच[1][2] बरोबरीचा असा एक पुरुष (सिद्धांत्येकदेशी) बोलतो,– ' अरे ! आह्मी ज्ञान हें मोक्षाला साक्षात् कारण आहे असें ह्मणत नाहींत; तर बुद्धिनिवृत्ति; ह्मणजे ज्ञानानें बुद्धिनिवृत्ति होऊन बुद्धिनिवृत्तिद्वारा मोक्ष होतो असें आमचें मत; कारण, अदर्शनाला ( बंधाला ) कारण जो बुद्धिसंयोग त्याचा अभाव आहे ह्मणून. ( ह्मणजे आह्मी कारणाचीच निवृत्ति मानतों तेव्हां कारणाचा अभाव असतां कार्य (बंध) मुळींच उत्पन्न होत नाहीं. ) एवंच मोक्षाला साक्षात् कारण बुद्धिनिवृत्ति होय. आणि तें बंधाचें कारण अदर्शन विवेकदर्शनानें निवृत्त होतें. ' यावर मुख्य आचार्य ह्मणतात; कीं, ' चित्तनिवृत्तिच मोक्ष ' असेंच आमचें मत; परंतु या नास्तिकाच्या भ्रममूलक शंकेंत कांहीं अर्थ नसल्यामुळें उत्तर देण्याचें मुळीं कारणच नाहीं. ( ह्मणजे त्याची उपेक्षा करावयाची असतां समाधान केलें ह्मणून आचार्यदेशीय असें ह्मटलें. )'

हेय ह्मणजे दुःख व हेयाचा हेतु जो बुद्धिसंयोग असे दोन व्यूह, त्यांचें कारण जी अविद्या तीसुद्धां सांगितले; आतां पुढें तिसरा व्यूह हाननांवाचा सांगतात,–

## तदभावात्संयोगाभावो हानन्तद्दृशेः कैवल्यम् ॥ २५ ॥

**सूत्रार्थः**–त्या अविद्येचा नाश झाल्यामुळें जो दृश्य व द्रष्टा यांच्या संयोगाचा नाश, त्यालाच हान ( त्याग ) असें ह्मणतात; व हाच पुरुषाला मोक्ष होय ( मोक्षाचें स्वरूप याशिवाय आणीक नाहीं ).

---

**सूत्र २४ टीपः**–[1] जो अनेक शास्त्रार्थ पाहून त्याप्रमाणें लोकांस आचरण करण्यास लावतो व स्वतःही त्याप्रमाणें आचरण करितो; त्यास आचार्य ह्मणतात. असें वायुपुराणांत सांगितलें आहे. [2] पूर्वी जें आचार्यांचें लक्षण सांगितलें त्यापेक्षां ज्यांत थोडी न्यूनता असेल तो आचार्यदेशीय ह्मणजे सिद्धांती असून थोड्या अंशानें पूर्वपक्षी.

**भाष्यम्**–तस्यादर्शनस्याभावाद् बुद्धिपुरुषसंयोगाभावः। आत्यन्तिको बन्धनोपरम इत्यर्थः। एतद्धानन्तद्दृशेः कैवल्यं पुरुषस्यामिश्रीभावः। पुनरसंयोगो गुणैरित्यर्थः। दुःखकारणनिवृत्तौ दुःखोपरमो हानन्तदा स्वरूपप्रतिष्ठः पुरुष इत्युक्तम् ॥ २५ ॥ 'अथ हानस्य कः प्राप्त्युपाय इति'॥

**भाष्यार्थः**–त्या अदर्शनाचा म्हणजे अविद्येचा विनाश झाला ह्मणजे बुद्धि व पुरुष यांचा जो संयोग त्याचाही विनाश होतो ह्मणजे सर्वथा निवृत्ति होते असा अभिप्राय. यालाच हान असें म्हणतात. तें हानच पुरुषाला कैवल्य ह्मणजे पुरुषाचा दुःखादिगुणांशीं कधींही संबंध न होणें असा अर्थ. याचें तात्पर्य असें कीं, दुःख प्राप्त होण्याचें कारण जो बुद्धिसंयोग त्याची निवृत्ति झाल्यामुळें दुःखाचाही शेवट होणें, हेंच हान होय. दुःखनिवृत्ति झाली म्हणजे पुरुष केवल प्रकाशमय अशा स्वरूपानें असतो असें (स० सू० ३ त) सांगितलें. (ह्मणजे 'तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्' या सूत्रांतील 'तदा' या पदानें, ह्या सूत्रानें सांगितलेली जी दुःखनिवृत्ति, ती होते त्या वेळेस, असा अर्थ समजावा. ह्या हाननामक व्यूहाचा (मोक्षाचा) पुढें चवथ्या ( कैवल्य ) पादांत पुष्कळ विस्तार सांगणार आहेत) ॥ २५ ॥

आतां हानप्राप्तीचा ( मोक्षप्राप्तीचा ) उपाय कोणता तो सांगतात,–

## विवेकख्यातिरविप्लवा हानोपायः ॥ २६ ॥

**सूत्रार्थः**–' गुण भिन्न व आत्मा भिन्न ' अशा प्रकारचें जें भेदज्ञान, त्याला विवेकख्याति ह्मणतात. व्युत्थानअवस्थेंत उत्पन्न होणारीं जीं विघ्नें तीं, मध्यें उत्पन्न न होतां जर ही विवेकप्रज्ञा उत्पन्न झाली, तर दृश्याचा त्याग सहज होतो. हा हानोपाय मुख्य आहे.

**भाष्यम्**–सत्वपुरुषान्यताप्रत्ययो विवेकख्यातिः। सा त्वनिवृत्तमिथ्याज्ञाना प्लवते। यदा मिथ्याज्ञानन्दग्धबीजभावं वन्ध्यप्रसवं संपद्यते तदा विधूतक्लेशरजसः सत्वस्य परे वैशारद्येऽपरस्यां वशीकारसंज्ञायां वर्तमानस्य विवेकप्रत्ययप्रवाहो निर्मलो भवति सा विवेकख्यातिरविप्लवा हानस्योपायः। ततो मिथ्याज्ञानस्य दग्धबीजभावोपगमः पुनश्चाप्रसव इत्येष मोक्षस्य मार्गो हानस्योपाय इति ॥ २६ ॥

**भाष्यार्थः**–सत्व ह्मणजे बुद्धि व पुरुष हे परस्पर अगदीं भिन्न आहेत असें जें भेदज्ञान, त्यास विवेकख्याति ह्मणतात. आतां ती विवेकख्याति जेथपर्यंत मिथ्याज्ञान (बुद्धि व पुरुष एकच आहेत असें भ्रमानें ऐक्यज्ञान ) समूळ नष्ट झालें नाहीं, तेथपर्यंत मध्यें मध्यें मिथ्याज्ञानाच्या संस्कारानें पराभव पावते ( बुद्धि व पुरुष हे भिन्न आहेत असा विचार होत नाहीं ). परंतु जेव्हां मिथ्याज्ञान जळालेल्या बीजाप्रमाणें ज्यापासून कांहीं फल उत्पन्न होणार नाहीं असें अगदीं निरुपयोगी होईल तेव्हां दूर झाली आहे क्लेशरूप धूळ ज्याची अशा व ह्मणूनच परवैशारद्य ह्मणजे ( स० सू० ४० त ) सांगितलेल्या इच्छाऽप्रतिघातरूप परव-

शीकारसंज्ञेचे ठिकाणीं वर्तमान असणाऱ्या बुद्धिसत्वाचा विवेकख्यातीचा ओघ स्वच्छ होतो; ह्मणून तिला अविप्लव ( मिथ्याज्ञानरहित ) अशी विवेकख्याति ह्मणतात; व ही हानाचा ( दुःखनिवृत्तीचा ) मुख्य उपाय होय. त्या विवेकख्यातीमुळें मिथ्याज्ञान जळलेल्या बीजाप्रमाणें होतें ह्मणजे अगदीं नाहींसें होतें, ह्मणून हा विवेकख्यातिरूप मार्ग बुद्धिनिवृत्तिरूप मोक्षाला सांगितला आहे ॥ २६ ॥

आतां अविप्लव विवेकख्यातीचें स्वरूप सांगतात,–

## तस्य सप्तधा प्रान्तभूमिः प्रज्ञा ॥ २७ ॥

**सूत्रार्थः**–ज्याला अविप्लव ( विघ्नांवांचून ) विवेकख्याति उत्पन्न झाली आहे अशा योग्याच्या प्रज्ञेची प्रकृष्ट अवस्था सातप्रकारची आहे.

**भाष्यम्**–तस्येति प्रत्युदितख्यातेः प्रत्याम्नायः सप्तधेति अशुद्ध्यावरणमलापगमाच्चित्तस्य प्रत्ययान्तरानुत्पादे सति सप्तप्रकारैव प्रज्ञा विवेकिनो भवति । तद्यथा । परिज्ञातं हेयन्नास्य पुनः परिज्ञेयमस्ति । क्षीणा हेयहेतवो न पुनरेतेषां क्षेतव्यमस्ति । साक्षात्कृतं निरोधसमाधिना हानम् । भावितो विवेकख्यातिरूपो हानोपाय इत्येषा चतुष्टयी कार्यविमुक्तिः । प्रज्ञायाश्चित्तविमुक्तिस्तु त्रयी, चरिताधिकारा बुद्धिगुणा गिरिशिखरतटच्युता इव ग्रावाणो निरवस्थानाः स्वकारणे प्रलयाभिमुखाः सह तेनास्तं गच्छन्ति । न चैषां विप्रलीनानां पुनरस्त्युत्पादः प्रयोजनाभावादिति । एतस्यामवस्थायां गुणसंबन्धातीतः स्वरूपमात्रज्योतिरमलः केवली पुरुष इत्येतां सप्तविधां प्रान्तभूमिप्रज्ञामनुपश्यन् पुरुषः कुशल इत्याख्यायते । प्रतिप्रसवेऽपि चित्तस्य मुक्तः कुशल इत्येव भवति गुणातीतत्वादिति सिद्धा भवति विवेकख्यातिर्हानोपाय इति ॥ २७ ॥ 'न च सिद्धिरन्तरेण साधनमित्येतदारभ्यते' ॥

**भाष्यार्थः**–सूत्रांत जें ' तस्य ' असें ' तद् ' शब्दाचें षष्ठ्यंत रूप आहे, त्यांतील प्रकृतिभूत तच्छब्दानें पूर्वसूत्रांत सांगितलेल्या हानोपायाचें ग्रहण करावयाचें; ( विवेकख्यातीचें ग्रहण करावयाचें नाहीं; कारण, ' तस्य ' असा पुंलिंगनिर्देश अनुपपन्न होईल. असेंच तच्छब्दानें ज्याला विवेकख्याति उत्पन्न झाली आहे अशा पुरुषाचेंही ग्रहण करितां येत नाहीं; कारण, पुरुषाचें ग्रहण पूर्वसूत्रांत नाहीं. ) ' सप्तधा ' असें जें सूत्रांत ह्मटलें आहे त्याचा अर्थ,–अशुद्धि ह्मणजे अविद्या तीच स्वच्छपदार्थाला झांकून टाकणारा मल, तो दूर झाल्यामुळें चित्ताच्या विवेकख्यातीहून अन्य प्रत्ययांची ( ज्ञानांची ) उत्पत्ति न झाली असतां ( परवैराग्यानें सिद्ध झालेल्या निरोधयोगानंतर ज्याला ज्ञान झालें आहे अशा योग्याची सातप्रकारचीच प्रज्ञा ( बुद्धि किंवा ओळखण्याची खूण ) असते. ते सात प्रकार असे,–१ म्यां हेयाचें ( दुःखाचें ) स्वरूप काय आहे तें सर्व जाणलें; आतां त्यांतील पुनः

समजून घेण्याचें कांहीं बाकी राहिलें नाहीं; २ सर्वहेयहेतूंचा ( दुःखकारणांचा )' नाश झाला; आतां त्यांच्यामध्यें ज्याचा नाश व्हावयाचा असा एकही हेयहेतु बाकी राहिला नाहीं. ३ निरोधसमाधीनें संपादन करावयाचा जो मोक्ष तो ( संप्रज्ञातसमाधीनें ) साक्षात् केला. ४ व मोक्षाचा उपाय जी विवेकख्याति तीही म्यां संपादन केली. असे चार प्रकार प्रांतभूमिप्रज्ञेचे ( उत्कृष्ट आहे फल ज्यांचें अशा अवस्थांतील प्रज्ञेचे ) विषय आहेत. यांनाच कार्यविमुक्ति (जीवन्मुक्ति ) ह्मणतात. चित्तविमुक्ति ह्मणजे परममुक्ति सुद्धां प्रांतभूमिप्रज्ञेचा विषय असून ती तीन प्रकारची आहे. ते तीन प्रकार असे,–१ 'माझी बुद्धि कृतार्थ झाली' अशी एक कृतार्थ बुद्धि. ( ही परवैराग्यरूपा चित्तनाशाची पहिली भूमिका ( अवस्था ). २ बुद्धीचे जे संसार-सुख दुःखादि गुण ते, सत्वादिगुणमयप्रकृतींत लीन होत असतां चित्तासहित अत्यंतलयाला जातात. यास दृष्टांत, जशा पर्वताच्या शिखरापासून निसटलेल्या शिळा वर राहूं शकत ना-हींत ह्मणून मध्यें कोठें न अडकतां आपल्या मूळ ठिकाणीं येऊन पडतात, त्याप्रमाणें. ( ही लिंगशरीराची विनाश पावणारी दुसरी अवस्था.) ३ मोक्षरूप पुरुषार्थ समाप्त होऊन कांहीं कारण न राहिल्यामुळें ह्या प्रकृतींत लीन झालेल्या गुणांची मुळीं उत्पत्तिच होत नाहीं; ह्मणून या अशा अवस्थेमध्यें पुरुष बुद्ध्यादिगुणांच्या संबंधानें रहित, केवळ ज्योतिस्स्वरूप ( प्रकाशमय ), निर्मल ( अविद्यादिमलरहित ) व मोक्षाचा विभागी असा होतो. अशा या सात प्रकारच्या बुद्धिवृत्तीप्रत जीवन्मुक्त पुरुष केवळ साक्षिभावेंकरूनच पाहतो; ( अर्थात् अभिमानानें पाहत नाहीं; ) ह्मणून त्याला कुशल ह्मणजे कल्याणयुक्त असें उपचारानें ह्म-णतात. व चित्ताचा अत्यंत लय झाल्यावर तर तो मुख्यच कुशल होतो; ( म्हणजे परममुक्त होतो; ) कारण सत्वादिक सर्वगुणांचा त्या वेळेस वियोग झालेला असतो ॥ २७ ॥

आतां विवेकख्याति जर अविप्लव अशी सिद्ध झाली तर ती दुःखनिवृत्तीचा उपाय होईल; परंतु तिची सिद्धि साधनावांचून कांहीं होणार नाहीं ह्मणून या पुढील सूत्राचा आरंभ केला आहे,–

## योगाङ्गानुष्ठानादशुद्धिक्षये ज्ञानदीप्तिराविवेकख्यातेः ॥ २८ ॥

**सूत्रार्थः**–योगाच्या अंगांचें अनुष्ठान ( सांगितल्याप्रमाणें आचरण ) केलें असतां ज्ञानप्राप्ति होण्याला जे मध्यें प्रतिबंध आहेत त्यांचा ( चित्तमलाचा ) सर्वप्रकारें नाश होऊन विवेकख्यातीपर्यंत ज्ञानाची ज्योति प्रदीप्त होत होत शेवटीं त्यापासून विवेकख्याति उत्पन्न होते.

**भाष्यम्**–योगाङ्गान्यष्टावभिधायिष्यमाणानि तेषामनुष्ठानात् पञ्चपर्वणो वि-पर्ययस्याशुद्धिरूपस्य क्षयो नाशस्तत्क्षये सम्यग्ज्ञानस्याभिव्यक्तिः । यथा यथा च साधनान्यनुष्ठीयन्ते तथा तथा तनुत्वमशुद्धिरापद्यते। यथा यथा च क्षीयते तथा तथा

क्षयक्रमानुरोधिनी ज्ञानस्यापि दीप्तिर्विवर्द्धते । सा खल्वेषा विवृद्धिः प्रकर्षमनुभवति त्वाविवेकख्यातेरागुणपुरुषस्वरूपविज्ञानादित्यर्थः । योगाङ्गानुष्ठानमशुद्धेर्वियोगकारणं यथा परशुश्छेद्यस्य, विवेकख्यातेस्तु प्राप्तिकारणं यथा धर्मः सुखस्य, नान्यथा कारणम् । कति चैतानि कारणानि शास्त्रे भवन्ति । नवेत्याह । तद्यथा, 'उत्पत्तिस्थित्यभिव्यक्तिविकारप्रत्ययाप्तयः ॥ वियोगान्यत्वधृतयः कारणं नवधा स्मृतम्'इति ॥ तत्रोत्पत्तिकारणं मनो भवति ज्ञानस्य । स्थितिकारणं मनसः पुरुषार्थता शरीरस्येवाहार इति । अभिव्यक्तिकारणं यथा रूपस्यालोकः। विकारकारणं मनसो विषयान्तरं यथाग्निः पाक्यस्य । प्रत्ययकारणं धूमज्ञानमग्निज्ञानस्य । प्राप्तिकारणं योगाङ्गानुष्ठानं विवेकख्यातेः । वियोगकारणं तदेवाशुद्धेः । अन्यत्वकारणं यथा सुवर्णस्य सुवर्णकारः । एवमेकस्य स्त्रीप्रत्ययस्याविद्या मूढत्वे द्वेषो दुःखत्वे रागः सुखत्वे तत्त्वज्ञानं माध्यस्थे धृतिकारणं शरीरमिन्द्रियाणां तानि च तस्य । महाभूतानि शरीराणान्तानि च परस्परं सर्वेषां तैर्यग्यौनमानुषदैवतानि च परस्परार्थत्वादित्येवं नव कारणानि । तानि च यथासम्भवं पदार्थान्तरेष्वपि योज्यानि । योगाङ्गानुष्ठानं तु द्विधैव कारणत्वं लभते इति ॥ २८ ॥ 'तत्र योगाङ्गान्यवधार्य्यन्ते' ॥

भाष्यार्थः—योगाचीं अंगें ( साधनें ) आठ पुढें सांगावयाचीं आहेत, त्यांच्या अनुष्ठानानें (त्या त्या अंगांत सांगितल्याप्रमाणें वागल्यानें) पांच आहेत पर्वे ह्मणजे पायऱ्या ज्याला अशा मलरूप विपर्ययाचा ( अविद्यादि पांच क्लेशांचा ) नाश होतो; त्या विपर्ययांचा नाश झाला असतां उत्तम ज्ञान प्राप्त होतें. जसें जसें साधनाचें अनुष्ठान करावें तसा तसा विपर्ययरूप मल कमी होतो; जसा जसा तो मल कमी होत जातो तशी तशी क्षयाच्या क्रमाला अनुसरून ज्ञानाचीही दीप्ति ( प्रकाश अथवा अतिसूक्ष्माचेंही ग्रहण करितां येणें ) अधिकाधिक वाढत जाते. ह्मणजे जितका मलाचा नाश तितकीच अधिक दीप्तीची वृद्धि होत जाते. याप्रमाणें ती ज्ञानदीप्ति विवेकख्यातीपर्यंत सारखी क्रमानें वाढत जाते; ह्मणजे गुण व पुरुष यांच्या स्वरूपाचें पूर्ण ज्ञान होईपर्यंत वाढत जाते असा अर्थ. आतां योगाच्या अंगांचें अनुष्ठान हें अशुद्धि दूर करण्याला कारण आहे, ह्मणजे जशी कुऱ्हाड झाडाला तोडून जमिनीपासून दूर करण्याला कारण, त्याप्रमाणें; व तें (अंगानुष्ठान) विवेकख्यातीचें तर प्राप्तीचें कारण आहे ( योगांगानुष्ठान विवेकख्याति प्राप्त करून देण्याला कारण आहे ); जसा धर्म सुखाच्या प्राप्तीला कारण, त्याप्रमाणें. यावांचून योगांगानुष्ठानाला दुसरें कारणत्व संभवत नाहीं. आतां हीं अशा प्रकारचीं कारणें शास्त्रांत आहेत तरी किती ? उत्तर,—कारणें नऊच परिगणिलीं आहेत; तीं याप्रमाणें,—१ उत्पत्ति, २ स्थिति, ३ अभिव्यक्ति, ४ विकार, ५ प्रत्यय, ६ आप्ति (प्राप्ति), ७ वियोग, ८ अन्यत्व व ९ धृति, याप्रमाणें नऊ आहेत. उदाहरणें,—

१ त्या नऊ कारणांत मन हें ज्ञानाच्या उत्पत्तीला कारण आहे; अर्थात् जशी घटास मृत्तिका उपादान (साक्षात्) कारण, त्याप्रमाणें मनापासून वृत्तिरूप ज्ञान उत्पन्न होतें; (ह्मणून तें उत्पत्तिकारण). २ जसा आहार ( खाणेंपिणें ) देह राहण्यास कारण, तशी भोग व मोक्षरूप पुरुषार्थता मनाच्या स्थितीला ( राहण्याला ) कारण, ( ह्मणून पुरुषार्थता मनाचें स्थितिकारण, अर्थात् पुरुषार्थता संपली कीं मनाचा स्वतांच नाश होतो ). ३ अभिव्यक्तिकारण असें,– जसा काळें, पिंवळें, लाल इत्यादि रूपें स्पष्ट दिसण्याला साधन प्रकाश. ४ जसा तांदुळांचा भातरूप विकार होण्यास कारण अग्नि, त्याप्रमाणें मनाला विषयांतर ( अन्य विषय ) हें विकारकारण आहे. ५ धूर पाहिला असतां जो 'येथें अग्नि आहे,' असा निश्चय होतो, तेथें अग्निज्ञानाला धुराचें ज्ञान हें प्रत्ययकारण होय. ( प्रत्यय ह्मणजे निश्चय. ) ६ योगांगानुष्ठान हें विवेकख्यातीचें प्राप्तिकारण आहे. ( आप्ति व प्राप्ति या दोहोंचा अर्थ एकच आहे. ) ( प्राप्तिकारण ह्मटल्यानें साक्षात् उत्पत्तिकारण नाहीं. ) ७ तसेंच योगांगानुष्ठान अविद्यादिक्लेशांच्या वियोगाला ( दूर करण्याला ) कारण, ह्मणून हें वियोगकारण होय. ८ अन्यत्वकारण असें,–जसा सोनार प्रथम सोन्याचा एक गोळा असतां कडीं, कुंडलें इत्यादि अनेकरूपानें सोन्याचा रूपभेद करण्याला कारण ह्मणून सोनार हा सोन्याचें अन्यत्वकारण होय. हें बाह्य अन्यत्वकारण झालें, याचप्रमाणें आध्यात्मिक अन्यत्वकारण समजावें; तें असें,–पहा! स्त्री तर एकच असते, परंतु तिच्याविषयीं एकेकाच्या मनांत कशा कशा अनेक विरुद्ध भावना असतात;–एक ह्मणतो, 'ही कन्या फारच सुंदर आहे.' दुसरा एक पुरुष, 'तो पुण्यवान् आहे ह्मणून त्याला ही अशी चांगली स्त्री मिळाली; मी पापी ह्मणून मला नाहीं;' याप्रमाणें ती स्त्री मनांत आणून खेद पावतो. याचप्रमाणें सवत जी असते ती त्या स्त्रीचा द्वेष करिते, व त्याच स्त्रीवर नवऱ्याची मोठी प्रीति असते. तसेंच तीच स्त्री विवेकी जो असेल त्यानें मनांत, 'हा स्त्रीदेह ह्मणजे केवळ त्वचा, मांस, मेद, अस्थि व मज्जा इत्यादि घाणेरड्या व अपवित्र पदार्थांनीं बनलेला आहे; हिचें बीज व उत्पत्तीचें ठिकाण पाहिलें तर फारच अमंगल व अपवित्र आहे,' असा तात्त्विक विचार केला असतां त्याला वैराग्याला कारण होते. असे जे एकाच स्त्रीपासून मोह, द्वेष, दुःख, राग, सुख व तत्त्वज्ञान उत्पन्न होतात; त्यांना अविद्यादि क्लेशच कारण आहेत. ९ शरीर इंद्रियांना धारण करणारें (पोषण करून रक्षण करणारें) व इंद्रियें शरीराला धारण करणारीं; पंचमहाभूतें शरीरांना धारक (धारण करणारीं) व तीं सर्व ( पंचमहाभूतें ) एकमेकांना धारक आहेत. याचप्रमाणें पशु, पक्षी,

---

**सू० २८ टी० १** पहा! मृकंडुनांवाचा ऋषि एकाग्रचित्त करून ध्यानस्थ बसला असतां सतार इत्यादि वाद्यांचा मंजुल ध्वनि कानावर आल्यानंतर डोळे उघडून पाहतो तों स्वरूप, लावण्य व तारुण्य या गुणांनीं संपन्न अशी प्रम्लोचानांवाची अप्सरा पुढें उभी आहे. तिला पाहिल्यावर समाधि सोडून देऊन त्याचें मन तिच्या ठिकाणीं आसक्त झालें. याकरितां अन्यविषय हा मनाचें विकारकारण आहे. वाच० मि०.

मनुष्यें, देवता हीं सर्व परस्परांकरितां असल्यामुळें हें सर्व धृतिकारण आहेत. याप्रमाणें हीं नऊ कारणें येथें सांगितलेल्या पदार्थांहून अन्यठिकाणीं सुद्धां जसजसा संभव असेल त्याप्रमाणें योजावीं. आतां योगांगानुष्ठानाला तर वियोगकारणत्व व प्राप्तिकारणत्व अशीं दोनच कारणत्वें आहेत ॥ २८ ॥

आतां योगाचीं अंगें किती आहेत याचा निश्चय सांगतात,—

## यमनियमासनप्राणायामप्रत्याहारधारणाध्यानसमाधयोऽष्टावङ्गानि ॥ २९ ॥

**सूत्रार्थः**—यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि हीं योगाचीं आठ अंगें आहेत.

**भाष्यम्—यथाक्रममेतेषामनुष्ठानं स्वरूपञ्च वक्ष्यामः ॥ २९ ॥ ' तत्र ' ॥**

**भाष्यार्थः**—ह्या यमादि आठ अंगांचें अनुष्ठान कसें करावें व यांचें लक्षण काय हें क्रमानेंच पुढें सांगूं ॥ २९ ॥

आतां त्या आठ अंगांपैकीं यमाचें स्वरूप सांगतात,—

## अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्य्याऽपरिग्रहा यमाः ॥ ३० ॥

**सूत्रार्थः**—अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हे पांच यम आहेत.

**भाष्यम्—तत्राऽहिंसा सर्वथा सर्वदा सर्वभूतानामनभिद्रोहः । उत्तरे च यमनियमास्तन्मूलास्तत्सिद्धिपरतया तत्प्रतिपादनाय प्रतिपाद्यन्ते तदवदातरूपकारणायैवोपादीयन्ते । तथा चोक्तम् । स खल्वयं ब्राह्मणो यथा यथा व्रतानि बहूनि समादित्सते तथा तथा प्रमादकृतेभ्यो हिंसानिदानेभ्यो निवर्तमानस्तामेवावदातरूपामहिंसां करोति । सत्यं यथार्थे वाङ्मनसे, यथा दृष्टं यथाऽनुमितं यथा श्रुतं तथा वाङ्मनश्चेति परत्र स्वबोधसंक्रान्तये वागुक्ता सा यदि न वञ्चिता भ्रान्ता वा प्रतिपत्तिवन्ध्या वा भवेदित्येषा सर्वभूतोपकारार्थम्प्रवृत्ता न भूतोपघाताय । यदि चैवमप्यभिधीयमाना भूतोपघातपरैव स्यान्न सत्यम्भवेत् । पापमेव भवेत्तेन पुण्याभासेन पुण्यप्रतिरूपकेण कष्टन्तमः प्राप्नुयात् । तस्मात्परीक्ष्य सर्वभूतहितं सत्यं ब्रूयात् । स्तेयमशास्त्रपूर्वकन्द्रव्याणां परतः स्वीकरणन्तत्प्रतिषेधः पुनरस्पृहारूपोऽयमिति । ब्रह्मचर्यं गुप्तेन्द्रियस्योपस्थस्य संयमः । विषयाणामर्जनरक्षणक्षयसङ्गहिंसादोषदर्शनादस्वीकरणमपरिग्रह इत्येते यमाः ॥ ' ते तु ' ॥ ३० ॥**

**भाष्यार्थः**—त्या यमांपैकीं अहिंसेचें लक्षण असें आहे कीं, कोणत्याही वेळीं, कोणत्याही प्रकारानें व कोणत्याही प्राण्याचा द्रोह (नाश) न करणें ह्याला अहिंसा असें ह्मणतात. या अहिं-

सेहून इतर सांगितलेले सत्यादि यम व शौचादि नियम हे सर्व अहिंसेकरितां आहेत; ह्मणजे तिच्या सिद्धीकरितां सर्व शास्त्रांत त्यांचें प्रतिपादन ( कथन ) केलें आहे. ( सत्यादिकांनीं अहिंसा सिद्ध होते हें सांगण्याकरितां सत्यादिकांचें प्रतिपादन केलें आहे. ) तसेंच त्या अहिंसेचें रूप निर्मल करण्याकरितां योगी सत्यादिकांचें अनुष्ठान करितात. असेंच आगमांतही सांगितलें आहे; कीं,–'खरोखर हा ब्राह्मण जशीं जशीं अनेक व्रतें ग्रहण करण्याची इच्छा करितो तसा तसा प्रमादानें ( असावधपणानें ) घडणाऱ्या हिंसेच्या कारणांपासून निवृत्त होऊन त्या अहिंसेलाच निर्मल करितो.' यथार्थ जी वाणी व मन यांना सत्य ह्मणतात. यथार्थ ह्मणजे जसें पाहिलें असेल, जसें अनुमानानें जाणलें असेल व जसें ऐकिलें असेल त्याचप्रमाणें वाणीची व मनाची प्रवृत्ति असूं देणें. आतां जसें आपणांला समजलें असेल तसेंच दुसऱ्याला समजावून देण्याकरितां जें आपण भाषण करितों त्यांत तें बोलणें जर दुसऱ्याला विपरीत बोध होण्याजोगें अथवा भ्रमयुक्त किंवा दुसऱ्याला जी भाषा समजणारी नाहीं अशा म्लेच्छ इत्यादिक भाषेंत, अथवा ज्याचा कांहीं उपयोग नाहीं असें असेल तर तें बोलणें जरी खरें असेल तथापि त्याला खऱ्यासारिखें ह्मणावयाचें मात्र; वस्तुतः तें खरें नव्हे. तशीच ही वाणी जी ब्रह्मदेवानें उत्पन्न केली ती सर्व प्राण्यांच्या उपकाराकरितां उत्पन्न केली, नाशाकरितां नव्हे, ह्मणून तशा खऱ्या बोलण्यानें जर प्राण्याचा घात (नाश) होत असेल तर त्यालाही सत्य ह्मणूं नये; उलटें त्यापासून पाप मात्र लागणार आहे; आणि ह्या अशा पुण्यासारख्या भासणाऱ्या भाषणानें दुःखकारक नरक प्राप्त होईल. याकरितां सर्व विचार करून सर्व प्राण्यांचें ज्यांत हित असेल असेंच सत्य भाषण करावें. शास्त्रानें ज्या पदार्थावर आपली सत्ता ह्मणजे मालकी सांगितली नसेल अशा दुसऱ्याच्या वस्तूचें ( दुसऱ्याच्या आज्ञेवांचून ) ग्रहण करणें यास स्तेय ( चोरी ) ह्मणतात; व त्या स्तेयाचा जो प्रतिषेध ह्मणजे अस्पृहा ( इच्छा न करणें ) तें अस्तेय होय. इतर इंद्रियांना विषयांत लुब्ध न होऊं देतां उपस्थनांवाच्या इंद्रियाला ( जननेंद्रियाला ) स्वाधीन ठेवणें यास ब्रह्मचर्य ह्मणतात. कोणत्याही वस्तूस प्रथम मिळविण्यास मोठे श्रम, मिळाल्यानंतर रक्षण करणें, तिचा नाश होणें, सहवास जो जो करावा तो तो भोगाभ्यास अधिक वाढणें, तसेंच कोणत्याही प्राण्याचा घात केल्यावांचून भोग संभवत नाहीं ह्मणून हिंसा; इत्यादि दोषांचा विचार करून विषयांचा स्वीकार न करणें याला अपरिग्रह ह्मणतात. याप्रमाणें हे यम होत ॥ ३० ॥

आतां सांगितलेल्या यमांचा विशेष या सूत्रानें सांगतात,–

## जातिदेशकालसमयानवच्छिन्नाः सार्वभौमा महाव्रतम् ॥ ३१ ॥

**सूत्रार्थः**–जाति, देश, काल आणि समय यांच्या संबंधाचा विचार न करितां हे यम एकसारखे चालले असतां त्यांना महाव्रत असें ह्मणतात. अर्थात् जाति इत्यादिकांचा विचार

न करितां यमांचें निरंतर पाळण करणें हें योग्याचें महाव्रत ह्मणजे मुख्य व्रत आहे.

**भाष्यम्–तत्राहिंसा जात्यवच्छिन्ना मत्स्यम्बन्धकस्य मत्स्येष्वेव नान्यत्र हिंसा । सैव देशावच्छिन्ना न तीर्थे हनिष्यामीति । सैव कालावच्छिन्ना न चतुर्दश्यान्न पुण्येऽहनि हनिष्यामीति। सैव त्रिभिरुपरतस्य समयावच्छिन्ना देवब्राह्मणार्थे नाऽन्यथा हनिष्यामीति । यथा च क्षत्रियाणां युद्ध एव हिंसा नान्यत्रेति । एभिर्जातिदेशकालसमयैरनवच्छिन्ना अहिंसादयः सर्वथैव परिपालनीयाः सर्वभूमिषु सर्वविषयेषु सर्वथैवाविदितव्यभिचाराः सार्वभौमा महाव्रतमित्युच्यन्ते ॥ ३१ ॥**

भाष्यार्थः–त्यांतही मुख्य अहिंसेचें लक्षण असें,–मासे धरणाराला माशांचीच तेवढी हिंसा सांगितली आहे इतरांची नाहीं; ही मत्स्यत्व जातीच्या संबंधानें हिंसा होते आणि इतर जातींच्या संबंधानें अहिंसा होते. ( दुसरें उदाहरण,–)' मी ब्राह्मणाची हत्या करणार नाहीं; ' ही ब्राह्मणत्व जातीच्या संबंधाचा विचार करून पाळली गेली ह्मणून ह्या उदाहरणांतील ही जात्यवच्छिन्न अहिंसा होते. ' मी तीर्थाच्या ( क्षेत्राच्या ) ठिकाणीं कोणाची हत्या करणार नाहीं;' ही देशाच्या ( स्थलाच्या ) संबंधाचा विचार करून पाळली गेली ह्मणून ही देशावच्छिन्न अहिंसा होते. ' मी चतुर्दशीस व पुण्यदिवशीं कोणाची हत्या करणार नाहीं; ' ही कालाच्या संबंधाचा विचार करून पाळली गेली ह्मणून ही कालावच्छिन्न अहिंसा होते. ' मी देवब्राह्मणांच्या निमित्तावांचून इतराकरितां कोणाची हत्या करणार नाहीं; ' ह्यांत जाति, देश व काल यांचा बिलकुल संबंध नसून केवल देवब्राह्मणांच्या समयाच्या ह्मणजे संकेताच्या अथवा निमित्ताच्या संबंधाचा विचार करून पाळली गेली ह्मणून ही समयावच्छिन्न अहिंसा होते. जशी क्षत्रियांना युद्धामध्येंच हिंसा सांगितली आहे; अन्य ठिकाणीं नाहीं. ( यांत युद्धनिमित्तावांचून अन्य ठिकाणीं होणाऱ्या हिंसेचा निषेध केला आहे ह्मणून ही समयावच्छिन्न अहिंसा होय. ) याप्रमाणें या सांगितलेल्या चार प्रकारानेंच न वागतां ' कोणत्याही जातीची, कोणत्याही ठिकाणीं, कोणत्याही वेळीं व कोणत्याही निमित्तानें हत्या करणार नाहीं ' असा नियम धरून अहिंसेचें चांगलें रक्षण करावें. याचप्रमाणें जाति, देश, काल व समय यांची सबब न ठेवितां सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह या चार यमांचें चांगलें पाळण करावें. हे अहिंसादिक पांच यम जात्यादिकांच्या संबंधाचा विचार न करितां चांगल्या रीतीनें पाळिले असतां हें योग्याचें महाव्रत ह्मणवितें ( या अशा प्रकारच्या यमांना महाव्रत अशी संज्ञा होते ) ॥ ३१ ॥

यम सांगून आतां नियम सांगतात,–

## शौचसन्तोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः ॥ ३२ ॥

**सूत्रार्थः**–पवित्रता, संतोष, तप, स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान हे पांच नियम आहेत.

भाष्यम्—तत्र शौचं मृज्जलादिजनितं मेध्याभ्यवहरणादि च बाह्यमाभ्यन्तरश्चित्तमलानामाक्षालनम् । सन्तोषः सन्निहितसाधनादधिकस्यानुपादित्सा । तपो द्वन्द्वसहनं, द्वन्द्वानिच जिघत्सापिपासे, शीतोष्णे, स्थानासने, काष्ठमौनाकारमौने च, व्रतानि चैव यथायोगं कृच्छ्रचान्द्रायणसान्तपनादीनि । स्वाध्यायो मोक्षशास्त्राणामध्ययनम्प्रणवजपो वा । ईश्वरप्रणिधानन्तस्मिन् परमगुरौ सर्वकर्मार्पणम् । 'शय्यासनस्थोऽथ पथि व्रजन्वा स्वस्थः परिक्षीणवितर्कजालः । संसारबीजक्षयमीक्षमाणः स्यान्नित्यमुक्तोऽमृतभोगभागी ॥' यत्रेदमुक्तम् । 'ततः प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यन्तरायाभावश्च' इति ॥ ३२ ॥ एतेषां यमनियमानाम् ॥

भाष्यार्थः—नियम शौचइत्यादिक पांच आहेत; त्यांत शौच ह्मणजे शुद्धि ही दोन प्रकारची आहे. बाह्य व आभ्यंतर. मृत्तिका, उदक, गोमय इत्यादिकांनीं होणारी व गोमूत्र, यवागू इत्यादि पवित्र पदार्थांचें खाणें किंवा उपवास करणें इत्यादिकांनीं होणारी ही बाह्य ( बाहेरील देहाची ) शुद्धि होय. मैत्री इत्यादिकांच्यां भावनेनें चित्ताचा जो राग, द्वेष इत्यादिक मल, त्यास दूर करणें, ही आभ्यंतर (आंतील) शुद्धि होय. शरीररक्षणाला लागणाऱ्या ज्या अत्यावश्यक वस्तू त्यांवांचून इतरांच्या प्राप्तीची इच्छा न करणें यास संतोष ( तृप्ति ) ह्मणतात. द्वंद्वांचें ( दोहोंदोहोंच्या ज्या जोड्या सांगितल्या आहेत त्यांचें ) सहन करणें ह्यास तप ह्मणतात. तीं द्वंद्वें याप्रमाणें,— बुभुक्षा व पिपासा ( खाण्याची इच्छा व पिण्याची इच्छा अर्थात् भूक व तहान ) हें एक द्वंद्व. असेंच शीत व उष्ण, उठणें व बसणें, नेत्रसंकेत इत्यादिकांनीं सुद्धां आपला अभिप्राय बाहेर प्रकट न करणें यास काष्ठमौन ह्मणतात; हें एक व आकारमौन ( कांहींएक न बोलणें ) इत्यादि. एकादश्यादि व्रतें व शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें कृच्छ्र, चांद्रायण, सांतपन इत्यादिकांचें आचरण करणें. या सर्वांस तप ह्मणतात. ब्रह्मसूत्र, उपनिषद्, गीता इत्यादि मोक्षशास्त्राचें अध्ययन ( अर्थज्ञानपूर्वक पठन) करणें, अथवा शास्त्रोक्तरीतीनें प्रणवाचा जप करणें ह्यांस स्वाध्याय ह्मणतात. लौकिक व वैदिक सर्व कर्माचें त्या परमेश्वराचे ठिकाणीं समर्पण करणें ( किंवा सर्व कर्मफलांचा भोक्ता ईश्वर आहे अशी भावना करणें ) हें ईश्वरप्रणिधान ( ईश्वरभक्ति ) होय. या दहा यमनियमांत ईश्वरप्रणिधानच मुख्य अंग आहे; कारण, ह्या ईश्वरप्रणिधानाच्या योगानें पुरुष निजलेला असो, अथवा वाट चालत असो, किंवा त्याचें परमेश्वराचे ठिकाणीं लय लागलेलें असो; त्याचे पुढें सांगावयाचे जे वितर्क ते सर्व नष्ट होतात; व संसारास बीज जे संस्कार त्यांचाही क्षय झाल्यावर तो नित्यमुक्त असा मोक्षसुखाचा अनुभव घेणारा होतो. ( तात्पर्य, ईश्वरप्रणिधान करणाऱ्या पुरुषास ईशप्रसादानें योग लवकर साध्य होतो. ) ज्या ईश्वरप्रणिधानाविषयीं पूर्वी ( स० सू० २९ त ) सूत्रकारांनींही असें सांगितलें आहे कीं, 'ईश्वरप्र-

णिधानानें आत्म्याचा साक्षात्कार होऊन सर्व विघ्नें दूर होतात;'' याप्रमाणें ॥ ३२ ॥

आतां अहिंसादिकांना योगांगत्व कसें तें सांगतात,–

## वितर्कबाधने प्रतिपक्षभावनम् ॥ ३३ ॥

**सूत्रार्थः**–योगास प्रतिबंध करणारे जे हिंसा, असत्य इत्यादिक वितर्क, त्यांपासून पीडा होऊं लागली असतां वितर्कांचे विरुद्धपक्षी जे अहिंसा, सत्य इत्यादि अर्थात् तर्क त्यांची चित्तांत भावना करावी, ह्मणजे मग वितर्कांची पीडा न होतां योग लवकर सिद्ध होतो.

**भाष्यम्–यदाऽस्य ब्राह्मणस्य हिंसादयो वितर्का जायेरन् हनिष्याम्यहमपकारिणमनृतमपि वक्ष्यामि द्रव्यमप्यस्य स्वीकरिष्यामि दारेषु चास्य व्यवायी भविष्यामि परिग्रहेषु चास्य स्वामी भविष्यामीति एवमुन्मार्गप्रवणवितर्कज्वरेणातिदीप्तेन बाध्यमानस्तत्प्रतिपक्षान् भावयेत्। 'घोरेषु संसाराङ्गारेषु पच्यमानेन मया शरणमुपागताः सर्वभूताभयप्रदानेन योगधर्म्माः स खल्वहं त्यक्त्वा वितर्कान्पुनस्तानाददानस्तुल्यश्च श्ववृत्तेन' इति भावयेत्। यथा श्वा वान्तावलेही तथा त्यक्तस्य पुनराददान इति। एवमादि सूत्रान्तरेष्वपि योज्यम्॥ ३३ ॥**

**भाष्यार्थः**–विपरीत ह्मणजे उलट आहेत तर्क ह्मणजे विचार ज्यांत ते वितर्क, ते हिंसा इत्यादिक पुढें सांगावयाचे आहेत. हे हिंसादिक वितर्क ज्या वेळेस ह्या ब्राह्मणाला उत्पन्न होतील; ह्मणजे 'मी माझा अपराध करणाऱ्याचा घात ( नाश ) करीन;' 'खोटें सुद्धां बोलेन;' 'याचें द्रव्य सुद्धां ग्रहण करीन ( चोरून घेईन );' 'याच्या स्त्रीशीं गमन करीन;' 'याच्या सर्व उपभोगसाधनाच्या वस्तूंचा मी मालक होईन.' ( हें यमांतील वितर्कपंचक. ) ('याचप्रमाणें 'मी शौच सोडून देईन;' 'मी कधींही तृप्त होणार नाहीं;' 'मी तपाचा त्याग करीन;' 'मी अध्ययन करणार नाहीं;' व 'मी ईश्वरभक्ति करणार नाहीं.' हें नियमांतील वितर्कपंचक. ) त्याप्रमाणें वाईट मार्गांत लावणाऱ्या अशा हिंसादिकवितर्करूपज्वराच्या संतापानें योगी जेव्हां अत्यंत पीडित होईल, तेव्हां त्यानें त्या हिंसादिवितर्कांचे प्रतिपक्ष ( विरुद्ध अथवा शत्रु ) जे अहिंसाहिक यांचें चिंतन करावें. ('हे वितर्क परिणामीं दुःख देणारे आहेत' असें चिंतन करणें हें या वाक्याचें तात्पर्य आहे.) ती प्रतिपक्षभावना अशी; 'ज्या वेळेस पूर्वी मी अतिभयंकर अशा संसाररूप अग्नींत भाजत पडलों होतों; त्या वेळेस या संसारतापांतून सुटका होण्याकरितां म्यां सर्व प्राण्यांला 'कोणालाही माझ्यापासून दुःख होणार नाहीं' असें अभयदान देऊन योगधर्मांचा ( अहिंसादिक यमनियमांचा ) स्वीकार केला; व हिंसादिक सर्व एकदा सोडून दिले. तो मी जर पुनः अहिंसादिकांला सोडून देऊन हिंसादिकांचें ग्रहण करीन ( हिंसादिकं करूं लागेन ) तर मग

असल्या वागणुकीनें मी कुत्र्यासारिखाच समजला पाहिजे.' याप्रमाणें. ती कुत्र्याची बरोबरी अशी,–जसा कुत्रा ओकलेलें पुनः चाटतो त्याप्रमाणें हिंसादिक एकदा सोडून दिले असतां पुनः त्यांचें ग्रहण करणारा. 'वितर्कांची पीडा होऊं लागली असतां प्रतिपक्षभावना करावी,' अशा वाक्याची व या सर्व व्याख्येची आसनप्राणायामांच्या सूत्रांतही योजना करावी ॥ ३३ ॥

आतां ते वितर्क, वितर्कप्रतिपक्ष व त्यांचें चिंतन हे तीन सांगतात,–

## वितर्का हिंसादयः कृतकारितानुमोदिता लोभक्रोधमोहपूर्वका मृदुमध्याधिमात्रा दुःखाज्ञानानन्तफला इति प्रतिपक्षभावनम् ॥ ३४ ॥

**सूत्रार्थः**–हिंसादिक हे वितर्क होत. त्यांचे कृत, कारित आणि अनुमोदित असे तीन प्रकार आहेत. लोभ, क्रोध आणि मोह एतत्पूर्वक वितर्कांची उत्पत्ति होते. या वितर्कांचे आणिक दुसरे मृदु, मध्य व अधिमात्र असे अवांतर तीन भेद आहेत. हे वितर्क दुःख व अज्ञानरूपी अशीं अनंत फळें उत्पन्न करणारे आहेत; याप्रमाणें प्रतिपक्षभावन समजावें.

**भाष्यम्**–तत्र हिंसा तावत्कृता कारिताऽनुमोदितेति त्रिधा । एकैका पुनस्त्रिधा लोभेन मांसचर्मार्थेन, क्रोधेनापकृतमनेनेति, मोहेन धर्मो मे भविष्यतीति । लोभक्रोधमोहाः पुनस्त्रिविधा मृदुमध्याधिमात्राः । इत्येवं सप्तविंशतिर्भेदा भवन्ति हिंसायाः । मृदुमध्याधिमात्राः पुनस्त्रेधा मृदुमृदुर्मध्यमृदुस्तीव्रमृदुरिति । तथा मृदुमध्यो मध्यमध्यस्तीव्रमध्य इति । तथा मृदुतीव्रो मध्यतीव्रोऽधिमात्रतीव्र इति । एवमेकाशीतिभेदा हिंसा भवति । सा पुनर्नियमविकल्पसमुच्चयभेदादसंख्येया प्राणभृद्भेदस्यापरिसंख्येयत्वादिति । एवमनृतादिष्वपि योज्यम् । ते खल्वमी वितर्का दुःखाज्ञानानन्तफला इति प्रतिपक्षभावनम् । दुःखमज्ञानञ्चानन्तफलं येषामिति प्रतिपक्षभावनम् । तथा च । हिंसकः प्रथमन्तावद्वध्यस्य वीर्यमाक्षिपति, ततः शस्त्रादिनिपातेन दुःखयति, ततो जीवितादपि मोचयतीति । ततो वीर्याक्षेपादस्य चेतनाचेतनमुपकरणं क्षीणवीर्यं भवति । दुःखोत्पादान्नरकतिर्यक्प्रेतादिषु दुःखमनुभवति । जीवितव्यपरोपणात्प्रतिक्षणश्च जीवितात्यये वर्तमानो मरणमिच्छन्नपि दुःखविपाकस्य नियतवेदनीयत्वात्कथञ्चिदेवोच्छ्वसिति । यदि च कथंचित्पुण्यावापगता हिंसा भवेत्तत्र सुखप्राप्तौ भवेदल्पायुरिति । एवमनृतादिष्वपि योज्यं यथासम्भवम् । एवं वितर्काणां चामुमेवानुगतं विपाकमनिष्टं भावयन्न वितर्केषु मनः प्रणिदधीत ॥ ३४ ॥ 'प्रतिपक्षभावनाद्धेतोर्हेया वितर्का यदास्य स्युरप्रसवधर्माणस्तदा तत्कृतमैश्वर्यं योगिनः सिद्धिसूचकं भवति तद्यथा' ॥

**भाष्यार्थः**—प्रथम हिंसा ही १ ( स्वतः ) केलेली, २ ( दुसऱ्याकडून 'कर, कर' असें ह्मणून करविलेली व ३ ( दुसरा करीत असतां 'बरी करितोस' अशी ) संमति देऊन झालेली, याप्रमाणें ३ तीन प्रकारची आहे. ती पुनः प्रत्येक तीन प्रकारची; १ मांस, कांतडें इत्यादि मिळण्याकरितां ( ह्मणजे लोभानें ) केलेली, २ कोणी कांहीं अपराध केला ह्मणून रागावून ( क्रोधानें ) केलेली व ३ 'साक्षात् पशु मारून यज्ञ केले असतां मला मोठा धर्म घडेल' अशा समजुतीनें ( मोहानें ) केलेली; याप्रमाणें ९ नऊ प्रकारची आहे. आतां पुनः लोभ, क्रोध व मोह हे प्रत्येक १ मृदु, २ मध्य व ३ अधिमात्र ( तीव्र ) असे तीन तीन प्रकारचे असल्यामुळें पूर्वीं सांगितलेली नऊ प्रकारची हिंसाही प्रत्येक तीन तीन प्रकारची होते; ह्मणून हिंसेचे २७ सत्तावीस प्रकार होतात. ( मृदु, मध्य व अधिमात्र ( तीव्र ) यांचीं लक्षणें ( स० सू० २० पृ० १९ त) सांगितलीं आहेत. ) मृदु, मध्य व अधिमात्र हेही प्रत्येक १ मृदुमृदु, २ मृदुमध्य व ३ मृदुतीव्र; तसेच १ मध्यमृदु, २ मध्यमध्य व ३ मध्यतीव्र; व १ तीव्रमृदु, तीव्रमध्य व २ तीव्रतीव्र; याप्रमाणें तीन तीन प्रकारचे असल्यामुळें पूर्वीची २७ सत्तावीस प्रकारची हिंसाही ८१ एकायशीं प्रकारची झाली ( हिंसेचे ८१ भेद झाले ). त्या ८१ एकायशीं प्रकारच्या हिंसेचे सुद्धां पुनः नियम, विकल्प व समुच्चय अशा भेदांनीं असंख्य ( अगणित ) भेद आहेत; कारण, हिंसा करणारे व ज्यांची हिंसा करावयाची ते असंख्य असल्यामुळें त्या त्या संबंधाचे नियम, विकल्प व समुच्चय हेही असंख्य होतात. ( जसे,—मासे मारणारानें माशांचीच हिंसा करावयाची, इतरांची करावयाची नाहीं. अशीच दुसऱ्या एका वाघमाऱ्यानें वाघांचीच हिंसा करावयाची, इतरांची करावयाची नाहीं. याप्रमाणें असे असंख्य नियम होऊं शकतात. हा हिंसेचा नियम झाला. तसेंच एका दिवसांत स्थावर ( वृक्ष, वनस्पति, धान्य वगैरे ) व जंगम ( मनुष्य, जनावरें, पक्षी वगैरे ) या दोहोंपैकीं मनास वाटेल त्या एकाचीच हिंसा करावयाची; दोहोंची नाहीं. यांत 'अमुक एकाची हिंसा करावयाची' असा नियम नसल्यामुळें हा हिंसेचा विकल्प झाला. तसेंच स्थावर व जंगम या दोहोंचीही हिंसा करावयाची; यांत हिंसेचा नियम नाहीं व विकल्पही नाहीं ह्मणून हा हिंसेचा समुच्चय होय. ) जसे हे हिंसेचे भेद सांगितले याचप्रमाणें असत्य इत्यादिकांचीही विभागकल्पना करावी. हे हिंसा इत्यादिकच वितर्क होत. ते सर्व हिंसादिक वितर्क खरोखर 'दुःखाज्ञानानंतफला इति प्रतिपक्षभावनम्' (हीं सूत्रांतील तीन पदें घेऊन भाष्यकार त्यांची व्याख्या सांगतात.) ह्मणजे दुःख व अज्ञान ह्मणजे (संमोह) हीं आहेत अनंत फलें ज्यांचीं असे आहेत; असें प्रतिपक्षभावन ( हे याप्रमाणें अनिष्ट फळ देणारे आहेत असें चिंतन करावें ). ( हिंसेपासून दुःख व अज्ञान ( संमोह ) हीं कशीं प्राप्त होतात, पहा! ) 'हिंसा करणारा प्रथम तर ज्याचा वध ( हिंसा ) करावयाचा असेल त्यास जबरदस्तीनें त्याचा पाडाव करून त्याला आपल्या स्वाधीन करितो; नंतर तो अगदींच बलहीन झाला ह्मणजे त्यावर एकाद्या शस्त्राचा वार करून त्याला वारंवार दुःख देतो; नंतर त्याचा

एकादे वेळीं प्राणही घेतो. (याप्रमाणें त्या हिंसकानें त्या बिचाऱ्या प्राण्याचें बल हरण करून त्याला दुःख देऊन ठार मारिलें यामुळें याचा मोबदला त्याला पुढें मिळतो; तो असा,–) हिंसा करणारानें त्या प्राण्याचें प्रथम बल हरण केलें ह्मणून त्या हिंसकाचें स्त्री, पुत्र, धन इत्यादिक उपभोगाचें साधन बलहीन ( निरुपयोगी ) होतें. त्याला शस्त्रानें दुःख दिलें ह्मणून त्यालाही ( हिंसकालाही ) नरकांत किंवा पक्षियोनींत अथवा पिशाचयोनींत प्राप्त होऊन दुःख भोगावें लागतें. तसेंच त्याचा प्राण घेतला आहे ह्मणून क्षणोक्षणीं मरतो कीं काय अशी अवस्था प्राप्त होऊन शेवटीं दुःख सहन न झाल्यामुळें 'आतां मला मरण येईल तर बरें होईल; परंतु हें दुःख सोसवत नाहीं' अशी मरणाची इच्छा करितो खरी तथापि कसा तरी वांचतोच; कारण, दुःख जितकें भोगावयाचें आहे तितकें भोगून सारल्यावांचून मरण कोठून येणार! आतां जर कदाचित् कांहीं पुण्यकर्म करीत असतां हिंसा घडलेली असेल तर त्या ठिकाणीं सुद्धां पुण्यकर्माबद्दल सुख प्राप्त झालें असतां हिंसेमुळें त्याचें आयुष्यच कमी होतें (ह्मणून सुख भोगण्यास तो वांचतच नाहीं). जसें हिंसेपासून अमर्याद दुःख ( क्लेश ) व संमोह असें वाईट फल सांगितलें, त्याप्रमाणेंच असत्यं इत्यादिकांविषयीं सुद्धां जसा संभव असेल त्याप्रमाणेंच फलाची योजना करावी. आणि ह्या हिंसादिक वितर्कांपासून नियमानें याप्रमाणें अनिष्ट फल प्राप्त होतेंच असा विचार करून हिंसादिकांकडे योग्यानें बिलकुल मन जाऊं देऊं नये ॥ ३४ ॥

अगदींच त्याग करण्याला योग्य असे हे हिंसादिक वितर्क, ज्या वेळेस योग्याच्या वर सांगितलेल्या प्रतिपक्षभावनेनें त्यांचे विषय समीप असतांनाही आपापलीं कामें करण्यास बिलकुल समर्थ होणार नाहींत ( अगदींच नष्ट होतील ) त्या वेळेस यमादि पूर्ण सिद्ध झाले, असें सुचविणारें ऐश्वर्य योग्यास प्राप्त होतें; त्यांत अहिंसेचें ऐश्वर्य असें,–

## अहिंसाप्रतिष्ठायां तत्संनिधौ वैरत्यागः ॥ ३५ ॥

**सूत्रार्थः**–भावनेनें अहिंसेची स्थिरता झाल्यानंतर त्या योग्याच्या जवळचे, जन्मापासून परस्परांचा विरोध करणारे असे गोव्याघ्रादिक प्राणी सुद्धां परस्पर वैर सोडून देतात.

**भाष्यम्–सर्वप्राणिनां भवति ॥ ३५ ॥**

**भाष्यार्थः**–अहिंसेची प्रतिष्ठा ह्मणजे- पूर्ण स्थिरता झाल्यावर ( जो हिंसा न करण्याचा अभ्यास करितो त्याच्या हातून कोणत्याही प्रकारें अगदीं हिंसा होत नाहीं असें झालें ह्मणजे ) मग तो जवळ असल्यामुळें मांजर व उंदीर, साप व मुंगुस इत्यादि स्वभावतःच एकमेकांचें वैर करणारे अशा प्राण्यांचें देखील वैर नाहींसें होतें ॥ ३५ ॥

आतां सत्याचें ऐश्वर्य सांगतात,–

## सत्यप्रतिष्ठायां क्रियाफलाश्रयत्वम् ॥ ३६ ॥

**सूत्रार्थः**–सत्याची स्थिरता झाल्यानें योग्यास अनुष्ठान केल्यावांचूनही यज्ञादिक्रियांचें फल प्राप्त होतें; व त्याच्या वचनानें वाटेल त्याला केल्यावांचून कर्मफल प्राप्त होतें.

**भाष्यम्**–धार्मिको भूया इति भवति धार्मिकः । स्वर्गं प्राप्नुहीति स्वर्गम्प्राप्नोति अमोघाऽस्य वाग्भवति ॥ ३६ ॥

**भाष्यार्थः**–( सत्याची प्रतिष्ठा झाली ह्मणजे त्या योग्यानें कोणत्याही प्राण्यास ) 'तूं धार्मिक होशील,' असा आशीर्वाद दिला असतां केवळ त्याच्या वचनानें ( कसाही आचरणानें असला तरी ) तो धार्मिक होतो; 'तुला स्वर्ग ( उत्तम लोक ) प्राप्त होईल,' असें त्यानें ह्मटलें असतां तत्काल यज्ञयागांवांचूनच तो स्वर्गास जातो. याप्रमाणें वाणीचे ठिकाणीं सत्यता येते ॥ ३६ ॥

आतां अस्तेयाचें ऐश्वर्य सांगतात,–

## अस्तेयप्रतिष्ठायां सर्वरत्नोपस्थानम् ॥ ३७ ॥

**सूत्रार्थः**–अस्तेयाची स्थिरता झाल्यानें त्या योग्याला इच्छा नसली तरी सर्वरत्नांची प्राप्ति होते.

**भाष्यम्**–सर्वदिक्स्थान्यस्योपतिष्ठन्ते रत्नानि ॥ ३७ ॥

**भाष्यार्थः**–( अस्तेयाची सिद्धि झाली असतां योग्यानें इच्छा केल्यावांचूनच ) स[र्व] ठिकाणीं असणारीं रत्नें चहूंकडून त्याजवळ प्राप्त होतात ॥ ३७ ॥

आतां ब्रह्मचर्याचें ऐश्वर्य सांगतात,–

## ब्रह्मचर्यप्रतिष्ठायां वीर्यलाभः ॥ ३८ ॥

**सूत्रार्थः**–ब्रह्मचर्य स्थिर झाल्यानें त्या योग्याला मोठें सामर्थ्य प्राप्त होतें.

**भाष्यम्**–यस्य लाभादप्रतिघान् गुणानुत्कर्षयति सिद्धश्च विनेयेषु ज्ञानमाधातुं समर्थो भवतीति ॥ ३८ ॥

**भाष्यार्थः**–( ब्रह्मचर्याची सिद्धि झाली असतां अद्भुत सामर्थ्य प्राप्त होतें कीं ज्याच्या प्राप्तीमुळें योगी अप्रतिबंध अशा ( ज्ञानशक्ति व क्रियाशक्तिरूप अथवा अणिमादि सिद्धिरूप ) गुणांना वाढवितो. तसाच स्वतां सिद्ध ( ज्ञानी ) होऊन आपल्या शिष्यांना ज्ञा[न] देण्याला समर्थ होतो ॥ ३८ ॥

आतां अपरिग्रहाचें ऐश्वर्य सांगतात,–

## अपरिग्रहस्थैर्ये जन्मकथन्तासम्बोधः ॥ ३९ ॥

**सूत्रार्थः**–अपरिग्रहाची स्थिरता झाल्यानें अन्यजन्मांत 'मी कोण होतों, कसा होतों व काय करीत होतों' इत्यादि सर्व ज्ञान होतें.

**भाष्यम्**—अस्य भवति । कोऽहमासङ्कथमहमासङ्किंस्विदिदङ्कथंस्विदिदङ्के वा भविष्यामः कथं वा भविष्याम इत्येवमस्य पूर्वान्तपरान्तमध्येष्वात्मभावजिज्ञासा स्वरूपेणोपावर्तते । एता यमस्थैर्ये सिद्धयः ॥ 'नियमेषु वक्ष्यामः' ॥ ३९ ॥

**भाष्यार्थः**—'अस्य' व 'भवति' या दोन पदांचा सूत्रांत अध्याहार करावयाचा. (अपरिग्रह स्थिर झाला असतां) 'मी पूर्वजन्मीं कोण होतों, मी कसा होतों, हें काय आहे? हें कसें आहे? आह्मी पुढें कोण होणार? व कसे होणार?' याप्रमाणें योग्याला भूत, भविष्यत् व वर्तमान या तिन्ही कालांतील आपल्या जन्मांसंबंधानें जिज्ञासा ( जाणण्याची इच्छा ) होते; त्याबरोबर ती जाणण्याची इच्छा आपला विषय जें ज्ञान त्यानें युक्त होते. (जिज्ञासा झाल्याबरोबर सर्व जन्मांचें ज्ञान आपोआप होतें; ह्मणजे तें संपादन करण्याला कांहीं इतर खटपट करावी लागत नाहीं. ) याप्रमाणें यमांचें स्थैर्य झालें असतां ह्या सिद्धी सांगितल्या ॥ ३९॥

आतां नियमांच्या सिद्धी सांगणार; त्यांत बाह्यशुद्धीचें फल सांगतात,—

## शौचात्स्वाङ्गजुगुप्सा परैरसंसर्गः ॥ ४० ॥

**सूत्रार्थः**—शौचाची स्थिरता झाल्यानें योग्याला आपल्या शरीराविषयीं सुद्धां तुच्छबुद्धि उत्पन्न झाल्यामुळें दुसऱ्यांशीं संबंध ठेवण्याची इच्छा राहत नाहीं.

**भाष्यम्**—स्वाङ्गजुगुप्सायां शौचमारभमाणः कायावद्यदर्शी कायानभिष्वङ्गी यतिर्भवति । किञ्च परैरसंसर्गः । कायस्वभावावलोकी स्वमपि कायञ्जिहासुर्मृज्जलादिभिराक्षालयन्नपि कायशुद्धिमपश्यन् कथं परकायैरत्यन्तमेवाप्रयतैः संसृज्येत ॥४०॥ 'किञ्च' ॥

**भाष्यार्थः**—प्रथम आपलें अंग थोडेंसें मलिन आहे असें वाटून त्याला स्वच्छ करण्याचा प्रयत्न करूं लागलेला योगी जसजसा अभ्यास अधिक करीत जातो तसतसा, शरीर हें मांस, रुधिर इत्यादि अत्यंत कुत्सित ( घाणेरड्या ) पदार्थांनीं बनलेलें आहे अशा दोषदृष्टीनें त्याला आपल्या शरीराचा अगदीं वीट येतो. दुसरें आणिक असें,—त्याला दुसऱ्याचा अगदीं स्पर्श सुद्धां नको असें होतें; कारण, ज्याला शरीराची सर्व स्थिति पाहून आपला देह सुद्धां नकोसा झालेला असतो; व जो शरीरास मृत्तिका, उदक इत्यादिकांनीं नेहमीं पुष्कळ धूत असतांनाही थोडा सुद्धां निर्मळ होत नाहीं असें पाहतो तो दुसऱ्यांच्या अत्यंत अपवित्र देहांचा स्पर्श कसा होऊं देईल? ॥ ४० ॥

आणिक असें,—

## सत्त्वशुद्धिसौमनस्यैकाग्र्येन्द्रियजयात्मदर्शनयोग्यत्वानि च ॥४१॥

**सूत्रार्थः**—आणखी, शौचास्थिरतेपासून सत्वशुद्धि, मनाची प्रसन्नता, चित्ताची स्थिरता, इंद्रियांचा जय आणि आत्मदर्शनाची योग्यता हीं प्राप्त होतात.

**भाष्यम्**—भवन्तीति वाक्यशेषः । शुचेः सत्त्वशुद्धिस्ततः सौमनस्यं तत ऐकाग्र्यं तत इन्द्रियजयस्ततश्चात्मदर्शनयोग्यत्वं बुद्धिसत्त्वस्य भवतीति । एतच्छौचस्थैर्यादधिगम्यत इति ॥ ४१ ॥

**भाष्यार्थः**—'भवन्ति' अशा पदाचा सूत्रांत अध्याहार करावयाचा. मैत्री इत्यादिकांच्या भावनेनें चित्ताचा मल जो राग, द्वेष इत्यादिक, तो दूर केला असतां चित्तसत्वाची शुद्धि, नंतर मनाची प्रसन्नता, त्यानंतर एकाग्रता, त्यापुढें इंद्रियें स्वाधीन राहणें, त्यानंतर आत्मसाक्षात्कार होण्याची योग्यता चित्तसत्वाची होते. ह्या दोन्ही सूत्रांत सांगितलेल्या सिद्धी शौच स्थिर झाल्यानें प्राप्त होतात ॥ ४१ ॥

आतां संतोषाचें फल सांगतात,—

## सन्तोषादनुत्तमसुखलाभः ॥ ४२ ॥

**सूत्रार्थः**—संतोषाची स्थिरता झाल्यानें परमावधि सुखाचा लाभ होतो.

**भाष्यम्**—तथा चोक्तं 'यच्च कामसुखं लोके यच्च दिव्यं महत्सुखम् ॥ तृष्णाक्षयसुखस्यैते नार्हतः षोडशीं कलाम्' इति ॥ ४२ ॥

**भाष्यार्थः**—(संतोष ह्मणजे आशेचा सर्वथा नाश होणें. अशा प्रकारच्या संतोषाचा अभ्यास नित्य करीत करीत तो पूर्ण दशेस आला असतां, ज्यापेक्षां कांहीं उत्तम नाहीं अशा सुखाचा लाभ होतो.) याप्रमाणें स्मृतींतही सांगितलें आहे; तें असें,—'जें कांहीं सर्व लौकिकविषयांपासून होणारें सुख व जें केवल नुसत्या इच्छेनेंच प्राप्त होणाऱ्या विषयांपासून होणारें असें मोठें दिव्य सुख, हीं सर्व सुखें तृष्णाक्षयापासून ( वासनेचा नाश झाल्यामुळें ) होणारें जें सुख त्याची सोळाव्या अंशाची सुद्धां बरोबरी करण्याला योग्य होत नाहींत.' ॥ ४२ ॥

आतां तपाचें फल सांगतात,—

## कायेन्द्रियसिद्धिरशुद्धिक्षयात्तपसः ॥ ४३ ॥

**सूत्रार्थः**—तपानें अशुद्धि दूर होऊन शरीर व इंद्रियांची सिद्धि होते.

**भाष्यम्**—निर्वर्त्यमानमेव तपो हिनस्त्यशुद्ध्यावरणमलम् । तदावरणमलापगमात्कायसिद्धिरणिमाद्या तथेन्द्रियसिद्धिर्दूराच्छ्रवणदर्शनाद्येति ॥ ४३ ॥

**भाष्यार्थः**—अशुद्धि ह्मणजे अधर्म, हा तामस गुण आहे. हाच पुढें विभूतिपादांत सांगावयाच्या ज्या अणिमादि शक्ति त्यांना आवरण ह्मणजे झांकून टाकणारा मल आहे. याला, नित्य अभ्यास करून पूर्ण दशेस प्राप्त झालेलें तप नाहींसें करितें. एकदा कां तपानें अशुद्धिरूप मल दूर झाला ह्मणजे अणिमा, महिमा, लघिमा इत्यादि शरीरसंबंधी सिद्धि (शक्ति) प्राप्त होतात; तशाच दुरून ऐकूं येणें व पाहणें इत्यादि इंद्रियसंबंधी सिद्धी प्राप्त होतात ॥ ४३ ॥

आतां स्वाध्यायाचें फल सांगतात,—

## स्वाध्यायादिष्टदेवतासम्प्रयोगः॥ ४४ ॥

**सूत्रार्थः**—मनांत योजिलेल्या मंत्राचा जप करितां करितां अनुष्ठान पूर्ण आलें असतां योग्याला मनांत योजिलेली देवता प्रसन्न होते (ती देवता त्याला प्रत्यक्ष दर्शन देऊन त्याच्याशीं भाषणादिक करिते ).

**भाष्यम्**—**देवा ऋषयः सिद्धाश्च स्वाध्यायशीलस्य दर्शनं गच्छन्ति, कार्ये चास्य वर्तन्ते इति ॥ ४४ ॥**

**भाष्यार्थः**—नित्यनियमानें स्वाध्याय करणाऱ्या पुरुषास, तो ज्याचें दर्शन व्हावें अशी इच्छा करितो ते देव, ऋषि, सिद्ध इत्यादिक वाटेल ते प्रत्यक्ष दर्शन देतात; व तो सांगेल तें कार्य करण्यास ते तयार असतात ॥ ४४ ॥

आतां ईश्वरप्रणिधानाचें फल सांगतात,—

## समाधिसिद्धिरीश्वरप्रणिधानात् ॥ ४५ ॥

**सूत्रार्थः**—ईश्वरप्रणिधानानें समाधीची सिद्धि होते.

**भाष्यम्**—**ईश्वरार्पितसर्वभावस्य समाधिसिद्धिर्यया सर्वमीप्सितमवितथं जानाति देशान्तरे देहान्तरे,कालान्तरे च। ततोऽस्य प्रज्ञा यथाभूतं प्रजानातीति॥४५॥ 'उक्ताः सह सिद्धिभिर्यमनियमाः॥ आसनादीनि वक्ष्यामस्तत्र'॥**

**भाष्यार्थः**—ईश्वराच्याच ठिकाणीं अर्पण ( निवेदन ) केले आहेत सर्व व्यापार ज्यानें अशा पुरुषास समाधीची सिद्धि लवकर होते. ( ह्मणजे ईश्वरभक्तीनें ईश्वर प्रसन्न होऊन त्यास समाधीला येणारीं सर्व विघ्नें दूर करितो, त्यामुळें समाधि लवकर सिद्ध होतो.) ज्या सिद्धीच्या योगानें योगी आपले सर्व मनोरथ पूर्ण झाले असें समजतो. ( अर्थात् कोणत्याही वस्तूची त्याला इच्छा राहत नाहीं. ) त्यानंतर दूर देशांत असो अथवा दुसऱ्याच्या मनांतील असो किंवा कोणत्याही वेळीं असो; अशा सर्व गोष्टींला बरोबर जाणणारी अशी प्रज्ञा ( बुद्धि ) योग्याची होते ॥ ४५ ॥

सिद्धिसहित सर्व यम व नियम सांगितले; आतां आसनादिक सांगणार आहोंत, त्यांत—

## स्थिरसुखमासनम् ॥ ४६ ॥

**सूत्रार्थः**—ज्याच्या योगानें शरीरास कंप उत्पन्न न होतां सुख प्राप्त होईल ( कसल्याही वेदना होणार नाहींत ), अशा प्रकारच्या बसण्यास आसन ह्मणतात.

**सू० ४६ टी०**—१ हें आसन, पद्मासन इत्यादिक अनेक प्रकारचे वसिष्ठ इत्यादिकांनीं सांगितलें आहे; तें येणेंप्रमाणे,—१ डावा पाय गुदा ( मलद्वार ) आणि लिंग या दोहोंच्या मध्यभागीं व उजवा पाय लिंगाच्या वरच्या भागावर ठेवून, हनुवटी हृदयाजवळ लावून, सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवून, स्थाणु ( झाडाचा बुंधा ) त्याप्रमाणें स्थिर राहून व भुवईच्या मध्ये दृष्टि ठेवावी; अशा बसण्यास सिद्धासन ह्मणतात. हे मोक्ष-

**भाष्यम्**–तद्यथा, पद्मासनं वीरासनं भद्रासनं स्वस्तिकं दण्डासनं सोपाश्रयं पर्य्यङ्कं क्रौञ्चनिषदनं हस्तिनिषदनमुष्ट्रनिषदनं समसंस्थानं स्थिरसुखं यथासुखं चेत्येवमादीति ॥ ४६ ॥

**भाष्यार्थः**–( बसण्याचा जो विशेष प्रकार त्यास आसन ह्मणतात. ) तें पद्मासन, वीरासन, भद्रासन, स्वस्तिकासन, दंडासन, सोपाश्रय, पर्यंक, क्रौंचनिषदन, हस्तिनिषदन, उष्ट्रनिषदन व समसंस्थान असें अनेक प्रकारचें आहे. त्यांत ज्याला ज्यापासून बसतांना शरीरास कंप उत्पन्न होणार नाहीं व सुख होईल त्यानें तें घ्यावें ॥ ४६ ॥

आतां आसन दृढ व सुखकारक करण्याचा उपाय सांगतात,–

**प्रयत्नशैथिल्यानन्तसमापत्तिभ्याम् ॥ ४७ ॥**

**सूत्रार्थः**–स्वाभाविक होणाऱ्या शरीरव्यापाराची शिथिलता ( ते व्यापार बंद झाले असतां ) व पृथ्वीस धारण करणारा अर्थात् अत्यंत स्थिर असणारा असा जो सहस्रफणी अनंत ( शेष ) त्याचे ठिकाणीं चित्ताची एकाग्रता केली असतां आसन सिद्ध होतें.

**भाष्यम्**–भवतीति वाक्यशेषः । प्रयत्नोपरमात्सिद्ध्यत्यासनं येन नाङ्गमेजयो भवति। अनन्ते वा समापन्नं चित्तमासनं निर्वर्तयतीति ॥ ४७ ॥

**भाष्यार्थः**–' भवति ' या पदाचा सूत्रांत अध्याहार करावयाचा. शरीराचे स्वभावतः होणारे जे हालणें, चालणें इत्यादि प्रयत्न ( व्यापार ) ते अभ्यासानें अगदीं शिथिल (सैल) सोडले असतां आसन स्थिर व सुखकारक होतें. ज्यायोगानें शरीरास कंप उत्पन्न होत नाहीं. अथवा पृथ्वीला धारण करणारा यावरून अत्यंत निश्चल राहणारा असा जो अनंत ह्मणजे शेष त्या ठिकाणीं चित्त धारण करून तदाकार झालें असतां आसन दृढ व सुखकारक होतें ॥ ४७ ॥

आतां आसन स्थिर झाल्याचें फल सांगतात,–

---

द्वारास खुलें करणारें आहे; ह्मणून ह्यास योगी सिद्धासन ह्मणतात. २ डाव्या मांडीवर उजवा पाय ( पाऊल) व उजव्या मांडीवर डावा पाय ठेवून, उजव्या हातानें डाव्या पायाचा अंगुठा व डाव्या हातानें उजव्या पायाचा अंगुटा बळकट धरून, हृदयाजवळ हनुवटी लावून नाकाच्या शेंड्यावर दृष्टि ठेवावी; अशा रीतीनें वसण्यास पद्मासन ह्मणतात. हें योग्याच्या सर्व व्याधींला दूर करितें. ३ वृषणाच्या ( अंडकोशाच्या ) खालीं जी शिवण असते तिच्या उजव्या बाजूस डाव्या पायाचा घोंटा व तिच्या डाव्या बाजूस उजव्या पायाचा घोंटा ठेवून, दोन्ही मांड्यांवर, सर्व बोटें पसरून दोन्ही हात ठेवावे; व तोंड मिटलेलें न ठेवतां नाकाच्या शेंड्यावर एकसारखी दृष्टि ठेवावी; अशा बसण्यास सिंहासन ह्मणतात. ४ वृषणाच्या खालीं शिवणीच्या डाव्या बाजूस डाव्या पायाचा घोंटा व उजव्या बाजूस उजव्या पायाचा घोंटा ठेवून जवळ आलेल्या दोन पायांस दोन्ही हातांनीं बळकट धरून निश्चल बसावें; अशा बसण्यास भद्रासन ह्मणतात. हें सर्व व्याधींस दूर करितें. याप्रमाणें योगप्रदीपिकादि ग्रंथांत अनेक आसनें सांगितलीं आहेत; परंतु त्या सर्वांत सिद्धासनाचीच प्रशंसा पुष्कळ केली आहे. करितां त्याचा नेहमीं अभ्यास करावा.

## ततो द्वन्द्वानभिघातः ॥ ४८ ॥

**सूत्रार्थः**–आसनजय झाल्यानें शीतोष्ण, क्षुत्तृष्णा इत्यादि जीं द्वंद्वें ( जोडपीं ), त्यांपासून योग्यास पीडा होत नाहीं.

**भाष्यम्**–शीतोष्णादिभिर्द्वन्द्वैरासनजयान्नाभिभूयते ॥ ४८ ॥

**भाष्यार्थः**–आसनजय झाल्यानें शीत व उष्ण इत्यादिक जीं द्वंद्वें, त्यांपासून योग्यास पीडा होत नाहीं ॥ ४८ ॥

आतां क्रमानें प्राप्त झालेलें योगाचें चवथें अंग प्राणायाम सांगतात,–

## तस्मिन्सति श्वासप्रश्वासयोर्गतिविच्छेदः प्राणायामः ॥४९॥

**सूत्रार्थः**–आसनजय झाल्यानंतर बाहेरच्या वायूचा प्रवेश आंत न होऊं देणें व आंतील वायूस बाहेर न जाऊं देणें, यास प्राणायाम ह्मणतात.

**भाष्यम्**–सत्यासनजये बाह्यस्य वायोराचमनं श्वासः कोष्ठ्यस्य वायोर्निःसारणं प्रश्वासस्तयोर्गतिविच्छेद उभयाभावः प्राणायामः ॥ ४९ ॥ 'स तु' ॥

**भाष्यार्थः**–आसन सिद्ध झाल्यानंतर पुढें बाहेरचा वायु नाकाच्या छिद्रांवाटें( भोंकांवाटें) पोटांत साठविणें याला श्वास ( व पूरक ) असें ह्मणतात. पोटांतील वायूला पुनः नाकाच्या छिद्रांवाटें बाहेर सोडणें याला प्रश्वास ( व रेचक ) असें ह्मणतात. या श्वासप्रश्वासांचा जो गतिविच्छेद (वायूच्या गतीचा प्रतिबंध) ह्मणजे श्वास व प्रश्वास ह्या दोन्हीही गती चालू न देणें, याला प्राणायाम ( व कुंभक ) असें ह्मणतात ॥ ४९ ॥

आतां तोच सुलभरीतीनें समजण्याकरितां विभाग करून त्याचें स्वरूप सांगतात,–

## बाह्याभ्यन्तरस्तम्भवृत्तिर्देशकालसंख्याभिः परिदृष्टो दीर्घसूक्ष्मः॥५०॥

**सूत्रार्थः**–बाह्यवृत्ति ह्मणजे वायु बाहेर सोडणें, ह्यासच श्वास व रेचक ह्मणतात; आभ्यंतरवृत्ति ह्म० वायु आंत ओढून घेणें, ह्यासच प्रश्वास व पूरक ह्मणतात; स्तंभवृत्ति ह्म० वायु आंत कोंडून धरणें, यास कुंभक[1] ह्मणतात. अशा तीन प्रकारचा हा प्राणायाम स्थल[2], काल[3] व संख्या[4] ह्यांच्याविषयींच्या विचारानें, दीर्घ व सूक्ष्म असा दृष्ट आहे.

---

**सू० ५० टी०–१** जसें कुंभांत ह्मणजे घागरींत भरलेलें पाणी शांत व निश्चल राहतें, तसा पूरकद्वारें फुप्फुसांत भरलेला वायु राहतो; ह्मणून ह्यास कुंभक असें नांव आहे. २ श्वास व प्रश्वास कारितांना जी वायूची धारा चालते, ती नाकापासून बारा अंगुळें इत्यादि प्रमाणानें चालावी, हा प्राणायामाच्या स्थलाचा विचार झाला. ३ श्वास अथवा प्रश्वास हा छत्तीस, चोवीस, निदानपक्षीं बारा मात्रांपर्यंत चालवावा, हा कालविचार झाला. ४ प्राणायाम इतके वेळां केला; एवढ्या श्वासप्रश्वासांनीं पहिला उद्घात झाला. ह्याप्रमाणें उद्घात किती झाले हें समजण्याकरितां संख्येचें ग्रहण केलें. हा संख्याविचार झाला. उद्घात ह्मणजे बेंबीच्या मूळापासून प्रेरणा झालेल्या वायूचें जें डोक्यांत आपटणें तो. भोजवृत्ति.

भाष्यम्–यत्र प्रश्वासपूर्वको गत्यभावः स बाह्यः। यत्र श्वासपूर्वको गत्यभावः स आभ्यन्तरः। तृतीयस्तम्भवृत्तिर्यत्रोभयाभावः सकृत्प्रयत्नाद्भवति। यथा तप्ते न्यस्तमुपले जलं सर्वतः संकोचमापद्यते तथा द्वयोर्युगपद्गत्यभाव इति। त्रयोऽप्येते देशेन परिदृष्टा इयानस्य विषयो देश इति। कालेन परिदृष्टाः। क्षणानामियत्तावधारणेनावच्छिन्ना इत्यर्थः। संख्याभिः परिदृष्टा एतावद्भिः श्वासप्रश्वासैः प्रथम उद्घातस्तद्वन्निगृहीतस्यैतावद्भिर्द्वितीय उद्घात एवं मृदुरेवं मध्य एवं तीव्र इति संख्यापरिदृष्टाः। स खल्वयमेवमभ्यस्तो दीर्घसूक्ष्मः॥ ५०॥

भाष्यार्थः–(तो गतिविच्छेद (प्राणायाम) तीन प्रकारचा; त्यांत ज्या प्राणायामांत प्रश्वासानें गतिविच्छेद (वायूच्या गतीचा प्रतिषेध) केलेला असतो तो १ बाह्य (बाह्यवृत्ति) (रेचकनामक) प्राणायाम होय. तसेंच ज्या गतिविच्छेदांत श्वासानें गतिविच्छेद केलेला असतो तो २ आभ्यंतर (आभ्यंतरवृत्ति) (पूरकनामक) प्राणायाम होय. आणि जेथें श्वास व प्रश्वास या दोहोंचा अभाव एकवेळच्या प्रयत्नानेंच होतो (अर्थात् आंतला वायु आंतच स्तंभून (रोंकून) ठेवायाचा, बाहेर जाऊं द्यावयाचा नाहीं; व बाहेरील वायु बाहेरच स्तंभून ठेवावयाचा, पोटांत घ्यावयाचा नाहीं;) हा ३ रा स्तंभवृत्ति (कुंभकनामक) प्राणायाम होय. याला दृष्टांत,–जसें तापलेल्या दगडावर टाकलेलें पाणी चोहोंकडून सुकत सुकत मध्यें थोडेंसें राहतें; त्याप्रमाणें (वायूचा चहूंकडे वाहण्याचा स्वभाव खरा परंतु त्याला स्तंभून (रोंकून) धरण्याचा प्रयत्न जबरदस्त पडल्यामुळें तो शरीरांतच संकोचित होऊन राहतो ह्मणून) एकाच वेळीं श्वास व प्रश्वास ह्या दोन्ही गतींचा अभाव होतो (दोहोंची गति बंद होते). रेचक, पूरक व कुंभक हे तीनही 'इतका हा देश या प्राणायामाचा (रेचकाचा) विषय,' याप्रमाणें देशानें परिदृष्ट (मोजलेले) आहेत. 'इतका हा काल या प्राणायामाचा (पूरक किंवा कुंभकाचा) विषय,' याप्रमाणें कालानें परिदृष्ट (मोजलेले) ह्मणजे (डोळे झांकण्यास जो काल लागतो, त्याच्या चवथ्या भागास क्षण ह्मणतात. अशा) 'इतक्या क्षणांपर्यंत हा प्राणायाम झाला,' अशा कालमानानें मोजलेले आहेत; असा अर्थ. असेंच 'एवढ्या श्वास व प्रश्वासांनीं परिमित हा पहिला उद्घात झाला. इतका वेळपर्यंत वायूचें स्तंभन केल्यानंतर पुनः इतक्या श्वासप्रश्वासांनीं दुसरा उद्घात झाला. इतक्याच श्वासप्रश्वासांनीं तिसरा उद्घात झाला. याचप्रमाणें इतक्या श्वासप्रश्वासांनीं मृदु, असाच मध्य व असाच तीव्र; याप्रमाणें संख्यांनीं परिदृष्ट आहेत. याप्रमाणें सांगितलेला बाह्यवृत्ति, आभ्यंतरवृत्ति व स्तंभवृत्ति असा तीन प्रकारचा प्राणायामच देश, काल व संख्या यांच्या निश्चयानें त्याचा रोज अभ्यास करीत गेलें असतां बहुत कालपर्यंत टिकणारा ह्मणून दीर्घ असा होऊन वायूच्या संचाराच्या अतिसूक्ष्मपणामुळें सूक्ष्म असा होतो॥५०॥

प्राणायामाचे तीन भेद सांगितले; आतां त्याचा चवथा विशेष भेद सांगतात,–

## बाह्याभ्यन्तरविषयाक्षेपी चतुर्थः ॥ ५१ ॥

**सूत्रार्थः**—ज्यांत बाह्य व आभ्यंतर विषयांचें अवलोकन करण्यांत येतें तो प्राणायामाचा चौथा प्रकार होय.

**भाष्यम्**—देशकालसंख्याभिर्बाह्यविषयः परिदृष्ट आक्षिप्तः। तथाऽऽभ्यन्तरविषयः परिदृष्ट आक्षिप्त उभयथा दीर्घसूक्ष्मः। तत्पूर्वको भूमिजयात्क्रमेणोभयोर्गत्यभावश्चतुर्थः। प्राणायामस्तृतीयस्तु विषयानालोचितो गत्यभावः सकृदारब्ध एव देशकालसंख्याभिः परिदृष्टो दीर्घसूक्ष्मः। चतुर्थस्तु श्वासप्रश्वासयोर्विषयावधारणात् क्रमेण भूमिजयादुभयाक्षेपपूर्वको गत्यभावश्चतुर्थः प्राणायाम इत्ययं विशेष इति ॥ ५१ ॥

**भाष्यार्थः**—बाह्य (देशरूप) विषय देश, काल व संख्या यांनीं मोजला गेला व नंतर सूक्ष्मदृष्टीनें अवलोकन किंवा चांगल्या रीतीनें निश्चित केला. तसाच आभ्यंतर (हृदय, नाभिचक्र वगैरे) विषय हाही देशादिकांनीं मोजला गेला व नंतर चांगल्या रीतीनें निश्चित केला. दोन्ही प्रकारचे विषय (अभ्यासानें) दीर्घसूक्ष्म झाले. याप्रमाणें पूर्वी झाल्यानंतर क्रमानेंच (मधल्या) भूमिकांचा जय होऊन जो श्वास व प्रश्वास या उभयगतींचा अभाव होतो तो चवथा प्राणायाम होय. (आतां गतिविच्छेद दोघांतही खरा, परंतु) तिसऱ्या प्राणायामांत पूर्वी सांगितलेल्या श्वासप्रश्वासविषयांचें आलोचन ह्मणजे सूक्ष्मदृष्टीनें अवलोकन केल्यावांचून एकवेळच्या प्रयत्नानेंच उभयगतींचा अभाव होतो; व तो देशादिकांनीं परिदृष्ट होऊन अभ्यासानें दीर्घसूक्ष्म होतो. आणि या चवथ्या प्राणायामांत तर पूर्वी श्वासप्रश्वासविषयांचा चांगला निश्चय करून मग पुढें क्रमानें भूमिकाजय झाल्यानंतर उभयतांचें अतिक्रमण करून गतींचा अभाव होतो; ह्मणून हा चवथा प्राणायाम तिसऱ्यापेक्षां विशेष आहे ॥ ५१ ॥

आतां प्राणायामाचें सिद्धिसूचक फल सांगतात,—

## ततः क्षीयते प्रकाशावरणम् ॥ ५२ ॥

**सूत्रार्थः**—प्राणायामाची सिद्धि झाल्यानें बुद्धिसत्वावर असलेलें क्लेशरूप आवरण (पडदा) दूर होतें.

**भाष्यम्**—प्राणायामानभ्यस्यतोऽस्य योगिनः क्षीयते विवेकज्ञानावरणीयं कर्म। यत्तदाचक्षते 'महामोहमयेनेन्द्रजालेन प्रकाशशीलं सत्त्वमावृत्य तदेवाऽकार्ये नियुङ्क्ते' इति। तदस्य प्रकाशावरणं कर्म संसारनिबन्धनं प्राणायामाभ्यासाद्दुर्बलं भवति, प्रतिक्षणं च क्षीयते । तथा चोक्तं 'तपो न परं प्राणायामात्ततो विशुद्धिर्मलादीनां दीप्तिश्च ज्ञानस्य' इति ॥ 'किञ्च' ॥ ५२ ॥

**भाष्यार्थः**—प्राणायामाचा निरंतर अभ्यास करणाऱ्या योग्याचें विवेकज्ञानाला झां-

कून टाकणारें कर्म ( अधर्म ) नाश पावतें. ज्या कर्माबद्दल पूर्वींचे आचार्य सांगतात; कीं,– ' जें महामोहमय इंद्रजालानें, प्रकाशस्वभाव जें बुद्धिसत्त्व त्याला आवरून ( झांकून टाकून ) तें कर्मच अकार्यांत ( अधर्मांत ) प्रवृत्त करितें; तें हें बुद्धिसत्त्वाच्या प्रकाशाला लोपवून टाकणारें ह्मणूनच संसाराला कारण असें कर्म योग्याच्या प्राणायामाच्या अभ्यासानें दुर्बल ( प्रकाशाला लोपवून टाकण्यास असमर्थ ) होतें; व प्रतिक्षणीं त्याचा नाश होत जातो. याप्रमाणें पूर्वींच्या आचार्यांनीं सांगितलें आहे; कीं,–' प्राणायामापेक्षां मोठें दुसरें तप नाहीं; त्यापासून पापाचा सर्वथा नाश झाल्यामुळें तमोरूप मल दूर होऊन ज्ञानाचा प्रकाश होतो' ॥ ५२॥

आणिक असें,–

## धारणासु च योग्यता मनसः ॥ ५३ ॥

**सूत्रार्थः**–त्यानंतर मन निर्दोष झाल्यामुळें त्यास ज्या ज्या विषयावर लावावें, तेथें तेथें तें स्थिर होतें.

**भाष्यम्–प्राणायामाभ्यासादेव प्रच्छर्दनविधारणाभ्यां वा प्राणस्येति वचनात् ॥ ' अथ कः प्रत्याहारः ' ॥ ५३ ॥**

**भाष्यार्थः**–प्राणायामाच्या अभ्यासानेंच ( धारणेविषयीं मनाची योग्यता होते; ) कारण, पूर्वीं ( स० सू० ३४ त ) ' अथवा नाकावाटें वायु बाहेर सोडणें व आंत ओढून घेणें असें केल्यानें चित्त एकाग्र होतें. ' असें सांगितलें आहे ह्मणून ॥ ५३ ॥

आतां प्रत्याहार कोणता ? तो सांगतात,–

## स्वविषयासम्प्रयोगे चित्तस्य स्वरूपानुकार इवेन्द्रियाणांप्रत्याहारः।५४

**सूत्रार्थः**–इंद्रियें आपापल्या विषयांचा परित्याग करून चित्तस्वरूपाचें अनुकरण करितात, त्यास प्रत्याहार ह्मणतात.

**भाष्यम्–स्वविषयसंप्रयोगाभावे चित्तस्वरूपानुकार इवेति चित्तनिरोधे चित्तवन्निरुद्धानीन्द्रियाणि नेतरेन्द्रियजयवदुपायान्तरमपेक्षन्ते । यथा ' मधुकरराजं मक्षिका उत्पतन्तमनूत्पतन्ति निविशमानमनु ' निविशन्ते ' तथेन्द्रियाणि चित्तनिरोधे निरुद्धानीत्येष प्रत्याहारः ॥ ५४ ॥**

**भाष्यार्थः**–' रूप, रस इत्यादि जे चक्षु इत्यादि इंद्रियांचे विषय, त्यांचें ग्रहण न करण्याविषयीं ( इंद्रियें ) चित्तस्वरूपासारखें अनुकरण करितात.' असें जें सूत्रांत सांगितलें आहे; याचा अभिप्राय असा कीं, ( वैराग्यामुळें ) चित्त निरुद्ध झालें ह्मणजे शब्दादिविषयांकडे जाईनासें होतें, मग त्याप्रमाणें इंद्रियें सुद्धां निरुद्ध होतात आणि आपापल्या विषयांचें ग्रहण करीत नाहींत. तात्पर्य, इतर इंद्रियजयाप्रमाणें त्यांना स्वाधीन करण्याला कांहीं दुसऱ्या उपायाची गरज

---

सू० ५३ टी०–१ धारणेचें लक्षण ( विभू० सू० १ त ) सांगितलें आहे.

लागत नाहीं. याला दृष्टांत; जसा,–'मधमाशा भ्रमर अथवा त्यांच्या मधील राजा उडूं लागला ह्मणजे त्याच्या बरोबर उडतात; व तो कोठें फुलावर बसूं लागला ह्मणजे त्या फुलावर आपणही बसतात.' त्याप्रमाणें इंद्रियें चित्तनिरोध झाला असतां निरुद्ध होतात ( सर्व विषय सेवन करण्याचें सोडून देतात ); याला प्रत्याहार ह्मणतात ॥ ५४ ॥

आतां प्रत्याहाराचें फल सांगतात,–

## ततः परमा वश्यतेन्द्रियाणाम् ॥ ५५ ॥

**सूत्रार्थः**–प्रत्याहार सिद्ध झाल्यानें इंद्रियें फारच चांगल्या रीतीनें स्वाधीन होतात.

**भाष्यम्**–शब्दादिष्वव्यसनमिन्द्रियजय इति केचित् । सक्तिर्व्यसनं व्यस्यत्येनं श्रेयस इति । अविरुद्धा प्रतिपत्तिर्न्याय्या शब्दादिसंप्रयोगः स्वेच्छयेत्यन्ये । रागद्वेषाभावे सुखदुःखशून्यं शब्दादिज्ञानमिन्द्रियजय इति केचित् । चित्तैकाग्र्यादप्रतिपत्तिरेवेति जैगीषव्यः । ततश्च परमा त्वियं वश्यता यच्चित्तनिरोधे निरुद्धानीन्द्रियाणि नेतरेन्द्रियजयवत्प्रयत्नकृतमुपायान्तरमपेक्षन्ते योगिन इति ॥ ५५ ॥

**भाष्यार्थः**–(इंद्रियांचा परम जय ह्मणजे कशाला ह्मणतात ; याविषयीं अनेक मतभेद आहेत. ) कोणी ' शब्दादिविषयांच्या ठिकाणीं व्यसन नसणें ' याला इंद्रियजय ह्मणतात. 'व्यसन' या शब्दाचा अर्थ सक्ति (प्रीति). असा अर्थ, 'जें पुरुषाप्रत परमकल्याणापासून दूर करितें तें व्यसन,' अशा व्युत्पत्तीनें ( अवयवार्थानें ) होतो. कोणी ( वेदादिकांस ) अविरुद्ध जे शब्दादि विषय त्यांचें सेवन करणें व वेदादिविरुद्ध विषयांच्या ठिकाणीं प्रवृत्ति न होऊं देणें; व अशी प्रवृत्ति होऊं देणें नीतीस अनुसरून आहे; करितां हाच इंद्रियजय ' असें ह्मणतात. दुसरे 'शब्दादिक विषयांचें सेवन जर इंद्रियें आपलीं आपण करूं लागलीं तर त्यांस खुशाल करूं द्यावें; आपण मात्र बुद्ध्या त्यांची प्रवृत्ति करूं नये; हा इंद्रियजय,' असें ह्मणतात. कोणी ' राग व द्वेष या निमित्तांनीं होणारें जें सुख व दुःख, त्यांनीं रहित जो विषयभोग अर्थात् विषयभोगाविषयीं उदासीनपणा, हा इंद्रियजय, ' असें ह्मणतात. आणि जैगीषव्यनामक परमऋषि 'चित्ताचें ऐकाग्र्य ह्मणजे चित्त एकाग्र झाल्यामुळें ( चित्ताबरोबरच ) इंद्रियांची विषयसेवनाविषयीं अप्रवृत्ति; हा इंद्रियजय,' असें ह्मणतात. (हाच इंद्रियजय सूत्रकारांस संमत आहे. ) यालाच इंद्रियांचें मुख्य स्वाधीन होणें ( मुख्य इंद्रियजय ) असें ह्मणतात; कारण, जी इंद्रियांची मुख्य वश्यता झाली असतां, चित्तनिरोध झाला असतां इंद्रियांचाही ( सहज ) निरोध होतो; आणि इतर इंद्रियजयाप्रमाणें या इंद्रियजयास दुसऱ्या प्रयत्नाची गरज योग्यांना लागत नाहीं. ( जशी.) यतमानसंज्ञा वैराग्यानें एका इंद्रियाचा जय झाला तरी दुसऱ्या इंद्रियांच्या जयाकरितां दुसऱ्या प्रयत्नाची गरज लागते, तशी ही सांगितलेली परमा वश्यता झाली असतां आणखी दुसरा प्रयत्न योग्याला करावा लागत नाहीं ॥ ५५ ॥

**॥ इति श्रीवेदव्यासकृतभाष्यसहिते टिप्पण्यादियुतभाषान्तरोपेते सांख्यप्रवचने योगशास्त्रे साधनपादः समाप्तः ॥ २ ॥**

ॐ तत्सत्परमात्मने नमः ।

# पातञ्जलयोगसूत्रम् ।

## श्रीव्यासभाष्योपेतं भाषानुवादसहितं च ।

### विभूतिपादः ॥ ३ ॥

**भाष्यम्–'उक्तानि पञ्च बहिरङ्गानि साधनानि धारणा वक्तव्या ॥'**

**भाष्यार्थः**–पूर्वींच्या साधनपादांत यम, नियम इत्यादिक पांच योगाचीं बहिरंग ( परंपरेनें उपयोगी पडणारीं ) साधनें सांगितलीं; आतां अंतरंग ( साक्षात् उपयोगी पडणारीं ) साधनें सांगण्याकरितां व योगावर श्रद्धा उत्पन्न करणाऱ्या ज्या विभूति त्या सांगण्याकरितां या विभूतिपादाचा आरंभ आहे. त्यांत प्रथम योगास अंतरंग साधन जी धारणा तिचें लक्षण सांगतात,–

## देशबन्धश्चित्तस्य धारणा ॥ १ ॥

**सूत्रार्थः**–नाभिचक्र इत्यादि विशेषस्थलीं चित्त स्थिर करणें ह्यास धारणा असें ह्मणतात.

**भाष्यम्–नाभिचक्रे हृदयपुण्डरीके मूर्ध्नि ज्योतिषि नासिकाग्रे जिह्वाग्र इत्येवमादिषु देशेषु बाह्ये वा विषये चित्तस्य वृत्तिमात्रेण बन्ध इति बन्धो धारणा ॥१॥**

**भाष्यार्थः**–नाभिचक्र, हृदय, ऊर, मस्तक, ज्योति, नाकाचा शेंडा, जिभेचा शेंडा, कंठ, दोन्ही डोळे, भुवयांचा मधला भाग इत्यादि आंतील स्थानांच्या ठिकाणीं किंवा बाह्य ह्मणजे बाहेरच्या चंद्र, सूर्य, अग्नि इत्यादि पदार्थांच्या ठिकाणीं जो चित्तवृत्तींचा संबंध करणें याला धारणा ह्मणतात. ( तात्पर्य, ज्या वस्तूचें ध्यान करावयाचें त्या वस्तूच्या ठिकाणीं चित्तवृत्ति ठेवणें ही धारणा होय. ) ॥ १ ॥

आतां धारणेनें सिद्ध होणाऱ्या ध्यानाचें लक्षण सांगतात,–

**सू० १ टीपः**–१ गरुडपुराणांत तर 'बारा प्राणायामांस जितका काल लागतो; तितका वेळपर्यंत ब्रह्माचे ठिकाणी मन धारण करणें, ह्यास धारणा असें ह्मणतात,' असें सांगितलें आहे. यावरून वरील सूत्रांतही बारा प्राणायामांपर्यंत चित्त स्थिर करण्यासच धारणा ह्मणावयाची; नाहींतर एक क्षणभर जरी चित्त स्थिर झालें तरी त्यास धारणा ह्मणावी असें होऊं लागेल. वि० भि०.

## तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् ॥ २ ॥

**सूत्रार्थः**—ज्यावर चित्ताची धारणा केली असेल तेथेंच त्याची एकाग्रता होऊन दुसरीकडे न जाऊं देणें ह्यास ध्यान असें ह्मणतात.

**भाष्यम्—तस्मिन्देशे ध्येयालम्बनस्य प्रत्ययस्यैकतानता सदृशः प्रवाहः प्रत्ययान्तरेणापरामृष्टो ध्यानम् ॥ २ ॥**

**भाष्यार्थः**—( ज्या वस्तूच्या ठिकाणीं चित्ताच्या विरुद्ध ( उलट ) वृत्तींची निवृत्ति करण्याविषयीं प्रयत्न करावा लागतो ती पूर्वसूत्रांत सांगितलेली धारणा झाली. व त्याच वस्तूच्या ठिकाणीं जी प्रत्ययाची ह्मणजे चित्तवृत्तींची एकाग्रता ह्मणजे अनुभविलेला विषयच एकसारखा मनांत असणें, अर्थात् एका विषयांत दुसऱ्या विषयाचा संबंध बिलकुल नसणें, याला ध्यान असें ह्मणतात ॥ २ ॥

आतां ध्यानानें साध्य होणारें व योगाचें मुख्य अंग जो समाधि, त्याचें लक्षण सांगतात,—

## तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः ॥ ३ ॥

**सूत्रार्थः**—तेंच ध्यान जेव्हां ध्येयस्वरूपाकार ह्मणजे ज्याचें ध्यान करीत असेल तद्रूपच होऊन अन्य पदार्थांचें ज्ञान निराळें ह्मणून कांहींच राहत नाहीं ह्मणजे ध्यान व पदार्थ ह्या दोहोंचा एकाकार होतो तेव्हां त्यास समाधि असें ह्मणतात.

**भाष्यम्—ध्यानमेव ध्येयाकारनिर्भासं प्रत्ययात्मकेन स्वरूपेण शून्यमिव यदा भवति ध्येयस्वभावावेशात्तदा समाधिरित्युच्यते ॥ इदमत्र बोध्यम् । ध्यातृध्येयध्यानकलनावद् ध्यानं तद्रहितं समाधिरिति ध्यानसमाध्योर्विभागः । अस्य च समाधिरूपस्याङ्गस्याङ्गियोगसंप्रज्ञातयोगादयम्भेदो यदत्र चिन्तारूपतया निःशेषतो ध्येयस्वरूपं न भासते । अङ्गिनि तु संप्रज्ञाते साक्षात्कारोदये समाध्यविषया अपि विषया भासन्त इति । तथा च । साक्षात्कारयुक्तैकाग्र्यकाले सम्प्रज्ञातयोगः । अन्यदा तु समाधिमात्रमिति विभागः ॥ ३ ॥**

**भाष्यार्थः**—जेव्हां ध्यानच ध्येयाच्या आकारानें भासूं लागतें, व ध्येयस्वरूपाच्या आवेशानें ' मी चिंतन करितों ' अशा वृत्तीचें भान मुळींच राहत नाहीं. त्या वेळेस (त्या ध्यानालाच ) समाधि असें ह्मणतात. येथें असा विचार समजावा कीं, ज्या ठिकाणीं, ध्यान

---

सू० २ टीपः—१ वर टीपेंत सांगितलेली जी धारणा, त्या बारा होईपर्यंत चिंतन करणें ह्यास ध्यान असें ह्मणतात; असें ध्यानाचें विशेष लक्षण गरुडपुराणांत सांगितलें आहे. वि० भि०.

सू० ३ टीपः—१ वर टीपेंत सांगितलें जें ध्यान तें बारावेळ होईपर्यंत ब्रह्माचे ठिकाणीं तल्लीन होणें ह्यास समाधि ह्मणतात; असें गरुडपुराणांत समाधीचें विशेष लक्षण सांगितलें आहे. वि० भि०.

करणारा तो ध्याता, ज्याचें ध्यान करावयाचें तें ध्येय व ध्यान अशा ध्याता, ध्येय व ध्यान ह्या त्रिपुटीचें भान असतें तें ध्यान; व जेथें ह्या त्रिपुटीचें ( ध्याता, ध्येय व ध्यान या तिघांचें ) पृथक् भान न होतां केवल ध्येयाच्या आकारानेंच ध्यान भासूं लागतें, तो समाधि; याप्रमाणें ध्यान व समाधि या दोहोंमध्यें भेद समजावा. (तात्पर्य, जेथें चित्ताची एकाग्रता विरुद्ध-वृत्तीनें खंडित होते ती धारणा; ज्यांत एकाग्रता खंडित न होतां ध्याता, ध्येय व ध्यान या तिघांचें स्फुरण होतें तें ध्यान; व ज्यांत केवल ध्येयाचेंच स्फुरण होतें तो समाधि जाणावा.) या समाधिरूप अंगाचा अंगी जो संप्रज्ञातयोग त्यापेक्षां यामध्यें हा भेद आहे कीं, या समाधींत ज्याचें ध्यान करावयाचें त्या ध्येयापेक्षां अधिक वस्तूचें भान होत नाहीं; व अंगी जो संप्रज्ञातयोग त्यामध्यें तर ( विवेकख्यातिरूप ) साक्षात्कार झाला ह्मणजे पहिल्या समाधीमध्यें ज्या विषयांची धारणा केली नव्हती, असले विषय सुद्धां भासतात. यावरून असें सिद्ध झालें कीं, ज्या एकाग्रतेच्या वेळीं साक्षात्कार होतो तो संप्रज्ञातयोग व ज्या वेळेस केवल एकाग्रताच असते तो समाधि मात्र, असा यांत विभाग जाणावा ॥ ३ ॥

धारणा, ध्यान व समाधि या तिघांचा एकाच शब्दानें व्यवहार करितां येईल अशी पारिभाषिक संज्ञा सांगतात,–

## त्रयमेकत्र संयमः ॥ ४ ॥

**सूत्रार्थः**–एकाच विषयाकडे धारणा, ध्यान व समाधि हीं तीन्ही लावणें ह्यास संयम असें ह्मणतात. अर्थात् जेथें जेथें संयमशब्द तेथें तेथें, संयमशब्दानें धारणा, ध्यान व समाधि असें समजावें.

**भाष्यम्**–तदेतद् धारणाध्यानसमाधित्रयमेकत्र संयमः । एकविषयाणि त्रीणि साधनानि संयम इत्युच्यते । तदस्य त्रयस्य तान्त्रिकी परिभाषा संयम इति ॥ ४ ॥

**भाष्यार्थः**–तें नुक्तेंच पूर्वीं सांगितलेलें जें धारणा, ध्यान व समाधि त्रय ( त्रिक ) हें एका ठिकाणीं आलें असतां ह्मणजे या धारणादि तीन अंगांचा विषय एकच आला असतां 'संयम' या शब्दानें त्या ठिकाणीं तिघांचें ग्रहण करावें या तिघांना इतर शास्त्रांत 'संयम' ही परिभाषा आहे ॥ ४ ॥

## तज्जयात्प्रज्ञालोकः ॥ ५ ॥

**सूत्रार्थः**–संयमाचा अभ्यास करितां करितां तो संयम एकसारखा होऊं लागला ह्मणजे त्यापासून आपण ज्या वस्तूचें ध्यान करीत आहोंत त्याचें ज्ञान उत्तम रीतीनें होतें.

**भाष्यम्**–तस्य संयमस्य जयात्समाधिप्रज्ञाया भवत्यालोको, यथा यथा संयमः स्थिरपदो भवति तथा तथा ईश्वरप्रसादात् समाधिप्रज्ञा विशारदीभवति ॥ ५ ॥

**भाष्यार्थः**—त्या संयमाचा जय झाला असतां ह्मणजे धारणा, ध्यान व समाधि हे तीन स्थिर झाले असतां समाधीपासून झालेली प्रज्ञा निर्मल होते ( ह्मणजे तिच्यांत भ्रांति, संशय वगैरे मल कांहींएक न उरल्यामुळें ध्येयतत्त्वाचें चांगलें स्फुरण होतें ). सारांश, जसा जसा संयम स्थिर होत जातो तसतशी ईश्वराच्या प्रसादानें समाधिप्रज्ञा अगदीं निर्मल होते ॥५॥

आतां संयमाच्या अनुष्ठानाविषयीं विषय सांगतात,—

## तस्य भूमिषु विनियोगः ॥ ६ ॥

**सूत्रार्थः**—स्थूल व सूक्ष्म विषयांच्या ठिकाणीं सांगितलेल्या ज्या संप्रज्ञातयोगाच्या सवितर्क इत्यादि अवस्था त्यांना एकेकांना जिंकण्याकरितां संयमाचा उपयोग करावा.

**भाष्यम्—तस्य संयमस्य जितभूमेर्योऽनन्तरा भूमिस्तत्र विनियोगः । न ह्यजिताऽधरभूमिरनन्तरभूमिं विलङ्घ्य प्रान्तभूमिषु संयमं लभते, तदभावाच्च कुतस्तस्य प्रज्ञालोकः । ईश्वरप्रसादाज्जितोत्तरभूमिकस्य च नाधरभूमिषु परचित्तज्ञानादिषु संयमो युक्तः । कस्मात् । तदर्थस्यान्यत एवावगतत्वात् । भूमेरस्या इयमनन्तरा भूमिरित्यत्र योग एवोपाध्यायः । कथमेवमुक्तं 'योगेन योगो ज्ञातव्यो योगो योगात्प्रवर्तते । योऽप्रमत्तस्तु योगेन संयोगे रमते चिरम्' इति ॥ ६ ॥**

**भाष्यार्थः**—त्या संयमाची ( योग्यानें ), पहिल्या पहिल्या स्थूल भूमींचा क्रमानें जय झाल्यानंतर मग पुढच्या पुढच्या सूक्ष्म भूमींच्या ठिकाणीं योजना करावी; कारण खालच्या भूमिका जिंकल्यावांचून एकदम मधल्या भूमींचें उल्लंघन करून शेवटच्या भूमिकेंत संयम करितां येत नाहीं. त्या ठिकाणीं संयम न झाला तर त्या भूमिकांत समाधिप्रज्ञा निर्मल कोठून होणार ? आतां एकाद्या योग्याला जर ईश्वराच्या प्रसादानें विवेकख्याति वगैरे उत्तरभूमिका संयमावांचूनच प्राप्त झाल्या तर त्याला खालच्या स्थूलभूमिकांचे ठिकाणीं ह्मणजे परचित्ताच्या ज्ञानाच्या ठिकाणीं संयम करणें योग्य नाहीं; कारण, सूक्ष्म भूमि प्राप्त होण्याकरितां जो स्थूलभूमिकांच्या ठिकाणीं संयम करावयाचा तें कार्य तर ईश्वरप्रसादानेंच होऊन गेलें. ( आतां अशी शंका येते कीं, भूमिका अनेक व त्यांचे अधिकारीही अनेक, तेव्हां 'आपल्या योग्य हीच भूमिका, व हिच्या पुढची व अगदीं जवळची, ही भूमिका' असें ज्ञान कसें होईल ? याचें समाधान असें कीं, ) 'ही भूमिका ह्या भूमिकेच्या पुढची व अगदीं जवळची' असें ज्ञान होण्याला योगच उपाध्याय ह्मणजे गुरु आहे. ( दुसऱ्याची कांहीं जरूर नाहीं. तात्पर्य, योगबलेंकरूनच स्वतां सर्व जाणतो. ) योगापासूनच आपोआप ज्ञान होतें, यांस प्रमाण काय ? उत्तर, 'असें सांगितलें आहे कीं, योगाभ्यास करीत गेल्यानें योगाची पुढची विशेष माहिती होते; योगाभ्यासानेंच संप्रज्ञात इत्यादिकांची प्रवृत्ति होते; व योगास विघ्न करणाऱ्या सिद्धींस जर वश न झाला तर अक्षयसुखाला प्राप्त होतो ॥ ६ ॥

योगाचीं आठ अंगें तीं सर्व एक ठिकाणीं न सांगतां त्यांपैकीं यमादि पांच अंगें दुसऱ्या पादांत सांगितलीं; आणि धारणादि तीन अंगें ह्या तिसऱ्या पादांत सांगितलीं असें करण्याचें कारण काय; तें सांगतात,–

## त्रयमन्तरङ्गं पूर्वेभ्यः ॥ ७ ॥

**सूत्रार्थः**–यमादि पहिल्या पांच अंगांपेक्षां धारणादि तीन, संप्रज्ञातसमाधीस अंतरंग ह्मणजे साक्षात् उपयोगी पडणारीं साधनें आहेत; व तीं पांच बहिरंग ह्मणजे परंपरेनें उपयोगी पडणारीं साधनें आहेत.

**भाष्यम्–तदेतद्धारणाध्यानसमाधित्रयमन्तरङ्गं सम्प्रज्ञातस्य समाधेः पूर्वेभ्यो यमादिभ्यः पञ्चभ्यः साधनेभ्य इति ॥ ७ ॥**

**भाष्यार्थः**–पूर्वीच्या यम इत्यादि पांच अंगांपेक्षां धारणा, ध्यान व समाधि हीं तीन संप्रज्ञातसमाधीस अंतरंग ह्मणजे साक्षात् उपयोगी पडणारीं साधनें आहेत ॥ ७ ॥

आतां तीं धारणादि तीन अंगें सुद्धां बहिरंग आहेत असें सांगतात,–

## तदपि बहिरङ्गं निर्बीजस्य ॥ ८ ॥

**सूत्रार्थः**–असंप्रज्ञातसमाधीस हीं धारणादिक तीन अंगें सुद्धां बहिरंगच साधनें आहेत.

**भाष्यम्–तदप्यन्तरङ्गसाधनत्रयं निर्बीजस्य योगस्य बहिरङ्गम्भवति । कस्मात् । तदभावे भावादिति ॥८॥ ' अथ निरोधचित्तक्षणेषु चलं गुणवृत्तमिति कीदृशस्तदा चित्तपरिणामः' ॥**

**भाष्यार्थः**–तीं धारणादि तीन अंगें संप्रज्ञातसमाधीस अंतरंग आहेत खरीं परंतु असंप्रज्ञातसमाधीस तींही बहिरंगच साधनें आहेत; कारण, तीं नसलीं तरीं ( विवेकख्याति व परवैराग्य या साधनांनीं ) असंप्रज्ञात समाधि सिद्ध होतो. ( तात्पर्य, असंप्रज्ञात समाधीस धारणादि पांच अंगें विवेकख्याति व परवैराग्य या द्वारानें ह्मणजे परंपरेनें उपयोगी पडतात ह्मणून हीं असंप्रज्ञातास बहिरंग साधनें आहेत ॥ ८ ॥

आतां संयमापासून अनेक सिद्धी प्राप्त होतात त्या सांगण्याकरितां संयमानें जाणण्यास योग्य असे चित्ताचे परिणाम सांगतात,–

## व्युत्थाननिरोधसंस्कारयोरभिभवप्रादुर्भावौ निरोधक्षणचित्तान्वयो निरोधपरिणामः ॥ ९ ॥

**सूत्रार्थः**–संप्रज्ञातापासून उत्पन्न झालेला संस्कार क्रमानें जसजसा कमी कमी होत जातो तसतसा परवैराग्यापासून उत्पन्न होणारा संस्कार क्रमानें अधिकाधिक वाढत जातो;

अशा रीतीनें निरोधकाळच्या चित्तावर व्युत्थानसंस्कार व निरोधसंस्कार असे दोन्ही धर्म असतात ह्मणून त्याला या शास्त्रांत निरोधपरिणाम असें ह्मणतात.

**भाष्यम्–व्युत्थानसंस्काराश्चित्तधर्माः। न ते प्रत्ययात्मका इति प्रत्ययनिरोधे न निरुद्धा निरोधसंस्कारा अपि चित्तधर्मास्तयोरभिभवप्रादुर्भावौ व्युत्थानसंस्कारा हीयन्ते निरोधसंस्कारा आधीयन्ते। निरोधक्षणं चित्तमन्वेति तदेकस्य चित्तस्य प्रतिक्षणमिदं संस्कारान्यथात्वं निरोधपरिणामस्तदा संस्कारशेषं चित्तमिति निरोधसमाधौ व्याख्यातम् ॥ ९ ॥**

**भाष्यार्थः**–(असंप्रज्ञातापेक्षां संप्रज्ञात ही व्युत्थानावस्था होय ह्मणून येथें व्युत्थानशब्दानें संप्रज्ञात व निरोधशब्दानें परवैराग्य घ्यावयाचें. संप्रज्ञातकालीं उत्पन्न झालेले संस्कार जसजसे परवैराग्यानें कमी कमी होत जातात, तसतसे निरोधकालचे ( असंप्रज्ञातावस्थेंतील ) संस्कार अधिकाधिक वाढत जातात. याप्रमाणें चित्ताचा संप्रज्ञात व असंप्रज्ञात या दोन्ही अवस्थांशीं संबंध असतो. ह्मणून याला निरोधपरिणाम असें ह्मणतात. निरोध ह्मणजे संप्रज्ञात व असंप्रज्ञात; या दोन अवस्थांतील हे दोन ( चित्ताचे ) परिणाम ह्मणून ह्यांस निरोधपरिणाम ह्मणतात.) ( आतां अशी शंका येते कीं, जसे अविद्येमुळें उत्पन्न होणारे क्लेश, अविद्या नाहींशी झाली कीं ते आपोआप नाहींसे होतात; त्याप्रमाणें प्रत्यय ह्मणजे चित्तवृत्ती त्यांचा निरोध झाला असतां प्रत्ययांमुळें उत्पन्न होणारे जे संस्कार तेही आपोआप नाहींसे होतील; मग निरोधसंस्कारांनीं व्युत्थानसंस्कार कमी करावयाचे अशी आवश्यकता ती कोणती? याचें समाधान असें कीं,–)व्युत्थानसंस्कार व निरोधसंस्कार सुद्धां चित्ताचे धर्म आहेत. ह्यांना, घटास जशी माती उपादान (साक्षात्)कारण असते, तसे प्रत्यय (अंतःकरणाच्या वृत्ती) उपादानकारण नाहींत; तर चाक, दंड इत्यादिकांप्रमाणें निमित्तकारण आहेत. ह्मणून प्रत्ययांचा निरोध जरी कितीवेळ केला तथापि व्युत्थानसंस्कार जात नाहींत; ते तसेच राहतात. ह्मणून त्यांना कमी करण्याकरितां स्वतंत्र निरोधसंस्कारांची अत्यंत आवश्यकता आहे. (आतां दृष्टांतांत जें 'अविद्या दूर झाली कीं क्लेश नाहींसे होतात' असें ह्मटलें; तेथें अविद्या, क्लेशांस उपादानकारण असल्यामुळें ती नाहींशी झाली कीं ते आपोआप नाहींसे होतात हें बरोबरच आहे. ) आतां सूत्रामध्यें जें ' व्युत्थानसंस्कारांचा अभिभव ( पराभव ) व निरोधसंस्कारांचा प्रादुर्भाव ( प्रकट होणें ) होतो' ह्मणून ह्मटलें; याचा अर्थ इतकाच कीं, अभिभव ह्मणजे कमी कमी होत जाणें व प्रादुर्भाव ह्मणजे अधिकाधिक वाढत जाणें; हा होय. योगकालीं हा निरोधपरिणाम प्रत्येक क्षणीं चित्त स्थिर झालें असतां नवीन नवीन होत असतो. ( ह्मणून हा निरोधपरिणाम संपादन करण्याकरितां चित्त अवश्य स्थिर केलें पाहिजे. ) ( भाष्यकारांनीं आरंभीं जें संस्कारांस चित्तधर्म ह्मणून ह्मटलें यावरून हा चित्ताचा धर्मपरिणाम असें समजावें. )

निरोधसमाधींत चित्ताचे फक्त संस्कार मात्र बाकी राहिले असतात असें सूत्रांत सांगितलें गेलें ॥ ९ ॥

आतां निरोधपरिणामाचें फल सांगतात,—

## तस्य प्रशान्तवाहिता संस्कारात् ॥ १० ॥

**सूत्रार्थः**—निरोधसंस्कारामुळें चित्ताचा ओघ शांतपणें वाहूं लागतो.

**भाष्यम्—निरोधसंस्कारात् निरोधसंस्काराभ्यासपाटवापेक्षा प्रशान्तवाहिता चित्तस्य भवति । तत्संस्कारमान्द्ये व्युत्थानधर्म्मिणा संस्कारेण निरोधधर्मः संस्कारोऽभिभूयत इति ॥ १० ॥**

**भाष्यार्थः**—निरोधसंस्कारापासून ह्मणजे निरोधसंस्काराचा पूर्ण अभ्यास झाला ह्मणजे चित्ताचा प्रवाह निर्मल व शांत वाहूं लागतो ह्मणजे ज्यांत ( चित्तांत ) विक्षेपाचें अगदीं नांव नसल्यामुळें तें अगदीं स्थिर होतें; आणि जर कां निरोधसंस्कारांत थोडीशी कमतरता झाली तर लागलाच व्युत्थानसंस्कारानें निरोधसंस्काराचा पराभव होतो ह्मणजे लागलेंच चित्त चंचल होऊं लागतें ॥ १० ॥

आतां समाधिपरिणाम सांगतात,—

## सर्वार्थतैकाग्रतयोः क्षयोदयौ चित्तस्य समाधिपरिणामः ॥ ११ ॥

**सूत्रार्थः**—चित्ताच्या सर्वार्थता ( विक्षिप्तपणा ) रूप धर्माचा क्रमानें क्षय होणें व एकाग्रताधर्माची क्रमानें वृद्धि होणें याला समाधिपरिणाम ह्मणतात.

**भाष्यम्—सर्वार्थता चित्तधर्मः । एकाग्रता चित्तधर्मः । सर्वार्थतायाः क्षयस्तिरोभाव इत्यर्थः । एकाग्रताया उदय आविर्भाव इत्यर्थः । तयोर्धर्मित्वेनाऽनुगतं चित्तं तदिदं चित्तमपायोपजननयोः स्वात्मभूतयोर्द्धर्मयोरनुगतं समाधीयते स चित्तस्य समाधिपरिणामः ॥ ११ ॥**

**भाष्यार्थः**—चित्ताचे, सर्वार्थता ह्मणजे चंचलता अर्थात् अनेकविषयाकार होणें, व एकाग्रता ह्मणजे एकाच वस्तूवर स्थिर राहणें असे दोन प्रकारचे धर्म ह्मणजे स्वभाव आहेत. त्यांत सर्वार्थतेचा क्षय ह्मणजे गुप्त होणें, व एकाग्रतेचा उदय ह्मणजे प्रकट होणें; असा अर्थ आहे. ( येथें क्षय व उदय या दोन शब्दांचे अर्थ नाश व उत्पत्ति असे घेतां येत नाहींत; कारण, सद्वस्तूचा नाश नाहीं व असद्वस्तूची उत्पत्ति नाहीं. ) याला चित्ताचा समाधिपरिणाम ह्मणतात. ( आतां सर्वार्थता व एकाग्रता हे चित्ताचे धर्म कसे ते सांगतात,— ) सर्वार्थता व एकाग्रता हे चित्ताचे धर्म, व चित्त हें त्यांचा धर्मी आहे; कशावरून तर सर्वार्थतेचा अपाय ह्मणजे अस्त झाला असतां किंवा एकाग्रतेचा उदय झाला असतां चित्ताज्ञी समाधि लागूं

लागते. ( धर्मीचा धर्मपरिणाम होण्यास धर्मच कारण असतात.) म्हणून हा चित्ताचा धर्मद्वारानें समाधिपरिणाम होतो ॥ ११ ॥

आतां तिसरा एकाग्रतापरिणाम सांगतात,–

## ततः पुनः शान्तोदितौ तुल्यप्रत्ययौ चित्तस्यैकाग्रतापरिणामः॥१२॥

**सूत्रार्थः**–गेलेली आणि हल्लींची ह्या दोन्ही वृत्ती ज्या वेळेस एकाच विषयीं होतात, तो एकाग्रतापरिणाम होय.

**भाष्यम्–समाहितचित्तस्य पूर्वप्रत्ययः शान्त उत्तरस्तत्सदृश उदितः समाधिचित्तमुभयोरनुगतं पुनस्तथैवाऽऽसमाधिभ्रेषादिति स खल्वयन्धर्मिणश्चित्तस्यैकाग्रतापरिणामः ॥ १२ ॥**

**भाष्यार्थः**–ज्याची समाधि लागते अशा चित्ताचा जो पूर्वीचा प्रत्यय म्हणजे वृत्ति व त्यामागून होणारा प्रत्यय, हे दोन्ही प्रत्यय ज्या ठिकाणीं हल्लींप्रमाणें म्हणजे एकसारखे वाटतात; कारण समाधींतलें चित्त त्या वेळेस दोन्ही ठिकाणीं सारखेंच संबद्ध झालें असतें तें समाधि दूर होईपर्यंत; याला एकाग्रतापरिणाम म्हणतात. तात्पर्य, ज्या वस्तूवर एकदां चित्त लावलें आहे ती वस्तु कोणत्याही काळांत हल्लींप्रमाणें दिसणें हा चित्तरूपधर्मीचा एकाग्रतापरिणाम होय ॥ १२ ॥

जसे चित्ताचे परिणाम सांगितले याप्रमाणेंच आतां अतिदेशानें दुसऱ्याचे ठिकाणींही परिणाम सांगतात,–

## एतेन भूतेन्द्रियेषु धर्मलक्षणावस्थापरिणामा व्याख्याताः॥ १३ ॥

**सूत्रार्थः**–चित्ताचे परिणाम सांगितल्यानें, भूतें तशींच इंद्रियें यांच्या ठिकाणीं असणारे जे धर्म, लक्षण व अवस्था असे तीन प्रकारचे परिणाम तेही सांगितले गेले.

**भाष्यम्–एतेन पूर्वोक्तेन चित्तपरिणामेन धर्मलक्षणावस्थारूपेण भूतेन्द्रियेषु धर्मपरिणामो लक्षणपरिणामोऽवस्थापरिणामश्चोक्तो वेदितव्यः । तत्र व्युत्थाननिरोधयोर्द्धर्मयोरभिभवप्रादुर्भावौ धर्मिणि धर्मपरिणामो लक्षणपरिणामश्च। निरोधस्त्रिलक्षणास्त्रिभिरध्वाभिर्युक्तः । स खल्वनागतलक्षणमध्वानं प्रथमं हित्वा धर्मत्वमनतिक्रान्तो वर्तमानं लक्षणं प्रतिपन्नः। यत्रास्य स्वरूपेणाभिव्यक्तिरेषोऽस्य द्वितीयोऽध्वा । न चातीतानागताभ्यां लक्षणाभ्यां वियुक्तः। तथा व्युत्थानं त्रिलक्षणं त्रिभिरध्वाभिर्युक्तं वर्तमानं लक्षणं हित्वा धर्मत्वमनतिक्रान्तमतीतलक्षणं प्रतिपन्नमेषोऽस्य तृतीयोऽध्वा । न चानागतवर्तमानाभ्यां लक्षणाभ्यां वियुक्तम् । एवं पुनर्व्युत्थानमुपसंपद्यमानमनागतलक्षणं हित्वा धर्मत्वमनतिक्रान्तं वर्तमानं लक्षणं प्रतिपन्नं यत्रास्य स्वरूपाभिव्यक्तौ सत्यां व्यापार एषोऽस्य द्वितीयोऽध्वा । नचातीतानागताभ्यां लक्षणाभ्यां वि-**

युक्तमित्येवं पुनर्निरोध एवं पुनर्व्युत्थानमिति । तथावस्थापरिणामस्तत्र निरोधक्षणेषु निरोधसंस्कारा बलवन्तो भवन्ति दुर्बला व्युत्थानसंस्कारा इत्येष धर्माणामवस्थापरिणामः । तत्र धर्मिणो धर्मैः परिणामो, धर्माणां त्र्यध्वनां लक्षणैः परिणामो लक्षणानामप्यवस्थाभिः परिणाम इति । एवं धर्मलक्षणावस्थापरिणामैः शून्यं न क्षणमपि गुणवृत्तमवतिष्ठते । चलं च गुणवृत्तं गुणस्वाभाव्यन्तु प्रवृत्तिकारणमुक्तं गुणानामिति । एतेन भूतेन्द्रियेषु धर्मधर्मिभेदात्त्रिविधः परिणामो वेदितव्यः । परमार्थतस्त्वेक एव परिणामो धर्मिस्वरूपमात्रो हि धर्मो धर्मिविक्रियैवैषा धर्मद्वारा प्रपञ्च्यते इति । तत्र धर्मस्य धर्मिणि वर्तमानस्यैवाध्वस्वतीतानागतवर्तमानेषु भावान्यथात्वं भवति न द्रव्यान्यथात्वम् । यथा सुवर्णभाजनस्य भित्त्वाऽन्यथाक्रियमाणस्य भावान्यथात्वं भवति न सुवर्णान्यथात्वमिति । अपर आह । धर्मानभ्यधिको धर्मी पूर्वतत्त्वानतिक्रमात् पूर्वापरावस्थाभेदमनुपतितः कौटस्थ्येनैव परिवर्तेत यद्यन्वयी स्यादित्ययमदोषः । कस्मात् । एकान्तानभ्युपगमात् । तदेतत्त्रैलोक्यं व्यक्तेरपैति नित्यत्वप्रतिषेधात् । अपेतमप्यस्ति विनाशप्रतिषेधात्संसर्गाच्चास्य सौक्ष्म्यं सौक्ष्म्याच्चानुपलब्धिरिति । लक्षणपरिणामो धर्मोऽध्वसु वर्तमानोऽतीतोऽतीतलक्षणयुक्तोऽनागतवर्तमानाभ्यां लक्षणाभ्यामवियुक्तस्तथानागतोऽनागतलक्षणयुक्तो वर्तमानातीताभ्यां लक्षणाभ्यामवियुक्तस्तथा वर्तमानो वर्तमानलक्षणयुक्तोऽतीतानागताभ्यां लक्षणाभ्यामवियुक्त इति । यथा पुरुष एकस्यां स्त्रियां रक्तो न शेषासु विरक्तो भवतीति । अत्र लक्षणपरिणामे सर्वलक्षणयोगादध्वसङ्करः प्राप्नोतीति परैर्दोषश्चोद्यत इति । तस्य परिहारः । धर्माणां धर्मत्वमसाध्यम् । सति च धर्मत्वे लक्षणभेदोऽपि वाच्यो न वर्तमानसमय एवास्य धर्मत्वम् । एवं हि न चित्तं रागधर्मकं स्यात् । क्रोधकाले रागस्यासमुदाचारादिति । किञ्च । त्रयाणां लक्षणानां युगपदेकस्यां व्यक्तौ नास्ति सम्भवः । क्रमेण तु स्वव्यञ्जकाञ्जनस्य भावो भवेदिति । उक्तञ्च । 'रूपातिशया वृत्त्यतिशयाश्च परस्परेण विरुध्यन्ते सामान्यानि त्वतिशयैः सह प्रवर्तन्ते । तस्मादसङ्करो यथा रागस्यैव क्वचित्समुदाचार इति न तदानीमन्यत्राभावः किं तु केवलं सामान्येन समन्वागत इत्यस्ति तदा तत्र तस्य भावस्तथा लक्षणस्येति । न धर्मी अध्वा धर्मास्तु त्र्यध्वानस्ते लक्षिता अलक्षिताश्च तान्तामवस्थाम्प्राप्नुवन्तोऽन्यत्वेन प्रतिनिर्दिश्यन्तेऽवस्थान्तरतो न द्रव्यान्तरतः । यथैका रेखा शतस्थाने शतं दशस्थाने दशैका चैकस्थाने । यथा चैकत्वेऽपि स्त्री माता चोच्यते दुहिता च स्वसा चेति । अवस्थापरिणामे कौटस्थ्यप्रसङ्गदोषः कैश्चिदुक्तः । कथम् । अध्वनो व्यापारेण व्यवहितत्वात् ।

यदा धर्मः स्वव्यापारं न करोति तदाऽनागतो, यदा करोति तदा वर्तमानो, यदा कृत्वा निवृत्तस्तदाऽतीतः । इत्येवन्धर्मधर्मिणोर्लक्षणानामवस्थानां च कौटस्थ्यम्प्राप्नोतीति परैर्दोष उच्यते । नासौ दोषः । कस्मात् । गुणिनित्यत्वेऽपि गुणानां विमर्दवैचित्र्यात् । यथा संस्थानमादिमद्धर्ममात्रं शब्दादीनां विनाश्यविनाशिनामेवं लिङ्गमादिमद्धर्ममात्रं सत्वादीनां गुणानां विनाश्यविनाशिनां तस्मिन् विकारसंज्ञेति । तत्रेदमुदाहरणम् । मृद्धर्मी पिण्डाकाराद्धर्माद्धर्मान्तरमुपसंपद्यमानो धर्मतः परिणमते घटाकार इति । घटाकारोऽनागतं लक्षणं हित्वा वर्तमानलक्षणं प्रतिपद्यत इति लक्षणतः परिणमते । घटो नवपुराणतां प्रतिक्षणमनुभवन्नवस्थापरिणामं प्रतिपद्यत इति धर्मिणोऽपि धर्मान्तरमवस्था धर्मस्यापि लक्षणान्तरमवस्थेति एक एव द्रव्यपरिणामो भेदेनोपदर्शित इति । एवं पदार्थान्तरेष्वपि योज्यमिति । त एते धर्मलक्षणावस्थापरिणामा धर्मिस्वरूपमनतिक्रान्ता इत्येक एव परिणामः सर्वानमून्विशेषानभिप्लवते । अथ कोऽयं परिणामः । अवस्थितस्य द्रव्यस्य पूर्वधर्मनिवृत्तौ धर्मान्तरोत्पत्तिः परिणाम इति ॥ १३ ॥ ' तत्र ' ॥

**भाष्यार्थः**—जसे निरोधपरिणाम, समाधिपरिणाम व एकाग्रतापरिणाम हे जे धर्मलक्षणावस्थारूप तीन चित्तपरिणाम पूर्वी सांगितले; त्याप्रमाणेंच स्थूल व सूक्ष्म भूतें, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें व अंतःकरण यांविषयीं सुद्धां धर्मपरिणाम, लक्षणपरिणाम व अवस्थापरिणाम सांगितले असें जाणावें. त्यांत—व्युत्थान व निरोध या दोन धर्मांचे जे अभिभव व प्रादुर्भाव ह्मणजे नाश व उत्पत्ति ह्मणून सांगितले; तो धर्मी जें चित्त त्याचे ठिकाणीं धर्मपरिणाम व लक्षणपरिणाम समजावा. (त्यांत वर्तमान धर्मीच्या पूर्वधर्माचा लोप होऊन अन्यधर्म प्रकट होणें हा धर्मपरिणाम होय. ) निरोध तीन प्रकारचा आहे; ह्मणजे तीन मार्गांवर राहणारा असा आहे. तो असा,—( जसें आपण रस्त्यानें चाललों असतां आपणाला तीन प्रकारचे मार्ग असतात ह्मणजे एक आपण चालून घालविला, एकावर चालत आहोंत व एक आपण पुढें चालून घालविणार आहोंत. यांपैकीं शेवटीं सांगितला हा अनागत ह्मणजे पुढें येणारा व पहिला मार्ग होय. मध्यें सांगितला हा दुसरा व वर्तमान मार्ग होय. आणि आरंभीं सांगितलेला तो तिसरा व अतीत मार्ग होय. ) व्युत्थानाचे वेळीं निरोध हा अनागत मार्गावर होता ह्मणजे पुढें उत्पन्न व्हावयाचा होता; तो अनागत पहिला मार्ग सोडून देऊन निरोध दुसऱ्या वर्तमान मार्गावर प्राप्त झाला. ह्मणजे ज्या वेळेस निरोधाचें स्वरूप स्पष्ट रीतीनें प्रकट होतें तोच निरोधाचा दुसरा ( वर्तमान ) मार्ग समजावयाचा. त्या वेळेस तो अतीत व अनागत मार्गांवरून ह्मणजे सुटलेला असतो असें नाहीं. ( याप्रमाणें हा निरोधरूप धर्माचा लक्षणपरिणाम समजावा. ) ( तात्पर्य, अनागत, वर्तमान व अतीत या तीन मार्गांस

या शास्त्रांत लक्षण अशी संज्ञा आहे. लक्षण ह्मणजे एकमेकांची व्यावृत्ति करणारा शब्द अर्थात् विशेषण; उदाहरण,—वर्तमान निरोध ह्मणजे अनागत किंवा अतीत निरोध नव्हे. ह्मणून कोणत्याही एका मार्गाचा त्याग होऊन दुसरा मार्ग प्राप्त होणें हा लक्षणपरिणाम होतो. ) जसा निरोध तीन मार्गांनीं युक्त सांगितला त्याचप्रमाणें व्युत्थानधर्माचेंही तीन प्रकारचें लक्षण आहे ह्मणजे व्युत्थान तीन मार्गांनीं युक्त आहे. उदाहरण,—व्युत्थान वर्तमानलक्षणाला ( मार्गाला ) सोडून देऊन, सत्तारूपानें होतें त्याच अतीत लक्षणाप्रत प्राप्त झालें (ह्मणजे अतीत लक्षण नवीन उत्पन्न झालें नाहीं ). हा (अतीत लक्षण ) याचा (व्युत्थानाचा) तिसरा मार्ग होय. या वेळेस व्युत्थान अनागत व वर्तमान मार्गांना सर्वथा सोडून देऊन ह्मणजे अतीत मार्गावर गेलें असें नाहीं (तर गुप्तरूपानें तीं दोन्ही लक्षणें आहेत). याप्रमाणेंच पुनः ( ज्या वेळेस व्युत्थान पुढें उत्पन्न व्हावयाचें होतें तो व्युत्थानाचा अनागत मार्ग होता; तो ) अनागत मार्ग सोडून देऊन व्युत्थान, होता त्याच वर्तमान मार्गाप्रत प्राप्त झालें. जेथें ह्याचें स्वरूप अगदीं प्रकट झालें असतां व्यापार सुरू होतो तो ह्याचा दुसरा (वर्तमान) मार्ग होय. ह्या वेळेस अतीत व अनागत मार्ग ह्मणजे व्युत्थानाचे सुटले ( नष्ट झाले ) होते असें नाहीं. याप्रमाणें पुनः निरोध, पुनः व्युत्थान ( याप्रमाणें व्युत्थान व निरोध हे तीन मार्गांनीं नेहमीं युक्त असतात, ते मोक्षापर्यंत. त्यांत वर्तमान मार्गावर त्यांची स्पष्टता होते व बाकीच्या मार्गांवर ते गुप्तरूपानें असतात ). आतां अवस्थापरिणाम सांगतों,—त्यांत निरोधकालीं निरोधाचे संस्कार प्रबल ह्मणजे अधिकाधिक वाढत जातात व व्युत्थानसंस्कार दुर्बल ( कमी कमी ) होत जातात. त्यांत धर्मी जे असतात त्यांचा धर्मांच्या योगानें परिणाम होतो. ( परिणाम ह्मणजे दुसरी अवस्था प्राप्त होणें. ) तीन आहेत मार्ग ज्यांना अशा धर्मांचा परिणाम लक्षणांनीं होतो व लक्षणांचा सुद्धां अवस्थांनीं परिणाम होतो. याप्रमाणें सत्वादि गुणांचा व्यापार धर्म, लक्षण व अवस्था या तीन प्रकारच्या कार्यरूप परिणामांवांचून एक क्षणभरही असत नाहीं ( ह्मणजे गुणांचा व्यापार नेहमीं या तीन परिणामांपैकीं कांहींना कांहींतरी एक कार्य उत्पन्न करीत असतो ). ( अमुक वेळेस ह्मणजे हा व्यापार बंद पडून परिणामरूप कार्य होत नाहीं असें नाहीं; कारण, ) गुणांचा व्यापार नेहमीं चालत असतो; व व्यापार नेहमीं चालण्याला गुणांचा स्वभाव कारण आहे. ( जसे राजाचे सेवक राजाचीं कार्यें असतील तेथपर्यंत नेहमीं करीत असतात असें आपण पाहतों; त्याप्रमाणें सत्वादि गुण हे पुरुषा ( आत्म्या ) करितां आहेत. त्याचें भोग व मोक्षरूप कार्य सिद्ध होईपर्यंत गुणव्यापार नेहमीं चालतो ) असें पूर्वीच्या आचार्यांनीं सांगितलें आहे. हे जे तीन चित्तपरिणाम धर्मी व धर्म या दोन भेदांनीं सांगितले; याचप्रमाणें पंच महाभूतें व अकरा इंद्रियें यांच्या ठिकाणीं धर्मी व धर्म या भेदेंकरून तीन प्रकारचा परिणाम समजावा. ( त्यांत पृथ्वी इत्यादिक धर्मींचा घट इत्यादि धर्मपरिणाम; घटादिधर्मांचा वर्तमानता व अतीतता

अशा तऱ्हेचा लक्षणपरिणाम; वर्तमानादि तीन लक्षणांचा बाल्य, यौवन, वार्द्धक्य इत्यादि अवस्थापरिणाम जाणावा. ) आतां वास्तविक विचार केला असतां हे तीनही परिणाम एका धर्मीचेच आहेत; कारण, धर्मी व धर्म यांचें स्वरूप ह्मणजे कांहीं वेगळें आहे असें नाहीं. ह्मणून हा लक्षण इत्यादि धर्मपरिणामच धर्मादिकांच्या अवांतर भेदेंकरून विभागून सांगितला. ( आतां प्रत्येकक्षणीं जर असा परिणाम होत आहे तर धर्मीला क्षणिकता इत्यादि प्राप्त होईल ती न प्राप्त व्हावी याकरितां तिन्ही परिणामांची क्रमानें परीक्षा सांगतात,–) धर्म, लक्षण व अवस्था हे जे धर्मीचे ( मृत्तिका इत्यादि द्रव्याचे ) तीन परिणाम सांगितले; हे ह्मणजे कांहीं पहिल्यानें एक प्रकारचें द्रव्य असून त्याचें परिणामानंतर दुसऱ्याच प्रकारचें द्रव्य होतें असें नाहीं; तर धर्मीच्या ठिकाणीं अतीत, अनागत व वर्तमान या तीन अवस्थांमध्यें जे धर्म असतात त्यांचपैकीं एका धर्माच्या ठिकाणीं दुसरा धर्म येतो. जसें एक सोन्याचें भांडें मोडून त्याचे आपण अनेक प्रकारचे डागिने करूं लागलों असतां त्या वेळेस सोन्यावर 'भांडें' ह्मणून जो एक प्रकारचा धर्म होता तो जाऊन त्याबद्दल 'डागिना' अशा प्रकारचा एक धर्म आला; ह्मणून सोन्याचा सोनेपणा कांहीं जात नाहीं; त्याप्रमाणें. यावर एक बौद्धवादी असें ह्मणतो कीं, जर तुह्मी 'धर्मी हा धर्माहून कांहीं वेगळा नाहीं ( ह्मणजे धर्मी व धर्म हे एकच आहेत; ) कारण, पूर्वधर्माचा जो धर्मी असतो तोच धर्मी दुसऱ्या धर्माच्या वेळेस असतो' असें ह्मणाल; तर पूर्व अवस्थेमध्यें जो धर्मी तोच पुढच्या अवस्थेमध्यें असल्यामुळें ( चितिशक्तीप्रमाणें ) मृत्तिकादिक धर्मीस सुद्धां नित्यता येऊं लागेल ( ती तर तुह्मांस सुद्धां इष्ट नाहीं ) ? याचें समाधान,–अरे ! 'अनेक धर्मांत धर्मी एकच असतो ह्मणून धर्मीला आत्म्याप्रमाणें नित्यता येईल' असा जो दोष तूं दिलास, तो दोष आह्मांला येत नाहीं; कारण, मृत्तिकादिक धर्मीला आह्मी आत्म्याप्रमाणें अगदीं नित्य मानीत नाहीं; ( तर अनेक धर्मापेक्षां धर्मी चिरकाल राहणारा ह्मणून तो धर्मापेक्षां नित्य; व चितिशक्तीपेक्षां अनित्यच आहे. ) ( नुसतें मृत्तिकादि द्रव्यच अनित्य आहे असें नाहीं तर ) हें जें सर्व चोवीस तत्त्वांपासून उत्पन्न झालेलें कार्यकारणात्मक जगत् दिसत आहे हें वर्तमानअवस्थेपासून दूर होतें ह्मणजे याच्या वर्तमान स्वरूपाचा नाश होतो ह्मणून हें अनित्य आहे; कारण, 'हल्लीं जें कांहीं दिसत आहे, हें सृष्टीच्या पूर्वी कांहीं एक नव्हतें;' व 'हल्लीं जें कार्यरूपानें स्पष्ट दिसणारें जगत् हें सृष्टीच्या आरंभीं अस्पष्ट रीतीनें असें केवळ कारणरूपानें होतें.' इत्यादि श्रुतिस्मृतिपुराणादिकांमध्यें जगताच्या नित्यतेविषयीं निषेध केला आहे ह्मणून जगत् नित्य नाहीं. ( आतां जगत् नित्य नाहीं ह्मणून सृष्टीच्या आरंभीं व प्रलयानंतर त्याचा अगदींच अभाव असतो असें नाहीं; तर वृक्षाच्या बीजाप्रमाणें ) जगत् जरी स्पष्टपणानें नसलें तथापि सूक्ष्मरूपानें असतेंच; कारण, 'जी वस्तु मुळींच नसते तिची कधीं उत्पत्ति होत नाहीं,' इत्यादि वचनांत जगताच्या अत्यंत अभावाविषयीं निषेध

केला आहे ह्मणून जगताचा सर्वथा नाश होत नाहीं. ( तात्पर्य, कार्यरूपी जगत् अनित्य व कारणरूपी नित्य; ह्मणून जगत् हें नित्यानित्य आहे, चितिशक्तीप्रमाणें अगदीं नित्य नाहीं. ) तें प्रकृतींत लीन झाल्यामुळें त्याला अत्यंत सूक्ष्मरूपता प्राप्त झाली असते; व त्यामुळें तें ( जगत् ) असलें तरी दिसत नाहीं. आतां लक्षणपरिणामांत जो धर्म ज्या मार्गांत वर्तमान ह्मणजे स्पष्टपणानें असतो तो त्या वेळेस इतर दोन लक्षणांनीं वियुक्त ( त्यांना सोडून अगदीं पृथक् ) असतो असें नाहीं; तर अतीतधर्म अतीतलक्षणानें ( मार्गानें ) युक्त असून अनागत व वर्तमान लक्षणांनीं वियुक्त ( त्यांना सोडून निराळा ) असा नसतो. तसाच अनागत धर्म अनागत लक्षणानें युक्त असून वर्तमान व अतीत लक्षणांनीं वियुक्त नसतो. तसाच वर्तमान धर्म वर्तमान लक्षणानें युक्त असून अतीत व अनागत लक्षणांनीं वियुक्त नसतो. ( तात्पर्य, धर्म व लक्षणें हीं दोन्ही नित्य आहेत ह्मणून एकेक धर्म अथवा लक्षण ज्या वेळेस स्पष्टपणानें असतात त्या वेळेस त्याहून इतर धर्मांचा किंवा लक्षणांचा सर्वथा नाश झालेला असतो किंवा अभाव असतो असें नाहीं तर ते अत्यंत सूक्ष्मरूपानें असतात व त्यामुळेंच ते आपणांस स्पष्ट होत नाहींत. ) यास दृष्टांत,—जसा कोणीएक पुरुष एका स्त्रीच्या ठिकाणीं अत्यंत आसक्त झालेला असतो ह्मणजे बाकीच्या स्त्रियांविषयीं ह्मणजे तो विरक्त झाला असतो असें नाहीं. (कारण लोकांत तसा व्यवहार होत नाहीं व इतरांविषयीं सुद्धां त्याची कदाचित् प्रीति पुढें उत्पन्न होते ह्मणून त्या प्रीतीचा सर्वथा अभाव ह्मणतां येत नाहीं. ) आतां या लक्षणपरिणामावर कोणी असा दोष देतात कीं, 'जर सर्वलक्षणांचा परस्पर नित्य संबंध आहे ह्मणजे सर्व लक्षणें एककालीं सत्तारूपानें असतात तर अनागत व अतीत लक्षणें सुद्धां वर्तमान लक्षण होऊं लागतील?' ह्याचें समाधान असें कीं, 'धर्मांचा धर्मपणा पूर्वीं सिद्ध केला आहे ह्मणून तो हल्लीं साधावयास नको. आतां धर्मपणा जर सिद्ध आहे तर धर्मांचीं अनेक लक्षणेंही अवश्य मानिलीं पाहिजेत. आतां वर्तमानकालींच धर्माला धर्मत्व असतें असें नाहीं तर अतीतादि कालांत सुद्धां धर्मत्व असतें. कारण, वर्तमानकालींच जर धर्मत्व असलें तर सर्वच चित्त• 'विरक्त' अशा व्यवहाराला प्राप्त होईल; कारण, क्रोधकालीं राग ह्मणजे प्रीति प्रकट होत नसते. दुसरें असें कीं, अनागतादि तिन्ही लक्षणांची एका वेळींच एका वस्तूच्या ठिकाणीं स्पष्टता होत नसते. आतां क्रमाक्रमानें ह्मटली तर जशी दंड, चक्र इत्यादिकांच्या योगानें घटादिकांची मृत्तिकादिकांपासून प्रकटता होते त्याप्रमाणें ज्याला ज्याला प्रकट होण्याचें कारण अनुकूल होईल त्या त्या लक्षणांची प्रकटता होईल. याविषयीं पंचशिखाचार्यांनींही असें ह्मटलें आहे कीं, 'बुद्धीच्या रूपांचें आधिक्य व वृत्तींचें आधिक्य हींच एकमेकांशीं विरोध करीत असतात. आतां जीं रूपें व ज्या वृत्ती कांहीं हीनबल व कांहीं बलिष्ठ असतात; त्यांतील दुर्बल, प्रबलांबरोबर विरोध न करितां त्यांबरोबर मुकाट्यानें गुप्तरूपानें राहतात. ह्मणून अप्रकट असणाऱ्या अतीत व अनागत लक्षणांचा प्रकट

असणाऱ्या वर्तमान लक्षणांशीं कांहीं एक विरोध नसून तीं सर्व वर्तमानकालीं एकदम प्रकट होऊं शकत नाहींत. जसा कोठें कोठें रागच प्रकट असतो; ह्मणून दुसऱ्या ठिकाणीं त्या वेळेस त्याचा अगदीं अभाव असतो असें नाहीं; तर केवल सामान्य धर्मानें तो समत्वाप्रत प्राप्त झालेला असतो; ह्मणून त्या वेळेसही त्याची सत्ता असते. त्याप्रमाणें कोठें कोठें लक्षणाची स्पष्टता होते. आतां धर्मी हा तीन लक्षणांनीं युक्त नाहीं तर त्यावर असणारे धर्म आहेत. ते लक्षित ( वर्तमान ) व अलक्षित ( अनागत व अतीत ) असे दोन प्रकारचे असल्यामुळें बाल्य, यौवन, वार्धक इत्यादि त्या त्या अवस्थेप्रत प्राप्त होत असतां 'हा बाल आहे, तरुण नव्हे,' 'हा तरुण आहे, बाल नव्हे;' इत्यादि तऱ्हेंनीं परस्परांचा भेदानें व्यवहार होतो. आणि हा सर्व व्यवहार अवस्थाभेदामुळें होतो द्रव्यभेदामुळें नाहीं. ( तेव्हां पूर्वीची अवस्था जाऊन दुसरी अवस्था प्राप्त होणें यालाच अवस्थापरिणाम ह्मणतात.) (आतां धर्मी एक असून त्याबद्दल निमित्तभेदानें अनेक प्रकारचे व्यवहार होतात; यास दृष्टांत,–) जशी एक विशेष प्रकारानें काढलेली रेघ अर्थात् एकाचा अंक, त्यावर दोन शून्यें देऊन तो शतस्थानीं आला असतां तो 'शत' (शंभर) अशा व्यवहाराला पावतो; त्यावर 'एक' इत्यादि व्यवहार होत नाहीं. तसाच त्यावरील एक बिंदु काढून टाकिला असतां त्याला 'दश' (दहा) असा व्यवहार होतो; 'शत' किंवा 'एक' असा व्यवहार होत नाहीं. आणि तो एकही बिंदु काढून टाकिला असतां 'एक' असाच व्यवहार होतो. अथवा, कोणीएक स्त्री एकच असते, परंतु ती कोणाची माता कोणाची कन्या व कोणाची बहीण अशी ह्मणविते. आतां या अवस्थापरिणामावरही कोणीं ( बौद्धांनीं ) 'कूटस्थनित्यता येईल,' असा दोष दिला आहे. आतां तो दोष कसा ह्मणाल तर व्यापारनिमित्तानेंच सर्व वस्तूंच्या ठिकाणीं अनागतादि मार्गांचे परस्पर विभाग मानिले आहेत, साक्षात् सत्तारूपानें नाहींत; ह्मणून धर्म व लक्षण यांची नेहमीं सत्ता असणें इष्टच आहे. पहा ! ज्या वेळेस धर्म आपला व्यापार करीत नाहीं त्या वेळेस त्याला अनागत असें ह्मणतात. ज्या वेळेस तो व्यापार करीत असतो त्या वेळेस त्याला वर्तमान व ज्या वेळेस व्यापार करून त्यापासून निवृत्त ( दूर ) झालेला असतो त्या वेळेस त्याला अतीत असें ह्मणतात. (याप्रमाणें धर्मव्यापारच अध्व्यांच्या विभागाला निमित्त झाला. ) एवं च, पूर्वीचा धर्म जाऊन दुसरा धर्म प्रकट होणें अशा परिणामलक्षणामुळें धर्म, धर्मी, लक्षण व अवस्था या चौघांना चितिशक्तीप्रमाणें कौटस्थ्य ( अपरिणामनित्यता ) प्राप्त होईल; असा दुसऱ्यांनीं दोष दिला आहे; तो दोष येत नाहीं. कारण, धर्मीला जरी नित्यत्व असलें तथापि धर्मांचा विलक्षण रीतीनें विनाश( परिणाम ) होतो ह्मणून कूटस्थनित्यता येत नाहीं. आतां तो धर्मांचा विनाश ( परिणाम ) असा,– पृथ्वी–इत्यादि स्वकार्यापेक्षां अविनाशी जे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध पंचतन्मात्र त्यांचें संस्थान ( जें पृथ्व्यादि परिणामरूप ) हें धर्ममात्र असून आदिमत् ( आदि ज्याला आहे तें आदिमत् ) असें आहे ह्मणून विनाशी ( नाश पावणारें ) आहे. याचप्रमाणें,

लिंग ह्मणजे महत्तत्त्व हें, स्वकार्यापेक्षां अविनाशी जे सत्वादि तीन गुण त्यांपेक्षां आदिमत् असून केवल धर्मरूप आहे ह्मणून विनाशी आहे. याकरितां त्या त्या धर्मांच्या ठिकाणीं विकार ह्मणजे परिणाम ही संज्ञा आहे. ( व धर्म ज्याला आहेत तो धर्मी अर्थात् परिणामी; ह्मणून जितके धर्मी आहेत ते सर्व परिणामी असल्यामुळें चितिशक्तीप्रमाणें त्यांना कौटस्थ्य मुळींच नाहीं; तर त्यांना धर्म, लक्षण व अवस्था हेच परिणाम आहेत. ) ( आतां भूत व इंद्रियें यांचे तीन परिणाम कसे होतात ) याविषयीं उदाहरण,—मृत्तिकारूप धर्मीचा प्रथम पिंड ( गोळा ) रूप धर्मानें परिणाम होतो, नंतर तो मृत्तिका धर्मी पुनः पिंडाकाररूप जो एक धर्म त्यापासून दुसऱ्या ( घट इत्यादि ) धर्माप्रत प्राप्त होत असतां अन्य धर्मानें परिणाम पावतो. त्या परिणामाला घटाकार ह्मणजे घट असें ह्मणतात. ( हा धर्मपरिणाम होय. ) आतां घटाकार हा अनागत लक्षणाला सोडून देऊन वर्तमान लक्षणाप्रत प्राप्त झालेला असतो ह्मणून घटाकाररूप परिणाम लक्षणानें झाला ( याकरितां हा लक्षणपरिणाम झाला ). आतां घटाला प्रथम नवी अवस्था प्राप्त होऊन नंतर जुनी अवस्था प्राप्त झाली ह्मणून घटाचा हा अवस्थापरिणाम समजावयाचा. ( आतां वास्तविक विचार केला असतां धर्म इत्यादि सर्वांचा शेवटीं अवस्थापरिणामच होतो तथापि स्पष्ट समजण्याकरितां धर्म इत्यादि पृथक् पृथक् परिणाम सांगितला; कारण, ) धर्मीचाही अन्य धर्माप्रत प्राप्त होणें हा अवस्थापरिणाम, आणि धर्माचाही अन्य लक्षणाप्रत प्राप्त होणें हा अवस्थापरिणामच होय; ह्मणून एक अवस्थारूप परिणामच पृथक् विभाग करून सांगितला. याचप्रमाणें अन्य सर्व पदार्थांविषयीं योजना करावी. याप्रमाणें सांगितलेले हे धर्म, लक्षण व अवस्थापरिणाम धर्मीस्वरूपाला सोडून अगदीं राहत नाहींत ह्मणून ( धर्मी व धर्म हे एक आहेत आणि ) तो धर्मपरिणामच सर्व परिणामांत व्यापून असतो. आतां परिणाम ह्मणजे कशाला ह्मणतात तर, ज्या एका अवस्थेमध्यें एक द्रव्य ( पदार्थ ) असतें त्याचा पूर्वीचा धर्म जाऊन त्याला दुसरा धर्म प्राप्त होणें यास परिणाम असें ह्मणतात ॥ १३ ॥

ज्या धर्मीचा असा तीन प्रकारचा परिणाम होतो त्याचें स्वरूप सांगतात,—

## शान्तोदिताऽव्यपदेश्यधर्मानुपाती धर्मी ॥ १४ ॥

**सूत्रार्थः**—भूत, वर्तमान व भावी ( भविष्य ) या धर्मांनीं नियमानें जो अनुसरून राहतो तो धर्मी होय.

**भाष्यम्**—योग्यतावच्छिन्ना धर्मिणः शक्तिरेव धर्मः स च फलप्रसवभेदानुमितसद्भाव एकस्यान्योऽन्यश्च परिदृष्टः। तत्र वर्तमानः स्वव्यापारमनुभवन् धर्मो धर्मान्तरेभ्यः शान्तेभ्यश्चाव्यपदेश्येभ्यश्च भिद्यते। यदा तु सामान्येन समन्वागतो भवति तदा धर्मिस्वरूपमात्रत्वात्कोऽसौ केन भिद्येत। तत्र ते त्रयः खलु धर्मिणो

धर्माः शान्ता उदिता अव्यपदेश्याश्चेति । तत्र शान्ता ये कृत्वा व्यापारानुपरताः, सव्यापारा उदितास्ते चानागतस्य लक्षणस्य समनन्तराः, वर्तमानस्यानन्तरा अतीताः। किमर्थमतीतस्यानन्तरा न भवन्ति वर्तमानाः, पूर्वपश्चिमताया अभावात्। यथाऽनागतवर्तमानयोः पूर्वपश्चिमता नैवमतीतस्य, तस्मान्नातीतस्यास्ति समनन्तरस्तदनागत एव समनन्तरो भवति वर्तमानस्येति । अथाव्यपदेश्याः के, सर्वं सर्वात्मकमिति । यत्रोक्तम् । जलभूम्योः पारिणामिकं रसादिवैश्वरूप्यं स्थावरेषु दृष्टं तथा स्थावराणां जङ्गमेषु जङ्गमानां स्थावरेष्वित्येवं जात्यनुच्छेदेन सर्वं सर्वात्मकमिति । देशकालाकारनिमित्तापबन्धान्न खलु समानकालमात्मनामभिव्यक्तिरिति । य एतेष्वभिव्यक्तानभिव्यक्तेषु धर्मेष्वनुपाती सामान्यविशेषात्मा सोऽन्वयी धर्मी। यस्य तु धर्ममात्रमेवेदं निरन्वयं तस्य भोगाभावः । कस्मात् । अन्येन विज्ञानेन कृतस्य कर्मणोऽन्यत्कथं भोक्तृत्वेनाधिक्रियेत, तत्स्मृत्यभावश्च । नान्यदृष्टस्य स्मरणमन्यस्यास्तीति वस्तुप्रत्यभिज्ञानाच्च स्थितोऽन्वयी धर्मी यो धर्मान्यथात्वमभ्युपगतः प्रत्यभिज्ञायते। तस्मान्नेदं धर्ममात्रं निरन्वयमिति ॥ १४ ॥

**भाष्यार्थः**—नियमेंकरून जी कार्यकारणरूप योग्यता ( अर्थात् वर्तमानतास्वरूपयोग्यता) तिनें युक्त जी मृत्तिका इत्यादिक धर्मीची शक्ति तिलाच धर्म ह्मणतात. त्या शक्तिरूप धर्माची सत्ता भिन्न भिन्न फलांच्या उत्पत्तीवरून अनुमानित होते; कारण, धर्मी एक असून त्याचे चूर्ण, पिंड, घट इत्यादि भिन्न भिन्न अनेक धर्म दृष्टीस पडतात. ( ते धर्मीत असल्यावांचून कार्यांत उपलब्ध होणार नाहींत; यावरून ते अनादि आहेत. ) ( ते धर्म तीन प्रकारचे आहेत. ) त्यांमध्यें वर्तमान ह्मणजे स्वव्यापाराचा अनुभव घेणारा ( अर्थात् आपला व्यापार करणारा) धर्म, आपल्याहून अन्य जे अतीत, अनागत धर्म त्यांहून स्पष्ट रीतीनें पृथक् समजण्यांत येतो. आतां ज्या वेळेस तो वर्तमान धर्म, अतीत व अनागत धर्मांप्रमाणें धर्मीच्या ठिकाणीं लीन होतो ( गुप्तरीतीनें राहतो ) त्या वेळेस तो धर्मिस्वरूपमात्र असल्यामुळें धर्मी कोणता व धर्म कोणता हें ज्ञान योग्यावांचून इतराला कसें होणार? ते धर्मीचे धर्म अतीत, वर्तमान व अनागत असे तीन प्रकारचे आहेत. त्यांत जे ( आपला ) व्यापार करून निवृत्त झाले ते अतीत, व जे हल्लीं व्यापार करीत आहेत ते वर्तमान धर्म होत. ते वर्तमान धर्म अनागत धर्मांनंतर होतात; व वर्तमानांनंतर अतीत धर्म होतात. ( ह्मणजे अनागत धर्माला वर्तमानधर्मता प्राप्त होते व वर्तमान धर्माला अतीतधर्मता प्राप्त होते. ) ( अतीत धर्माला पुनः वर्तमानधर्मता प्राप्त होत नाहीं. ) अतीतानंतर वर्तमान धर्म कां होत नाहीं ह्मणाल तर, अतीताला पूर्वपश्चिमता ( प्रथमपणा व मागीलपणा ) नाहीं; कारण, जशी अनागताला व वर्तमानाला पूर्वपश्चिमता आहे ह्मणजे अनागत धर्म प्रथम असून

त्यामागून वर्तमानता, व वर्तमान धर्म प्रथम असून त्यानंतर अतीतता; त्याप्रमाणें अतीताला पूर्वपश्चिमता नाहीं; ह्मणून अतीताच्या मागून अनागत धर्म असत नाहीं; तर अनागत धर्म वर्तमानाच्या पूर्वींच असतो. ( जर अतीतानंतरही अन्यधर्म असेल तर धर्मांचा कधींही अंत न झाल्यामुळें आत्म्यास मोक्ष कधींच प्राप्त होणार नाहीं. ) आतां अनागत धर्म कोणते ह्मणाल तर, ज्या धर्मीच्या ठिकाणीं असून सर्व विकारांना उत्पन्न करणाऱ्या शक्ती त्याच अनागत धर्म होत. याप्रमाणें पूर्वीच्या आचार्यांनीं सांगितलेंही आहे कीं, ' स्थावर ह्मणजे वनस्पति, लता, गुल्म इत्यादिकांचे ठिकाणीं जें मधुर, आंबट इत्यादि रसादिभेदांनीं अनंत-रूपत्व प्राप्त झालें आहे हें सर्व उदक व पृथ्वी या दोहोंच्या परिणामामुळें झालें आहे हें प्रत्यक्ष दृष्ट आहे. तसाच मनुष्य इत्यादि जंगमपदार्थांच्या ठिकाणीं धान्यादि स्थावरपदार्थांच्या परिणामाच्या योगानें रूपादिकांत अनेक प्रकारचा फेरफार होतो हें दृष्ट आहे. तसेंच गाईचें शेण, दूध इत्यादि जंगमपदार्थांच्या परिणामाच्या योगानें धान्य, चंपक इत्यादि स्थावरपदार्थांचें अनेक प्रकारचें रूप, रस इत्यादि झालेलें पाहण्यांत येतात. याप्रमाणें (अतीतकार्यव्यक्तीचा जरी उच्छेद झाला तथापि) त्या जातीच्या आणखी दुसऱ्या वस्तूंचा उच्छेद झालेला नसतो ह्मणून सर्व वस्तु सर्व जातींच्या शक्तींनीं युक्त आहेत. आतां सर्व ठिकाणीं जरी सर्व जातींच्या शक्ती आहेत तथापि त्यांना भूलोक इत्यादि देश, कलियुग इत्यादि काल, मनुष्य इत्यादि आकार व अधर्म इत्यादि निमित्त, ह्यांचा प्रतिबंध असल्यामुळें एकाच वेळीं अनेक विरुद्ध कार्यांची अभिव्यक्ति ( स्पष्टता ) होत नाहीं. याप्रमाणें सांगितलेले हे जे अभिव्यक्त व अनभिव्यक्त (कार्यरूपानें स्पष्ट होणारे व बीजरूपानें अस्पष्ट असणारे) धर्म या सर्वांच्या ठिकाणीं जो नेहमीं संबद्ध ( युक्त ) असणारा व धर्मधर्मिउभयात्मक त्यास धर्मी ह्मणतात. आतां ज्याच्या मतानें हें सर्व केवल धर्ममात्र ह्मणजे धर्मिरहित असें आहे त्याच्या मतानें ( धर्मी नसल्यामुळें क्षणिक वाद प्राप्त होऊन ) आत्म्यास भोग मुळींच प्राप्त होणार नाहीं; कारण, दुसऱ्या विज्ञानानें केलेल्या कर्मांचा, 'भोक्ता' या नात्यानें अधिकारी त्याहून अन्य विज्ञान कसें होऊं शकेल ? व पूर्वीच्या कर्मांचा कर्ता अन्य असल्यामुळें त्याहून इतराला त्याचें स्मरणच होणार नाहीं; कारण, एकानें पाहिल्याचें स्मरण दुसऱ्याला होत नसतें. याकरितां ज्याअर्थी ' मीं पूर्वी पाहिलेलीच ही वस्तु ' असें निश्चयात्मक ज्ञान होतें त्यावरून सर्व धर्मांत संबद्ध असणारा असा धर्मी अवश्य मानिला पाहिजे; कारण, तो जरी अन्य धर्मांप्रत प्राप्त झाला तथापि त्याविषयीं ' तोच हा ' अशी प्रत्यभिज्ञा होते. ह्मणून जें कोणीं ' हें सर्व धर्ममात्र ह्मणजे धर्मिरहित ' असें ह्मटलें आहे तें बरोबर नाहीं ॥ १४ ॥

आतां एकच धर्मी असून त्याला अनेक परिणाम असतात अशाविषयीं युक्ति सांगतात,–

## क्रमान्यत्वं परिणामान्यत्वे हेतुः ॥ १५ ॥

सूत्रार्थः—परिणामाच्या निराळेपणाविषयीं क्रमाचा निराळेपणाच कारण आहे.

भाष्यम्—एकस्य धर्मिण एक एव परिणाम इति प्रसक्तेः क्रमान्यत्वम्परिणामान्यत्वे हेतुर्भवतीति। तद्यथा। चूर्णमृत्पिण्डमृद्घटमृत्कपालमृत्कणमृदिति च क्रमः। यो यस्य धर्मस्य समनन्तरो धर्मः स तस्य क्रमः। पिण्डः प्रच्यवते, घट उपजायते इति धर्मपरिणामक्रमः। लक्षणपरिणामक्रमो घटस्यानागतभावाद्वर्तमानभावः क्रमः। तथा पिण्डस्य वर्तमानभावादतीतभावः क्रमः। नातीतस्यास्ति क्रमः। कस्मात्। पूर्वपरतायां सत्यां समनन्तरत्वं क्रमता। सा तु नास्त्यतीतस्य। तस्माद्द्वयोरेव लक्षणयोः क्रमः। तथाऽवस्थापरिणामोऽपि घटस्याभिनवस्य प्रान्ते पुराणता दृश्यते सा च क्षणपरम्परानुपातिना क्रमेणाभिव्यज्यमाना परां व्यक्तिमापद्यत इति धर्मलक्षणाभ्यां च विशिष्टोऽयं तृतीयः परिणाम इति। त एते क्रमा धर्मधर्मिभेदे सति प्रतिलब्धस्वरूपाः। धर्मोऽपि धर्मी भवत्यन्यधर्मस्वरूपापेक्षयेति। यदा तु परमार्थधर्मिण्यभेदोपचारद्वारेण स एवाभिधीयते धर्मस्तदाऽयमेकत्वेनैव क्रमः प्रत्यवभासते। चित्तस्य द्वये धर्माः परिदृष्टाश्चापरिदृष्टाश्च। तत्र प्रत्ययात्मकाः परिदृष्टा वस्तुमात्रात्मका अपरिदृष्टाः। ते च सप्तैव भवन्त्यनुमानेन प्रापितवस्तुमात्रसद्भावाः। 'निरोधधर्मसंस्काराः परिणामोऽथ जीवनम्। चेष्टा शक्तिश्च चित्तस्य धर्मा दर्शनवर्जिताः' इति॥ 'अतो योगिन उपात्तसर्वसाधनस्य बुभुत्सितार्थप्रतिपत्तये संयमस्य विषय उपक्षिप्यते'॥ १५॥

भाष्यार्थः—एका धर्मीचा एकच परिणाम व्हावा असें युक्तीनें प्राप्त झालें खरें, परंतु परिणाम अनेक होतात अशाविषयीं परिणामांचा क्रम हा हेतु ह्मणजे ज्ञापक आहे. तो असा,—प्रथम मृत्तिकेची चूर्णावस्था असते, त्यानंतर ती ( मृत्तिका ) पाणी घालून चांगली मळली असतां तिला पिंडावस्था प्राप्त होते; त्यानंतर दंड इत्यादिकांच्या व्यापारानें घटावस्था होते. घटावस्थेनंतर (घट फुटला असतां) कपालावस्था, त्यानंतर पुनः चूर्णावस्था प्राप्त होऊन पूर्वीप्रमाणें माती होते. याप्रमाणें परिणामांमध्यें क्रम स्पष्ट पाहण्यांत येतो. जो धर्मी ज्या धर्माच्यानंतर असतो तो त्या धर्मीचा क्रम समजावा. ( ह्मणजे मृत्तिकाच प्रथम चूर्ण होऊन नंतर पिंड होते; हा एक क्रम झाला. पुढें घट इत्यादि क्रमांनीं धर्मीचेच अनेक क्रम झाले. ) आतां मातीचा गोळा बनून घट तयार झाला हा धर्मपरिणाम क्रम होय. पिंडावस्थेमध्यें जो घटाचा अनागत धर्म होता तो जाऊन घटाला वर्तमानता प्राप्त झाली, ह्या क्रमास लक्षणपरिणाम क्रम ह्मणतात. तसाच पिंडाचा वर्तमानधर्म जाऊन त्याला अतीतधर्मक्रम प्राप्त झाला. आतां, अतीताला पुढें क्रम नाहीं; कारण, पूर्वापरभाव असला तरच समनंतरत्व ( ह्मणजे त्यामागून असणें )

अशा प्रकारची क्रमता असते; परंतु ती अतीताला नाहीं; कारण, वर्तमान व अनागत या दोन लक्षणांनाच क्रम आहे. (अतीताच्यानंतर कोणी नसल्यामुळें अतीताला पौर्वापर्यक्रम नाहीं. ) तशीच नवीन घटाच्या शेवटीं जी घटाला पुराणता दृष्टीस पडते ह्मणजे घटाचा नवेपणा जाऊन त्याला जो जुनेपणा येतो; तो अवस्थापरिणाम क्रम जाणावा. आतां त्यांत धर्मपरिणामाप्रमाणें प्रत्येक क्षणीं झालेला क्रम प्रत्यक्ष पाहण्यांत येत नाहीं खरा, तथापि ज्याअर्थी नवेपणा जाऊन जुनेपणा प्राप्त होतो तो एकदम तर प्राप्त होणें संभवत नाहीं; ह्मणून असें अनुमान होतें कीं प्रत्येक क्षणीं होणारा जो क्रम त्या परंपरेनें नवेपणा जात जात व जुनेपणा येत येत मग तो आपल्यास चांगला प्रत्यक्ष होतो. यामुळें धर्मपरिणाम व लक्षणपरिणाम यांपेक्षां हा तिसरा अवस्थापरिणाम अतिशयित ( विलक्षण ) आहे ( कारण, त्या दोन परिणामांत प्रतिक्षणीं उत्पत्ति नाहीं; आणि या अवस्थापरिणामांत प्रतिक्षणीं उत्पत्ति आहे ). ते हे सांगितलेले क्रम धर्म व धर्मी यांचा भेद असतां स्पष्टपणास येतात (एरव्ही नाहीं). आतां घट इत्यादि धर्म-सुद्धां कपाल ( घटाचीं शकलें ) इत्यादि अन्य धर्मापेक्षां धर्मी होऊं शकतो. आतां ज्या वे-ळेस प्रधानाच्याच ठिकाणीं अभेदाच्या आरोपानें ( कल्पनेनें ) सर्वही धर्म धर्मी आहे असा प्रयोग होतो त्या वेळेस हा क्रम एकत्वानेंच अनुभवास येतो. चित्ताचे दोन दोन धर्म आहेत; ते असे,–परिदृष्ट व अपरिदृष्ट. त्यांत जे अनुभवरूप ते परिदृष्ट, व जे केवल वस्तुमात्र ह्मणजे परमाणूप्रमाणें अतिसूक्ष्म ते अपरिदृष्ट धर्म होत. ते अपरिदृष्ट धर्म सात प्रकारचे असून त्यांची केवल वस्तुमात्रत्वेंकरून सत्ता आहे असें अनुमानानें सिद्ध होतें. ते सात प्रकार असे,–वृत्तींचा निरोध, धर्म ह्मणजे पुण्य व पातक, संस्कार ( स्मृतीवरून अनुमानित होणारा ), चित्ताचा प्रतिक्षणीं परिणाम, जीवन ह्मणजे प्राणधारण, चेष्टा ( चित्ताचा व्यापार ) व शक्ति ( कार्याची कारणाच्या ठिकाणीं अव्यक्तावस्था ); याप्रमाणें चित्ताचे हे सात अदृश्य धर्म आहेत ॥ १५ ॥

आतां येथून पुढें हा पाद समाप्त होईपर्यंत ज्यांना योगाचीं सर्व साधनें प्राप्त झालीं आहेत अशा योग्यानें जाणावयास इच्छिलेले जे अर्थ त्यांच्या साक्षात्काराकरितां कोठें कोठें चित्तसंयम करावा तो विषय सांगतात,–

## परिणामत्रयसंयमादतीतानागतज्ञानम् ॥ १६ ॥

**सूत्रार्थः**–पूर्वीं सांगितलेल्या तिन्ही परिणामांत संयम केल्यानें भूत व भविष्य ज्ञान होतें.

**भाष्यम्–धर्मलक्षणावस्थापरिणामेषु संयमाद्योगिनां भवत्यतीतानागतज्ञानम् । धारणाध्यानसमाधित्रयमेकत्र संयम उक्तस्तेन परिणामत्रयं साक्षात्क्रियमाणमतीतानागतज्ञानं तेषु संपादयति ॥ १६ ॥**

**भाष्यार्थः**–धर्म, लक्षण व अवस्था या तीन परिणामांच्या ठिकाणीं चित्ताचा संयम

केला असतां योग्यांना परिणामत्रयविषयक अतीत व अनागत ज्ञान प्राप्त होतें. धारणा, ध्यान व समाधि या तिघांस संयम ह्मणतात असें ( वि० सू० ४ त ) सांगितलें; त्या संयमानें धर्मादिक तीन परिणामांचा साक्षात्कार झाला असतां सर्व प्रकारचें अतीत व अनागत ज्ञान प्राप्त होतें ॥ १६ ॥

आतां दुसरी सिद्धि प्राप्त करवून देणारा संयमाचा विषय सांगतात,–

## शब्दार्थप्रत्ययानामितरेतराध्यासात्संकरस्तत्प्रविभागसंयमात्सर्वभूतरुतज्ञानम् ॥ १७ ॥

**सूत्रार्थः**–शब्द, अर्थ व ज्ञान यांचा परस्पर लोकांना अभेदानें अध्यास झाल्यामुळें ते एकरूपानें भासत आहेत; त्यांचे युक्तीनें निरनिराळे विभाग पाडून त्यावर संयम केला असतां संयम करणाराला सर्व प्राण्यांच्या शब्दाचें ज्ञान होतें ह्मणजे शब्दार्थ समजूं लागतो.

**भाष्यम्**–तत्र वाग् वर्णेष्वेवार्थवती, श्रोत्रं च ध्वनिपरिणाममात्रविषयम्, पदं पुनर्नादानुसंहारबुद्धिनिर्ग्राह्यमिति । वर्णा एकसमयासंभवित्वात्परस्परनिरनुग्रहात्मानस्ते पदमसंस्पृश्यानुपस्थाप्याऽऽविर्भूतास्तिरोभूताश्चेति प्रत्येकमपदस्वरूपा उच्यन्ते । वर्णः पुनरेकैकः पदात्मा सर्वाभिधानशक्तिप्रचितः सहकारिवर्णान्तरप्रतियोगित्वाद्वैश्वरूप्यमिवापन्नः पूर्वश्चोत्तरेणोत्तरश्च पूर्वेण विशेषेऽवस्थापित इत्येवं बहवो वर्णाः क्रमानुरोधिनोऽर्थसङ्केतेनावच्छिन्ना इयन्त एते सर्वाभिधानशक्तिपरिवृत्ता गकारौकारविसर्जनीयाः सास्नादिमन्तमर्थं द्योतयन्तीति तदेषामर्थसङ्केतेनावच्छिन्नानामुपसंहृतध्वनिक्रमाणां य एको बुद्धिनिर्भासस्तत्पदं वाचकं वाच्यस्य सङ्केत्यते । तदेकं पदमेकबुद्धिविषयमेकप्रयत्नाक्षिप्तमभागमक्रममवर्णं बौद्धमन्त्यवर्णप्रत्ययव्यापारोपस्थापितं परत्र प्रतिपिपादयिषया वक्तृभिरभिधीयमानैः श्रूयमाणैश्च श्रोतृभिर्वर्णैरनादिवाग्व्यवहारवासनानुविद्धया लोकबुद्ध्या सिद्धवत्सम्प्रतिपत्त्या प्रतीयते । तस्य सङ्केतबुद्धितः प्रविभाग एतावतामेवंजातीयकोऽनुसंहार एतस्यार्थस्य वाचक इति। सङ्केतस्तु पदपदार्थयोरितरेतराध्यासरूपः स्मृत्यात्मको योऽयं शब्दः सोऽयमर्थो योऽर्थः स शब्द इत्येवमितरेतराध्यासरूपः सङ्केतो भवतीति। एवमेते शब्दार्थप्रत्यया इतरेतराध्यासात्सङ्कीर्णा गौरिति शब्दो गौरित्यर्थो गौरिति ज्ञानम् । य एषां प्रविभागज्ञः स सर्ववित् । सर्वपदेषु चास्ति वाक्यशक्तिर्वृक्ष इत्युक्तेऽस्तीति गम्यते । न सत्ताम्पदार्थो व्यभिचरति। तथा न ह्यसाधना क्रियाऽस्तीति, तथा च पचतीत्युक्ते सर्वकारकाणामाक्षेपो नियमार्थोऽनुवादः कर्तृकरणकर्मणां चैत्राग्नितण्डुलानामिति। दृष्टं च वाक्यार्थे पदवचनं श्रोत्रियश्छ-

---

१ एकस्येति पाठान्तरम् ।

न्दोऽधीते, जीवति प्राणान् धारयति । वाक्ये पदपदार्थाभिव्यक्तिस्ततः पदं प्रविभज्य व्याकरणीयं क्रियावाचकङ्कारकवाचकं वा । अन्यथा 'भवत्यश्वोऽजापयः' इत्येवमादिषु नामाख्यातसारूप्यादनिर्ज्ञातं कथं क्रियायां कारके वा व्याक्रियेतेति तेषां शब्दार्थप्रत्ययानां प्रविभागः । तद्यथा । श्वेतते प्रासाद इति क्रियार्थः, श्वेतः प्रासाद इति कारकार्थः। शब्दः क्रियाकारकात्मा तदर्थः प्रत्ययश्च । कस्मात् । सोऽयमित्यभिसम्बन्धादेकाकार एव प्रत्ययः सङ्केत इति । यस्तु श्वेतोऽर्थः स शब्दप्रत्ययोरालम्बनीभूतः स हि स्वाभिरवस्थाभिर्विक्रियमाणो न शब्दसहगतो न बुद्धिसहगतः । एवं शब्द एवं प्रत्ययो नेतरेतरसहगतः । इति अन्यथाऽर्थोऽन्यथा शब्दोऽन्यथा प्रत्यय इति विभागः । एवं तत्प्रविभागसंयमाद्योगिनः सर्वभूतरुतज्ञानं सम्पद्यते इति ॥ १७ ॥

भाष्यार्थः-(शब्द तीन प्रकारचे,-१ बोलणाराच्या वागिंद्रियापासून प्रथम उत्पन्न होणारा; २ ऐकणाराच्या कर्णेंद्रियानें ग्रहण केला जाणारा; व ३ रा बुद्धीनें ग्रहण केला जाणारा.) त्यांत वागिंद्रिय वर्णांचे ठिकाणींच अर्थवान् ( प्रयोजनवान् ) होतें, (ह्मणजे वागिंद्रियापासून जो शब्द उत्पन्न होतो तो वर्णच असतो; शृंग इत्यादि शब्द नसतो किंवा अर्थबोधक पद नसतें. ( वर्ण ह्मणजे उरःस्थान इत्यादि ठिकाणीं उत्पन्न होणारा शब्द होय. वर्णांचीं उर, कंठ, शिर, जिह्वामूल, ( जिभेचें मूल, ) दंत ( दांत, ) नासिका (नाक) व ओष्ठ ( ओंठ ), यांप्रमाणें आठ उत्पन्न होण्याचीं स्थानें आहेत. ) ( आतां वागिंद्रिय हें शरीराच्या बाहेर राहणारें नाहीं ह्मणून श्रोत्रेंद्रियानें ग्रहण केला जाणारा ( कानानें ऐकला जाणारा ) जो शब्द तोही ह्मणतां येत नाहीं; अथवा ऐकणाराच्या बुद्धीनें ग्रहण केला जाणारा जो वाचक शब्द तोही ह्मणतां येत नाहीं; कारण, ऐकणाराच्या कर्णेंद्रियाशीं बोलणाराच्या वागिंद्रियाचा कांहींच संबंध नसल्यामुळें ऐकणाराच्या कर्णेंद्रियानें ग्रहण केला जाणारा शब्द बोलणाराच्या वागिंद्रियानें उत्पन्न होण्याचा मुळींच संभव नाहीं.) (आतां वागिंद्रियापासून उत्पन्न होणारा शब्द व कर्णेंद्रियानें ग्रहण केला जाणारा शब्द एक ह्मणावा तर तसें ह्मणतां येत नाहीं; कारण,) श्रोत्रेंद्रियाचा विषय ह्मटला ह्मणजे ध्वनीचा परिणामरूप जो वर्ण अवर्ण या दोन्ही ठिकाणीं साधारण राहणारा नादनामक शब्दधर्म हा होय; ( ध्वनीच्या परिणामावांचून जें वाचक ( अर्थबोधक ) पद तें नव्हे. ध्वनि ह्मणजे वागिंद्रिय, शंख इत्यादि ठिकाणीं ताडित झालेल्या उदानवायूचा एक प्रकारचा परिणाम होय; कीं ज्या योगानें उदानवायु बोलणाराच्या देहांतून निघून अनेक शब्दांस एकसारखा उत्पन्न करीत करीत ऐकणाराच्या कर्णेंद्रियाप्रत प्राप्त होतो. ) ( आतां तो नादनामक शब्द वर्णांच्या जातीचा असल्यामुळें त्यालाही वर्ण असें ह्मणतात. ) ( आतां वागिंद्रियापासून उत्पन्न होणारा शब्द पद ह्मणावें तर तसें ह्मणतां येत नाहीं; कारण, ) पदाचें स्वरूप ह्मटलें ह्मणजे जशी आपल्याला शब्दप्रतीति

होते त्याचप्रमाणें सिद्ध झालेले जे नादसंज्ञक गकार इत्यादि वर्ण त्या प्रत्येक वर्णाला प्रथम ग्रहण करून नंतर जी बुद्धि सर्ववर्णांमिळून 'गाय' हें एक पद आहे असें एकत्वाचें ग्रहण करविते अशा बुद्धीनें ग्रहण केलें जाणारें, वर्णांहून निराळें, अखंड असें एकदाच उत्पन्न होणारें व ज्याला पुढें स्फोट ह्मणून नांव दिलें आहे असें एक प्रकारचें शब्दस्वरूप होय. ( ह्मणून अंतःकरणानेंच ग्रहण केला जाणारा असा हा तिसऱ्या प्रकारचा शब्द आहे. ) अनेक वर्णांची एक्या वेळींच उत्पत्ति होण्याचा संभव नसल्यामुळें त्या परस्परांचा कांहीं संबंध नसतो ह्मणून ते पदत्वाला प्राप्त न होतां व ह्मणूनच प्रकट होऊन पुनः क्षणभरांत नष्ट होणारे, याकरितां विचारी पुरुष प्रत्येक वर्णाला पदस्वरूप मानीत नाहींत. ( आतां अशी शंका येते कीं, जर वर्ण हे पदस्वरूप नाहींत तर मग 'अमुक इतके वर्ण अमुक अशा क्रमानें असतां अमुक अर्थाचे वाचक होतात,' असा लोकांत संकेत कसा होतो? याचें समाधान असें कीं, ) जरी वर्ण पदाहून भिन्न आहेत तथापि अवस्था व अवस्थावान् या दोहोंचा अभेदही मानिला आहे ह्मणून एकेक वर्ण सुद्धां पदाशीं अभिन्न असा होऊं शकतो; ह्मणूनच सर्वपदार्थाभिधानयोग्यता त्याला असते. आणि दुसरें कारण असें कीं, एका पदाच्या ठिकाणीं जे दुसरे आणीक वर्ण त्यांचा संबंध असल्यामुळें वर्णांना अनंतपदरूपता प्राप्त झाल्यासारखी होते. तो प्रकार असा,– 'गाय' या शब्दांतील पूर्वीचा गकार 'आय' या तीन वर्णांमुळें गण इत्यादि पदांहून व्यावृत्त होतो. आणि उत्तर ह्मणजे शेवटचा 'अ' हा वर्ण 'गाय्' या तीन वर्णांमुळें गौर इत्यादि पदांहून व्यावृत्त होऊन विशेष अर्थाचें बोधक जें 'गाय' असें अखंड स्फोटरूप पद त्या ठिकाणीं तादात्म्येंकरून अवस्थापित होतो; ह्मणून या प्रकारचे पुष्कळ वर्ण अमुक एक विशेष प्रकारच्या आनुपूर्वीची अपेक्षा करीत होत्साते पदाशीं अभेदरूपानें व अर्थसंकेतानें नियमित होऊन सर्व अर्थबोधन करण्याची जरी त्यांच्या मध्यें शक्ति आहे तथापि हे गकारादिक वर्ण इतकेच व अशा प्रकारच्या रचनेनें असले ह्मणजे ते जिला गळ्याखालीं पोळी, शिंगे वगैरे अवयव आहेत अशा अर्था (व्यक्ती) चाच बोध करवितात; ह्मणून तर त्याप्रमाणें वर्णद्वारा त्या पदाचाच अविवेकानें संकेत केला जातो. त्याचें कारण हें कीं, तें पदच त्या अर्थाचें बोधक असतें. आतां पद व अर्थ हे उभयतां भिन्न असतां पदानें अर्थाचा संकेत होण्यास कारण इतकेंच असतें कीं, अर्थसंकेतानें नियमित झालेले व समाप्त झाला आहे ध्वनीपासून उत्पन्न होणारा एक विशेष प्रकारचा क्रम ज्यांचा अशा ह्या वर्णांचा बुद्धीनेंच मात्र ग्राह्य होणारा जो पदसंज्ञक स्फोट तो एक असतो ह्मणून. आतां तें स्फोटसंज्ञक पद एकच असतें ह्मणजे वर्णांसारखें अनेक नसतें; कारण, त्याचें एका बुद्धीनेंच ग्रहण होतें व एकध्वन्यादिप्रयत्नानेंच त्याची उत्पत्ति होत असते. तसेच पदामध्यें अंश नसतात व (वर्णांप्रमाणें) क्रम नसतो; कारण, पद हें एकदाच उत्पन्न होणारें असतें. ह्मणून तें वर्णांहून भिन्न असून बुद्धीनेंच मात्र ग्राह्य होणारें आहे. तसेंच तें

अंत्यवर्णाच्या प्रत्ययरूप व्यापारानें अभिव्यक्त ह्मणजे स्फुट होणारें, असें असून दुसऱ्यास प्रतिपादन करण्याच्या इच्छेनें वक्त्यानें उच्चारित ( उच्चारण केलेले ) व श्रोत्यानें श्रुत ( ऐकलेले ) अशा वर्णांनीं खऱ्याप्रमाणें एकमेकांच्या संवादानें त्याचा व्यवहार होतो. त्यास कारण अनादिसिद्ध जी वाग्व्यवहाराची वासना तिच्या अधीन झालेली जी लोकांची बुद्धि ती होय. इतक्या वर्णांचें अशा अमुक प्रकारच्या क्रमानें मेलन (मिश्रण) असतां ह्या अर्थाचें बोधक पद असतें अशा प्रकारचा जो त्या पदाचा प्रविभाग (ह्मणजे विषयव्यवस्था) तो संकेतग्रहामुळेंच होतो. आतां संकेत ह्मणजे पद व पदाचा अर्थ या दोहोंचा एकमेकांच्या ठिकाणीं अभेदरूपानें आरोप. तो अभेदारोपही स्मृतिरूप होय. ह्मणजे 'जो शब्द तो अर्थ व जो अर्थ तो शब्द अशा प्रकारचा परस्पराध्यासरूप संकेत होतो. याप्रमाणें या संकेतबुद्धीच्या कारणानें तीन प्रकारचे शब्द आणि अर्थ व प्रत्यय (ज्ञान) हे परस्पराध्यासानें ह्मणजे 'गाय' हा शब्द, 'गाय' हा अर्थ व 'गाय' हें ज्ञान, याप्रमाणें एकरूपानें भासत आहेत. आतां जो या शब्दार्थज्ञानांचा प्रविभाग जाणतो तोच शब्दादिकांचा तत्त्वज्ञ होय. आतां सर्व पदांच्या ठिकाणीं वाक्यशक्ति आहे; ह्मणजे 'वृक्ष' इतकाच उच्चार केला कीं, 'आहे' या क्रियेचाच नियमानें अध्याहार होतो. (इतर क्रियांच्या अध्याहाराला ह्मटलें ह्मणजे योग्यता, आकांक्षा, तात्पर्य इत्यादिक लिंगच असावें लागतें; व तेथेंही सत्ता ही असतेच; ) कारण, पदार्थ सत्तेला सोडून कधींही असत नाहीं; आणि दुसरें असें कीं, कारकावांचून क्रिया असत नाहीं. (आतां अशी शंका येते कीं, सर्वत्र एका क्रियेनेंच निर्वाह झाल्यामुळें सर्व कारकांचा कोठेंच प्रयोग होणार नाहीं? याचें समाधान असें कीं, ) 'शिजवितो' अशा क्रियेचा उच्चार केला कीं, सर्व कारकांचा आक्षेप (ह्मणजे अनुमान ) होणार तो न व्हावा ह्मणून नियमार्थ चैत्र, अग्नि व तांदूळ या क्रमानेंच कर्ता, करण व कर्म या योग्य कारकांचा अनुवाद आहे. आतां कोठें कोठें वाक्याच्या ऐवजीं नुसतें पद उच्चारण केलेलें दृष्ट आहे; जसें, 'छन्दोऽधीते' ( वेदाध्ययन करितो ) या वाक्याबद्दल श्रोत्रिय या पदाचाच नुसता उच्चार केला ह्मणजे काम होतें; ( कारण, श्रोत्रिय या पदामध्यें वेदाध्ययनकर्ता असा अर्थबोध करून देण्याची शक्ति आहे.) तसेंच 'प्राणान् धारयति' या वाक्याबद्दल 'जीवति' एवढ्या पदाचाच उच्चार केला असतां काम होतें ( कारण, 'जीवति' या क्रियापदांतील 'जीव्' धातूमध्यें बल व प्राणधारण या अर्थांची शक्ति आहे ). त्यांत वाक्यामध्यें जेथें संशय येईल तेथें प्रथमपदाची वाक्यानें स्पष्टार्थता करावी, त्यानंतर पदाची 'हें क्रियावाचक पद किंवा हें कारक वाचक पद' अशी विषयव्यवस्था करून त्यांची व्याख्या करावी. नाहींतर 'भवति, अश्वः, अजापयः' या प्रकारच्या कित्येक नाम ह्मणजे प्रातिपदिक व क्रिया यांच्या अर्थांत भेद असून रूपांत सारखेपणा असल्यामुळें अनिर्धारित ( ज्याच्या अर्थाचा निश्चय झाला नाहीं असें ) पद कसें क्रियेविषयीं अथवा कारकीविषयीं स्पष्टार्थप्रत्यायक होईल? ह्मणून

त्या शब्द, अर्थ व प्रत्यय यांची आधीं विषयव्यवस्था केली पाहिजे. ( वरील 'भवति' इत्यादिकांच्या अर्थांत भेद व रूपांत सारखेपणा आहे तो असा,– 'भवति' एवढेंच ह्मटलें असतां 'भवति घटः') घट आहे व 'भवति भिक्षां देहि' ( हे गृहस्वामिनि ! तूं मला भिक्षा घाल ) या दोन वाक्यांतील पहिला भवतिशब्द क्रियावाचक व दुसरा संबोधनवाचक असल्यामुळें अर्थांत भेद झाला व रूपांत आनुपूर्वीनें (स्वरूपानें) सारखेपणा आहेच. 'अश्वः' असें ह्मटलें असतां 'तूं श्वासोच्छ्वास घेता झालास' अशा अर्थांत क्रियापद व दुसरा अर्थ 'घोडा' याप्रमाणें अर्थांत भेद व स्वरूपांत सारखेपणा; याप्रमाणें 'अजापयः' इतकें ह्मटलें असतां एक अर्थ 'शेळीचें दूध' व दुसरा अर्थ 'तूं शत्रूंचा पराभव करिता झालास;' यांत पहिल्या अर्थांत 'अजापयस्' शब्दकारकवाचक व दुसऱ्या अर्थांत क्रियापदवाचक असल्यामुळें अर्थांत भेद व रूपांत सादृश्य (सारखेपणा) आहे. याप्रमाणें भाषेंतही 'कर, धर, वर, मर,' इत्यादि संदेहाचीं उदाहरणें समजावीं. त्यांत संशय असा,–'कर' ह्मणजे 'हात, जकात' इत्यादि अर्थांत कारकवाचकता व 'काम कर' अशा अर्थांत क्रियावाचकता; 'धर' ह्मणजे आधार व चोर धर; 'वर' ह्मणजे 'नवरा, श्रेष्ठ, इच्छित' इत्यादि व 'स्वीकार कर;' आणि 'मर' ह्मणजे 'कीड' व 'मरून जा' इत्यादि अर्थांत भेद व रूपांत सारखेपणा जाणावा.) ( शब्द, अर्थ व प्रत्यय यांचा संकर (मिश्रीभाव) दाखवून आतां त्यांची विषयव्यवस्था दाखवितात; ती अशी,–) 'श्वेतते प्रासादः' या वाक्यांतील 'श्वेतते' हा शब्द ( क्रिया ह्मणजे साध्यरूप आहे अर्थ ज्याचा तो ) क्रियार्थ असा आहे; आणि 'श्वेतः प्रासादः' या वाक्यांतील 'श्वेतः' हा शब्द ( कारक ह्मणजे सिद्धरूप आहे अर्थ ज्याचा तो ) कारकार्थ असा आहे. आतां 'श्वेतते' व 'श्वेतः' हे दोन शब्द स्वतः स्वरूपानें व क्रियाकारकरूपानें भिन्न खरे, परंतु यांचा अर्थ जो श्वेत गुण तो एकच आहे; (व तसा प्रत्ययही होतो. ) कशावरून ह्मणाल तर, 'तो हा' अशा अभेदप्रत्यभिज्ञानेंकरून संकेतांत एकाकारच प्रत्यय होतो ( ह्मणजे जी श्वेतनक्रिया तोच श्वेतरूपकारक गुण; व जो 'श्वेतते' या शब्दापासून श्वेताकार प्रत्यय तोच 'श्वेतः' या शब्दापासून श्वेताकार प्रत्यय संकेतांत होतो; ह्मणून दोहोंचा अर्थ व प्रत्यय संकेतांत एक आहे ). आतां वस्तुतः विचार करून पाहिलें असतां जो श्वेतरूप अर्थ तो शब्द व प्रत्यय यांचा विषयभूत झाल्यामुळें व आपण ज्या शब्दादिव्यावृत्त अशा व नव ( नवीन ) पुराण ( जुनी ) इत्यादिक अवस्था त्यांनीं विकाराप्रत पावणारा असा असल्यामुळें तो शब्दाबरोबर असणारा किंवा प्रत्ययाबरोबर असणारा ह्मणतां येत नाहीं. याचप्रमाणें शब्द व याचप्रमाणें प्रत्यय एकमेकांबरोबर असत नाहींत. ( ह्मणजे शब्द, अर्थ व प्रत्यय हे देशतः ( एकदेशसंबंधानें ) किंवा कालतः ( एककालसंबंधानें ) कोणत्याच रीतीनें परस्पर सहचर ( बरोबर असणारे ) असूं शकत नाहींत; कारण, शब्द आकाशाच्या ठिकाणीं, श्वेतगुण इत्यादिक जो अर्थ तो प्रासाद इत्यादिकांच्या ठिकाणीं आणि

प्रत्यय तर बुद्धीच्या ठिकाणीं; ह्मणून कोणत्याच रीतीनें हे परस्पर बरोबर असत नाहींत. ) याप्रमाणें एकप्रकारचा अर्थ, एकप्रकारचा शब्द व एकप्रकारचा प्रत्यय असा त्यांचा विभाग आहे. याप्रमाणें मनुष्यांचा जो शब्दार्थप्रत्ययांचा प्रविभाग त्याच्या ठिकाणीं संयम केला असतां सर्व प्राण्यांच्या शब्दांचें, त्यांच्या अर्थांचें व प्रत्ययांचें योग्यांस ज्ञान होतें. ( ह्मणजे सर्वभूतरुतज्ञान अशा प्रकारची सिद्धि संयमापासून योग्यास प्राप्त होते ) ॥ १७ ॥

आतां दुसरी सिद्धि सांगतात,–

## संस्कारसाक्षात्करणात्पूर्वजातिज्ञानम् ॥ १८ ॥

**सूत्रार्थः**–वासनेच्या संस्कारांच्या ठिकाणीं चित्ताचा संयम करून संस्कारांचा साक्षात्कार करून घेतल्यानें योग्याला जन्मजन्मांतरीं आपण कोण होतों, वगैरे ज्ञान प्राप्त होतें.

**भाष्यम्**–द्वये खल्वमी संस्काराः स्मृतिक्लेशहेतवो वासनारूपा विपाकहेतवो धर्माधर्मरूपास्ते पूर्वभवाभिसंस्कृताः परिणामचेष्टानिरोधशक्तिजीवनधर्मवदपरिदृष्टाश्चित्तधर्मास्तेषु संयमः संस्कारसाक्षात्क्रियायै समर्थः । न च देशकालनिमित्तानुभवैर्विना तेषामस्ति साक्षात्करणम् । तदित्थम् । संस्कारसाक्षात्करणात्पूर्वजातिज्ञानमुत्पद्यते योगिनः । परत्राप्येवमेव संस्कारसाक्षात्करणात्परजातिसंवेदनम् । अत्रेदमाख्यानं श्रूयते । भगवतो जैगीषव्यस्य संस्कारसाक्षात्करणाद्दशसु महासर्गेषु जन्मपरिणामक्रममनुपश्यतो विवेकजं ज्ञानं प्रादुरभवत् । अथ भगवानावट्यस्तनुधरस्तमुवाच । 'दशसु महासर्गेषु भव्यत्वादनभिभूतबुद्धिसत्वेन त्वया नरकतिर्यग्गर्भसंभवं दुःखं संपश्यता देवमनुष्येषु पुनःपुनरुत्पद्यमानेन सुखदुःखयोः किमधिकमुपलब्धम्' इति । भगवन्तमावट्यं जैगीषव्य उवाच । दशसु महासर्गेषु भव्यत्वादनभिभूतबुद्धिसत्वेन मया नरकतिर्यग्भवं दुःखं संपश्यता देवमनुष्येषु पुनःपुनरुत्पद्यमानेन यत्किंचिदनुभूतन्तत्सर्वं दुःखमेव प्रत्यवैमि । भगवानावट्य उवाच । यदिदमायुष्मतः प्रधानवशित्वमनुत्तमं च सन्तोषसुखं किमिदमपि दुःखपक्षे निःक्षिप्तमिति । भगवाञ्जैगीषव्य उवाच । विषयसुखापेक्षयैवेदमनुत्तमं सन्तोषसुखमुक्तं कैवल्यापेक्षया दुःखमेव । बुद्धिसत्वस्यायं धर्मस्त्रिगुणः । त्रिगुणश्च प्रत्ययो हेयपक्षे न्यस्त इति दुःखरूपतृष्णातन्तुदृष्टार्थसन्तापापगमानुप्रसन्नमबाधं सर्वानुकूलं सुखमिदमुक्तमिति ॥ १८ ॥

**भाष्यार्थः**–चित्ताचे वासनारूप संस्कार ह्मटले ह्मणजे दोन प्रकारचे; कांहींएक तर ( ज्ञानापासून उत्पन्न होणारे ) फक्त स्मृतीला कारण ह्मणजे ज्या संस्कारांपासून पूर्वीची आठवण मात्र होते; आणि कांहींएक अविद्या, अस्मिता इत्यादि क्लेशांला हेतु असून त्यांपासून जाति, आयुष्य व उपभोग हे परिणाम उत्पन्न होतात; ते धर्म व अधर्म हेच होत ते संस्कार पूर्वींच्या अनेक जन्मांमध्यें संचित झालेले असून ते जसे परिणाम, चेष्टा, निरोध,

शक्ति व जीवन हे चित्ताचे धर्म असल्यामुळें साक्षिभास्य होत नाहींत ह्मणजे आत्म्याचे धर्म होत नाहींत; त्याप्रमाणें चित्ताचेच धर्म आहेत, आत्म्याचे धर्म नाहींत. ( यावरून धर्म इत्यादिक संस्कार प्रलयामध्येंही चित्ताचेच ठिकाणीं राहतात, ह्मणून चित्त हें बीजरूपानें नित्य असें सिद्ध झालें. ) त्या ( शब्द व अनुमान यांनीं सामान्य रीतीनें ज्ञात झालेल्या ) संस्कारांच्या ठिकाणीं संयम केला असतां ( ह्मणजे ' मीं ह्या पदार्थाचा पूर्वीं अनुभव घेतला किंवा मीं पूर्वीं अशा रीतीनें कामें केलीं अशा पूर्वीं घडलेल्या गोष्टींकडे लक्ष देऊन त्यांजवर संयम केला असतां ) तो संयम संस्कारांस साक्षात् करण्याविषयीं समर्थ होतो. आतां जन्मभूमि इत्यादि देश, युग इत्यादि काल, माता, पिता इत्यादि निमित्त हे संस्कारांचे विषय ( आधार ) आहेत; तेव्हां त्यांच्या अनुभवांवांचून ह्मणजे त्यांस विषय न करितां संस्कारांचा साक्षात्कार होण्याचा संभव नाहीं. ( कारण, आधारावांचून तर आधेय असूं शकत नाहीं; आणि संयमानें तर संस्कारांचा साक्षात्कार होतो ह्मणून सांगितलें; यावरून देश, काल, निमित्त इत्यादि सर्वांसहित संस्कारांचा साक्षात्कार होतो असें अर्थात् सिद्ध होतें. ) याप्रमाणें संस्कारांचा साक्षात्कार झाला असतां योग्यास पूर्वींच्या अनेक जन्मांचें ज्ञान होतें. पूर्वींच्याच जन्मांचें ज्ञान होतें असें नाहीं; तर अनागतावस्थ (ज्यांना अवस्था ह्मणजे स्थिति अद्यापि प्राप्त झाली नाहीं ) असे जे पुढें उत्पन्न होणाऱ्या जन्मांचे संस्कार त्यांचा संयमानें साक्षात्कार झाला असतां पुढच्याही जन्मांचें ज्ञान होतें. या ( पूर्वजातिज्ञाना ) विषयीं अशी एक कथा ऐकण्यांत आहे कीं, भगवान् जैगीषव्यमुनींनें संस्कारसाक्षात्कारांपासून दहा महासर्गांमध्यें ( महाकल्पांमध्यें ) असणाऱ्या जन्मपरंपरेचा व परिणामपरंपरेचा साक्षात्कार करून घेतल्यानंतर त्यास पुढें ( वि० ३ सू० ५४ त ) सांगितलेलें विवेकख्याति नांवाचें ज्ञान प्राप्त झालें. यानंतर भगवान् आवट्य नांवाचा योगी केवल लिंगशरीरानें विहार करणारा खरा परंतु जैगीषव्याच्या परीक्षेकरितां योगसामर्थ्यानें आपण नवीन देह धारण करून त्यास प्रश्न करितां झाला; कीं, ' हे जैगीषव्यमुने ! आपण दहा महाकल्प पाहिलेत, त्यांत आपण क्षेमयुक्त असल्यामुळें व आपल्या चित्ताचे तमोमल व रजोमल दूर झालेले असल्यामुळें सुख व दुःख यांपैकीं कोणाचा अनुभव अधिक घेतला ? ' असा भगवान् आवट्ययोग्याचा प्रश्न ऐकून त्याप्रत जैगीषव्य बोलता झाला कीं, ' हे भगवन् आवट्य ! दहा महाकल्पांमध्यें म्यां नरक व तिर्यग् ( पशु पक्षी ) योनींमध्यें प्राप्त होणाऱ्या दुःखाचा अनुभव घेतल्यानंतर पुनः वरचेवर देव, मनुष्य या योनींमध्यें उत्पन्न होऊन जो कांहीं अनुभव घेतला त्यांत सर्वत्र दुःखाचाच अनुभव घेतला ( सुख ह्मणून कोठेंच नव्हतें ). ' यानंतर पुनः आवट्य प्रश्न करिता झाला कीं, ' जें हें आपणांला प्रधानवशित्व ( प्रधान ह्मणजे प्रकृति, तिचा आपल्या इच्छेप्रमाणें उपयोग करितां येणें ह्मणजे अमुकाला अमुक अशा प्रकारची शरीर व इंद्रियरूप संपत्ति देण्याची योग्यानें इच्छा केली कीं तत्काल प्रकृतीस प्रेरणा करून त्याप्रमाणें शरीर व इंद्रियरूप

संपत्ति त्यास देतां येणें अशा प्रकारचें ऐश्वर्य ) व अत्युत्तम संतोषसुख हीं दोन प्राप्त झालीं; ह्या दोहोंचीही आपण दुःखपक्षांत गणना कशी केली? आवट्याचा असा प्रश्न ऐकून भगवान् जैगीषव्य पुनः सांगतात कीं, विषयसुखापेक्षांच हें संतोष सुख अत्यंत उत्तम असें ह्मटलें; बाकी कैवल्य (मोक्ष) सुखापेक्षां दुःखच आहे; कसें ह्मणाल तर, बुद्धिसत्वाचा हा धर्म त्रिगुण ह्मणजे सुखादिगुणत्रयवान् आहे, व सुखादिगुणत्रयवान् प्रत्यय ( मध व विष कालविलेल्या अन्नाप्रमाणें ) दुःखपक्षांत सांगितला आहे. आणि दुःखास साधन असल्यामुळें दुःखरूप असा जो तृष्णातंतु त्यापासून प्राप्त होणारा जो अत्यंत ताप तो दूर झाल्यामुळें प्रसन्न ( वैषयिकसुखानें रहित ), अक्षय व सर्वांना प्रिय असें संतोषापासून उत्पन्न होणारें सुख शास्त्रांत सांगितलें आहे ( ह्मणून संतोषसुखाला अत्युत्तमत्व सांगितलें तेंही बरोबर आहे. ) ॥ १८ ॥

आतां आणिक दुसरी सिद्धि सांगतात,–

## प्रत्ययस्य परचित्तज्ञानम् ॥ १९ ॥

**सूत्रार्थः**–दुसऱ्याच्या चित्तावर संमय केला असतां दुसऱ्याच्या मनांत काय आहे तें सामान्यरीतीनें समजूं लागतें.

**भाष्यम्–प्रत्यये संयमात्प्रत्ययस्य साक्षात्करणात्ततः परचित्तज्ञानम् ॥ १९ ॥**

**भाष्यार्थः**–( दुसऱ्याचा चेहरा पाहून त्याचें चित्त अमुक प्रकारचें असावें असें ओळखून त्यावर जर संयम करून दुसऱ्याच्या चित्ताचा साक्षात्कार झाला तर दुसऱ्याच्या चित्तांत काय आहे याचें ज्ञान योग्यास होतें ॥ १९ ॥

जसा संस्कारसाक्षात्कार झाला असतां तद्विषय जे देशादिक त्यांचा सुद्धां साक्षात्कार होतो; त्याप्रमाणें परचित्ताचा साक्षात्कार झाला असतां त्याच्या विषयांचा सुद्धां साक्षात्कार होतो कीं काय? ह्या शंकेचें आतां समाधान सांगतात,–

## न च तत्सालम्बनं तस्याविषयीभूतत्वात् ॥ २० ॥

**सूत्रार्थः**–दुसऱ्याच्या चित्तांत विषय काय आहे हें समजण्याला कांहीं साधन नसल्यामुळें दुसऱ्याच्या चित्तावर आपल्या चित्ताचा संयम केल्यानें दुसऱ्याच्या चित्तांतील विशेष गोष्ट समजूं शकत नाहीं; तर फक्त चित्त चांगलें किंवा वाईट अशा प्रकारचें साधारण ज्ञान होतें.

**भाष्यम्–रक्तं प्रत्ययं जानात्यमुष्मिन्नालम्बने रक्तमिति न जानाति । परप्रत्ययस्य यदालम्बनं तद्योगिचित्तेन नालम्बनीकृतं परप्रत्ययमात्रं तु योगिचित्तस्यालम्बनीभूतमिति ॥ २० ॥**

**भाष्यार्थः**–परचित्ताच्या ठिकाणीं संयम केल्यानें फक्त दुसऱ्याचें चित्त आसक्त आहे एवढें साधारण ज्ञान होईल; तें अमुक विषयावर आसक्त झालें आहे असें विशेष ज्ञान होत नाहीं;

कारण, दुसऱ्याच्या चित्ताचा जो ( नील किंवा पीत वगैरे ) विषय तो योग्याच्या चित्तानें संयम करण्याचा विषय होऊं शकत नाहीं; कारण, योग्याच्या चित्ताचा संयमाचा विषय ह्मटला ह्मणजे फक्त दुसऱ्याचें चित्त. ( तेव्हां जो संयमाचा विषय होऊं शकत नाहीं त्याचें ज्ञान कसें होणार ? अर्थात् दुसऱ्याच्या चित्ताचें ज्ञान संयमानें सविषय होत नाहीं ) ॥ २० ॥

आतां आणिक दुसरी सिद्धि सांगतात,–

## कायरूपसंयमात्तद्ग्राह्यशक्तिस्तम्भे चक्षुष्प्रकाशासम्प्रयोगेऽन्तर्द्धानम् ॥ २१ ॥

**सूत्रार्थः**–आपल्या शरीराच्या रूपांत संयम केल्यानें दुसऱ्याची रूप पाहण्याची जी शक्ति, तिचा प्रतिबंध होऊन योगी आपल्या इच्छेप्रमाणें कोणाला दिसेनासा होतो.

**भाष्यम्–कायरूपे संयमाद्रूपस्य या ग्राह्या शक्तिस्तां प्रतिबध्नाति । ग्राह्यशक्तिस्तम्भे सति चक्षुष्प्रकाशासंयोगेऽन्तर्द्धानमुत्पद्यते योगिनः । एतेन शब्दाद्यन्तर्द्धानमुक्तं वेदितव्यम् ॥ २१ ॥**

**भाष्यार्थः**–आपल्या शरीराच्या रूपाच्या ठिकाणीं चित्ताचा संयम केला असतां दुसऱ्याच्या चक्षुरिंद्रियाची जी रूप ग्रहण करण्याची शक्ति तिचा प्रतिबंध होतो; रूपग्राहकशक्तीचें स्तंभन ( प्रतिबंध ) झालें असतां दुसऱ्याच्या चक्षुःप्रकाशाचा संयोग योग्याच्या रूपाशीं न झाल्यामुळें योगी कोणास दिसेनासा होतो. ही जी रूपांतर्धानसिद्धि सांगितली. याचप्रमाणें आपल्या शरीरसंबंधी शब्द, स्पर्श, रस व गंध यांच्या ठिकाणीं चित्तसंयम केला असतां त्या त्या गुणाची जी ग्रहण करण्याची शक्ति तिचें स्तंभन होऊन योग्याच्या शब्दादिकांचें दुसऱ्यास ज्ञान होत नाहीं असें समजावें ॥ २१ ॥

आतां दुसरी विभूति सांगतात,–

## सोपक्रमं निरुपक्रमञ्च कर्म, तत्संयमादपरान्तज्ञानमरिष्टेभ्यो वा॥२२॥

**सूत्रार्थः**–निरुपक्रम व सोपक्रम अशा दोन प्रकारच्या कर्मांच्या ठिकाणीं संयम केला असतां अथवा अरिष्टांपासून आपल्याला मरण कोठें व कधीं येणार यांचें ज्ञान होतें.

**भाष्यम्–आयुर्विपाकं कर्म द्विविधं सोपक्रमं निरुपक्रमम् । तत्र यथार्द्रवस्त्रं वितानितं लघीयसा कालेन शुष्येत्, तथा सोपक्रमम् । यथा च तदेव सम्पिण्डितं चिरेण संशुष्येत्, एवन्निरुपक्रमम् । यथा वाग्निः शुष्के कक्षे मुक्तो वा तेन समन्ततो युक्तः क्षेपीयसा कालेन दहेत्तथा सोपक्रमम् । यथा वा स एवाग्निस्तृणराशौ क्रमशोऽवयवेषु न्यस्तश्चिरेण दहेत्तथा निरुपक्रमम् । तदेकभविकमायुष्करं कर्म द्विविधं सोपक्रमं निरुपक्रमं च । तत्संयमादपरान्तस्य प्रापणस्य ज्ञानमरिष्टेभ्यो वेति । त्रि-**

विधमरिष्टमाध्यात्मिकमाधिभौतिकमाधिदैविकं चेति । तत्राध्यात्मिकं घोषं स्वदेहे पिहितकर्णो न शृणोति ज्योतिर्वा नेत्रेऽवष्टब्धे न पश्यति । तथाधिभौतिकं यमपुरुषान्पश्यति, पितृनतीतानकस्मात्पश्यति। आधिदैविकं स्वर्गमकस्मात्सिद्धान्वा पश्यति। विपरीतं वा सर्वमिति । अनेन वा जानात्यपरान्तं मरणमुपस्थितमिति ॥ २२ ॥

**भाष्यार्थः**—ज्या कर्माचें फल आयुष्य आहे असें कर्म दोन प्रकारचें, एक सोपक्रम व दुसरें निरुपक्रम. त्यांपैकीं जसें ओलें वस्त्र पसरून ठेविलें असतां फार थोडक्या वेळांत त्यांतलें पाणी नाहींसें होऊन तें सुकतें; त्याप्रमाणें ( ज्या कर्मापासून फल फार लवकर प्राप्त होतें तें ) सोपक्रम कर्म; व जसें, त्याच ओल्या वस्त्राचा पिळाच ठेवून दिला तर तें त्यापेक्षां पुष्कळ अधिक काळानें वाळेल त्याप्रमाणें ( ज्याचें फल कांहीं काळांतरीं उत्पन्न होणारें असतें तें ) निरुपक्रम कर्म समजावें. अथवा जसा अग्नि वाळलेल्या गवतावर टाकला व त्याला भोंवतालून वारा लागला असतां तो अतिशय थोडक्या वेळांत सर्व गवत जाळून टाकील; त्याप्रमाणें सोपक्रम कर्म समजावें. आणि जसा तोच अग्नि गवताच्या ढिगावर ( गंजीवर ) एकेक अवयवावर क्रमाक्रमानें टाकला तर तो त्या सर्व गवताला फार वेळानें जाळील; त्याप्रमाणें निरुपक्रम कर्म जाणावें. तें, आयुष्य आहे फल ज्याचें असें एकभविक कर्म दोन प्रकारचें; १ सोपक्रम व २ निरुपक्रम. त्या ठिकाणीं चित्ताचा संयम केला असतां ह्मणजे संयमानें सोपक्रम इत्यादि विशेषांचा निश्चय झाला असतां अमुक दिवशीं आयुष्य सरून किंवा अरिष्टांपासून मरण येणार असें योग्यास ज्ञान प्राप्त होतें. ( त्यायोगानें जर विलंबानें मरण येणार आहे तर योगी कर्मफलाची उपभोगानें शीघ्र समाप्ति व्हावी ह्मणून एककालींच अनेक देह धारण करून तत्काल त्याची समाप्ति करून स्वेच्छेनें मरतो. ) अरिष्टें तीन प्रकारचीं; १ आध्यात्मिक, २ आधिभौतिक व ३ आधिदैविक. त्यांत कानांचीं भोंकें बंद केलीं असतां शरीरांत जो प्राणवायूचा आवाज होत असतो त्याप्रत प्राणी ऐकत नाहीं किंवा बोट वगैरे घालून डोळे फिरविले असतां अग्नीच्या कणांप्रमाणें ज्योति ( नक्षत्रें ) पाहत नाहीं; हें आध्यात्मिक अरिष्ट समजावें. तसेंच यमदूतांस पाहतो, व एकाएकीं मृत पित्रादिकांस पाहतो; हें आधिदैविक अरिष्ट होय. व एकाएकीं स्वर्ग वगैरे पदार्थांस अथवा सिद्धांस अवलोकन करितो; अथवा श्वासप्रश्वास इत्यादिक सर्वच विपरीत झालें असतां आधिदैविक अरिष्ट समजावें. अथवा या सांगितलेल्या अरिष्टांवरून मरण जवळ प्राप्त झालें असें संयमानें समजतें ॥ २२ ॥

आतां शुद्ध करणाऱ्या कर्मापासून होणाऱ्या सिद्धीचें विवरण करितात,—

## मैत्र्यादिषु बलानि ॥ २३ ॥

**सूत्रार्थः**—मैत्र्यादिकांत संयम केल्यानें त्या त्या संबंधाचें बल प्राप्त होतें.

**भाष्यम्**–मैत्री करुणा मुदितेति तिस्रो भावनाः । स्तत्र भूतेषु सुखितेषु मैत्रीं भावयित्वा मैत्रीबलं लभते । दुःखितेषु करुणां भावयित्वा करुणाम्बलं लभते । पुण्यशीलेषु मुदिताम्भावयित्वा मुदिताबलं लभते । भावनातः समाधिर्यः स संयमस्ततो बलान्यवन्ध्यवीर्य्याणि जायन्ते । पापशीलेषूपेक्षा नतु भावना । ततश्च तस्यां नास्ति समाधिरिति । अतो न बलमुपेक्षातस्तत्र संयमाभावादिति ॥ २३ ॥

**भाष्यार्थः**–मैत्री, करुणा, मुदिता ह्या तीन भावना (संयम) आहेत. त्यांत सुखी जे असतील त्यांच्या ठिकाणीं जी मैत्री तिजवर संयम केला असतां मैत्रीबल प्राप्त होतें; दुःखी जे असतील त्यांविषयीं जी करुणा तिचे ठिकाणीं संयम केला असतां करुणाबल प्राप्त होतें; व पुण्यशीलांविषयीं जी मुदिता ( आनंद ) तिजवर संयम केला असतां मुदिताबल प्राप्त होतें. भावनेपासून जो समाधि तो संयम होय. संयमानें मैत्री इत्यादिकांचा साक्षात्कार झाल्यावर मैत्री इत्यादिक बलें सफलप्रयत्न अशीं होतात. पापशीलांची फक्त उपेक्षा करावयाची ह्मणजे उपेक्षेविषयीं भावना करावयाची नाहीं; त्यामुळें तिच्या विषयीं समाधि ही नाहीं, ह्मणून उपेक्षाबल नाहीं; कारण, तिच्या ठिकाणीं संयम नाहीं ॥ २३ ॥

आतां संयमापासून होणारी दुसऱ्या प्रकारची बलसिद्धि सांगतात,–

## बलेषु हस्तिबलादीनि ॥ २४ ॥

**सूत्रार्थः**–हत्ती इत्यादिकांच्या ठिकाणीं चित्तसंयम केला असतां तीं तीं बलें प्राप्त होतात.

**भाष्यम्**–हस्तिबले संयमाद्धस्तिबलो भवति वैनतेयबले सयमाद्वैनतेयबलो भवति । वायुबले संयमाद्वायुबल इत्येवमादि ॥ २४ ॥

**भाष्यार्थः**–हत्तीच्या बलाच्या ठिकाणीं चित्त एकाग्र केल्यानें योग्यास हत्तीचें बल प्राप्त होतें; गरुडाच्या बलाच्या ठिकाणीं संयम केल्यानें गरुडाचें बल प्राप्त होतें; व वायूच्या वेगाच्या ठिकाणीं संयम केला असतां वायूसारखा वेग प्राप्त होतो. ( ह्मणजे ज्याच्या बलाच्या ठिकाणीं आपलें तादात्म्य करून त्या ठिकाणीं जो आपलें चित्त एकाग्र करितो त्याला त्याचें बल प्राप्त होतें. ) याचप्रमाणें आणिक इतर बलांविषयीं समजावें ॥ २४ ॥

आतां पुनः दुसरी सिद्धि सांगतात,–

## प्रवृत्त्यालोकन्यासात्सूक्ष्मव्यवहितविप्रकृष्टज्ञानम् ॥ २५ ॥

**सूत्रार्थः**–ज्योतिष्मतीप्रवृत्तीच्या प्रकाशाच्या योगानें सूक्ष्म, व्यवहित व फार दूर असणाऱ्या वस्तूमध्यें संयम केल्यानें सर्व वस्तूंचें ज्ञान होतें.

**भाष्यम्**–ज्योतिष्मतीप्रवृत्तिरुक्ता मनसस्तस्या य आलोकस्तं योगी सूक्ष्मे वा व्यवहिते वा विप्रकृष्टे वाऽर्थे विन्यस्य तमर्थमधिगच्छति ॥ २५ ॥

**भाष्यार्थः**–पूर्वीं ( स० १ सू० ३६ त ) बुद्धि व पुरुष या दोहोंतून कोणातरी एकाचा साक्षात्कार होणें अशा प्रकारची ज्योतिष्मती नांवाची मनाची प्रवृत्ति सांगितली; तिचा जो त्या वेळचा सत्वप्रकाश त्याप्रत जर योगी सूक्ष्म अथवा व्यवहित किंवा अत्यंत दूर अशा अर्थाच्या ठिकाणीं स्थापन करील तर त्याचा त्याला साक्षात्कार होईल ॥ २५ ॥

आतां दुसरी सिद्धि सांगतात,–

## भुवनज्ञानं सूर्ये संयमात् ॥ २६ ॥

**सूत्रार्थः**–सूर्यमंडलांत चित्त एकाग्र केलें असतां सर्व भुवनांचें ज्ञान होतें.

**भाष्यम्**–तत्प्रस्तावः सप्त लोकाः। तत्रावीचेः प्रभृति मेरुपृष्ठं यावदित्येवं भूर्लोकः। मेरुपृष्ठादारभ्याध्रुवाद् ग्रहनक्षत्रताराविचित्रोऽन्तरिक्षलोकः। तत्परः स्वर्लोकः पञ्चविधो माहेन्द्रस्तृतीयो लोकः। चतुर्थः प्राजापत्यो महर्लोकस्त्रिविधो ब्राह्मः। तद्यथा। जनोलोकस्तपोलोकः सत्यलोक इति। 'ब्राह्मस्त्रिभूमिको लोकः प्राजापत्यस्ततो महान्। माहेन्द्रश्च स्वरित्युक्तो दिवि तारा भुवि प्रजाः॥' इति संग्रहश्लोकः॥ तत्रावीचेरुपर्य्युपरि निविष्टाः षण्महानरकभूमयो घनसलिलानलानिलाकाशतमःप्रतिष्ठा महाकालाम्बरीषरौरवमहारौरवकालसूत्रान्धतामिस्राः। यत्र स्वकर्मोपार्जितदुःखवेदनाः प्राणिनः कष्टमायुर्दीर्घमाक्षिप्य जायन्ते। ततो महातलरसातलातलवितलतलातलसुतलपाताला-ख्यानि सप्त पातालानि। भूमिरियमष्टमी सप्तद्वीपा वसुमती, यस्याः सुमेरुर्मध्ये पर्वतराजः काञ्चनः। तस्य राजतवैदूर्य्यस्फटिकहेममणिमयानि शृङ्गाणि। तत्र वैदूर्य्यप्रभानुरागान्नीलोत्पलपत्रश्यामो नभसो दक्षिणभागः। श्वेतः पूर्वः। पश्चिमः स्वच्छः। कुरुण्डकाभ उत्तरः। दक्षिणपार्श्वे चास्य जम्बूर्यतोऽयं जम्बूद्वीपः। तस्य सूर्यप्रचारद्रात्रिंदिवं लग्नमिव विवर्तते। तस्य नीलश्वेतशृङ्गवत उदीचीनास्त्रयः पर्वता द्विसाहस्रायामास्तदन्तरेषु त्रीणि वर्षाणि नवयोजनसाहस्राणि रमणकं हिरण्मयमुत्तराः कुरव इति। निषधहेमकूटहिमशैला दक्षिणतो द्विसाहस्रायामास्तदन्तरेषु त्रीणि वर्षाणि नवयोजनसाहस्राणि हरिवर्षं किंपुरुषं भारतमिति। सुमेरोः प्राचीना भद्राश्वा माल्यवत्सीमानः प्रतीचीनाः केतुमाला गन्धमादनसीमानो मध्ये वर्षमिलावृतं तदेतद्योजनशतसहस्रं सुमेरोर्दिशि दिशि तदर्द्धेन व्यूढं स खल्वयं शतसाहस्रायामो जम्बूद्वीपस्ततो द्विगुणेन लवणोदधिना वलयाकृतिना वेष्टितः। ततश्च द्विगुणाः शाककुशक्रौञ्चशाल्मलगोमेधपुष्करद्वीपाः सप्त समुद्राश्च सर्षपराशिकल्पाः सविचित्रशैलावतंसा इक्षुरससुरासर्पिर्दधिमण्डक्षीरस्वादूदकाः सप्तसमुद्रवेष्टिता वलयाकृतयो लोकालोकपर्वतपरिचाराः पञ्चाशद्योजनकोटिपरिसंख्यातास्तदेतत्सर्वं सुप्रतिष्ठितसंस्थानमण्डमध्ये व्यूढम्। अण्डं च प्रधानस्याणुरिव

पयो यथाकाशे खद्योत इति । तत्र पाताले जलधौ पर्वतेष्वेतेषु देवनिकाया असुरगन्धर्वकिन्नरकिंपुरुषयक्षराक्षसभूतप्रेतपिशाचापस्मारकाप्सरोब्रह्मराक्षसकूष्माण्डविनायकाः प्रतिवसन्ति । सर्वेषु द्वीपेषु पुण्यात्मानो देवमनुष्याः । सुमेरुस्त्रिदशानामुद्यानभूमिस्तत्र मिश्रवनं नन्दनं चैत्ररथं सुमानसमित्युद्यानानि, सुधर्मा देवसभा, सुदर्शनं पुरं, वैजयन्तः प्रासादः । ग्रहनक्षत्रतारकास्तु ध्रुवे निबद्धा वायुविक्षेपनियमेनोपलक्षितप्रचाराः सुमेरोरुपर्युपरि सन्निविष्टा विपरिवर्तन्ते । माहेन्द्रनिवासिनः षड् देवनिकायास्त्रिदशा अग्निष्वात्ता याम्यास्तुषिता अपरिनिर्मितवशवर्तिनः परिनिर्मितवशवर्तिनश्चेति सर्वे सङ्कल्पसिद्धा अणिमाद्यैश्वर्योपपन्नाः कल्पायुषो वृन्दारकाः कामभोगिन औपपादिकदेहा उत्तमानुकूलाभिरप्सरोभिः कृतपरिचाराः । महति लोके प्राजापत्ये पञ्चविधो देवनिकायः । कुमुदा ऋभवः प्रतर्दना अञ्जनाभाः प्रचिताभा इत्येते महाभूतवशिनो ध्यानाहाराः कल्पसहस्रायुषः । प्रथमे ब्रह्मणो जनलोके चतुर्विधो देवनिकायो ब्रह्मपुरोहिता ब्रह्मकायिका ब्रह्ममहाकायिका अमरा इति । ते भूतेन्द्रियवशिनो द्विगुणद्विगुणोत्तरायुषः । द्वितीये तपसि लोके त्रिविधो देवनिकायः । अभास्वरा महाभास्वराः सत्यमहाभास्वरा इति । ते भूतेन्द्रियप्रकृतिवशिनो द्विगुणद्विगुणोत्तरायुषः सर्वे ध्यानाहारा ऊर्ध्वरेतस ऊर्ध्वमप्रतिहतज्ञाना अधरभूमिष्वनावृतज्ञानविषयाः । तृतीये ब्रह्मणः सत्यलोके चत्वारो देवनिकाया अच्युताः शुद्धनिवासाः सत्याभाः संज्ञासंज्ञिनश्चेति । अकृतभवनन्यासाः स्वप्रतिष्ठा उपर्युपरि स्थिताः प्रधानवशिनो यावत्सर्गायुषः । तत्राच्युताः सवितर्कध्यानसुखाः । शुद्धनिवासाः सविचारध्यानसुखाः । सत्याभा आनन्दमात्रध्यानसुखाः । संज्ञासंज्ञिनश्चास्मितामात्रध्यानसुखास्तेऽपि त्रैलोक्यमध्ये प्रतिष्ठन्ति । त एते सप्त लोकाः सर्वे एव ब्रह्मलोकाः । विदेहप्रकृतिलयास्तु मोक्षपदे वर्तन्ते न लोकमध्ये न्यस्ता इति । एतद्योगिना साक्षात्कर्तव्यं सूर्यद्वारे संयमं कृत्वा ततोऽन्यत्रापि । एवन्तावदभ्यस्येद्यावदिदं सर्वं दृष्टमिति ॥ २६ ॥

**भाष्यार्थः**–भुवनाचा विस्तार सांगतों,– ( एकंदर चवदा भुवनें ( लोक ), त्यांपैकीं सात ऊर्ध्व लोक व सात अधोलोक; त्यांत ऊर्ध्व) सात लोक आहेत. त्यांत अवीचि नांवाच्या नरकास आरंभ करून तें थेट मेरुपर्वताच्या पृष्ठभागापर्यंत सर्व भूर्लोक; मेरुपृष्ठास आरंभ करून तें थेट ध्रुवमंडळापर्यंत ग्रह, नक्षत्र, तारा यांनीं चित्रित झालेला असा अंतरिक्षलोक (भुवर्लोक); व त्यावर ( क्रमानेंच ) पांच प्रकारचा स्वर्लोक आहे. त्यांत पहिल्या दोन सांगितलेल्या ( भूर्लोक व अंतरिक्षलोक या ) लोकांस धरून माहेंद्रलोक हा तिसरा; प्राजापत्य लोक चवथा, त्यालाच महर्लोक ह्मणतात; व पांचवा जनोलोक तपोलोक व सत्यलोक याप्रमाणें तीन

प्रकारचा ब्रह्मलोक आहे. याप्रमाणें सात लोक झाले. या सात लोकांबद्दलचा एक संग्रह-श्लोक आहे त्याचा अर्थ असा,– जन इत्यादि तीन आहेत भूमि ज्याला असा ब्रह्मलोक; त्याच्या खालीं ' महर् ' या नांवाचा प्रजापतिलोक; त्याच्या खालीं ' स्वर् ' या नांवाचा इंद्र-लोक; त्याच्या खालीं ' द्यौः ' व 'भुवर्' या संज्ञांनीं प्रसिद्ध असा तारालोक; व त्याच्या खालीं ' भू ' व ' भुर् ' या नांवांचा मनुष्यांचा लोक आहे.' त्यांत भूर्लोकामध्यें सर्व नरकांच्या खालीं असणारा जो अवीचि नांवाचा नरक त्यावर एकावर एक असणाऱ्या अशा सहा मीठाल्या नरकभूमी आहेत; कीं ज्या घन ( शिलाशकल इत्यादि पार्थिव पदार्थ ), उदक, अग्नि, वायु, आकाश व तम ( अंधकार ) यांच्या आधारभूत असून महाकाल, अंबरीष, रौरव, महारौरव, कालसूत्र व अंधतामिस्र या संज्ञांनीं प्रसिद्ध आहेत. ( येथें महानरक या शब्दानें दुसरेही कुंभीपाक इत्यादि उपनरक अनंत आहेत असें सुचविलें. ) ज्या ठिकाणीं आपापल्या कर्मांच्या योगानें दुःख भोगणारे प्राणी कष्टकारक असें दीर्घायुष्य धारण करून उत्पन्न होतात. अवीचिनरकाच्या खालीं खालीं क्रमानें महातल, रसातल, अतल, वितल, तलातल, सुतल व पाताल या नांवांनीं प्रसिद्ध अशीं सात पातालें व आठवी ही सप्तद्वीपा ( सात आहेत जंबू इत्यादि द्वीपें जीस अशी ) वसुमती ( उदक, धन व रत्नें धारण करणारी अशी ) भूमि होय. जिच्या मध्यभागीं सुवर्णमय असा सुमेरुनामक सर्व पर्वतांचा राजा आहे. त्याच्या पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर ह्या चार बाजूंस राजत ( रौप्यमय ), वैदूर्यमय ( नीलमणिमय ), स्फटिकमय व हेममणिमय अशीं चार शिखरें आहेत. त्यांत दक्षिणेकडच्या वैदूर्यमय शिखराची प्रभा आकाशांत पसरल्यामुळें आकाशाचा दक्षिण-भाग नीलकमलाच्या पत्रा ( पांकळी ) प्रमाणें श्यामवर्ण दिसत आहे. पूर्वेकडचें शिखर रुप्याप्रमाणें स्वच्छ ( प्रतिबिंब ग्रहण करण्यास समर्थ ); व उत्तरेकडचें कुरंडकाच्या ( सुवर्णवर्ण एक प्रकारचें पुष्प अथवा पिंवळा कोरंटा त्याच्या ) रंगाचें शिखर आहे. ह्या सुमेरूच्या वर दक्षिणबाजूस एक जंबू नांवाचा वृक्ष आहे कीं ज्याच्या योगानें ( लव-णोदधीनें वेष्टित अशा ) ह्या द्वीपाला जंबूद्वीप असें नांव पडलें. त्या सुमेरूच्या भोंवतालीं सूर्याची नेहमीं प्रदक्षिणा होत असल्यामुळें रात्री व दिवस सुमेरूला नेहमीं जणूं चिकटून ( धरून ) फिरत आहेत. ( म्हणजे मेरूच्या ज्या भागाला सूर्य सोडतो त्या ठिकाणीं रात्री व ज्या भागास सूर्य येतो तेथें दिवस; याप्रमाणें रात्री व दिवस भोंवतालच्या भागा-ला नेहमीं होऊन राहिले आहेत. ) तसेंच त्या मेरूच्या उत्तरदिशेस नील, श्वेत व शृंग-वान् ह्या नांवांचे तीन पर्वत आहेत; ते प्रत्येक आठ हजार कोश लांबीचे आहेत. त्यांमध्यें जें अंतर ( अवकाश ) आहे त्यांत रमणक, हिरण्मय व उत्तरकुरु ह्या नांवांचीं तीन वर्षे ( देश ) आहेत; त्यांचा प्रत्येकाचा छत्तीसहजार कोश विस्तार आहे. मेरूच्या दक्षि-णदिशेस निषध, हेमकूट व हिमशैल या नांवांचे तीन पर्वत प्रत्येक आठ हजार कोश

लांबीचे असे आहेत. तसेंच त्यांमध्यें जें अंतर आहे त्या प्रत्येकांत छत्तीसहजार कोश विस्ताराचीं व हरिवर्ष, किंपुरुष व भारत ह्या नांवांचीं तीन वर्षें आहेत. मेरूच्या पूर्वेस माल्यवान् नांवाचा पर्वत आहे; ह्याच्याच कडेनें ( समुद्रापर्यंत ) भद्राश्व नांवाचे देश आहेत; आणि मेरूच्या पश्चिमेस गंधमादन पर्वत आहे; त्याच्या कडेनें समुद्रापर्यंत केतुमाल नांवाचे देश आहेत. मध्यें (ह्मणजे छत्राकार मेरूच्या खालीं सभोंवतीं ) इलावृत नांवाचें वर्ष आहे. तें हें जंबूद्वीप एकंदर चार लाख कोश विस्ताराचें असून मेरूच्या प्रत्येक दिशेस त्यांपैकीं भाग पन्नास हजार योजन विस्ताराचा याप्रमाणें आहे; ह्मणून हा जंबूद्वीप चार लाख कोश विस्ताराचा व त्याच्या भोंवतालीं त्याच प्रमाणाच्या दुप्पट क्षारसमुद्राचा कड्याप्रमाणें वेढा आहे. जंबूद्वीपाच्या दुप्पटप्रमाणानें शाकद्वीप, शाकद्वीपाच्या दुप्पट कुशद्वीप; याप्रमाणें दुप्पटप्रमाणें वाढतीं अशीं क्रौंच, शाल्मल, गोमेध व पुष्कर ह्या नांवांचीं चार द्वीपें आहेत. पहिलीं तीन व हीं चार मिळून सात द्वीपें झालीं. याचप्रमाणें प्रत्येक द्वीपाच्या भोंवतीं त्या त्या द्वीपाच्या दुप्पट प्रमाणानें वाढते असे सात समुद्र आहेत. ते सर्षपराशिकल्प ह्मणजे मोहऱ्यांचा ढीग जसा फार उंच नसतो व अगदींच सपाट नसतो त्याप्रमाणें असून त्यांच्या दोन्ही तीरांस चित्रविचित्र आकारांचे व रंगांचे, भूषणांप्रमाणें शोभणारे असे अनेक पर्वत आहेत. त्या सात समुद्रांचें उदक उंसांचा रस, सुरा ( मद्य ), तूप, दधिमंड ( दह्याची निवळी ) व दूध याप्रमाणें रुचिकारक आहे. ह्या समुद्रांसुद्धां सात द्वीपांस, सात समुद्रांच्या बाहेर असणाऱ्या अशा लोकालोक नांवाच्या पर्वतांचा पन्नासकोटी योजन विस्ताराचा वेढा आहे. ( अर्थात् सप्तसमुद्रांसुद्धां सप्तद्वीपांचा घेर पन्नासकोटी योजन प्रमाणाचा आहे. ) याप्रमाणें हा सर्व भूगोल ब्रह्मांडाच्या पोंकळीमध्यें सुरक्षितपणानें राहिलेला आहे. ( अंडाचा घेर शंभर कोटी योजन विस्ताराचा आहे. ) ( एवढें मोठें अंड खरें ) परंतु हें सुद्धां ( सप्तावरणांसहित ) जसा आकाशांत काजवा त्याप्रमाणें प्रकृतीच्या एका सूक्ष्म अंशासारखें आहे. त्यांत पाताल, समुद्र व पर्वत या ठिकाणीं देवसमूह व असुर ( दैत्य ), गंधर्व, किन्नर, किंपुरुष, यक्ष, राक्षस, भूत, प्रेत, पिशाच, अपस्मारक, अप्सरा, ब्रह्मराक्षस, कूष्मांड व विनायक हे सर्व राहतात; आणि द्वीपांमध्यें पुण्यशील असे देव व मनुष्य राहतात. मेरु हा देवांच्या विहाराची जागा ह्मणजे यावर सर्व देवांचे बगीचे आहेत; त्यांत मिश्रवन, नंदन, चैत्ररथ व सुमानस हीं चार उद्यानभूमींचीं नांवें आहेत. तसेंच सुमेरूवर सुधर्मा नांवाची देवसभा, सुदर्शन नांवाचें पुर (राजधानी, ) वैजयंत नांवाचा प्रासाद ( राजवाडा ) हीं आहेत. ( याप्रमाणें ही सर्व भूर्लोकाची रचना सांगितली. आतां भुवर्लोकाची रचना सांगतों,— त्यांत ) ग्रह, नक्षत्रें (अश्विनी इत्यादि सत्तावीस ) व तारका ( इतर नक्षत्रें ) हीं सर्व सर्वांवर असणारा जो ध्रुव त्याच्या ठिकाणीं वायुरूप रज्जूनें बद्ध होऊन नियमित गतीनें मेरूच्या वर फिरून राहिलीं आहेत. स्वर्लोका-

पैकीं पहिल्या माहेंद्रलोकांत १ त्रिदश, २ अग्निष्वात्त, ३ याम्य, ४ तुषित, ५ अपरिनिर्मितवशवर्ती व परिनिर्मितवशवर्ती असे सहा प्रकारचे देवसमूह ह्मणजे सहा देवांच्या जाती आहेत. ते सर्व देव असून त्या सर्वांस संकल्पसिद्धि, अणिमा इत्यादि ऐश्वर्य, कल्पप्रमाणाचें आयुष्य, इच्छित भोग, मातापितरांच्या संयोगावांचूनच अकस्मात् दिव्यशरीरप्राप्ति, सुंदर व अनुकूल अशा अप्सरांबरोबर यथेच्छ भोगप्राप्ति वगैरे आहे. जेथें प्रजापति राहतात अशा महर्लोकामध्यें १ कुमुद, २ ऋभव, ३ प्रतर्दन, ४ अंजनाभ व ५ प्रचिताभ असे पांच प्रकारचे देवसमूह (देवांच्या जाती ) आहेत. हे सर्व महाभूतांना स्वाधीन ठेवणारे ह्मणजे महाभूतांचा परिणाम करण्याविषयीं स्वतंत्र, आहारावांचून नुसते ध्यानानेंच नेहमीं तृप्त (पुष्ट) असणारे व ज्यांचें हजार कल्पप्रमाणाचें आयुष्य असे आहेत. ब्रह्मदेवाच्या पहिल्या जनोलोकांत १ ब्रह्मपुरोहित, २ ब्रह्मकायिक ३ ब्रह्ममहाकायिक व अमर असे चार प्रकारचे देवसमूह आहेत. ते सर्व भूतें व इंद्रियें यांचा कोणत्याही प्रकारचा परिणाम करण्याविषयीं स्वतंत्र आहेत. व ब्रह्मपुरोहितांचें आयुष्य हजार कल्प, ब्रह्मकायिकांचें दोन हजार कल्प, याप्रमाणें पुढें सर्वांचें दुप्पट दुप्पट प्रमाणानें आयुष्य आहे. दुसऱ्या तपोलोकांत १ अभास्वर, २ महाभास्वर व ३ सत्यमहाभास्वर असे तीन प्रकारचे देवसमूह आहेत. ते सर्व भूतें, इंद्रियें व प्रकृति ( तन्मात्र ) यांचा कोणत्याही प्रकारचा परिणाम करण्याविषयीं स्वतंत्र व पूर्वी सांगितलेल्यापेक्षां उत्तरोत्तर दुप्पट आयुष्याचे आहेत. सर्वच केवल ध्यानानें तृप्त ( पुष्ट ) होणारे, ऊर्ध्वरेते ( प्राणायामाच्या योगानें ज्यांचे वीर्य सूक्ष्म होऊन जात आहे असे ) व ज्यांना सत्यलोकापासून तें अवीचिनरकलोकापर्यंतचें संपूर्ण ज्ञान आहे; कोठेंही ज्यांच्या ज्ञानाची गति कुंठित होत नाहीं. ब्रह्मदेवाच्या तिसऱ्या सत्यलोकांत १ अच्युत, २ शुद्धनिवास, ३ सत्याभ व ४ संज्ञासंज्ञी असे चार प्रकारचे देवसमूह आहेत. ते सर्व राहण्याकरितां गृह वगैरे कांहींएक न करितां आत्म्याच्याच ठिकाणीं रममाण होणारे, प्रधानाला ( प्रकृतीला ) स्वाधीन ठेवणारे व सर्व सर्ग होईपर्यंत वांचणारे असे असून अच्युतावर शुद्धनिवास, त्यावर सत्याभ व त्यावर संज्ञासंज्ञी याप्रमाणें राहिले आहेत. त्यांत अच्युत नांवाचे देव सवितर्कयोगानेंच, शुद्धनिवास सविचारयोगानेंच, सत्याभ आनंदमात्रयोगानेंच व संज्ञासंज्ञी नांवाचे देव केवळ अस्मितायोगानेंच सुखी ( तृप्त ) असतात. ( असे जरी ते आहेत तथापि ) ते सुद्धां त्रैलोक्यांतच राहतात; ब्रह्मांडाबाहेर राहत नाहींत. हे सांगितलेले सात लोक सर्वच ( ब्रह्मा जो हिरण्यगर्भ त्याच्या लिंगदेहानें व्याप्त झाले आहेत ह्मणून ) ब्रह्मलोक ( अशा व्यवहारानेंच लोकांत प्रसिद्ध ) आहेत. आतां जे विदेह व प्रकृतिलय राहिले ते प्रायः मोक्षपदवीस जाऊन पोहोंचले आहेत ह्मणून ते या लोकविस्तारकथनांत सांगितले नाहींत. हें सर्व सांगितलेलें भुवन योग्यानें सूर्यद्वाराच्या ( ह्मणजे सुषुम्नानाडीच्या ) ठिकाणीं चित्ताचा संयम करून प्रत्यक्ष करून घ्यावें; नंतर ( योगशास्त्रांत सांगितलेल्या ) दुसऱ्या आणिक ठिकाणीं

सुद्धां संयम करून भुवनांचा साक्षात्कार करून घ्यावा. तो साक्षात्कार एकदांच संयम करून होणार नाहीं; तर साक्षात्कार होईपर्यंत संयमाचा एकसारखा अभ्यास करीत गेला पाहिजे ॥ २६ ॥

आतां भौतिक पदार्थांच्या दुसऱ्या प्रकाशाच्या योगानें होणारी दुसरी सिद्धि सांगतात,–

## चन्द्रे ताराव्यूहज्ञानम् ॥ २७ ॥

**सूत्रार्थः**–चंद्राचे ठिकाणीं संयम केला असतां दिवसां सर्व नक्षत्रांचें ज्ञान होतें.

**भाष्यम्–चन्द्रे संयमं कृत्वा ताराव्यूहं विजानीयात्** ॥ २७ ॥

**भाष्यार्थः**–चंद्राच्या ठिकाणीं चित्त एकाग्र करण्याचा अभ्यास करून तारांच्या स्वरूपांचें ज्ञान होईल ॥ २७ ॥

आतां दुसरी सिद्धि सांगतात,–

## ध्रुवे तद्गतिज्ञानम् ॥ २८ ॥

**सूत्रार्थः**–ध्रुव नक्षत्राच्या ठिकाणीं संयम केला असतां प्रत्येक नक्षत्राची व ग्रहाची गति किती वेळांत किती आहे हें समजतें.

**भाष्यम्–ततो ध्रुवे संयमं कृत्वा ताराणां गतिं जानीयात् । ऊर्ध्वविमानेषु कृतसंयमस्तानि विजानीयात्** ॥ २८ ॥

**भाष्यार्थः**–तारांच्या स्वरूपांचें ज्ञान झाल्यानंतर ध्रुवाच्या ठिकाणीं चित्त एकाग्र करण्याचा अभ्यास करून प्रत्येक ताऱ्याची गति इतक्या वेळांत इतकी आहे ह्मणजे हें नक्षत्र व हा ग्रह अमुक काळांत अमुक राशीवर व अमुक नक्षत्रावर जातो अशा प्रकारचें ज्ञान होईल. अथवा आदित्य इत्यादिकांच्या रथाच्या ठिकाणीं साक्षात्कारापर्यंत अभ्यास केला असतां आदित्य इत्यादिकांच्या विमानांचें ( रथांचें ) ज्ञान होईल ॥ २८ ॥

बाहेरील सिद्धी सांगून आतां आंतील सिद्धी सांगतात,–

## नाभिचक्रे कायव्यूहज्ञानम् ॥ २९ ॥

**सूत्रार्थः**–नाभिचक्रांत संयम केला असतां योग्याला शरीराच्या रचनेचें ज्ञान होतें.

**भाष्यम्–नाभिचक्रे संयमं कृत्वा कायव्यूहं विजानीयात् । वातपित्तश्लेष्माणस्त्रयो दोषाः संति, धातवः सप्त त्वग्लोहितमांसस्नाय्वस्थिमज्जाशुक्राणि पूर्वं पूर्वमेषां बाह्यमित्येष विन्यासः** ॥ २९ ॥

**भाष्यार्थः**–( सोळा पांकळ्यांचें एक चक्र जें शरीराच्या मध्यभागीं सांगितलें आहे त्याला नाभिचक्र ह्मणतात; त्या ) नाभिचक्राचे ठिकाणीं साक्षात्कारापर्यंत चित्ताचा संयम करून शरीरांत असणाऱ्या पदार्थांचें ज्ञान होईल. ( शरीरांत ) वात, पित्त व कफ असे

तीन दोष आहेत; व त्वचा, रक्त, मांस, स्नायु ( शिरा ), अस्थि ( हाडें ), मज्जा व शुक्र असे सात धातु आहेत. त्यांपैकीं पहिला पहिला धातु बाहेरून आहे. याप्रमाणें शरीरांत पदार्थांची व्यवस्था आहे; ( त्यांचें संयमानें साक्षात् ज्ञान होऊं शकेल ) ॥ २९ ॥

आतां दुसरी सिद्धि सांगतात,–

## कण्ठकूपे क्षुत्पिपासानिवृत्तिः ॥ ३० ॥

**सूत्रार्थः**–कंठकूपाचे ठिकाणीं संयम केल्यानें योग्याला भूक व तहान लागत नाहीं.

**भाष्यम्–जिह्वाया अधस्तात् तन्तुस्तन्तोरधस्तात्कण्ठस्ततोऽधस्तात्कूपस्तत्र संयमात् क्षुत्पिपासे न बाधेते ॥ ३० ॥**

**भाष्यार्थः**–जिभेच्या खालीं मध्यभागीं जी शीर आहे, तिच्या खालीं गळ्यांत एक कूप ह्मणजे खळगा आहे; ( जेथें प्राण इत्यादि वायूचा स्पर्श झाल्यामुळें भूक व तहान हीं लागत असतात, ) त्याला कंठकूप असें ह्मणतात. तेथें चित्ताचा संयम केला असतां भूक व तहान यांपासून पीडा होत नाहीं ॥ ३० ॥

आतां पुनः दुसरी सिद्धि सांगतात,–

## कूर्मनाड्यां स्थैर्यम् ॥ ३१ ॥

**सूत्रार्थः**–कूर्मनाडीमध्यें चित्तसंयम केला असतां योग्याचें चित्त व शरीर स्थिर होतें.

**भाष्यम्–कूपादध उरसि कूर्माकारा नाडी तस्यां कृतसंयमः स्थिरपदं लभते । यथा सर्पो गोधा वेति ॥ ३१ ॥**

**भाष्यार्थः**–पूर्वी जो कंठकूप ह्मणून सांगितला त्याच्या खालच्या बाजूस हृदयाच्या ठिकाणीं एक कांसवाच्या आकाराची नाडी आहे ( तिला कूर्मनाडी ह्मणतात. ) तेथें संयम केल्यानें ह्मणजे संयमानें चित्त तिच्यामध्यें प्रवेश करील तर त्याला ( चित्ताला ) व शरीराला, जसा सर्प किंवा घोरपड हे एकदा वेढा घालून किंवा गच्च धरून बसले असतां जागचे हालत नाहींत त्याप्रमाणें स्थिरता प्राप्त होते ॥ ३१ ॥

आतां आणिक दुसरी सिद्धि सांगतात,–

## मूर्द्धज्योतिषि सिद्धदर्शनम् ॥ ३२ ॥

**सूत्रार्थः**–ब्रह्मरंध्राच्या ज्योतीमध्यें संयम केला असतां योग्याला सिद्धपुरुषांचें दर्शन होतें.

**भाष्यम्–शिरःकपाले अन्तश्छिद्रं प्रभास्वरं ज्योतिस्तत्र संयमात्सिद्धानां द्यावापृथिव्योरन्तरालचारिणां दर्शनम् ॥ ३२ ॥**

**भाष्यार्थः**–मस्तकांत ( ब्रह्मरंध्र नांवाचें ) एक छिद्र ( भोंक ) आहे; तें ( सुषुम्नाना-

डीच्या योगानें व हृदयांतील चित्तरूप मण्याच्या प्रकाशानें ) फारच तेजस्वी आहे; त्याच्या ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां योग्याला अंतरिक्ष व पृथ्वी . यांमध्यें संचार करणाऱ्या सिद्ध पुरुषांचें दर्शन होतें ॥ ३२ ॥

पुनः आणिक दुसरी सिद्धि सांगतात,–

## प्रातिभाद्वा सर्वम् ॥ ३३ ॥

**सूत्रार्थः**–प्रतिभेच्या ठिकाणीं चित्तसंयम केला असतां जें त्यापासून ज्ञान उत्पन्न होतें, त्यायोगानें योगी सर्व जाणतो.

**भाष्यम्–प्रातिभं नाम तारकं तद्विवेकजस्य ज्ञानस्य पूर्वरूपं यथोदये प्रभा भास्करस्य। तेन वा सर्वमेव जानाति योगी प्रातिभस्य ज्ञानस्योत्पत्ताविति ॥ ३३ ॥**

**भाष्यार्थः**–प्रतिभा ह्मणजे तर्क, त्यानें जें केवल होणारें त्यास प्रातिभ ज्ञान ह्मणतात; तें संसारांतून तरून जाण्यास साधन आहे. व जशी सूर्योदय होण्यापूर्वी प्रथम सूर्याची प्रभा प्रकट होते, आणि त्यायोगानें जसा आतां सूर्योदय होणार असा पूर्ण निश्चय होतो; तसें विवेकख्याति ज्ञान आतां पुढें निश्चयानें होणार अशाचें सूचक तें प्रातिभ ज्ञान आहे. त्या प्रातिभ ज्ञानाची उत्पत्ति झाली असतां मग योगी सर्व जाणतो ॥ ३३ ॥

आतां दुसरी सिद्धि सांगतात,–

## हृदये चित्तसंवित् ॥ ३४ ॥

**सूत्रार्थः**–हृदयकमलाचे ठिकाणीं संयम केला असतां आपल्या व दुसऱ्याच्या चित्ताचें वासनासहित ज्ञान होतें.

**भाष्यम्–यदिदमस्मिन् ब्रह्मपुरे दहरं पुण्डरीकं वेश्म तत्र विज्ञानं तस्मिन् संयमाच्चित्तसंवित् ॥ ३४ ॥**

**भाष्यार्थः**–जें हें ह्या परमात्म्याच्या व जीवाच्या शरीरांत खोलगटसें व श्वेतकमलाच्या आकाराचें जीवाचें राहण्याचें स्थान आहे; तेथें अंतःकरण ब्रह्माच्या सिंहासनाप्रमाणें राहत आहे. ह्मणून त्या हृदयसंज्ञक गृहाच्या ठिकाणीं संयम केल्यानें चित्ताचा साक्षात्कार होतो ॥ ३४ ॥

आतां आणिक दुसरी सिद्धि सांगतात,–

## सत्वपुरुषयोरत्यन्तासङ्कीर्णयोः प्रत्ययाविशेषो भोगः परार्थत्वात् स्वार्थसंयमात्पुरुषज्ञानम् ॥ ३५ ॥

**सूत्रार्थः**–बुद्धि व आत्मा हे अगदीं निराळे आहेत; बुद्धीच्या सुखदुःखादि परिणामाचा जो प्रतिबिंबद्वारानें पुरुषाच्या ठिकाणीं आरोप त्याला भोग ह्मणतात. तो भोग्यरू-

पानें पुरुषाकरितां ह्मणून परार्थ आहे. व त्याहून भिन्न जो दुसरा चित्प्रतिबिंबरूप भोग त्याला स्वार्थ ह्मणतात; त्या स्वार्थभोगाचे ठिकाणीं संयम केला असतां योग्याला आत्मज्ञान प्राप्त होतें.

**भाष्यम्–बुद्धिसत्वं प्रख्याशीलं समानसत्वोपनिबन्धे रजस्तमसी वशीकृत्य सत्वपुरुषान्यताप्रत्ययेन परिणतम् । तस्माच्च सत्वात्परिणामिनोऽत्यन्तविधर्मा शुद्धोऽन्यश्चितिमात्ररूपः पुरुषस्तयोरत्यन्तासंकीर्णयोः प्रत्ययाविशेषो भोगः पुरुषस्य, दर्शितविषयत्वात् । स भोगप्रत्ययः सत्वस्य परार्थत्वाद्दृश्यः । यस्तु तस्माद्विशिष्टश्चितिमात्ररूपोऽन्यः पौरुषेयः प्रत्ययस्तत्र संयमात्पुरुषविषया प्रज्ञा जायते। न च पुरुषप्रत्ययेन बुद्धिसत्वात्मना पुरुषो दृश्यते पुरुष एव प्रत्ययं स्वात्मालम्बनं पश्यति । तथा ह्युक्तम् । ‘ विज्ञातारमरे केन विजानीयात् ’ इति ॥ ३५ ॥**

**भाष्यार्थः**– ( सत्व ह्मणजे बुद्धि, ) हें बुद्धिरूप सत्व प्रकाशस्वभाव असल्यामुळें तें समानसत्वाधीनवृत्तिक ( ह्मणजे जेथपर्यंत सत्वगुणाचा हीनपणा व रज व तमोगुणाचें आधिक्य असतें तेथपर्यंत ते दोन्ने सत्वगुणाच्या स्वाधीन न राहून त्याचा पराभव करीत असतात; परंतु एकदा कां सत्वगुणाची त्या दोन गुणांशीं बरोबरी झाली ह्मणजे मग ते सत्वगुणाच्याच स्वाधीन राहतात., असे ) जे रजोगुण व तमोगुण त्यांना स्वाधीन करून ह्मणजे त्यांचा पराभव करून सत्व व पुरुष ( आत्मा ) हे अगदीं परस्परांहून भिन्न आहेत अशा ज्ञानाच्या साक्षात्काररूपानें परिणाम पावतें. अशा परिणाम पावणाऱ्या सत्वगुणाहून सुद्धां पुरुष अगदींच विलक्षणधर्माचा असा अन्य आहे; कारण, तो शुद्ध, चैतन्यस्वरूपमात्र ( व अपरिणामी असा ) आहे. याप्रमाणें परस्परांहून अगदींच भिन्न असणारे जे सत्व व पुरुष यांच्यामध्यें ( अविवेकानें ) पृथक्पणाचा अनुभव न येणें ह्मणजे प्रकाशशील अशा बुद्धिरूप आरशामध्यें पुरुषाचें प्रतिबिंब पडल्यामुळें बुद्धि विषयांचें ग्रहण करूं लागली कीं पुरुषप्रतिबिंबही विषयाकार भासूं लागतें; व अविवेकानें ‘ पुरुषच विषयांचें सेवन करितो ’ असा पुरुषाच्या ठिकाणीं आरोप होतो; अशाच प्रकारचा पुरुषाला भोग आहे. ( वस्तुतः पाण्यास मालिन्य अथवा कंप वगैरे उत्पन्न झाल्यामुळें त्यांत पडलेलें सूर्यप्रतिबिंब जसें मलिन झालेलें व हालतेंसें दिसतें; परंतु बिंबभूत सूर्यास त्यांचा कांहींच संबंध नसतो; त्याप्रमाणें पुरुषाचा विषयांशीं कांहींच संबंध नाहीं. ) तो उभयात्मक भोगरूप प्रत्यय बुद्धिसत्वाचा अंश असून परार्थ ह्मणजे आत्म्याकरितां असल्यामुळें तो दृश्य व भोग्य ( उपभोगाचा पदार्थ ) आहे ( आणि आत्मा हा त्या भोग्यपदार्थाचा भोक्ता आहे ). त्या परार्थभोगाहून भिन्न असा केवल,पुरुषस्वरूपाच्या आश्रयानें असणारा जो स्वार्थ भोगप्रत्यय ह्मणजे अहंकाररहित बुद्धीमध्यें पडलेलें जें चैतन्याचें प्रतिबिंब त्या ठिकाणीं चित्ताचा संयम केला असतां ( योग्याला ) आत्म्याविषयींचें ज्ञान उत्पन्न होतें. आतां पुरुषज्ञान होतें ह्मणून

जें सांगितलें तें बुद्धिसत्वगत जो पुरुषाकारप्रत्ययरूप धर्म त्याप्रत होत नाहीं; ) कारण, तो जड आहे; ) तर ( स्वतः पुरुषासच होतें ह्मणजे ) स्वतः पुरुषच आपल्या ठिकाणीं प्रतिबिंबित झालेला जो ( स्वस्वरूपाकार ) प्रत्यय त्याप्रत पाहतो. ( जसें आपल्या ठिकाणीं प्रतिबिंबित जी घटाकार बुद्धि, तिचें दर्शन झालें कीं घटाचें दर्शन झालें असें होतें; त्याप्रमाणेंच आपल्या ठिकाणीं प्रतिबिंबित जी स्वाकार बुद्धि, तिचें दर्शन हेंच पुरुषदर्शन होय. ) ( पुरुषालाच ज्ञातृत्व आहे ) याविषयीं ( ईश्वरानें ) असें ह्मटलें आहे कीं, ' ( जर आत्मा नित्यज्ञानरूप नाहीं तर ) कोणत्या दुसऱ्या ज्ञानानें लोकांस आत्म्याचें ज्ञान होणार ? ' अथवा ' ( मोक्षकालीं बुद्धि इत्यादि सर्वांचाच लय झाल्यामुळें पुरुष आपल्याप्रत कोणत्या साधनानें जाणूं शकेल ? ' ॥ ३५ ॥

आतां पुरुषसाक्षात्कार होण्याच्या पूर्वी ह्या संयमाचें फल सांगतात,–

## ततः प्रातिभश्रावणवेदनादर्शास्वादवार्त्ता जायन्ते ॥ ३६ ॥

**सूत्रार्थः**–त्या स्वार्थभोगसंयमापासून प्रतिभेनें ह्मणजे केवळ मनापासून होणारें असें प्रातिभज्ञान होतें. तसेंच त्या योग्याच्या श्रोत्र, त्वक् ( त्वचा ), चक्षु, रसना व घ्राण ह्या पांच इंद्रियांस स्वर्गांतील शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे विषय ग्रहण करण्याचें सामर्थ्य व्युत्थानअवस्थेंत सुद्धां प्राप्त होतें.

**भाष्यम्**–प्रातिभात्सूक्ष्मव्यवहितविप्रकृष्टातीतानागतज्ञानम् । श्रावणाद्दिव्यशब्दश्रवणम् । वेदनाया दिव्यस्पर्शाधिगमः । आदर्शाद्दिव्यरूपसंवित् । आस्वादाद्दिव्यरससंवित् । वार्तातो दिव्यगन्धविज्ञानमित्येतानि नित्यं जायन्ते ॥ ३६ ॥

**भाष्यार्थः**– ( पुरुषज्ञान झालें ह्मणजे दुसऱ्यानें सांगितल्यावांचूनच अत्यंत सूक्ष्म इत्यादिकांचें केवल मनानेंच ज्ञान होणें व तसें नेहमीं सामर्थ्य असणें अशा प्रकारचें प्रातिभज्ञान प्राप्त होतें. त्या ) प्रातिभज्ञानापासून अत्यंत सूक्ष्म, व्यवहित ( आड असणारा ), दूरचा, मागें गेलेला व पुढें येणारा अशा पदार्थांचें ज्ञान होतें. श्रावण ह्मणजे श्रोत्रेंद्रियानें जें ज्ञान होतें तें; त्यायोगानें योग्याला दिव्य ह्मणजे स्वर्गांतील शब्द ऐकूं येऊं लागतात. वेदना ह्मणजे स्पर्शेंद्रियानें होणारें ज्ञान; त्यापासून योग्याला स्वर्गांतील स्पर्शाचें ज्ञान होतें. आदर्श ह्मणजे चक्षुरिंद्रियानें होणारें ज्ञान; त्यायोगानें स्वर्गांतील रूपाचें ज्ञान होतें. आस्वाद ह्मणजे रसनेंद्रियानें होणारें ज्ञान; तें झाल्यामुळें योग्याला स्वर्गांतील रसाचें ज्ञान होतें; आणि वार्ता ह्मणजे घ्राणेंद्रियानें होणारें ज्ञान; तें झाल्यापासून योग्याला स्वर्गांतील गंधाचें ज्ञान होतें. असें हें सहा प्रकारचें ज्ञान व्युत्थानअवस्थेंत सुद्धां कायम राहतें ॥ ३६ ॥

आतां अशा सिद्धी प्राप्त झाल्याउें योगी आपणास कृतकृत्य मानून संयमाचा अभ्यास सोडून देईल; तो त्यानें सोडूं नये याकरितां सांगतात,–

## ते समाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः ॥ ३७ ॥

**सूत्रार्थः**—त्या प्रातिभ इत्यादिक सिद्धी समाधींत विघ्न करणाऱ्या आहेत; व व्युत्थान-दशेंत उत्तम फळें देणाऱ्या आहेत.

**भाष्यम्—ते प्रातिभादयः समाहितचित्तस्योत्पद्यमाना उपसर्गास्तद्दर्शनप्रत्य-नीकत्वात् । व्युत्थितचित्तस्योत्पद्यमानाः सिद्धयः ॥ ३७ ॥**

**भाष्यार्थः**—पूर्वी ज्या प्रातिभ इत्यादि सिद्धी सांगितल्या त्या असंप्रज्ञातसमाधींत तत्पर झालेल्या योग्याला प्राप्त झाल्या असतां समाधीस विघ्न करणाऱ्या आहेत. ( ह्मणजे त्या प्राप्त झाल्यामुळें आनंद, आश्चर्य इत्यादिक उत्पन्न होऊन समाधीस कमीपणा येतो; असें जाणून मुमुक्षूंनीं त्यांच्या लोभांत पडूं नये. ) आतां ज्या वेळेस व्युत्थानअवस्था असते त्या वेळेस तर त्याच सिद्धी ( सुखकारक ) होतात ॥ ३७ ॥

याप्रमाणें ज्ञानरूप सिद्धी सांगून आतां क्रियारूप सिद्धी सांगतात,—

## बन्धकारणशैथिल्यात्प्रचारसंवेदनाच्च चित्तस्य परशरीरावेशः ॥ ३८ ॥

**सूत्रार्थः**—बंधकारण जे धर्माधर्म, त्यांचा कमीपणा झाल्यानें आणि मन, प्राण व इंद्रियें यांचा संचार करण्याचा मार्ग ज्या नाड्या, त्या ठिकाणीं चित्त एकाग्र केल्यानें आपलें चित्त, इंद्रियें इत्यादिकांची दुसऱ्याच्या शरीरांत प्रवेश करवितां येतो.

**भाष्यम्—लोलीभूतस्य मनसोऽप्रतिष्ठस्य शरीरे कर्माशयवशाद्बन्धः प्रतिष्ठे-त्यर्थः । तस्य कर्मणो बन्धकारणस्य शैथिल्यं समाधिबलाद्भवति प्रचारसंवेदनं च चित्त-स्य समाधिजमेव । कर्मबन्धक्षयात् स्वचित्तस्य प्रचारसंवेदनाच्च योगी चित्तं स्वशरीरान्निष्कृष्य शरीरान्तरेषु निःक्षिपति, निःक्षिप्तं चित्तं चेन्द्रियाण्यनुपतन्ति, यथा मधुकरराजानं मक्षिका उत्पतन्तमनूत्पतन्ति निविशमानमनु निविशन्ते, तथेन्द्रियाणि प-रशरीरावेशे चित्तमनु विधीयन्त इति ॥ ३८ ॥**

**भाष्यार्थः**—सर्व प्रदेशांत व्याप्त होणें हा चित्ताचा स्वभाव खरा; परंतु धर्म व अधर्मरूप कारणानें आपल्या शरीरांतच तें बांधल्यासारखें संकोचानें राहिलें आहे. तें धर्मा-धर्मरूप बंधकारण संयमाच्या प्रभावानें कमी होतें; आणीक• चित्ताचा संचार करण्याचा मार्ग ज्या नाड्या त्यांच्या ठिकाणीं संयम केल्यानें संवेदन ह्मणजे अमक्या वेळेस अमुक नाडीनें चित्ताचा संचार होत आहे असें ज्ञान होतें. तसेंच प्राण व इंद्रियें यांचा संचार करण्याचा मार्ग ज्या नाड्या त्यांचें संयमानें ज्ञान होतें. तें झालें असतां ( जसें आपल्या किंवा दुसऱ्याच्या घरांत प्रवेश करण्याला दार इत्यादिकांचा प्रतिबंध असतो, तो दूर झाल्यानें प्रवेश सहज करितां येतो; त्याप्रमाणें ) आपल्या चित्ताचा मृतशरीरामध्यें अथवा अन्य जीवंत शरीरामध्यें प्रवेश करवितां येतो; त्यानंतर जसा मधमाशांचा राजा ( फुलव-

रून ) उठला असतां त्याच्या मागून मधमाशा उठतात; व तो ( फुलावर ) बसला असतां त्या बसतात; त्याप्रमाणें चित्तामागून बाकीचीं इंद्रियें सुद्धां परशरीरामध्यें प्रवेश करितात. यालाच परकायाप्रवेश ह्मणतात ॥ ३८ ॥

आतां उदानजयापासून होणारी सिद्धि सांगतात,–

## उदानजयाज्जलपङ्ककण्टकादिष्वसङ्ग उत्क्रान्तिश्च ॥ ३९ ॥

**सूत्रार्थः**–उदानवायूचा संयमानें जय झाल्यानें महानद्या, मोठा गाळ व मोठाल्या कांट्यांच्या जाळ्या यांमध्यें योगी फसून न राहतां कापसाच्या गोळ्यासारखा वर येतो.

**भाष्यम्–समस्तेन्द्रियवृत्तिः प्राणादिलक्षणा जीवनं तस्य क्रिया पञ्चतयी । प्राणो मुखनासिकागतिराहृदयवृत्तिः । समुन्नयनात्समानश्चानाभिवृत्तिः । अपनयनादपान आपादतलवृत्तिः । उन्नयनादुदान आशिरोवृत्तिः । व्यापी व्यान इति । एषां प्रधानः प्राणः । उदानजयाज्जलपङ्ककण्टकादिष्वसङ्ग उत्क्रान्तिश्च प्रयाणकाले भवति तां वशित्वेन प्रतिपद्यते ॥ ३९ ॥**

**भाष्यार्थः**–प्राणन, अपानन इत्यादिरूप जी सर्व इंद्रियांची वृत्ति तिला जीवन ह्मणतात. त्या जीवनाचा पांच प्रकारचा व्यापार आहे; ( त्याला प्राण इत्यादि नांवें आहेत. ) त्यांत मुख व नाकाच्या शेंड्यापासून तें हृदयापर्यंत जो वायु व्यापार करीत असतो त्यास प्राण असें ह्मणतात. नाडींना पाहिजे तेवढ्या रसाचा पुरवठा करितो ह्मणून समान, तो ( हृदयापासून तें ) नाभीपर्यंत व्यापार करीत असतो. मूत्र, पुरीष ( विष्ठा ) व गर्भ इत्यादिकांना दूर करण्याला हेतु ह्मणून अपान, तो नाभीपासून तें तळपायांपर्यंत व्यापार करीत असतो. ऊर्ध्वगति देतो व रसादिकांना वर ( मस्तकापर्यंत ) पोहोंचवितो ह्मणून उदान, तो ( नाकाच्या शेंड्यांपासून तें मस्तकापर्यंत व्यापार करीत असतो. आणि सर्व शरीरांत व्यापून राहणारा तो व्यानसंज्ञक वायु होय. ह्या पांचांपैकीं प्राण हा सर्वांत श्रेष्ठ आहे. यांत सांगितलेल्या उदान वायूचा संयमानें जय झाला असतां योगी उदक, चिखल, कांटे इत्यादि ठिकाणीं चालू लागला तरी वरचेवर राहतो ह्मणजे पाण्यांत बुडत नाहीं किंवा चिखलांत गढत नाहीं अथवा कांटे वगैरे त्यास मोडत नाहींत; व प्राण सोडण्याची ज्या वेळेस योग्यास इच्छा होते त्या वेळेस त्याचें प्राणोत्क्रमण अर्चिरादिर्मार्गानें होतें. ती ऊर्ध्वगति उदानजय वांचून प्राप्त होत नाहीं ह्मणून उदानजय करावा ॥ ३९ ॥

आतां आणिक दुसरी सिद्धि सांगतात,–

## समानजयाज्ज्वलनम् ॥ ४० ॥

**सूत्रार्थः**–समानवायूचा संयमानें जय केल्यानें योगी अग्नीसारखा देदीप्यमान दिसतो.

**भाष्यम्–जितसमानस्तेजस उपध्मानं कृत्वा ज्वलति ॥ ४० ॥**

**भाष्यार्थः**– ( नाभीच्या जवळ राहणारा जो जठराग्नि, त्याच्या भोंवतीं व्यापून ( वेढून ) राहणारा जो समानवायु त्याला संयमानें जिंकिलें असतां जठराग्नीचें तेज वाढून योगी अग्नीप्रमाणें प्रदीप्त दिसतो; अथवा अग्नीचें तेज वाढवून सतीप्रमाणें आपलें शरीर जाळितो ॥ ४० ॥

आतां दुसरी सिद्धि सांगतात,–

## श्रोत्राकाशयोः सम्बन्धसंयमाद्दिव्यं श्रोत्रम् ॥ ४१ ॥

**सूत्रार्थः**–श्रोत्रेंद्रिय व आकाश यांच्यामध्यें असणारा जो संबंध, त्यामध्यें संयम केल्यानें दिव्य शब्दाचें ग्रहण करणारें असें योग्याचें श्रोत्रेंद्रिय होतें.

**भाष्यम्**–सर्वश्रोत्राणामाकाशं प्रतिष्ठा सर्वशब्दानां च। यथोक्तम् 'तुल्यदेशश्रवणानामेकदेशश्रुतित्वं सर्वेषां भवति' इति। तच्चैतदाकाशस्य लिङ्गमनावरणं चोक्तम्। तथाऽमूर्तस्यानावरणदर्शनाद्विभुत्वमपि प्रख्यातमाकाशस्य शब्दग्रहणानुमितं श्रोत्रं बधिरयोरेकः शब्दं गृह्णात्यपरो न गृह्णातीति तस्माच्छ्रोत्रमेव शब्दविषयम्। श्रोत्राकाशयोः सम्बन्धे कृतसंयमस्य योगिनो दिव्यं श्रोत्रं प्रवर्तते ॥ ४१ ॥

**भाष्यार्थः**–सर्वांच्या श्रोत्रेंद्रियांचा व सर्व शब्दांचा आश्रय आकाश आहे. याविषयीं पंचशिखाचार्यांनींही असें ह्मटलें आहे कीं, 'ज्यांच्या श्रोत्रेंद्रियांचा समान देश आहे त्या सर्वांच्या श्रवणाचाही देश एकच असतो.' ( तो एक देश ह्मटला ह्मणजे आकाशच होय.) व तें श्रोत्र व शब्द आकाशाचें लिंग ह्मणजे आकाशाच्या अस्तित्वाचें अनुमापक चिह्न व दुसरें अवकाशरूप सांगितलें आहे. तसेंच अपरिच्छिन्न द्रव्याला कधींही आवरण पाहण्यांत नसल्यामुळें आकाशाला विभुत्वही श्रुति, स्मृति इत्यादि स्थलीं प्रसिद्ध आहे. शब्दाचें ग्रहण होतें हेंच अनुमान श्रोत्रेंद्रिय असण्याबद्दल प्रमाण आहे; कारण, जो बहिरा नसतो तो शब्दाला ऐकतो, व जो बहिरा असतो तो ऐकत नाहीं. या अन्वयव्यतिरेकांवरून शब्दाला ग्रहण करणारें श्रोत्रेंद्रियच आहे. याप्रमाणें श्रोत्र व आकाश यांचा जो आधाराधेयभाव संबंध त्या ठिकाणीं चित्ताचा संयम करणाऱ्या योग्याला दिव्य ह्मणजे तन्मात्र इत्यादिरूप सूक्ष्मशब्दग्राहक श्रोत्रेंद्रिय प्राप्त होतें ॥ ४१ ॥

आतां आणिक दुसरी सिद्धि सांगतात,–

## कायाकाशयोः सम्बन्धसंयमाल्लघुतूलसमापत्तेश्चाकाशगमनम् ॥ ४२ ॥

**सूत्रार्थः**–शरीर व आकाश यांचा जो संबंध आहे त्यावर संयम केला असतां आणि कापूस वगैरे जे हलके पदार्थ आहेत त्यांच्या ठिकाणीं तदाकार भावना करून समाधि साधिला असतां योगी आकाशांत गमन करूं शकतो.

भाष्यम्—यत्र कायस्तत्राकाशं तस्यावकाशदानात्कायस्य तेन सम्बन्धप्राप्तिस्तत्र कृतसंयमो जित्वा तत्सम्बन्धं लघुषु तूलादिष्वापरमाणुभ्यः समापत्तिं लब्ध्वा जितसम्बन्धो लघुर्लघुत्वाच्च जले पादाभ्यां विहरति ततस्तूर्णनाभितन्तुमात्रे विहृत्य रश्मिषु विहरति ततो यथेष्टमाकाशगतिरस्य भवतीति ॥ ४२ ॥

भाष्यार्थः—ज्या आसन इत्यादि ठिकाणीं शरीर असतें तेथें तेवढ्या जागेंत सुद्धां आकाश असतें; कारण, अवकाश देणें हा आकाशाचा धर्म आहे. याकरितां शरीराचा आकाशाशीं जो व्याप्तिरूप संबंध त्या संबंधाच्या ठिकाणीं संयम करणारा त्या संबंधाप्रत साक्षात्कारेंकरून स्वाधीन करून घेतल्यामुळें अगदीं हलका होतो. अथवा कापूस इत्यादि हलक्या पदार्थांपासून तें थेट परमाणूपर्यंत चित्ताची तदाकार वृत्ति करून व समाधि साधून संयमानें शरीर व आकाश यांचा संबंध स्वाधीन करून घेईल तर तो योगी फार हलका होतो. व त्याच्या ठिकाणीं अगदीं हलकेपणा आल्यामुळें तो पाण्यावरून पायांनीं चालत जातो. त्यानंतर तर तो कोळी नांवाच्या किड्यानें केलेल्या एका सूक्ष्म तंतूवरून आनंदानें संचार करून सूर्यकिरणांबरोबर सुद्धां फिरूं लागतो. नंतर वाटेल तिकडे आकाशांत गमन करण्याचें त्यास सामर्थ्य येतें ॥ ४२ ॥

आतां दुसरी सिद्धि सांगतात,—

## बहिरकल्पिता वृत्तिर्महाविदेहा ततः प्रकाशावरणक्षयः ॥ ४३ ॥

सूत्रार्थः—शरीराच्या बाहेरची जी अकल्पिता महाविदेहा नांवाची प्रवृत्ति, तिच्यांत चित्तसंयम केला असतां योग्याच्या सात्विकचित्ताच्या प्रकाशाचें जें आच्छादन क्लेश, कर्म इत्यादि त्याचा नाश होतो.

भाष्यम्—शरीराद्बहिर्मनसो वृत्तिलाभो विदेहा नाम धारणा सा यदि शरीरप्रतिष्ठस्य मनसो बहिर्वृत्तिमात्रेण भवति सा कल्पितेत्युच्यते । या तु शरीरनिरपेक्षा बहिर्भूतस्यैव मनसो बहिर्वृत्तिः सा खल्वकल्पिता । तत्र कल्पितया साधयत्यकल्पितां महाविदेहामिति, यया परशरीराण्याविशन्ति योगिनः । ततश्च धारणातः प्रकाशात्मनो बुद्धिसत्वस्य यदावरणं क्लेशकर्मविपाकत्रयं रजस्तमोमूलं तस्य च क्षयो भवति ॥४३॥

भाष्यार्थः—शरीराच्या बाहेर जो मनाचा वृत्तिलाभ ह्मणजे शरीराप्रमाणेंच बाहेरच्या वस्तूंची संकल्पवशता, तिचें अधिष्ठान ( आश्रय ) बाहेर असतें ह्मणून तिला विदेहा धारणा ह्मणतात. आतां ती जर शरीरांतच मन राहून मनाच्या केवळ बाह्यज्ञानमात्रानेंच होते तर तिला कल्पिता विदेहा असें ह्मणतात. आणि जी तर शरीराची मुळींच अपेक्षा न करणारी अशी बाहेर राहणाऱ्या मनाची बहिर्वृत्ति तिला अकल्पिता धारणा ह्मणतात. त्यांत प्रथम कल्पिता धारणा साध्य करून मग तिनें अकल्पिता महाविदेहा साधावी; कीं जिच्या योगानें योगी

परशरीरांत प्रवेश करूं शकतात. त्यानंतर त्या धारणेच्या ठिकाणीं चित्त एकाग्र केलें असतां सात्विक चित्ताच्या प्रकाशाचें जें आच्छादन ह्मणजे क्लेश, कर्म व विपाकरूप जो चित्तमल त्याचा नाश होतो ॥ ४३ ॥

आतां सबीज व निर्बीज समाधींच्या सिद्धीकरितां उपाय सांगतात,–

## स्थूलस्वरूपसूक्ष्मान्वयार्थवत्त्वसंयमाद्भूतजयः ॥ ४४ ॥

**सूत्रार्थः**–प्रत्येक भूताच्या स्थूल, स्वरूप, सूक्ष्म, अन्वयत्व व अर्थवत्त्व अशा पांच प्रकारच्या विशेष अवस्था आहेत; त्यांच्यामध्यें संयम केला असतां महाभूतें स्वाधीन होतात.

**भाष्यम्** –तत्र पार्थिवाद्याः शब्दादयो विशेषाः सहाकारादिभिर्धर्मैः स्थूलशब्देन परिभाषिताः । एतद्भूतानां प्रथमं रूपं द्वितीयं रूपं स्वसामान्यं मूर्तिर्भूमिः स्नेहो जलं वह्निरुष्णता वायुः प्रणामी सर्वतोगतिराकाश इत्येतत्स्वरूपशब्देनोच्यते। अस्य सामान्यस्य शब्दादयो विशेषाः। तथा चोक्तम् । 'एकजातिसमन्वितानामेषां धर्ममात्रव्यावृत्तिः' इति । सामान्यविशेषसमुदायोऽत्र द्रव्यम्। द्विष्ठो हि समूहः प्रत्यस्तमितभेदावयवानुगतः शरीरं वृक्षो यूथं वनमिति । शब्देनोपात्तभेदावयवानुगतः समूह उभये देवमनुष्याः, समूहस्य देवा एको भागो मनुष्या द्वितीयो भागस्ताभ्यामेवाभिधीयते समूहः । स च भेदाभेदविवक्षित आम्राणां वनं ब्राह्मणानां सङ्घ आम्रवनं ब्राह्मणसङ्घ इति। स पुनर्द्विविधो युतसिद्धावयवोऽयुतसिद्धावयवश्च।युतसिद्धावयवः समूहो वनं सङ्घ इति। अयुतसिद्धावयवः संघातः शरीरं वृक्षः परमाणुरिति। अयुतसिद्धावयवभेदानुगतः समूहो द्रव्यमिति पतञ्जलिः। एतत्स्वरूपमित्युक्तम् । अथ किमेषां सूक्ष्मरूपम्।तन्मात्रं भूतकारणम्।तस्यैकोऽवयवः परमाणुः सामान्यविशेषात्माऽयुतसिद्धावयवभेदानुगतः समुदाय इत्येवं सर्वतन्मात्राणि। एतत्तृतीयम्। अथ भूतानां चतुर्थं रूपम् । ख्यातिक्रियास्थितिशीला गुणाः कार्यस्वभावानुपातिनोऽन्वयशब्देनोक्ताः । अथैषां पञ्चमं रूपमर्थवत्त्वं भोगापवर्गार्थता गुणेष्वन्वयिनो गुणास्तन्मात्रभूतभौतिकेष्विति सर्वमर्थवत् । तेष्विदानींभूतेषु पञ्चरूपेषु संयमात्तस्य तस्य रूपस्य स्वरूपदर्शनं जयश्च प्रादुर्भवति । तत्र पञ्चभूतस्वरूपाणि जित्वा भूतजयी भवति । तज्जयाद्वत्सानुसारिण्य इव गावोऽस्य सङ्कल्पानुविधायिन्यो भूतप्रकृतयो भवन्ति ॥ ४४ ॥

**भाष्यार्थः**–( स्थूल इत्यादि ज्या पृथ्वी इत्यादि पंचभूतांच्या पांच अवस्था ) त्यांमध्यें पार्थिव ( पृथ्वीसंबंधी ), पाथसीय ( उदकसंबंधी ), तैजस ( तेजःसंबंधी ), वायवीय (वायुसंबंधी) व आकाशीय (आकाशसंबंधी) जे ( यथासंभव ) शब्द, स्पर्श, रूप, रस व गंधरूप विशेष ( ह्मणजे षड्ज, ऋषभ इत्यादि; शीत, उष्ण इत्यादि; नील, पीत इत्यादि; कषाय, मधुर इत्यादि; व सुरभी इत्यादि नाम व कर्मे इहींकरून विभक्त होणारे ह्मणून 'विशेष) हे आकार

इत्यादि धर्मांसुद्धां शास्त्रांत 'स्थूल' या शब्दानें परिभाषित आहेत (ह्मणजे ह्यांना स्थूल अशा शब्दानें व्यवहार होतो). ते आकारादि धर्म येणेंप्रमाणें,– आकृति, गुरुत्व, रूक्षपणा, आच्छादन करणें, स्थिरता, सर्वभूताधारता, विदारण, स्थिति, क्षमा, काळेपणा, कठिनता व सर्वप्राणिभोगभोग्यता, हे पृथ्वीचे गुण आहेत. स्नेह, सूक्ष्मत्व ( विरलपणा ), शुक्लत्व, मृदुत्व, गुरुत्व, शैत्य, रक्षणशक्ति, पवित्रत्व व संधि करणें हे उदकाचे गुण आहेत. वरतीं असणें, पचनशक्ति; पवित्र करणें, लघुत्व, प्रभा, तमाचा ध्वंस करण्याची शक्ति व प्रकाश हे तेजाचे गुण आहेत. वांकडी गति, पवित्रपणा, दूर सारणें, प्रेरण, बल, चांचल्य, रूपराहित्य व रूक्षता हे वायूचे गुण आहेत. सर्वत्र व्याप्ति, संधिभाव न होणें व कोणाचाही प्रतिबंध नसणें हे तीन गुण आकाशाचे आहेत. याप्रमाणें हें पृथिवी इत्यादि पंचभूतांचें सूत्रांत सांगितलेलें पहिलें ह्मणजे स्थूल रूप (अवस्था) होय. आतां पृथ्वी इत्यादिकांचें दुसरें रूप ह्मणजे अवस्था ह्मटली ह्मणजे स्वसामान्य ( आपापल्या ठिकाणीं राहणारा स्वाभाविक धर्म ) हें होय. तें असें,– पृथ्वीच्या ठिकाणीं स्वतःसिद्ध कठिनपणा, जलाच्या ठिकाणीं स्नेह ( स्निग्धता ) अग्नी ( तेजा ) च्या ठिकाणीं उष्णता, वायूच्या ठिकाणीं प्रेरणा करणें, हालविणें, वाहणें इत्यादि व आकाशाच्या ठिकाणीं अवकाश देणें या प्रकारच्या ह्या पंचभूतांच्या सामान्य ( स्वाभाविक ) धर्मांस शास्त्रांत 'स्वरूप' ह्या शब्दानें व्यवहार होतो. ह्या (कठिनपणा इत्यादि) सामान्य धर्मांचेच शब्द इत्यादि ( षड्ज इत्यादि इत्यादि ) विशेष ह्मणजे एकमेकांची एकमेकांहून व्यावृत्ति करणारे असे धर्म आहेत. असें पूर्वींच्या आचार्यांनीं सांगितलेंही आहे कीं, 'कठिनपणा इत्यादि एकेक स्वाभाविकधर्मानें युक्त जीं पृथ्वी इत्यादिक पंचभूतें ह्यांची सजातीय अन्यद्रव्यांहून शब्दादि विशेषधर्मानें व्यावृत्ति होते.' याप्रमाणें जे कठिनपणा इत्यादि सामान्य धर्म व षड्ज इत्यादि विशेष धर्म सांगितले; ह्या सामान्य व विशेष धर्मांचा समूहच द्रव्य असा या शास्त्राचा सिद्धांत आहे. ( या सामान्य व विशेष यांच्या समूहाहून शिवाय द्रव्य ह्मणून पदार्थ दुसरा कांहीं नाहीं. ) त्यांत समूह दोन ठिकाणीं राहणारा आहे; ह्मणजे एक तर ज्यांचा शब्दानें कांहींएक भेद ( विभाग ) सांगतां येत नाहीं अशा अवयवांच्या ठिकाणीं राहणारा; उदाहरण,–शरीर, वृक्ष, यूथ ( पशूंचा समूह ) वन इत्यादि; व दुसरा शब्दानें सांगतां येण्याजोगा आहे भेद ( विभाग ) ज्यांचा अशा अवयवांच्या ठिकाणीं राहणारा; उदाहरण,– 'उभय देवमनुष्य.' या उदाहरणांतील देवमनुष्यरूप समूहाचा देव हा एक भाग व मनुष्य हा दुसरा भाग, त्या दोन भागांनीं 'देवमनुष्य' हा एक समूह ह्मटला जातो. आतां तो दोन प्रकारचा समूह सुद्धां पुनः आणखी भेदविवक्षेनें व अभेदविवक्षेनें दोन प्रकारचा; जसें, 'आम्रां- ( आंब्यां ) चें वन व ब्राह्मणांचा संघ;' येथें आंब्याचीं झाडें व ब्राह्मण ह्या व्यक्ती भिन्न व त्यांचा समूह जो वन व संघ हीं भिन्न अशी भेदविवक्षा मानिली ह्मणून आंबा व ब्राह्मण

ह्या शब्दांहून 'चें, चा' असे षष्ठीचे प्रत्यय झाले. आणि जेव्हां व्यक्ति व तद्विशिष्ट समूह हे दोन्ने एक अशी अभेदविवक्षा केली त्या वेळेस 'आम्रवन, ब्राह्मणसंघ' या दोन उदाहरणांत कर्मधारय समास झाला. तो समूह पुनः आणखी दोन प्रकारचा; एक युतसिद्धावयव ह्मणजे ज्याच्या अवयवांत अंतर ( अवकाश ) असतें असा; व दुसरा अयुतसिद्धावयव ह्मणजे ज्याच्या अवयवांत अंतर नसतें असा. त्या पहिल्या प्रकारच्या समूहाचें उदाहरण वन, संघ इत्यादि; व दुसऱ्या प्रकारच्या समूहाचें उदाहरण शरीर, वृक्ष, परमाणु इत्यादि. या दोन प्रकारच्या समूहांपैकीं अयुतसिद्धावयव समूहच द्रव्य असा या शास्त्राचा सूत्रकार जो भगवान् पतञ्जलि त्याचा सिद्धांत आहे. याप्रमाणें हें पंचभूतांचें स्वरूप सांगितलें. आतां ह्या पंचभूतांचें तिसरें सूक्ष्मरूप कोणतें ह्मणाल तर शब्दतन्मात्र, स्पर्शतन्मात्र, रूपतन्मात्र, रसतन्मात्र व गंधतन्मात्र अशीं पांच तन्मात्रें होत. यांना सूक्ष्म ह्मणण्याचें कारण हें कीं, हीं पंचभूतांच्या उत्पत्तीला कारण आहेत.( साक्षात्कारणांनाच येथें सूक्ष्मत्व विवक्षित आहे. ) त्या भूतांचाच परमाणु हा एक अगदीं शेवटचा भाग आहे; त्यांत जे कठिनपणा इत्यादि सामान्य धर्म व शब्द इत्यादि विशेष धर्म हे परमाणूचे अवयव असून अयुतसिद्ध ह्मणजे अंतररहित आहेत; व त्यांच्या समुदायालाच परमाणु ह्मणतात; ह्मणून परमाणु हा भूताचें सूक्ष्मरूप आहे. जसें परमाणु भूताचें सूक्ष्मरूप त्याप्रमाणेंच तन्मात्र सुद्धां भूताचें सूक्ष्मरूप आहे असें जाणावें. हें तन्मात्र भूतांचें तिसरें रूप सांगितलें; आतां त्यांचें चवथें रूप सांगतों,– सत्व, रज व तम ह्या तीन गुणांचे प्रकाश, प्रवृत्ति व स्थिति हे अनुक्रमें तीन स्वभाव आहेत. हें कार्यरूप जें द्रव्यांतील गुण त्यांत संबद्ध असतात ह्मणून गुण हेच या शास्त्रांत अन्वयशब्दानें सांगितले आहेत, ह्मणजे या तीन गुणांसच अन्वय ही संज्ञा आहे. ( हें भूतांचें चवथें रूप झालें. ) आतां या भूतांचें 'अर्थवत्त्व' हें पांचवें रूप होय. पुरुषास शब्दादिकांचें ज्ञान हा भोग व विवेकख्याति हा अपवर्ग ह्मणजे मोक्ष हे दोन अर्थ ह्मणजे प्रयोजन आहे ज्यांस ते अर्थवंत अर्थात् तीन गुण, त्यांचा जो भाव ( धर्म ) तें अर्थवत्त्व ( भोगापवर्गार्थता ), तें गुणांवर राहतें, व गुण हे भूत, तन्मात्र व घट इत्यादि कार्यांवर राहतात ह्मणून सर्वच अर्थवत् आहे. ( याप्रमाणें हीं भूतांचीं पांच रूपें सांगितलीं; ) त्यांत पांचही भूतांचीं जीं पांच स्थूलरूपें त्या ठिकाणीं प्रथम संयम करावा ह्मणजे भूतांच्या रूपाचें दर्शन होतें; व त्यायोगानें भूतजय लवकरच होतो. त्यानंतर पांचही भूतांच्या स्वरूपांच्या ठिकाणीं संयमाचा अभ्यास करून त्यांना जिंकावें ह्मणजे भूतजयी होतो ह्मणजे योगी भूतांस स्वाधीन ठेवण्यास समर्थ होतो. नंतर भूतजय झाल्यामुळें जशा वांसराच्या अनुरोधानें ( पाठीमागें ) गायी चालणाऱ्या असतात; त्याप्रमाणें योग्याच्या इच्छेप्रमाणें वागण्याचा भूतांचा स्वभाव होतो ॥ ४४ ॥

आतां त्यानंतर काय होतें तें सांगतात,—

## ततोऽणिमादिप्रादुर्भावः कायसम्पत्तद्धर्म्मानभिघातश्च ॥४५॥

सूत्रार्थः—भूतजय झाल्यानें अणिमा इत्यादि सिद्धींची प्राप्ति होते; त्याचप्रमाणें पुढें सांगितलेली शरीरसंपत्ति प्राप्त होते; व शरीराच्या रूप इत्यादि गुणांचा कशानें नाश होत नाहीं.

भाष्यम्—तत्राणिमा भवत्यणुः । लघिमा लघुर्भवति । महिमा महान् भवति । प्राप्तिरङ्गुल्यग्रेणापि स्पृशति चन्द्रमसम् । प्राकाम्यमिच्छानभिघातः । भूमावुन्मज्जति यथोदके । वशित्वं भूतभौतिकेषुवशी भवत्यवशश्चान्येषाम् । ईप्सितृत्वं तेषां प्रभवाप्ययव्यूहानामीष्टे । यत्र कामावसायित्वं सत्यसङ्कल्पता यथा संकल्पस्तथा भूतप्रकृतीनामवस्थानम् । न च शक्तोऽपि पदार्थविपर्यासङ्करोति । कस्मात् । अन्यस्य यत्र कामावसायिनः पूर्वसिद्धस्य तथाभूतेषु सङ्कल्पादिति । एतान्यष्टावैश्वर्याणि । कायसंपद्वक्ष्यमाणा । तद्धर्मानभिघातश्च पृथ्वी मूर्त्या न निरुणद्धि, योगिनः शरीरादिक्रियां शिलामप्यनुविशतीति । नापः स्निग्धाः क्लेदयन्ति नाग्निरुष्णहति न वायुः प्रणामी वहत्यनावरणात्मकेऽप्याकाशे भवत्यावृतकायः सिद्धानामप्यदृश्यो भवति ॥ ४५ ॥

भाष्यार्थः—( सूत्रांत ज्या अणिमादिप्रादुर्भाव, कायसंपत् व तद्धर्मानभिघात अशा तीन प्रकारच्या सिद्धी सांगितल्या ) त्यांत १ योगी मोठा असतांनाही अणु ह्मणजे परमाणूसारखा लहान होतो ही अणिमा सिद्धि; २ गुरु ( जड ) असतांही कापसाप्रमाणें हलका होतो ही लघिमा सिद्धि; ३ लहान असतांनाही मेरुपर्वतासारखा मोठा होतो ही महिमा सिद्धि; ४ ( भूमीवर असून ) बोटानें चंद्रमंडलास सुद्धां स्पर्श करितो ही प्राप्ति सिद्धि; ( ह्या चार सिद्धी भूतांच्या स्थूलरूपांच्या ठिकाणीं संयम केल्यानें प्राप्त होतात. ५ इच्छेचा कोठेंही प्रतिबंध न होणें ही प्राकाम्यासिद्धि; उदाहरण, जसें पाण्यांतून सहज वर येतां येतें व आंत शिरतां येतें; त्याप्रमाणें योगी भूमींतून सहज वर येतो व एकदम आंत शिरतो. ( ही भूतांच्या स्वरूपांच्या ठिकाणीं संयम केल्यानें सिद्धि प्राप्त होते. ) ६ पृथ्वी इत्यादि पंचभूतें व त्यांचीं गाय, घट इत्यादि कार्यें यांच्याविषयीं योगी स्वतंत्र होतो, व दुसऱ्याच्या ( भूत व तत्कार्यांच्या ) स्वाधीन राहत नाहीं, ही वशित्व सिद्धि; ( ही सूक्ष्माच्या ठिकाणीं संयम केल्यानें प्राप्त होते. ) ७ भूत व भौतिक ( भूतकार्यें ) यांनी जी उत्पत्ति व विनाश त्यांचा जो व्यूह ह्मणजे यथास्थित रीतीनें अवस्थापन त्याविषयीं योगी समर्थ होतो; ( ही भूतांच्या अन्वयांच्या ठिकाणीं संयम केल्यानें सिद्धि प्राप्त होते. ) ८ व योग्याला ज्याविषयीं इच्छा उत्पन्न होते ती त्या विषयींची इच्छा केवल संकल्पानेंच पूर्ण होणें ह्मणजे जसा संकल्प त्याप्रमाणें गुण व तन्मात्रांचा एक विशेष परिणाम होणें ही कामावसायित्व सिद्धि होय. ( ही गुणांच्या अर्थवत्त्वाच्या ठिकाणीं संयम केल्यानें सिद्धि प्राप्त होते. ) याप्रमाणें योगी

सर्वे करण्यास जरी समर्थ असला तथापि सूर्याचा चंद्र, व चंद्राचा सूर्य, याप्रमाणें पदार्थांचा विपर्यास करीत नाहीं; कारण, पहिले दुसरे योगी जसे वागत होते त्यांच्या अनुरोधानेंच हा योगी व्यवहार करितो ( नाहींतर योगी याप्रमाणें विरुद्ध आचरण करूं लागल्यास व्यवहार सुरळीत चालण्याचा मुळींच संभव नाहीं ). याप्रमाणें हीं आठ ऐश्वर्यें सांगितलीं. कायसंपत् पुढच्या सूत्रांत सांगावयाची आहे. आतां तद्धर्मानभिघात तो असा,– पृथ्वी ही आपल्या कठिनपणानें योग्याच्या शरीर इत्यादिकांच्या क्रियेप्रत प्रतिबंध करीत नाहीं; व तो दगडांत सुद्धां शिरून बसतो. त्याला उदक भिजवीत नाहीं; अग्नि जाळीत नाहीं; वायु वहनशील खरा परंतु वाहत नाहीं; आकाशाला आवरण घालतां येत नाहीं तथापि योगी आकाशाला सुद्धां आवरण घालितो; व सिद्धपुरुषांना सुद्धां अदृश्य ( दिसेनासा ) होतो ॥ ४५ ॥

आतां कायसंपत्ति सांगतात,–

## रूपलावण्यबलवज्रसंहननत्वानि कायसंपत् ॥ ४६ ॥

**सूत्रार्थः**–रूप, सौंदर्य, बळ व वज्राप्रमाणें शरीरास कठिनपणा ही शरीरसंपत्ति समजावी.

**भाष्यम्**–दर्शनीयः कान्तिमान् अतिशयबलः वज्रसंहननश्चेति ॥ ४६ ॥

**भाष्यार्थः**–देखणा, कांतिमान्, अतिशय बलवान् व वज्राप्रमाणें आहे दृढ शरीर ज्याचें असा योगी होतो. ( ही शरीरसंपत्ति होय; पुढील सूत्रांत सांगावयाचें जें ग्राह्य त्याच्या ठिकाणीं संयम केल्यानें ह्या सिद्धी प्राप्त होतात. ) ॥ ४६ ॥

याप्रमाणें भूतजय सांगून आतां इंद्रियजय सांगतात,–

## ग्रहणस्वरूपास्मितान्वयार्थवत्त्वसंयमादिन्द्रियजयः ॥ ४७ ॥

**सूत्रार्थः**–ग्रहण, स्वरूप, अस्मिता, अन्वय व अर्थवत्त्व ह्या प्रत्येक इंद्रियाच्या पांच अवस्था आहेत; यांच्या ठिकाणीं संयम केल्यानें इंद्रियजय होतो.

**भाष्यम्**–सामान्यविशेषात्मा शब्दादिर्ग्राह्यः, तेष्विन्द्रियाणां वृत्तिर्ग्रहणम् । न च तत्सामान्यमात्रग्रहणाकारं कथमनालोचितः स विषयविशेष इन्द्रियेण मनसाऽनुव्यवसीयेतेति । स्वरूपं पुनः प्रकाशात्मनो बुद्धिसत्त्वस्य सामान्यविशेषयोरयुतसिद्धावयवभेदानुगतः समूहो द्रव्यमिन्द्रियम् । तेषां तृतीयं रूपमस्मितालक्षणोऽहङ्कारः । तस्य सामान्यस्येन्द्रियाणि विशेषाः । चतुर्थं रूपं व्यवसायात्मकाः प्रकाशक्रियास्थितिशीला गुणाः । येषामिन्द्रियाणि साहङ्काराणि परिणामः । पञ्चमं रूपं गुणेषु यदनुगतं पुरुषार्थवत्त्वमिति । पञ्चस्वेतेष्विन्द्रियरूपेषु यथाक्रमं संयमः । तत्र तत्र जयं कृत्वा पञ्चरूपजयादिन्द्रियजयः प्रादुर्भवति योगिनः ॥ ४७ ॥

**भाष्यार्थः**– सामान्य व विशेष यांचें लक्षण पूर्वी ( वि०३ सू० ४४ त ) सांगितलें. सामान्यविशेषरूप जे शब्द इत्यादि ( त्यांचेंही स्वरूप पूर्वी ( वि० ३ सू० ४४ त ) सांगितलें. ) त्यांना ग्राह्य ह्मणतात. ( हेच इंद्रियांचे विषय होत. ) त्या विषयांच्या ठिकाणीं जी इंद्रियांची वृत्ति ह्मणजे आलोचन (विषयाकार एक प्रकारचा परिणाम) याला ग्रहण ह्मणतात. ( हें ग्रहण इंद्रियांचें प्रथम रूप होय. ) आतां ग्रहण ह्मणजे इंद्रियवृत्ति सामान्यमात्रविषय ह्मणतां येत नाहीं; कारण, तो विषयगत विशेष जर इंद्रियानें अनालोचित होईल ह्मणजे इंद्रियगोचर होणार नाहीं तर मग त्या ( विषयगत ) विशेषाचें मन कसें ग्रहण करील ? ( आतां इंद्रियांचें स्वरूप हें द्वितीय रूप होय. ) तें स्वरूप ह्मटलें ह्मणजे प्रकाशशील जें बुद्धिसत्व त्याचे पृथक् सिद्ध (स्वतःसिद्ध) जे सात्विकाहंकाररूप अवयवभेद, त्या ठिकाणीं राहणारा जो सामान्यविशेषरूप समूह ह्मणजे द्रव्य अर्थात् इंद्रिय हें होय. ( त्यांत नील, पीत इत्यादिरूप विशेष व चक्षुष्ट्व इत्यादि सामान्य होय.) इंद्रियांचें तिसरें रूप ह्मटलें ह्मणजे अस्मितालक्षण अहंकार हा होय; कारण, त्या (अहंकाररूप ) सामान्याचे चक्षु इत्यादि इंद्रियें हीं विशेष आहेत. इंद्रियांचें चवथें रूप, निश्चयात्मकबुद्धिरूपानें परिणामास पावलेले, प्रकाश, प्रवृत्ति व स्थिति अशा प्रकारचे आहेत स्वभाव ज्यांचे व अंतःकरणसहित इंद्रियें हा ज्यांचा परिणाम असे सत्व इत्यादि गुण हे होत. ( यालाच अन्वय ह्मणतात.) इंद्रियांच्या प्रकृतिगुणांचे ठिकाणीं विद्यमान असणारें जें पुरुषांचें अर्थवत्त्व ( याचीही व्याख्या पूर्वी ४४ व्या सूत्रांत केली ) हें इंद्रियांचें पांचवें रूप होय. या इंद्रियांच्या पांचही रूपांच्या ठिकाणीं क्रमाक्रमानें संयम करावा. त्या त्या रूपास संयमानें स्वाधीन केल्यानें योग्याला इंद्रियजय सिद्ध होतो. ( मग वत्साच्या अनुरोधानें चालणाऱ्या गायीप्रमाणें योग्याच्या संकल्पाच्या अनुरोधानें वागण्याचे इंद्रियांचे स्वभाव होतात ) ॥ ४७ ॥

आतां इंद्रियजयापासून होणाऱ्या सिद्धी सांगतात,–

## ततो मनोजवित्वं विकरणभावः प्रधानजयश्च ॥ ४८ ॥

**सूत्रार्थः**–इंद्रियजय झाल्यानें शरीराला मनाप्रमाणें गति प्राप्त होते, शरीरावांचून इंद्रियें आपलीं कार्यें करितात व सर्व जग वश होतें.

**भाष्यम्–कायस्यानुत्तमो गतिलाभो मनोजवित्वं विदेहानामिन्द्रियाणामभिप्रेतदेशकालविषयापेक्षो वृत्तिलाभो विकरणभावः सर्वप्रकृतिविकारवशित्वं प्रधानजय इत्येतास्तिस्रः सिद्धयो मधुप्रतीका उच्यन्ते । एताश्च करणपञ्चकरूपजयादधिगम्यन्ते ॥ ४८ ॥**

**भाष्यार्थः**–( इंद्रियजय झाल्यानें योग्यास ) मनोजवित्व ह्मणजे योगिशरीरास अतिशय शीघ्रगतीची प्राप्ति होते; (ही संयमानें कर्मेंद्रियांस जिंकिल्यानें सिद्धि प्राप्त होते. )

विदेह (स्थूलदेहसंपर्करहित)' जीं सर्व इंद्रियें त्यांना इष्ट जे देश, काल व विषय यांना सोडून न राहणारा जो इंद्रियवृत्तिलाभ, अर्थात् व्यापकपणा ह्यास विकरणभाव ह्मणतात. व सर्व प्रकारच्या प्रकृतींचें ( सत्वादिगुणांचें ) व त्यांच्या विकारांचें आपल्या मनाप्रमाणें वागणें ह्यास प्रधानजय ह्मणतात. मनोजवित्व, विकरणभाव व प्रधानजय ह्या तीन सिद्धींस मधुप्रतीक अशी संज्ञा आहे. ह्या तीन सिद्धी, इंद्रियांच्या ग्रहण इत्यादि पांचही रूपांस संयमानें स्वाधीन केल्यानें प्राप्त होतात ॥ ४८ ॥

ग्राह्य व ग्रहण यांच्या संयमापासून होणाऱ्या सिद्धी सांगून आतां ग्रहीतृसंयमापासून होणाऱ्या सिद्धी सांगतात,–

## सत्वपुरुषान्यताख्यातिमात्रस्य सर्वभावाधिष्ठातृत्वं सर्वज्ञातृत्वं च ॥ ४९ ॥

**सूत्रार्थः**–बुद्धि व पुरुष हे दोघे भिन्न आहेत असें भेदज्ञान ज्याला झालें आहे अशा योग्याला गुण व त्यांचे परिणाम यांचें स्वामिपण व सर्वज्ञत्व हीं प्राप्त होतात.

**भाष्यम्–निर्धूतरजस्तमोमलस्य बुद्धिसत्वस्य परे वैशारद्ये परस्यां वशीकारसंज्ञायां वर्तमानस्य सत्वपुरुषान्यताख्यातिमात्ररूपप्रतिष्ठस्य सर्वभावाधिष्ठातृत्वं, सर्वात्मानो गुणा व्यवसायव्यवसेयात्मकाः स्वामिनं क्षेत्रज्ञं प्रत्यशेषदृश्यात्मत्वेनोपस्थिता इत्यर्थः । सर्वज्ञातृत्वं सर्वात्मनां गुणानां शान्तोदिताव्यपदेश्यधर्मत्वेन व्यवस्थितानामक्रमोपारूढं विवेकजं ज्ञानमित्यर्थः । इत्येषा विशोका नाम सिद्धिः । यां प्राप्य योगी सर्वज्ञः क्षीणक्लेशबन्धनो वशी विहरति ॥ ४९ ॥**

**भाष्यार्थः**–( पूर्वी जो स्वार्थसंयम ह्मणजे चित्प्रतिबिंबाचे ठिकाणीं संयम सांगितला, त्या स्वार्थसंयमानें चित्ताचे सर्व मल धुऊन गेल्यामुळें त्याला अतिशय प्रसन्नता प्राप्त होऊन तें परवशीकार नांवाच्या वैराग्यांत स्थित होतें; त्यामुळें सत्व ह्मणजे बुद्धि व पुरुष हे दोघे परस्परांहून अगदीं भिन्न आहेत अशा विवेकख्यातीच्याच ठिकाणीं केवल संयम करणारें अशा चित्तास सर्वभावाधिष्ठातृत्व प्राप्त होतें. याचा अर्थ असा कीं, सर्वात्मे ह्मणजे कारणात्मक व तद्विषयात्मक जे गुण हे आपला स्वामी जो आत्मा त्याप्रत केवल संकल्पमात्रानेंच संपूर्ण भोग्यवस्तूंच्या आकारानें परिणत होऊन प्राप्त होतात. ( ही क्रियैश्वर्यसिद्धि सांगितली. )' व असेंच योग्यास सर्वज्ञातृत्व प्राप्त होतें. याचा अर्थ असा कीं, सर्वात्मे ह्मणजे सर्व पुरुष यांच्या भूत, वर्तमान व भविष्यरूप जे धर्म, तद्विशिष्ट गुणांचें एकदाच 'विवेकजनांवाचें ज्ञान ( यथार्थसाक्षात्कार ) होणें याला सर्वज्ञातृत्व ह्मणतात. हीच विशोका नांवाची सिद्धि

होय; ह्मणजे जी प्राप्त झाली असतां योगी सर्वज्ञ, क्षीण झालीं आहेत क्लेशरूप बंधनें ज्याचीं ह्मणूनच शोकरहित असा व स्वतंत्र होऊन खुशाल आनंदानें विहार करितो ॥ ४९ ॥

आतां विवेकख्यातीपासून होणारी मुख्य सिद्धि सांगतात,–

## तद्वैराग्यादपि दोषबीजक्षये कैवल्यम् ॥ ५० ॥

**सूत्रार्थः**–विशोकादिसिद्धीविषयीं सुद्धां ज्या वेळेस वैराग्य उत्पन्न होतें त्या वेळेस अविद्यादि दोषबीजें नाहींतशीं झाल्यामुळें कैवल्य ( मोक्ष ) प्राप्त होतें.

**भाष्यम्–यदास्यैवं भवति क्लेशकर्मक्षये सत्वस्यायं विवेकप्रत्ययो धर्मः सत्वं च हेयपक्षे न्यस्तं पुरुषश्चापरिणामी शुद्धोऽन्यः सत्वादित्येवमस्य ततो विरज्यमानस्य यानि क्लेशबीजानि दग्धशालिबीजकल्पान्यप्रसवसमर्थानि सह मनसा प्रत्यस्तं गच्छन्ति तेषु प्रलीनेषु पुरुषः पुनरिदं तापत्रयं न भुङ्क्ते । तदेतेषां गुणानां मनसि कर्मक्लेशविपाकस्वरूपेणाभिव्यक्तानां चरितार्थानामप्रतिप्रसवे पुरुषस्यात्यन्तिको गुणवियोगः कैवल्यम् । तदा स्वरूपप्रतिष्ठा चितिशक्तिरेव पुरुष इति ॥ ५० ॥**

**भाष्यार्थः**–जेव्हां योग्याला क्लेश व कर्म यांच्या क्षयाविषयीं असा विचार मनांत येतो कीं, सत्वाचा ( बुद्धीचा ) विवेकप्रत्यय ( विवेकख्याति ) हा धर्म ( स्वभाव ) आहे, सत्व हें दुःखपक्षांत मानिलें आहे; व आत्मा हा परिणामशून्य ( नित्य ), शुद्ध, सत्वाहून भिन्न आहे; याप्रमाणें विचार करणाऱ्या योग्याला परवैराग्य प्राप्त होऊन त्याचीं सर्व क्लेशरूप बीजें जळालेल्या बीजांप्रमाणें ज्ञानाग्नीनें दग्ध होऊन व पुनः उत्पन्न होण्याविषयीं असमर्थ होऊन मनासुद्धां तीं आपल्या कारणांमध्यें लीन होतात. 'तीं लीन झालीं ह्मणजे पुरुष पुनः आधिभौतिक इत्यादि तापत्रय भोगीत नाहीं. त्या वेळेस ( परवैराग्यावस्थेंत ) मनामध्यें क्लेश व कर्म यांच्या विपाकस्वरूपानें अभिव्यक्त झालेले, समाप्त आहे पुरुषार्थ ज्यांचा असे जे संस्काररूप सत्वादिगुण त्यांची पुनः उत्पत्ति न झाल्यामुळें पुरुषास अत्यंत गुणवियोग होऊन कैवल्य ह्मणजे मोक्षरूप सिद्धि योग्यास प्राप्त होते. त्या वेळेस चितिशक्ति स्वस्वरूपानेंच असते; तोच पुरुष ('आत्मा ) होय ॥ ५० ॥

आतां ह्या मोक्षाख्य सिद्धीमध्यें येणाऱ्या विघ्नांच्या नाशाचा उपाय सांगतात,–

## स्थान्युपनिमन्त्रणे सङ्गस्मयाकरणं पुनरनिष्टप्रसङ्गात् ॥ ५१ ॥

**सूत्रार्थः**–समाधि सिद्ध होण्याच्या वेळीं योग्याला योगापासून भ्रष्ट करण्याकरितां देवता येऊन सुंदर स्त्री, अमृत वगैरे ग्रहण करण्याविषयीं प्रार्थना करीत असतात; त्या वेळेस योग्यानें त्यांच्या लोभांत अगदीं पडूं नये; कारण, तसें केल्यानें पुनः अनिष्ट संसाराची प्राप्ति होते.

भाष्यम्—चत्वारः खल्वमी योगिनः प्रथमकल्पिको मधुभूमिकः प्रज्ञाज्योतिरतिक्रान्तभावनीयश्चेति । तत्राभ्यासी प्रवृत्तमात्रज्योतिः प्रथमः । ऋतंभरप्रज्ञो द्वितीयः । भूतेन्द्रियजयी तृतीयः। सर्वेषु भावितेषु भावनीयेषु कृतरक्षाबन्धः कृतकर्तव्यसाधनादिमान्। चतुर्थो यस्त्वतिक्रान्तभावनीयस्तस्य चित्तप्रतिसर्ग एकोऽर्थः । सप्तविधा अस्य प्रान्तभूमिप्रज्ञाः । तत्र मधुमतीं भूमिं साक्षात्कुर्वतो ब्राह्मणस्य स्थानिनो देवाः सत्त्वशुद्धिमनुपश्यन्तः स्थानैरुपनिमन्त्रयन्ते 'भो इहास्यतामिह रम्यतां,कमनीयोऽयं भोगः कमनीयेयं कन्या,रसायनमिदं जरामृत्यू बाधते,वैहायसमिदं यानममी कल्पद्रुमाः, पुण्या मन्दाकिनी,सिद्धा महर्षय उत्तमा अनुकूला अप्सरसो, दिव्ये श्रोत्रचक्षुषी, वज्रोपमः कायः, स्वगुणैः सर्वमिदमुपार्जितमायुष्मता, प्रतिपद्यतामिदमक्षयमजरममरस्थानं देवानां प्रियम्' इत्येवमभिधीयमानः सङ्गदोषान् भावयेत् 'घोरेषु संसाराङ्गारेषु पच्यमानेन मया जननमरणान्धकारे विपरिवर्तमानेन कथञ्चिदासादितः क्लेशतिमिराविनाशो योगप्रदीपस्तस्य चैते तृष्णायोनयो विषयवायवः प्रतिपक्षाः। स खल्वहं लब्धालोकः कथमनया विषयमृगतृष्णया वञ्चितस्तस्यैव पुनः प्रदीप्तस्य संसाराग्नेरात्मानमिन्धनीकुर्य्यामिति । 'स्वस्ति वः स्वप्नोपमेभ्यः कृपणजनप्रार्थनीयेभ्यो विषयेभ्यः' इत्येवन्निश्चितमतिः समाधिम्भावयेत्सङ्गमकृत्वा स्मयमपि न कुर्य्यात् । ' एवमहन्देवानामपि प्रार्थनीयः' इति । स्मयादयं सुस्थितंमन्यतया मृत्युना केशेषु गृहीतमिवात्मानं न भावयिष्यति । तथा चास्य च्छिद्रान्तरप्रेक्षी नित्यं यत्नोपचर्यः प्रमादो लब्धविवरः क्लेशानुत्तम्भयिष्यति, ततः पुनरनिष्टप्रसङ्गः । एवमस्य सङ्गस्मयावकुर्वतो भावितोऽर्थो दृढो भविष्यति भावनीयश्चार्थोऽभिमुखीभविष्यतीति ॥ ५१ ॥

**भाष्यार्थः**–प्रथमकल्पिक, मधुभूमिक, प्रज्ञाज्योति व अतिक्रांतभावनीय असे चार प्रकारचे योगी आहेत. त्यांपैकीं १ जो नुक्ताच अभ्यास करण्यास लागलेला असून ज्यास शुद्धतत्त्वाच्या ज्ञानाची प्रवृत्ति मात्र झाली आहे तो प्रथमकल्पिक योगी होय. २ ज्यास ऋतंभरा नांवाची प्रज्ञा प्राप्त झाली असते तो मधुभूमिक योगी; याला ऋतंभरप्रज्ञ असेंही ह्मणतात. ३ ज्याच्या स्वाधीन पंचभूतें व इंद्रियें झालीं असतांत अर्थात् जो भूतजयी व इंद्रियजयी तो प्रज्ञाज्योति योगी; त्यानें सर्व भावित ह्मणजे उत्पादित जे निर्वितर्कादि योग त्यांविषयीं रक्षारूप बंध केला असतो व सर्व भावनीय ह्मणजे उत्पादनीय जे विशोकादिसिद्धि इत्यादिकांस आरंभ करून तें असंप्रज्ञातसमाधीपर्यंत योग, त्यांविषयीं सर्व प्रकारचे उपाय केलेले असतात. ४ आतां जो चवथा अतिक्रांतभावनीय ह्मणून योगी सांगितला त्याचें असंप्रज्ञातसमाधीनें चित्तविलय करण्याचें मात्र एक काम

उरलें असतें. त्याच्या सात प्रकारच्या प्रांतभूमिप्रज्ञा ह्मणजे असंप्रज्ञातसमाधीपर्यंत जाऊन पोहोंचण्यास सात भूमिका ( अवस्था ) आहेत; त्यांतील मधुमतीनामक दुसऱ्या भूमीप्रत साक्षात् करीत असतां ह्मणजे माझी ही हल्लीं मधुमती भूमिका आहे असा अनुभव घेत असतां योग्यास, त्याच्या चित्तशुद्धीची परीक्षा पाहणारे असे महेंद्र इत्यादिक देव आपल्या जवळ येण्याविषयीं अशा तऱ्हेनें निमंत्रण ( बोलावणें ) करितात कीं, 'हे योगिपुरुष ! येथें बसा, येथें क्रीडा करा, हा सुंदर भोग, ही सुंदर कन्या, हें जरा व मृत्यु दूर करणारें रसायन (औषध ), हें आकाशांत गमन करणारें यान ( विमान ), हे कल्पवृक्ष (कल्पिलेलें देणारीं झाडें ),ही पुण्यदायक मंदाकिनी ( आकाशगंगा ) नदी, हे सर्व सिद्ध, महर्षि, ह्या सुंदर व अनुकूल अशा अप्सरा ( स्वर्वेश्या ), हे दिव्य ( स्वर्गांतील ) विषयांचें ग्रहण करण्यास समर्थ असे कान व डोळे, हा वज्रासारखा सुदृढ असा देह; याप्रमाणें हें सर्व आपण कुशल पुरुषानें आपल्या गुणांनीं संपादन केलें; ह्या स्वर्गलोकांत आपण येऊन यांचा स्वीकार करा; अविनाशी, सदा नवीन व देवांना प्रिय अशा प्रकारचें हें स्वर्गस्थान आहे.' याप्रमाणें त्यांनीं निमंत्रण करितांना भाषण केलें असतां योग्यानें त्या वेळेस विषयांचे ठिकाणीं प्रीति केली असतां काय काय अनर्थ होतील याचा विचार करावा. तो विचार असा,–' अरे या घोर संसाररूप अग्नीमध्यें भाजत राहणारा, जननमरणरूप काळोखांत भटकत फिरणारा अशा म्यां मोठ्या प्रयासानें क्लेशरूप अंधकाराचा नाश करणारा असा योगरूप मोठा दीप संपादन केला; त्या योगप्रदीपाचे हे तृष्णाहेतूनें उत्पन्न होणारे विषयरूप वायु शत्रु ( नाशक ) आहेत. ( असें मला धडधडीत कळत आहे ) व ज्यानें ज्ञानप्रकाश संपादन केला आहे असा मी ह्या विषयमृगतृष्णेनें फसला जाऊन पुनः त्याच प्रदीप्त झालेल्या संसाराग्नीमध्यें कसा देह जाळून घेईन ?' याप्रमाणें विचार करून निमंत्रण करण्यास आलेल्या पुरुषांस, 'या स्वप्नतुल्य व क्षुद्रजनप्रार्थनीय अशा विषयांपासून तुमचेंच कल्याण असो; ( मला त्याची कांहीं इच्छा नाहीं; )' असा निरोप द्यावा. याचप्रमाणें नेहमीं बुद्धीचा निश्चय ठेवून समाधिनिष्ठ व्हावें; व दिव्य विषयांच्या ठिकाणीं प्रीति न करितां 'याप्रमाणें मी देवांना सुद्धां प्रार्थना करण्याला योग्य आहें' असें आश्चर्यही मानूं नये. आश्चर्य मानिल्यापासून योगी हा आपणांस नित्य समजल्यामुळें 'मृत्यूनें आपणांला केशांचे ठिकाणीं धरून चालविलें आहे' असें तो आपणास समजणार नाहीं. त्यानंतर छिद्रान्वेषी (न्यून कोठें पडत आहे अशी वाट पाहणारा ); नित्य ज्याचा प्रतिकार केला पाहिजे असा प्रमाद अवकाश सांपडल्याबरोबर क्लेशांप्रत उत्पन्न करील; त्यानंतर पुनः अनिष्ट प्रसंग येणार. याप्रमाणें योग्यानें संग ( प्रीति ) व स्मय ( आश्चर्य अथवा गर्व ) न केला तर तो ज्या अर्थाची भावना करीत आहे तो अर्थ दृढ होईल; व तो ज्या अर्थाची भावना करणार आहे तो अर्थ अभिमुख ( प्रत्यक्ष ) होईल॥ ५१ ॥

आतां रागनिवृत्तीकरितां सर्वज्ञतासाधक असा दुसरा संयमविषय सांगतात,–

**क्षणतत्क्रमयोः संयमाद्विवेकजं ज्ञानम् ॥ ५२ ॥**

**सूत्रार्थः**–क्षण व त्यांचा पूर्वापर क्रम यांच्या ठिकाणीं संयम केला असतां योग्याला विवेकज्ञान प्राप्त होतें.

**भाष्यम्**–यथापकर्षपर्यन्तन्द्रव्यं परमाणुरेवम्परमापकर्षपर्यन्तः कालः क्षणः। यावता वा समयेन चलितः परमाणुः पूर्वदेशं जह्यादुत्तरदेशमुपसंपद्येत स कालः क्षणः। तत्प्रवाहाविच्छेदस्तु क्रमः। क्षणतत्क्रमयोर्नास्ति वस्तुसमाहार इति बुद्धिसमाहारो मुहूर्ताहोरात्रादयः। स खल्वयं कालो वस्तुशून्यो बुद्धिनिर्माणः शब्दज्ञानानुपाती लौकिकानां व्युत्थितदर्शनानां वस्तुस्वरूप इवावभासते। क्षणस्तु वस्तुपतितः क्रमावलम्बी, क्रमश्च क्षणानन्तर्यात्मा तङ्कालविदः काल इत्याचक्षते योगिनः। न च द्वौ क्षणौ सह भवतः। क्रमश्च न द्वयोः सहभुवोरसम्भवात्पूर्वस्मादुत्तरस्य भाविनो यदानन्तर्यङ्क्षणस्य स क्रमस्तस्माद्वर्तमान एवैकः क्षणो न पूर्वोत्तरक्षणाः सन्तीति तस्मान्नास्ति तत्समाहारः। ये तु भूतभाविनः क्षणास्ते परिणामान्विता व्याख्येयास्तेनैकेन क्षणेन कृत्स्नो लोकः परिणाममनुभवति तत्क्षणोपारूढाः खल्वमी सर्वे धर्मास्तयोः क्षणतत्क्रमयोः संयमात्तयोः साक्षात्करणन्ततश्च विवेकजं ज्ञानम्प्रादुर्भवति ॥ 'तस्य विषयविशेष उपक्षिप्यते' ॥ ५२ ॥

**भाष्यार्थः**— जसा मृत्तिकादि द्रव्यांचा अगदीं शेवटचा सूक्ष्म भाग. परमाणु; याप्रमाणें कालाचा अगदीं शेवटचा सूक्ष्म भाग क्षण हा होय. अथवा परमाणूएवढ्या देशाच्या पूर्वभागास सोडून उत्तरभागास जाण्यास जेवढा काल लागतो; तेवढ्या कालास 'क्षण' अशी संज्ञा आहे; आणि त्यांची (क्षणांची) जी निरंतर परंपरा ह्मणजे त्यांत अविरलपणा त्यास क्रम असें ह्मणतात. क्षण व त्यांचा क्रम यांचा वस्तुभूत समाहार (समुदाय) नाहीं ह्मणून मुहूर्त, अहोरात्र इत्यादि बुद्धिकल्पित समाहारच आहेत. आतां तो काल जर विचार करून पाहिला तर कांहींएक वस्तु नाहीं व केवल बुद्धिकल्पित आहे आणि केवल शब्दानें मात्र ज्याचें ज्ञान होतें असा विकल्पकोटींत आहे, तथापि भ्रांत लोकांना तो वस्तुभूत असा भासतो. आतां क्षण जर घेतला तर तो वस्तुकोटींमध्यें आहे; कारण, तो क्रमाचा आश्रय करून असतो; आणि क्रम ह्मणजे क्षणांचा अविरलपणारूप आहे ह्मणून कालतत्त्ववेत्ते योगी त्याप्रत काल असें ह्मणतात. दोन क्षण कधींही बरोबर असत नाहींत; व क्रम दोहोंचा होत नाहीं; कारण, दोन क्षणांचा एकदम होण्याचा मुळींच असंभव आहे. पूर्व क्षणापासून उत्तरक्षणापर्यंत जो निरंतरपणा त्याला क्रम ह्मणतात. याकरितां वर्तमानकाळीं

एकच क्षण असतो, त्याच्या पूर्वींचे व पुढचे क्षण असत नाहींत. ह्मणून त्यांचा मुहूर्त इत्यादिरूप समाहार नाहीं. आतां जे वर्तमानाच्या पहिले व पुढचे क्षण ते सर्वेही सर्व वस्तूंच्या परिणामास आधार आहेत; कारण, एकदाच वार्द्धक्य इत्यादिक परिणाम दृष्ट नाहींत; ह्मणून क्षणपर्यायकालत्व त्यांना असल्यामुळें ते परिणाम हेतु आहेत अशी ( कैवल्यपादांतील ३३ व्या सूत्रांत ) व्याख्या करावी. त्यामुळें एकेक क्षणानें संपूर्ण लोक परिणामास पावतात; कारण, सर्व पदार्थ एकेक क्षणोपारूढ झालेले आहेत. त्या क्षण व क्षणांच्या क्रमाच्या ठिकाणीं संयम केल्यानें क्षण व त्यांच्या क्रमाचा साक्षात्कार होतो; त्यानंतर विवेकज ह्मणजे विवेकख्याति नांवाचें ज्ञान प्रकट होतें ॥ ५२ ॥

आतां त्या सर्वविषयक अशा विवेकख्यातीचें एक उदाहरण सांगतात,–

## जातिलक्षणदेशैरन्यतानवच्छेदात्तुल्ययोस्ततः प्रतिपत्तिः ॥५३॥

**सूत्रार्थः**–जाति, लक्षण व देश या तीन कारणांनीं सुद्धां ज्या दोन सारख्या पदार्थांचें भिन्नपणानें ज्ञान होत नाहीं; त्यांचें भेदज्ञान होण्याकरितां क्षण अथवा त्यांचा पूर्वापर जो क्रम त्यांच्या ठिकाणीं संयम केला असतां भेदज्ञान होतें.

**भाष्यम्**–तुल्ययोर्देशलक्षणसारूप्ये जातिभेदोऽन्यतायां हेतुर्गौरियं वडवेयमिति । तुल्यदेशजातीयत्वे लक्षणमन्यत्वकरङ्कालाक्षी गौः, स्वस्तिमती गौरिति । द्वयोरामलकयोर्जातिलक्षणसारूप्याद्देशभेदोऽन्यत्वकर इदम्पूर्वमिदमुत्तरमिति । यदा तु पूर्वमामलकमन्यव्यग्रस्य ज्ञातुरुत्तरदेशे उपावर्त्यते तदा तुल्यदेशत्वे पूर्वमेतदुत्तरमेतदिति प्रविभागानुपपत्तिः । असंदिग्धेन च तत्त्वज्ञानेन भवितव्यमित्यत इदमुक्तं ततः प्रतिपत्तिर्विवेकजज्ञानादिति । कथं पूर्वामलकसहक्षणो देश उत्तरामलकसहक्षणाद्देशाद्भिन्नस्ते चामलके स्वदेशक्षणानुभवभिन्ने अन्यदेशक्षणानुभवस्तु तयोरन्यत्वहेतुरिति । एतेन दृष्टान्तेन परमाणोस्तुल्यजातिलक्षणदेशस्य पूर्वपरमाणुदेशसहक्षणसाक्षात्करणादुत्तरस्य परमाणोस्तद्देशानुपपत्तौ उत्तरस्य तद्देशानुभवो भिन्नः सहक्षणभेदात्तयोरीश्वरस्य योगिनोऽन्यत्वप्रत्ययो भवतीति । अपरे तु वर्णयन्ति, येऽन्त्या विशेषास्तेऽन्यताप्रत्ययं कुर्वन्तीति । तत्रापि देशलक्षणभेदो मूर्तिव्यवधिजातिभेदश्चान्यत्वहेतुः । क्षणभेदस्तु योगिबुद्धिगम्य एवेति । अत उक्तम्। ‘मूर्तिव्यवधिजातिभेदाभावान्नास्ति मूलपृथक्त्वम्’ इति वार्षगण्यः ॥ ५३ ॥

**भाष्यार्थः**—दोन पदार्थांच्या देश व लक्षणांचा जर सारखेपणा असला तर त्या ठिकाणीं भेद दाखविण्याला जातिभेद कारण असतो; जसें, ही गाय, ही घोडी, इत्यादि. दोन पदार्थांचा देश व जाति जर समान असलीं तर त्या ठिकाणीं लक्षण हें भेद घडण्याला

कारण होतें; उदाहरण, 'काळ्या डोळ्यांची गाय, कल्याणयुक्त गाय,' इत्यादि. दोन आवळ्यांची जाति व लक्षण यांचा सारखेपणा असला तर त्या ठिकाणीं भेद घडण्याला देशभेद कारण असतो; जसें, हें पूर्वेच्या बाजूचें, हें उत्तरेच्या बाजूचें, इत्यादि. आतां ज्या वेळेस योग्याच्या ज्ञानाच्या जाणण्याची इच्छा करणाऱ्या कोणीएक पुरुषानें पूर्वेस असणारा आवळा दुसऱ्या एका अन्यविषयाच्या ठिकाणीं व्यग्र झालेल्या योग्याच्या उत्तरदिशेस आणून ठेविला; ( नंतर तो पुनः तेथून काढला अथवा लपवून ठेविला; ) त्या वेळेस दोन्ही आवळ्यांचा तुल्य देश असल्यामुळें हा पूर्वेकडचा व हा उत्तरेकडचा असा विवेक करितां येणार नाहीं. आणि तत्त्वज्ञानांत ह्मणजे कोणत्याही प्रकारचा संशय नसला पाहिजे; ह्मणून हें ह्मटलें कीं, 'त्यानंतर विवेकजज्ञानापासून विवेकानें पुरुषाचा साक्षात्कार होतो.' आतां संयमानें विवेकज्ञान होतें हें कसें? याचें समाधान असें कीं, पूर्वेकडच्या आवळ्याच्या क्षणाबरोबरचा जो देश तो उत्तरेकडच्या आवळ्याच्या क्षणाबरोबरच्या देशाहून भिन्न आहे ह्मणून स्वदेशलक्षणप्राप्तीनें ते दोन्ही आवळे भिन्न आहेत. आतां त्यांना जो अन्यदेशक्षणानुभव तो त्यांच्या भेदाला कारण आहे. ह्या आवळ्यांच्या दृष्टांतानें तुल्य आहेत जाति, लक्षण व देश ज्याचे अशा परमाणूच्या पूर्व परमाणुदेशाबरोबरचा जो क्षण त्याच्या साक्षात्कारानें उत्तरेच्या परमाणूला त्या देशाची अनुपपत्ति आल्यामुळें उत्तरेच्या परमाणूला त्या देशाचा अनुभव भिन्न आहे; कारण, त्या दोघांच्या बरोबरच्या क्षणांचा भेद असल्यामुळें त्यांमध्यें समर्थयोग्यास भेदप्रत्यय होतो. याविषयीं वैशेषिक असें ह्मणतात कीं, 'नित्यद्रव्यवृत्ति जे अंत्य विशेष ते परमाणूंच्या ठिकाणीं सुद्धां अन्यत्वप्रत्यय करितात.' त्या मतांतही देशलक्षणभेद आणि संस्थान, व्यवहितता व जाति यांचा भेद अन्यपणाला कारण आहे. आतां क्षणभेद हा योगीश्वरबुद्धीनेंच गम्य आहे. ह्मणूनच, 'नित्यद्रव्यांच्या ठिकाणीं मूर्तिव्यवधिजातिभेद नाहीं ह्मणून मूलद्रव्यांच्या ( नित्यद्रव्यांच्या ) ठिकाणीं पृथक्त्व ह्मणजे विशेष पदार्थ नाहीं' असें वार्षगण्य आचार्याचें मत आहे ॥ ५३ ॥

आतां विवेकजज्ञान मोक्षोपयोगी आहे असें सांगतात,—

## तारकं सर्वविषयं सर्वथाविषयमक्रमं चेति विवेकजं ज्ञानम् ॥५४॥

**सूत्रार्थः**—पूर्वसूत्रांत सांगितल्याप्रमाणें संयम करीत गेलें असतां शेवटच्या भूमिकेंत उत्पन्न झालेलें ज्ञान योग्याला संसारसमुद्रांतून तारितें, ह्मणून त्याला तारक असें नांव आहे. त्यायोगानें सर्व वस्तूंच्या सर्व प्रकारच्या अवस्था, क्रम वगैरे समजण्यांत येतात.'

**भाष्यम्**—तारकमिति स्वप्रतिभोत्थमनौपदेशिकमित्यर्थः । सर्वविषयं नास्य किंचिदविषयीभूतमित्यर्थः । सर्वथाविषयमतीतानागतप्रत्युत्पन्नं सर्वं पर्यायैः सर्वथा जानातीत्यर्थः । अक्रममित्येकक्षणापारूढं सर्वं सर्वथा गृह्णातीत्यर्थः । एतद्विवेकजं

**ज्ञानं परिपूर्णमस्यैवांशो योगप्रदीपो मधुमतीं भूमिमुपादाय यावदस्य परिसमाप्तिरिति ॥ 'प्राप्तविवेकजज्ञानस्याप्राप्तविवेकजज्ञानस्य वा' ॥ ५४ ॥**

**भाष्यार्थः**—लौकिकसामग्रीवांचूनच प्राप्त झालेलें, व सत्वपुरुष यांच्या भेदज्ञानाच्या ठिकाणीं व क्षणतत्क्रमांच्या ठिकाणीं संयम केल्यानें उत्पन्न झालेलें जें यथार्थज्ञानसामर्थ्य त्यांस प्रतिभा ह्मणतात. त्या प्रतिभेपासून जें उत्पन्न होणारें तें स्वप्रतिभोत्थ, त्यालाच संसारापासून तरून नेण्याची योग्यता असते; ह्मणून स्वप्रतिभोत्थ ज्ञानच तारकशब्दाचा अर्थ आहे; कारण, तें दुसऱ्यानें शिकवून आलेलें नसतें. आणि तें पुनः सर्वविषयसंबंधी ज्ञान असतें; ह्मणजे याला अमुक वस्तु माहीत नाहीं असें होत नाहीं. पुनः तें ज्ञान सर्व प्रकारच्यां वस्तूंचें ह्मणजे भूत, भविष्यत् व वर्तमान या कालांत असणाऱ्या सर्व वस्तूंचें असतें; ह्मणजे त्या त्या वस्तूच्या ठिकाणीं असणारे जे विशेष त्या संपूर्ण विशेषांसुद्धां वस्तूंप्रत योगी जाणतो असा अर्थ. अक्रम या शब्दाचा अर्थ, एका क्षणींच बुद्धीच्या ठिकाणीं सर्व वस्तू वर्तमान झाल्यामुळें योगी सर्व वस्तूंप्रत त्यांच्या सर्व विशेषांसुद्धां ग्रहण करितो असा अर्थ. असें जें ज्ञान त्याला विवेकजज्ञान ह्मणतात. तें परिपूर्ण असतें; ह्मणजे तें इतकें कीं, त्या विवेकज ज्ञानाच्याच एका अंशानें योगप्रदीप सिद्ध होतो; कीं जो योगप्रदीप एकदा प्रज्वलित झाला ह्मणजे ( मागें ५१ व्या सूत्रांत सांगितली जी ऋतंभराप्रज्ञा नांवाची द्वितीय भूमि व ज्या भूमिकेंत योग्यास मधुभूमिक असें ह्मटलें आहे ती मधुमती नांवाची भूमिका होय; त्या ) मधुमतीभूमिकेपासून तें थेट संप्रज्ञात समाधीपर्यंत तो राहतो. (द्वितीय मधुमती भूमिकेपासून तें संप्रज्ञात समाधीपर्यंत ज्या भूमिका ( अवस्था ) त्यांना योगप्रदीप अशी या शास्त्रांतील संज्ञा होय.) ॥ ५४ ॥

आतां अशी शंका येते कीं, ह्या ज्या सिद्धी सांगितल्या यांच्या प्राप्तीनंतरच मोक्ष प्राप्त होतो किंवा याच्या प्राप्तीवांचून सुद्धां मोक्ष प्राप्त होतो ? याचें समाधान पुढील सूत्रांत सांगतात,—

## सत्वपुरुषयोः शुद्धिसाम्ये कैवल्यमिति ॥ ५५ ॥

**सूत्रार्थः**—बुद्धि व पुरुष यांची सारखी शुद्धि झाली असतां योग्याला मोक्ष प्राप्त होतो.

**भाष्यम्—यदा निर्धूतरजस्तमोमलं बुद्धिसत्त्वं पुरुषस्यान्यताप्रत्ययमात्राधिकारं दग्धक्लेशबीजं भवति तदा पुरुषस्य शुद्धिसारूप्यमिवापन्नं भवति, तदा पुरुषस्योपचरितभोगाभावः शुद्धिः । एतस्यामवस्थायां कैवल्यं भवति । ईश्वरस्यानीश्वरस्य वा विवेकजज्ञानभागिन इतरस्य वा । न हि दग्धक्लेशबीजस्य ज्ञाने पुनरपेक्षा काचिदस्ति । सत्वशुद्धिद्वारेणैतत्समाधिजमैश्वर्य्यं च ज्ञानं चोपक्रान्तम् । परमार्थतस्तु ज्ञानाद्दर्शनं निवर्तते तस्मिन्निवृत्ते न सन्त्युत्तरे क्लेशाः । क्लेशाभावात्कर्मविपाकाभाव-**

**श्चरिताधिकाराश्चैतस्यामवस्थायां गुणा न पुरुषस्य पुनर्दृश्यत्वेनोपतिष्ठन्ते तदस्य कैवल्यं, तदा पुरुषः स्वरूपमात्रज्योतिरमलः केवली भवति ॥ ५५ ॥**

**भाष्यार्थः**—ज्या वेळेस चित्तरूप सत्वाचा रजोमल व तमोमल सर्व नष्ट होऊन जाऊन क्लेशरूपसंसारबीजें जळून गेल्यामुळें केवल विवेकख्यातिज्ञानाविषयीं मात्र अधिकार राहतो त्या वेळेस तें शुद्धिगुणामुळें पुरुषाच्या स्वरूपासारखें दिसूं लागतें. त्या वेळेस पुरुषाला ( भोग हा बुद्धिधर्म असल्यामुळें तो बुद्धीच्याच ठिकाणीं असणारा खरा परंतु त्याचा अविवेकानें पुरुषावर आरोप झालेला आहे; त्या ) आरोपित प्रत्ययविशेषरूप भोगाचा सुद्धां अभाव होतो; ( कारण, जीवन्मुक्तदशेंत विवेकामुळें तसा सुद्धां पुरुषास भोग असत नाहीं. ) हीच पुरुषाची शुद्धि होय. ह्या शुद्धिसाम्यावस्थेमध्यें पुरुषास मोक्ष प्राप्त होतो; मग तो पुरुष पूर्वी सांगितलेल्या संयमांच्या योगानें ज्ञानशक्तीनें व क्रियाशक्तीनें युक्त झालेला असो अथवा नसो; किंवा विवेकजज्ञानवान् असो अथवा नसो. कारण, एकदा क्लेशबीजें दग्ध झाल्यानंतर मग पुरुषाला ज्ञानाविषयीं कांहींएक अपेक्षा ( गरज ) नसते. मग मध्यें सिद्धींचें कशाकरितां कथन केलें ह्मणाल तर, बुद्धिसत्वाची शुद्धि होऊन त्या द्वारानें त्या उपयोगी आहेत ह्मणून समाधीपासून उत्पन्न होणाऱ्या अणिमा इत्यादि सिद्धी व विवेकज्ञानापर्यंत ज्ञान सांगितलें. वस्तुतः सत्वपुरुषान्यताज्ञानापासूनच अज्ञानाची निवृत्ति होते. अज्ञाननिवृत्ति झाल्यावर मग पुढें क्लेश असत नाहींत. क्लेश नष्ट झाल्यामुळें कर्मविपाक असत नाहीं; ह्मणून सर्व कर्तव्यता समाप्त होते. ह्या अवस्थेमध्यें गुण पुनः पुरुषाला भोग्यत्वेंकरून उपस्थित होत नाहींत. हाच पुरुषाचा मोक्ष होय. त्या वेळेस पुरुष ( चित्तज्योतीचा ) वियोग झाल्यामुळें केवल स्वरूपमात्र ज्योति ह्मणूनच दुःखादिप्रतिबिंबरूपमलरहित असा होत्साता मुक्त होतो ॥ ५५ ॥

इति श्रीवेदव्यासकृतभाष्यसहिते टिप्पण्यादियुतभाषान्तरोपेते च पातञ्जले सांख्यप्रवचने योगशास्त्रे विभूतिपादः समाप्तः ॥ ३ ॥

ॐतत्सत्परमात्मने नमः।

# पातञ्जलयोगसूत्रम्।

## श्रीव्यासभाष्योपेतं भाषानुवादसहितं च

### कैवल्यपादः ॥ ४ ॥

दुसऱ्या व तिसऱ्या पादांत मोक्षप्राप्तीचीं साधनें व सिद्धी पुष्कळ विस्तारानें सांगितल्या, परंतु मोक्षाचें स्वरूप चांगलें विस्तारानें सांगितलें नव्हतें; तें सांगण्याकरितां ह्या कैवल्यनामक चवथ्या पादाचा आरंभ आहे. त्यांत प्रथम मोक्षाला योग्य चित्त कोणतें, याचा निश्चय करण्याकरितां व ज्यांच्या योगानें समाधिसिद्धीचा उत्कर्ष सिद्ध होईल अशा पांच प्रकारच्या सिद्धी सांगतात,–

**जन्मौषधिमन्त्रतपःसमाधिजाः सिद्धयः ॥ १ ॥**

**सूत्रार्थः**–जन्म, ओषधि, मंत्र, तप आणि समाधि ह्या पांच कारणांनीं सिद्धी प्राप्त होतात.

**भाष्यम्–देहान्तरिता जन्मना सिद्धिः। ओषधिभिरसुरभवनेषु रसायनेनेत्यवमादि। मन्त्रैराकाशगमनाणिमादिलाभः। तपसा सङ्कल्पसिद्धिः, कामरूपी यत्र तत्र कामग इत्येवमादि। समाधिजाः सिद्धयो व्याख्याताः॥ 'तत्र कायेन्द्रियाणामन्यजातीयपरिणतानाम्' ॥ १ ॥**

**भाष्यार्थः**–( ह्या लोकीं केलेल्या कर्मांच्या योगानें ) अन्य जन्मीं देव इत्यादिकांचा देह प्राप्त होऊन त्यांत जन्म झाल्याबरोबर ज्या अणिमा इत्यादि सिद्धी प्राप्त होतात; त्या जन्मसिद्धी होत. असुरांच्या घरीं ओषधी ( वनस्पतीं ) च्या योगानें जी रसायनापासून सिद्धि प्राप्त होते; (ह्मणजे कोणीएक मनुष्य कांहींएक निमित्तानें असुरांच्या घरीं प्राप्त झाला असतां त्याला पाहून मोहित झालेल्या असुरांच्या कन्यांनीं आणिलेलें रसायन त्यानें भक्षण करून तो जरामरणरहित होतो; ही व आणिकही दुसरी सिद्धि त्याला प्राप्त होते; अथवा येथेंच जशी मांडव्यमुनीला रसायनाच्या उपयोगानें सिद्धि झाली; ) ह्यासारख्या आणिक दुसऱ्या सर्व सिद्धी ओषधीपासून झालेल्या होते. कोणाला मंत्रजपानें आकाशगमन व अणिमादि सिद्धींचा लाभ होतो; कोणाला तपाच्या योगानें संकल्पसिद्धि प्राप्त होते; कीं जिच्या योगानें योगी ज्या विषयाची इच्छा करितो तो विषय त्याला तत्काल प्राप्त होतो. ह्या चार प्रकारच्या सिद्धी सांगितल्या; व समाधीपासून प्राप्त होणाऱ्या सिद्धी पूर्वीच्या पादांत

(विभूतिपादांत) विस्तारानें सांगितल्या. (वस्तुतः पूर्वीच्या चार प्रकारच्या सिद्धी सुद्धां पूर्वजन्मीं केलेल्या समाधीच्या अभ्यासानेंच ह्या जन्मीं प्राप्त होतात; त्यास जन्म इत्यादि केवल निमित्त मात्र आहेत ॥ १ ॥

आतां शंका येते कीं, ह्या जन्मीं ज्या सिद्धी प्राप्त होतात त्या पूर्वजन्मीं केलेल्या समाधीच्या अभ्यासानेंच प्राप्त होतात असें मागील सूत्रांत सांगितलें; आणि पुराणादिकांत तर नंदीश्वर इत्यादिकांस योगाभ्यासानें ह्याच जन्मांत सिद्धि प्राप्त झाली ह्मणजे त्यांचा मनुष्यपणा जाऊन ह्याच जन्मांत त्यास देवशरीर इत्यादि प्राप्त झालें; वगैरे वर्णन आहे. तेव्हां पूर्वीचा सिद्धांत कोठें कायम राहिला ? याचें समाधान सांगतात,–

## जात्यन्तरपरिणामः प्रकृत्यापूरात् ॥ २ ॥

**सूत्रार्थः**–अन्य जाति वगैरेच्या प्रकृतीची भरती झाली ( पुरवठा झाला ) असतां ह्याच जन्मांत दुसरी जाति वगैरे प्राप्त होते.

**भाष्यम्–पूर्वपरिणामापाये उत्तरपरिणामोपजनस्तेषामपूर्वावयवानुप्रवेशाद्भवति । कायेन्द्रियप्रकृतयश्च स्वं स्वं विकारमनुगृह्णन्ति आपूरेण धर्मादिनिमित्तमपेक्षमाणा इति ॥ २ ॥**

**भाष्यार्थः**–ह्या जन्मांतच जो नंदीश्वर इत्यादिकांच्या शरीर व इंद्रियांचा अन्य जातीचा परिणाम झाला ह्मणजे मनुष्यशरीर व इंद्रियें यांचा पालट होऊन आकाश वगैरे ठिकाणीं गमन करण्यास समर्थ असें देवशरीर व दिव्य विषयांस ग्रहण करणारीं अशीं इंद्रियें नंदीश्वरास प्राप्त झालीं. हा जो शरीर व इंद्रियांत एकदम फेरफार झाला हा केवल संकल्पमात्रानेंच झालेला नव्हे तर प्रकृतीच्या (पंचभूतें व अस्मिता ह्यांच्या) पुरवठ्यानें ( मोबदल्यानें ) झाला; ह्मणजे नंदीश्वराच्या योगप्रभावानें मनुष्यशरीर व इंद्रियांची प्रकृति एकदम दूर होऊन त्या जागीं देवशरीर व इंद्रियें यांच्या प्रकृतीची भरती झाली ह्मणून. जसे लोकांत वारूळ इत्यादिक प्रथमतः लहान असून नंतर पृथ्वी इत्यादि प्रकृतीचा त्यांत प्रवेश झाल्यामुळें ते मोठाले झालेले दृष्टीस पडतात; त्याप्रमाणेंच योगीश्वरादिकांच्याही शरीर व इंद्रियांचा दुसरा परिणाम होण्याचा समय येतो त्या वेळेस धर्मादिकांची अपेक्षा करून असणाऱ्या शरीर व इंद्रियांच्या प्रकृती तेथें प्रवेश करून आपापले विकार निर्माण करितात ॥ २ ॥

आतां श्रुति इत्यादिकांत तर प्रकृती स्वतंत्र ह्मणून सांगितल्या आहेत; व वरील सूत्रांत तर धर्मादिनिमित्तांची अपेक्षा करितात ह्मणून ह्मटलें; तेव्हां त्यांचा स्वतंत्रपणा गेला ! ह्या विरोधाचें समाधान सांगतात,–

## निमित्तमप्रयोजकं प्रकृतीनां वरणभेदस्तु ततः क्षेत्रिकवत् ॥३॥

**सूत्रार्थः**–जसा शेतकरी दुसऱ्या शेतांत पाणी नेत असतां मधला उंचवटा फक्त काढितो

त्यामार्गानें पाणी आपोआपच पुढें चालतें होतें, त्याप्रमाणें धर्माधर्म इत्यादि हे फक्त अविद्या इत्यादिक मधल्या अडचणीस मात्र दूर करितात; मग प्रकृति आपोआपच आपलें कार्य करण्यास प्रवृत्त होते.

**भाष्यम्**—न हि धर्मादिनिमित्तं तत्प्रयोजकं प्रकृतीनां भवति। न कार्येण कारणं प्रवर्त्यत इति । कथं तर्हि । वरणभेदस्तु ततः क्षेत्रिकवत्। यथा च क्षेत्रिकः केदारादपां पूर्णात्केदारान्तरं पिप्लावयिषुः समं निम्नं निम्नतरं वा नापः पाणिनाऽपकर्षत्यावरणं त्वासां भिनत्ति । तस्मिन् भिन्ने स्वयमेव आपः केदारान्तरमाप्लावयन्ति । तथा धर्मः प्रकृतीनामावरणमधर्मं भिनत्ति, तस्मिन् भिन्ने प्रकृतयः स्वंस्वं विकारमाप्लावयन्ति । यथा वा स एव क्षेत्रिकस्तस्मिन्नेव केदारे न प्रभवत्यौदकान् भौमान्वा रसान्धान्यमूलान्यनुप्रवेशयितुं किं तर्हि मुद्गगवेधुकश्यामाकादींस्ततोऽपकर्षत्यपकृष्टेषु तेषु स्वयमेव रसा धान्यमूलान्यनुप्रविशन्ति । तथा धर्मो निवृत्तिमात्रे कारणमधर्मस्य शुद्ध्यशुद्ध्योरत्यन्तविरोधात् । न तु प्रकृतिप्रवृत्तौ धर्मो हेतुर्भवतीति । अत्र नन्दीश्वरादय उदाहार्याः । विपर्ययेणाप्यधर्मो धर्मं बाधते ततश्चाशुद्धिपरिणाम इति । तत्रापि नहुषाजगरादय उदाहार्याः ॥ 'यदा तु योगी बहून्कायान्निर्मिमीते तदा किमेकमनस्कास्ते भवन्त्यथानेकमनस्का इति' ॥ ३ ॥

**भाष्यार्थः**—धर्म व अधर्म इत्यादि हे प्रकृतीस केवल निमित्त असल्यामुळें ते प्रकृतींना प्रेरणा करूं शकत नाहींत; व कार्यानें कधीं कारणही प्रवृत्त होत नसतें; (कारण, धर्माधर्म हे प्रकृतीचीं कार्यें आहेत; ) तर शेतकऱ्याप्रमाणें धर्माधर्म हे फक्त देवशरीर वगैरे प्राप्त होण्यास जो मध्यें प्रतिबंध त्यास दूर करितात. जसें, एकाद्या शेतकऱ्याला या शेतांतून त्या शेतांत पाणी न्यावयाचें असतां तें शेत जर सपाट आहे, किंवा उतळ आहे अथवा फारच खोलगट आहे तर त्यांत तो हातानें पाणी फेंकून देत नाही; तर त्या पाण्याला जो मध्यें उंचवटा वगैरे असतो तो फक्त काढून टाकितो; कीं लागलेंच तें पाणी दुसऱ्या शेतांत आपोआप जाऊं लागतें. तसा धर्म हा, प्रकृतीचा प्रतिबंध जो अधर्म त्याप्रत दूर करितो कीं लागल्याच प्रकृती स्वतांच आपापले विकार उत्पन्न करूं लागतात. अथवा जसा, तोच शेतकरी त्याच शेतांत धान्य व मुळें वगैरेंत पाण्याचे अथवा पृथ्वीचे रस घालूं शकत नाहीं; तर फक्त धान्य, मुळें वगैरेंचें बीज पेरूं शकतो. बीज पेरून त्यावर माती लोटतो; मग आपोआपच धान्य व मुळें वगैरेंत रस प्रवेश करितो. त्याप्रमाणें धर्म हा अधर्माच्या निवृत्तीला मात्र कारण आहे; कारण शुद्धि ( धर्म ) व अशुद्धि ( अधर्म ) यांचा परस्पर अत्यंत विरोध आहे. सारांश, धर्म हा प्रकृतीच्या प्रवृत्तीला कारण नाहीं. यांत धर्मविषयीं उदाहरण नंदीला ईश्वरपणा प्राप्त झाला वगैरे समजावें. आतां ज्या

वेळेस अधर्माचा जोर होतो त्या वेळेस उलट अधर्मच धर्माचा बाध करितो, ह्मणजे अधर्म धर्माची निवृत्ति करितोः त्याविषयीं सुद्धां, नहुषराजाला अजगरपणा प्राप्त झाला वगैरे उदाहरण समजावें ॥ ३ ॥

आतां ज्या वेळेस योगी ( प्रारब्धकर्माच्या उपभोगाकरितां ) अनेक देह एकदम निर्माण करितो त्या वेळेस त्या सर्व शरीरांमिळून एकच मन असतें किंवा प्रत्येक शरीरास मन पृथक् पृथक् असतें तें सांगतात,–

## निर्माणचित्तान्यस्मितामात्रात् ॥ ४ ॥

**सूत्रार्थः**–योगप्रभावानें प्रकृतीचा पुरवठा होऊन योग्यानें जर अनेक देह धारण केलें तर त्या वेळेस तितक्या शरीरांस अहंकारापासून चित्तांचा पुरवठा होतो.

**भाष्यम्–अस्मितामात्रं चित्तकारणमुपादाय निर्माणचित्तानि करोति । ततः सचित्तानि भवन्ति ॥ ४ ॥**

**भाष्यार्थः**– ( ज्या वेळेस योगी देह धारण करितो त्या वेळेस योग्याच्या संकल्पानें केवल अहंकारच मनास निमित्त करून प्रत्येक शरीरागणित चित्तें निर्माण करितो; त्यानंतर सर्व शरीरें चित्तयुक्त होतात.

आतां अनेक चित्तांच्या निर्माण करण्यांतही विशेष सांगतात,–

## प्रवृत्तिभेदे प्रयोजकश्चित्तमेकमनेकेषाम् ॥ ५ ॥

**सूत्रार्थः**–योग्याचें स्वतांचें चित्त दुसऱ्या उत्पन्न झालेल्या चित्तांवर अंमल चालविण्यास समर्थ असतें ह्मणून योग्याला अनुकूल असे भोग भोगितां येतात.

**भाष्यम्–बहूनां चित्तानां कथमेकचित्ताभिप्रायपुरःसरा प्रवृत्तिरिति सर्वचित्तानां प्रयोजकं चित्तमेकं निर्मिमीते ततः प्रवृत्तिभेदः ॥ ५ ॥**

**भाष्यार्थः**–आपल्या पूर्वचित्ताच्या अभिप्रायानुरोधानेंच अनेक निर्मित चित्तांची प्रवृत्ति कशी राहील असें मनांत आणून योगी सर्व चित्तांचें नियामक ( सर्व चित्तांना ताब्यांत ठेवणारें ) असें आपलें एक मुख्य चित्त करितो; त्यानंतर त्या चित्ताभिप्रायाप्रमाणेंच सर्व इतर चित्तांची प्रवृत्ति होते ॥ ५ ॥

आतां याप्रमाणें सांगितलेल्या पांच प्रकारच्या चित्तांत मोक्षाच्या उपयोगी पडणारें चित्त कोणतें याचा निश्चय सांगतात,–

## तत्र ध्यानजमनाशयम् ॥ ६ ॥

**सूत्रार्थः**–त्या जन्म इत्यादि सिद्धींपासून उत्पन्न झालेल्या सर्व चित्तांमध्यें समाधीपासून उत्पन्न झालेलें चित्तच कर्मवासनारहित असतें ( ह्मणून तें मोक्षाला योग्य होतें ).

**भाष्यम्–पञ्चविधं निर्माणचित्तं जन्मौषधिमन्त्रतपःसमाधिजाः सिद्धय इति । तत्र यदेव ध्यानजं चित्तं तदेवानाशयं, तस्यैव नास्त्याशयोरागादिप्रवृत्तिर्नातः पुण्यपापाभिसम्बन्धः, क्षीणक्लेशत्वाद्योगिन इति । इतरेषां तु विद्यते कर्माशयः॥ 'यतः' ॥६॥**

**भाष्यार्थः**–पूर्वी ज्या जन्म, ओषधि, मंत्र, तप व समाधि, यांपासून उत्पन्न होणाऱ्या पांच प्रकारच्या सिद्धी सांगितल्या, त्यांपासून जीं पांच प्रकारचीं चित्तें सिद्ध होतात; त्या सर्वांत समाधीपासून सिद्ध झालेलें जें चित्त तेंच अनाशय ह्मणजे वासनारहित असतें; ह्मणजे रागादिकांची प्रवृत्ति ज्या संस्कारापासून असा संस्काररूप कर्माशय त्याच चित्ताला नसतो; ह्मणून पुण्यपापांचाही संबंध त्या चित्ताशीं नसतो; कारण, योग्याचे अविद्यादि क्लेश सर्व नष्ट झालेले असतात. आणि इतर चार प्रकारच्या चित्तांचा कर्माशय ( कुशलाकुशल कर्मांच्या अनुरोधानें उत्पन्न होणाऱ्या वासना ) तसाच राहिलेला असतो ( ह्मणून त्या चित्तांच्या योगानें मोक्षप्राप्ति होणार नाहीं. ) ॥ ६ ॥

आतां योग्याच्या चित्तासारखें त्याचें कर्म सुद्धां इतरांपेक्षा विलक्षण असतें असें सांगतात,–

## कर्माऽशुक्लाकृष्णं योगिनस्त्रिविधमितरेषाम् ॥ ७ ॥

**सूत्रार्थः**–कांहींकांचें शुक्लकर्म, कांहींकांचें कृष्णकर्म व कांहींकांचें शुक्लकृष्ण असें मिश्रित कर्म असतें. आणि योगी जो असतो त्याचें या सर्वांहून निराळ्याच तऱ्हेचें अशुक्लाकृष्ण नांवाचें कर्म असतें.

**भाष्यम्–चतुष्पात् खल्वियं कर्मजातिः कृष्णा शुक्लकृष्णा शुक्लाऽशुक्लाकृष्णा चेति । तत्र कृष्णा दुरात्मनाम् । शुक्लकृष्णा बहिःसाधनसाध्या, तत्र परपीडानुग्रहद्वारेण कर्माशयप्रचयः । शुक्ला तपःस्वाध्यायध्यानवतां, सा हि केवले मनसि आयतत्वाद्बहिःसाधनाधीना न परान् पीडयित्वा भवति । अशुक्लाऽकृष्णा संन्यासिनां क्षीणक्लेशानां चरमदेहानामिति । तत्राऽशुक्लं योगिन एव फलसंन्यासादकृष्णं चानुपादानात् । इतरेषां तु भूतानां पूर्वमेव त्रिविधमिति ॥ ७ ॥**

**भाष्यार्थः**–कर्म ह्मणजे शरीरादिव्यापार. ह्या कर्माच्या जातींत कृष्ण, शुक्लकृष्ण, शुक्ल व अशुक्लाकृष्ण असे चार भाग आहेत. त्यांत कृष्णकर्म, जे दुष्ट हिंसक लोक आहेत त्यांच्या हातून होतें; पशु, सोम इत्यादि बाह्य साधनांनीं सिद्ध होणारे जे यज्ञ वगैरे तें शुक्लकृष्ण कर्म होय. त्यांत यागांतील साहित्य तयार करितांना मुंग्या वगैरे क्षुद्रजंतूंना पीडा होते; आणि देवता वगैरेंची आराधना केल्यामुळें त्यांचा अनुग्रह होतो; याप्रमाणें पापकर्माशय व पुण्यकर्माशय हे दोन्ही यागादिकांत उत्पन्न होतात, ह्मणून हें शुक्लकृष्ण कर्म होय. आतां तपस्वी, वेदाध्ययनशील व ध्यानी यांनीं फलकामना मनांत धरून केलेलें

जें मंत्रजप, तप वगैरे कर्म तें शुक्लकर्म होय; कारण, तीं सर्व कर्में केवल मनानेंच होत असल्यामुळें त्यांना बाह्य साधनांची मुळींच गरज नसते; ह्मणून तीं दुसऱ्यांस पीडा दिल्यावांचून होत असतात. आतां ज्यांनीं अभिमान व कर्मफलांचा त्याग केला आहे; ज्यांचे अविद्यादि क्लेश समूळ नाहींसे झाले आहेत व ज्यांना मुक्तियोग्य असा शेवटचा देह प्राप्त झाला आहे अशा योग्यांचें कर्म अशुक्ल व अकृष्ण असें होय. त्यांत कर्मफलाचा त्याग केल्यामुळें योग्याच्या हातून शुक्लकर्महीं घडत नाहीं; व कृष्णकर्माचा तर त्यानें मुळीं स्वीकारच केलेला नसतो. या निष्काम योग्याहून बाकी राहिले जे सकाम, दुष्ट वगैरे त्यांच्या हातून पूर्वीं सांगितलेलींच तीन प्रकारचीं कर्में होतात ॥ ७ ॥

आतां अशुक्लाकृष्णकर्माहून इतर तीन प्रकारच्या कर्माचें फल कसकसें प्राप्त होतें तें प्रसंगांत सांगतात,–

## ततस्तद्विपाकानुगुणानामेवाभिव्यक्तिर्वासनानाम् ॥ ८ ॥

**सूत्रार्थः**–त्या कर्मापासून त्या कर्माच्या विपाकांना अनुकूल असतील अशाच वासना प्रकट होतात.

**भाष्यम्–तत इति त्रिविधात्कर्मणः। तद्विपाकानुगुणानामेवेति यज्जातीयस्य कर्मणो यो विपाकस्तस्यानुगुणा या वासनाः कर्मविपाकमनुशेरते, तासामेवाभिव्यक्तिः। न हि दैवं कर्म विपच्यमानं नारकतिर्यङ्मनुष्यवासनाभिव्यक्तिनिमित्तं भवति, किंतु दैवानुगुणा एवास्य वासना व्यज्यन्ते। नारकतिर्यङ्मनुष्येषु चैवं समानश्चर्चः ॥ ८ ॥**

**भाष्यार्थः**–सूत्रांत जें 'ततः' असें पद आहे त्याचा अर्थ,-पूर्वीं सांगितलेल्या तीन प्रकारच्या कर्मापासून. तसेंच जी 'तद्विपाकानुगुणानामेव' अशी दोन वेगळालीं पदें आहेत त्यांचा अर्थ, ज्या जातीच्या ( प्रकारच्या ) कर्मापासून जो जाति, आयुष्य वगैरे विपाक ह्मणजे परिणाम त्याला अनुकूल अशाच वासना कर्मविपाकाचें अनुकरण करीत असतात. आणि कर्मफल उत्पन्न होण्याच्या वेळीं त्याच वासना प्रकट होतात. पहा! दैव ह्मणजे देवशरीर वगैरे ज्या कर्माच्या योगानें प्राप्त व्हावयाचें अशा कर्माचा फलकाल प्राप्त झाला असतां त्या वेळेस तें ( दैव ) कर्म नरकांत राहणारे प्राणी, पक्षी व मनुष्य ह्यांच्या वासना प्रकट करण्यास ह्मणजे निमित्त होतें असें नाहीं; तर दैवकर्मविपाकाला अनुकूल ज्या वासना त्याच त्या कर्माच्या योगानें प्रकट होतात. जो विचार दैवकर्मविपाकाविषयीं सांगितला तसाच विचार नरकांतील प्राणी, पशुपक्षी व मनुष्य अशीं फळें ज्या योगानें प्राप्त होतात अशा कर्मविपाकाविषयीं समजावा ॥ ८ ॥

आतां कर्मफलास अनुकूल अशा वासनांना अनेक जन्मांचें जरी व्यवधान असलें तथापि कर्मफलकालीं तदनुकूलच वासना प्रकट होतात अशाबद्दल कारण सांगतात,–

## जातिदेशकालव्यवहितानामप्यानन्तर्य्यं स्मृतिसंस्कारयोरेकरूपत्वात् ॥ ९ ॥

**सूत्रार्थः**—स्मृति व संस्कार हे दोन्ही एकच आहेत ह्मणून जाति, देश व काल यांचें मध्यें पुष्कळ व्यवधान असलें तरी तें व्यवशान न होतां विपाकास अनुकूळ अशाच वासना प्रकट होतात.

**भाष्यम्—वृषदंशविपाकोदयः स्वव्यञ्जकाञ्जनाभिव्यक्तः स यदि जातिशतेन वा दूरदेशतया वा कल्पशतेन वा व्यवहितः, पुनश्च स्वव्यञ्जकाञ्जन एवोदियात्तदा द्रागित्येव पूर्वानुभूतवृषदंशविपाकाभिसंस्कृता वासना उपादाय व्यज्येत । कस्मात् । यतो व्यवहितानामप्यासां सदृशं कर्माभिव्यञ्जकं निमित्तीभूतमित्यानन्तर्य्यमेव । कुतश्च, स्मृतिसंस्कारयोरेकरूपत्वात् । यथाऽनुभवास्तथा संस्कारास्ते च कर्मवासनानुरूपाः । यथा च वासनास्तथा स्मृतिः । इति जातिदेशकालव्यवहितेभ्यः संस्कारेभ्यः स्मृतिः,स्मृतेश्च पुनः संस्कारा इत्येते स्मृतिसंस्काराः कर्माशयवृत्तिलाभाद्व्यज्यन्ते अतश्च, व्यवहितानामपि निमित्तनैमित्तिकभावानुच्छेदादानन्तर्य्यमेव सिद्धमिति ॥९॥**

**भाष्यार्थः**—ज्या कर्माच्या योगानें बैलास चावणाऱ्या माशांचा जन्म प्राप्त होतो,अशा वृषदंशरूपविपाकाचा ज्या वेळेस पूर्वी आरंभ झाला होता त्या वेळेस तो ( वृषदंशविपाकारंभ ) आपल्याला प्रकट करणारें जें शरीर, कर्म इत्यादि, त्याच्या योगानें प्रकट झाला होता. पुढें त्यामध्यें जरी शेंकडों जन्म अथवा दूर देश किंवा शेंकडों कल्पांचें व्यवधान झालें तथापि तो पुनः ज्या वेळेस आपल्याला प्रकट करणारें शरीर, कर्म इत्यादि प्राप्त होऊन प्रकट होतो तेव्हां अशादिशीं पूर्वी प्राप्त झालेल्या वृषदंशरूपविपाकापासून उत्पन्न झालेल्या वासनां-( संस्कारां ) प्रत घेऊनच प्रकट होतो. हें कशावरून तर ज्या कारणास्तव ह्या वासनांना अनेक जन्म, देश व काल यांचें व्यवधान असलें तरी सदृश ( ज्यापासून समानच फल प्राप्त व्हावयाचें असें ) कर्म अभिव्यंजक ह्मणजे निमित्त आहे ह्मणून त्यांना व्यवधान कोणाचेंच होऊं शकत नाहीं. व दुसरें असें कीं, स्मृति व संस्कार यांचें स्वरूप एकच आहे. ह्मणजे जसे अनुभव तसेच संस्कार असतात; आणि ते संस्कारही कर्मवासनारूपच असतात. जशा वासना तसेंच स्मरण होतें. याप्रमाणें जन्म, देश व काल यांचें व्यवधान जरी मध्यें असलें तथापि संस्कारांपासून स्मृति व स्मृतीपासून पुनः संस्कार, याप्रमाणें हे स्मृतिहेतु संस्कार कर्माशयाच्या उद्बोधानें ( उदयानें ) प्रकट होतात, ह्मणून वासनांमध्यें व्यवधान जरी असलें तथापि कार्यकारणभाव जर कायम आहे तर त्यांचा नेहमीं जवळपणाच सिद्ध आहे ॥९॥

**येथें अशी शंका येते कीं, अगदीं पहिल्या प्रथम जो अनुभव येतो तो काय वासनेमुळेंच परंपरेनें उत्पन्न होतो किंवा त्यास कांहींएक निमित्तच नसतें ? जर त्यास कांहींएक**

निमित्त नसेल तर ह्या जन्मांतही येणाऱ्या अनुभवास पूर्वजन्मांतील वासना निमित्त मानावयास नको; व अथात्. पूर्वजन्मही मानण्याचें कारण राहिलें नाहीं; असें ह्मणणाऱ्या चार्वाकास आतां समाधान सांगतात,–

## तासामनादित्वं चाशिषो नित्यत्वात् ॥ १० ॥

**सूत्रार्थः**–इष्टवस्तुविषयीं नेहमीं मोह उत्पन्न होतो, या कारणावरून वासना ह्या अनादि आहेत.

**भाष्यम्**–तासां वासनानामाशिषो नित्यत्वादनादित्वम् । येयमात्माशीर्मा न भूवं भूयासमिति सर्वस्य दृश्यते । सा न स्वाभाविकी । कस्मात् । जातमात्रस्य जन्तोरननुभूतमरणधर्मकस्य द्वेषदुःखानुस्मृतिनिमित्तो मरणत्रासः कथं भवेत् । न च स्वाभाविकं वस्तु निमित्तमुपादत्ते । तस्मादनादिवासनानुविद्धमिदं चित्तं निमित्तवशात्काश्चिदेव वासनाः प्रतिलभ्य पुरुषस्य भोगायोपावर्तते इति । घटप्रासादप्रदीपकल्पं संकोचविकाशि चित्तं शरीरपरिमाणाकारमात्रमित्यपरे प्रतिपन्नास्तथा चान्तराभावः संसारश्च युक्त इति । वृत्तिरेवास्य विभुनः संकोचविकाशिनीत्याचार्यः। तच्च धर्मादिनिमित्तापेक्षम् । निमितं च द्विविधं बाह्यमाध्यात्मिकं च । शरीरादिसाधनापेक्षं बाह्यं स्तुतिदानाभिवादनादि । चित्तमात्राधीनं श्रद्धाद्याध्यात्मिकम् । तथा चोक्तम् । ये चैते मैत्र्यादयो ध्यायिनां विहारास्ते बाह्यसाधननिरनुग्रहात्मानः प्रकृष्टं धर्ममभिनिर्वर्तयन्ति। तयोर्मानसं बलीयः । कथम् । ज्ञानवैराग्ये केनातिशय्येते । दण्डकारण्यं चित्तव्यतिरेकेण कः शारीरेण कर्मणा शून्यं कर्तुमुत्सहेत, समुद्रमगस्त्यवद्वा पिबेत् ॥ १० ॥

**भाष्यार्थः**–इच्छा प्रत्येक जन्मामध्यें नियमानें असते ह्मणून वासनांना प्रारंभकाल नाहीं. ( त्या अनादिसिद्धकालापासून परंपरेनें चालत आलेल्या आहेत. जी ही प्रत्येक प्राण्याच्या ठिकाणीं नेहमीं इच्छा दृष्टीस पडते कीं, ' मीं नेहमीं असावें, कधीं नसावें असें नाहीं. ' ती इच्छा स्वाभाविक ह्मणतां येत नाहीं; कारण, कोणत्याही प्राण्यानें जर मरणापासून होणाऱ्या दुःखाचा अनुभव घेतला नसता तर तो उत्पन्न झाल्याबरोबर ह्मणजे अगदींच अज्ञानअवस्थेंत सुद्धां मरणाचा त्रास कसा मानता ? ( ज्याअर्थी या जन्मीं मरणदुःखाचा अनुभव नसतां मरणाचा त्रास मानितो ) त्यावरून पूर्वजन्मामध्यें मरणदुःखाचा जो अनुभव घेतला त्याचें स्मरण होऊन प्राणी मरणाचा द्वेष करूं लागतो. व दुसरें असें कीं, कोणतीही वस्तु अनुभवावांचून केवल स्वभावतांच सुखदुःखांस निमित्त मानिलेली नसते; ह्मणून चित्त नेहमीं अनादिवासनांनीं युक्त आहे, तें कांहींएक कारणानें

कित्येक वासनांप्रत घेऊन पुरुषाच्या उपभोगाकरितां प्रवृत्त होतें. ( तें प्रत्येक पुरुषाप्रत सर्वशरीरसाधारण व एकेकच आहे. ) आणि जसा दिव्याचा संकोची व विकाशी स्वभाव आहे ह्मणजे त्याचा प्रकाश घागरींत संकोचानें राहतो व मोठ्या वाड्यांत विस्तारानें पडतो: त्याप्रमाणें चित्त लहान मोठ्या शरीराच्या आकारमानाप्रमाणें लहान मोठ्या प्रमाणानें ह्मणजे अत्यंत लहान शरीरांत अत्यंत संकोचवृत्तीनें व अत्यंत मोठ्या शरीरांत अतिविस्तारानें राहतें: केवळ व्यापकच नाहीं; असें सांख्यतत्त्ववेत्ते मानितात. आणि याप्रमाणें लहान मोटें होण्याचा त्याचा स्वभाव आहे ह्मणूनच प्रलयकालीं त्याचा लय व ह्यां लोकांतून परलोकांत त्याचें जाणें हीं योग्य रीतीनें त्याला संभवतात. परंतु या शास्त्राचा आचार्य जो पतंजलिमुनि अथवा ब्रह्मदेव त्याचें मत असें नाहीं तर, चित्त हें आकाशाप्रमाणें विभु ह्मणजे व्यापकच खरें परंतु त्याचा संकोच व प्रसरण पावणें हा धर्म आहे; व संकोच व प्रसरण पावणें यांस धर्म व अधर्म हे कारण आहेत. निमित्त ( कारण ) दोन प्रकारचें; बाह्य व आध्यात्मिक. त्यांत शरीर, इंद्रियें इत्यादि साधनांनी होणारें जें स्तुति, दान, अभिवादन ( विधिपूर्वक नमस्कार ), निंदा, परद्रव्यापहार व दुसऱ्याची अमर्यादा करणें इत्यादि हें बाह्यनिमित्त होय. आणि केवल मनाच्या साधनानेंच मात्र होणारें जें श्रद्धा, वीर्य, स्मृति, समाधि ( यांची व्याख्या पूर्वी समाधिपाद सू० २० त केली ), व यांच्या उलट जें अश्रद्धा इत्यादि, हें आध्यात्मिक निमित्त होय. याप्रमाणें पूर्वीच्या आचार्यांनी ह्मटलेंही आहे कीं, ' योग्यांच्या मैत्री, करुणा इत्यादि व्यापारांस शरीरादि बाह्यसाधनांची कांहींएक गरज नसून ते शुक्लधर्मांप्रत उत्पन्न करितात; ह्मणून बाह्य व आध्यात्मिक ( मानस ) कर्मांमध्यें मानस कर्म अतिशयच प्रबल आहे. कारण, ज्ञान व वैराग्यरूप मानस कर्मांचा कोणाच्यानें पराभव होणार आहे ? यास प्रत्यक्ष उदाहरण,–( एके वेळी दंडकदेशचा राजा रागावला असतां त्याच्या संकल्पानें इंद्रानें तेथें पाषाणवृष्टि करून सर्व दंडकारण्य निर्जन करून टाकिलें. ) याप्रमाणें दंडकारण्यास जनशून्य करण्यास एक मनावांचून कोणतें शारीर कर्म समर्थ होणार आहे ? अथवा अगस्त्यमुनीप्रमाणें मानस बलावांचून समुद्राचें कोण प्राशन करणार आहे ? ॥ १० ॥

आतां मोक्षाच्या उपपत्तीकरितां अनादि व असंख्य जरी वासना आहेत तथापि त्यांचा उच्छेद कसा होतो तें सांगतात,–

## हेतुफलाश्रयालम्बनैः संगृहीतत्वादेषामभावे तदभावः ॥ ११ ॥

**सूत्रार्थः**–कारण, फळ, ठिकाण व आधार या कारणांमुळें अनंतावधि वासनांचा संग्रह झाला आहे. याकरितां ह्या कारणांचा अभाव झाला असतां वासनांचाही अभाव होतो.

भाष्यम्—हेतुर्धर्मात्सुखमधर्माद्दुःखं, सुखाद्रागो दुःखाद्द्वेषस्ततश्च प्रयत्नस्तेन मनसा वाचा कायेन वा परिस्पन्दमानः परमनुगृह्णाति, उपहन्ति वा । ततःपुनर्धर्माधर्मौ सुखदुःखे रागद्वेषाविति 'प्रवृत्तमिदं षडरं संसारचक्रमस्य च प्रतिक्षणमावर्तमानस्याविद्या नेत्री मूलं सर्वक्लेशानामित्येष हेतुः । फलं तु यमाश्रित्य यस्य प्रत्युत्पन्नताधर्मादेर्न ह्यपूर्वोपजनः । मनस्तु साधिकारमाश्रयो वासनानाम् । न ह्यवसिताधिकारे मनसि निराश्रया वासनाः स्थातुमुत्सहन्ते । यदभिमुखीभूतं वस्तु यां वासनां व्यनक्ति तस्यास्तदालम्बनम् । एवं हेतुफलाश्रयालम्बनैरेतैः संगृहीताः सर्वा वासनाः, एषामभावे तत्संश्रयाणामपि वासनानामभावः । 'नास्त्यसतः संभवो न चास्ति सतो विनाश इति द्रव्यत्वेन संभवन्त्यः कथं निवर्तिष्यन्ते वासनाः' इति ॥ ११ ॥

**भाष्यार्थः**—सूत्रांतील ' हेतु ' या शब्दाचा अर्थ असा कीं, धर्मापासून सुख व अधर्मापासून दुःख; पुढें सुखापासून प्रीति व दुःखापासून द्वेष, उत्पन्न होतो. त्यानंतर प्रयत्न सुरू होतो. त्यायोगानें मनानें, वाणीनें अथवा शरीरानें व्यापार होऊन दुसऱ्यावर दया केली जाते किंवा तो दुसऱ्याचा नाश करितो. त्यापासून धर्मअधर्म, सुखदुःख, राग (प्रीति) द्वेष ( अप्रीति ) याप्रमाणें सहा आरे ( पाकळ्या ) ज्याला आहेत असें हें संसारचक्र फिरण्याजोगें तयार झालें. तें प्रत्येक क्षणीं फिरत असतां त्याला दंडाप्रमाणें फिरविणारी जी अविद्या, हीच सर्व क्लेशांचें मूळ व वासनांचें कारण आहे. ज्या पुरुषार्थाला उद्देशून धर्मादि उत्पन्न झालें तेंच वासनांचेंही फल आहे. आतां येथें धर्मादिकांची उत्पत्ति ह्मणजे वर्तमानता, अपूर्व उत्पत्ति नव्हे. ( याप्रमाणें वासनांचा हेतु व फल हीं सांगितलीं. ) आतां ज्या चित्ताला पुरुषार्थ ( पुरुषाचें काम) बाकी आहे तें चित्त वासनांचा आश्रय (ठिकाण) होय. ज्या वेळेस मनाचें पुरुषार्थरूप कार्य संपतें त्या वेळेस वासना निराश्रय झाल्यामुळें मग त्या राहूं शकत नाहींत. आतां ज्या वस्तूला पाहून ज्या वासना उत्पन्न होतात तीच वस्तु त्या वासनांचें आलंबन ( आधार ) होय. याप्रमाणें हेतु, फल, आश्रय व आलंबन यांच्यामुळें ह्या सर्व वासनांचा संग्रह ( संचय ) झाला आहे. ह्मणून हेतु इत्यादिकांचा समूळ नाश झाला असतां त्यांच्या आश्रयानें राहणाऱ्या ज्या वासना त्यांचाही समूळ नाश होईल ॥ ११ ॥

आतां या शास्त्रांत जागजागीं सत्कार्यवादाचा स्वीकार केला आहे ह्मणून वासनांचा समूळ नाश होणें संभवत नाहीं अशी शंका घेऊन समाधान सांगतात,—

## अतीतानागतं स्वरूपतोऽस्त्यध्वभेदाद्धर्माणाम् ॥ १२ ॥

**सूत्रार्थः**—जसें वर्तमान काळचे धर्म स्वरूपानें (प्रत्यक्ष) असतात त्याचप्रमाणें भूत व भविष्य काळचे सुद्धां धर्म स्वरूपानेंच असतात; मग वर्तमानकाळच्या धर्मांप्रमाणें ते स्पष्ट कां दिसत नाहींत तर त्यांचे मार्गच भिन्न पडले.

भाष्यम्–भविष्यद्व्यक्तिकमनागतम् । अनुभूतव्यक्तिकमतीतम् । स्वव्यापारोपारूढं वर्तमानम् । त्रयं चैतद्वस्तु ज्ञानस्य ज्ञेयम् । यदि चैतत्स्वरूपतो नाभविष्यन्नेदं निर्विषयं ज्ञानमुदपत्स्यत । तस्मादतीतानागतं स्वरूपतोऽस्तीति । किंच भोगभागीयस्य वाऽपवर्गभागीयस्य वा कर्मणः फलमुत्पित्सु यदि निरुपाख्यमिति तदुद्देशेन तेन निमित्तेन कुशलानुष्ठानं न युज्येत । सतश्च फलस्य निमित्तं वर्तमानीकरणे समर्थं नापूर्वोपजनने । सिद्धं निमित्तं नैमित्तिकस्य विशेषानुग्रहणं कुरुते नापूर्वमुत्पादयति । धर्मी चानेकधर्मस्वभावस्तस्य चाध्वभेदेन धर्माः प्रत्यवस्थिताः । न च यथा वर्तमानं व्यक्तिविशेषापन्नं द्रव्यतोऽस्त्येवमतीतमनागतं च, कथं तर्हि स्वेनैव व्यङ्ग्येन स्वरूपेणानागतमस्ति स्वेन चानुभूतव्यक्तिकेन स्वरूपेणातीतमिति वर्तमानस्यैवाध्वनः स्वरूपव्यक्तिरिति । न सा भवत्यतीतानागतयोरध्वनोः । एकस्य चाध्वनः समये द्वावध्वानौ धर्मिणमन्वागतौ भवत एवेति नाभूत्वा भावस्त्रयाणामध्वनामिति ॥ १२ ॥

भाष्यार्थः– जी वस्तु पुढें प्रकट होणार आहे ती अनागत; जी वस्तु प्रकट होऊन गेली ती अतीत; व ज्या वस्तूचा हल्लीं व्यापार चालू आहे ती वर्तमान वस्तु होय. ह्या तिन्ही काळच्या वस्तू स्वरूपानें नेहमीं आहेत; कारण, योग्याला त्या भूत व भविष्य काळच्या वस्तू सुद्धां नेहमीं प्रत्यक्ष दिसतात. जर त्या भूत व भविष्य काळांत स्वरूपानें नसत्या तर त्या ( संयमांचा विषय नसल्यामुळें ) त्यांचें प्रत्यक्ष ज्ञान योग्याला झालें नसतें. त्याकरितां अतीत व अनागत वस्तू नेहमी स्वरूपानें आहेत. आणिक दुसरें असें कीं, भोगाला साधन अथवा मोक्षाला साधन जें कर्म त्याचें फल पुढें उत्पन्न व्हावयाचें असतें ह्मणजे अनागत असतें; आतां जर तें स्वरूपतां नसेल तर त्याच्या उद्देशानें ( त्याच्या प्राप्तीकरितां ) योगिपुरुषाचें अनुष्ठान कांहीं योग्य नाहीं; कारण, जर फल असेल तर त्याबद्दल केलेलें अनुष्ठान तें फल देण्यास समर्थ होईल; अपूर्व ( स्वरूपता नसलेलें ) फल उत्पन्न करण्याविषयीं नाहीं. तसेंच कोणतेंही निमित्त ( कर्म ) फलप्राप्तीस विशेष साधनभूत होतें एवढेंच; कांहीं नवीन फल उत्पन्न करीत नाहीं. ( धर्म ज्याला आहे तो धर्मी. त्या ) धर्मीच्या धर्माचे अनेक स्वभाव असतात; ह्मणून ते मार्गभेदानें राहिलेले असतात. आतां जसा वर्तमान धर्म स्पष्टपणास आल्यामुळें आपला व्यापार करितो त्याप्रमाणें अतीत व अनागत धर्म नाहींत; तर अनागत धर्म पुढें प्रकट होणाऱ्या स्वरूपानें व अतीत धर्म मागें प्रकट होऊन गेलेल्या स्वरूपानें असतात; वर्तमानच धर्म मात्र त्या वेळेस प्रकटस्वरूपानें असतो. तसें प्रकट स्वरूप अतीत व अनागत या दोहोंचेंही नसतें. आणि एका अध्याच्या ( मार्गाच्या ) वेळीं दोन अध्वे धर्मीच्या बरोबरच असतात; ह्मणून तिन्ही अध्वे पूर्वी नसून नवीन उत्पन्न होतात असें नाहीं ॥ १२ ॥

आतां ते धर्म व धर्मी कोणत्या स्वरूपाचे आहेत तें सांगतात,–

## ते व्यक्तसूक्ष्मा गुणात्मानः ॥ १३ ॥

**सूत्रार्थः**–ते तिन्ही काळचे धर्म गुणांपासून उत्पन्न झालेले ह्मणून त्यांचें गुणस्वरूपच नित्य आहे.

**भाष्यम्–ते खल्वमी त्र्यध्वानो धर्मा वर्तमाना व्यक्तात्मानोऽतीतानागताः सूक्ष्मात्मानः। सर्वमिदं गुणानां संनिवेशविशेषमात्रमिति परमार्थतो गुणात्मानः । तथा च शास्त्रानुशासनम् । 'गुणानां परमं रूपं न दृष्टिपथमृच्छति ॥ यत्तु दृष्टिपथं प्राप्तं तन्मायेव सुतुच्छकम्' इति ॥ 'यदा तु सर्वे गुणाः कथमेकः शब्द एकमिन्द्रियम्' इति ॥१३॥**

**भाष्यार्थः**–त्या धर्मीच्या अध्वनामक धर्मांपैकीं वर्तमान धर्म व्यक्त ( स्पष्ट ) स्वरूपानें असतात; आणि अतीत व अनागत धर्म अत्यंत सूक्ष्मरूपानें असतात. हा स्थूल-सूक्ष्मात्मक सर्व प्रपंच सत्वादि तीन गुणांच्या कांहींएक विशेष संयोगानें मात्र दृष्टिगोचर झाला आहे. वस्तुतः ह्यांचें हें स्वरूप अगदीं तुच्छ असून ह्या सर्वांचें गुणस्वरूपच नित्य आहे. असें षष्टितंत्रशास्त्रांत सांगितलेंही आहे कीं, 'गुणांचें जें नित्यरूप आहे तें मुळींच आपल्या दृष्टी पडत नाहीं; आणि जें स्वरूप दृष्टी पडत आहे तें लौकिकमायेप्रमाणें अगदींच तुच्छ ( असार ) आहे ' ॥ १३ ॥

आतां जर सर्व विकार अनेकगुणमात्र आहेत तर त्यांत एक शब्द व एक इंद्रिय असा लोक व शास्त्राचा व्यवहार कसा होतो ? याचें समाधान सांगतात,–

## परिणामैकत्वाद्वस्तुतत्त्वम् ॥ १४ ॥

**सूत्रार्थः**–वस्तुतः जरी तीन गुण अनेक आहेत तथापि त्यांचा परिणाम एक होतो ह्मणून त्यांचा महत्तत्त्व इत्यादि स्थलीं एकत्वानें व्यवहार होतो.

**भाष्यम्–प्रख्याक्रियास्थितिशीलानां गुणानां ग्रहणात्मकानां करणभावेनैकः परिणामः श्रोत्रमिन्द्रियमिति । ग्राह्यात्मकानां शब्दभावेनैकः परिणामः शब्दो विषय इति । शब्दादीनां मूर्तिसमानजातीयानामेकः परिणामः पृथ्वीपरमाणुस्तन्मात्रावयवः। तेषां चैकः परिणामः पृथ्वी गौर्वृक्षः पर्वत इति। एवमादिभूतान्तरेष्वपि स्नेहौष्ण्यप्रणामित्वावकाशदानान्युपादाय सामान्यमेकविकारारम्भः समाधेयः। नास्त्यर्थो विज्ञानविसहचरोऽस्ति तु ज्ञानमर्थविसहचरं स्वप्नादौ कल्पितमित्यनया दिशा ये वस्तुस्वरूपमपह्नुवते ज्ञानपरिकल्पनामात्रं वस्तु स्वप्नविषयोपमं न परमार्थतोऽस्तीति ये आहुस्ते तथेति । प्रत्युपस्थितमिदं स्वमाहात्म्येन वस्तु कथमप्रमाणात्मकेन विकल्प**

**ज्ञानबलेन वस्तुस्वरूपमुत्सृज्य तदेवापलपन्तः श्रद्धेयवचनाः स्युः ॥ 'कुतश्चैतदन्याय्यम्' ॥ १४ ॥**

**भाष्यार्थः**–प्रकाश, प्रवृत्ति व स्थिति ( जडत्व ) हे, सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांचे तीन वेगवेगळाले स्वभाव खरे, परंतु ज्या वेळेस त्या तिघांत सत्त्वगुण प्रधान असतो त्या वेळेस त्यांचा बाह्यकरणत्वेंकरून श्रोत्रेंद्रिय असा एकच परिणाम होतो. ( श्रोत्रेंद्रियशब्दानें येथें पांचही ज्ञानेंद्रियांचें उपलक्षण समजावयाचें. ) त्याचप्रमाणें तीन गुणांत ज्या वेळेस तमोगुण प्रधान असतो त्या वेळेस त्या तिघांचा शब्दतन्मात्ररूप द्रव्य असा एक परिणाम होतो. ( येथेंही शब्दतन्मात्रशब्दानें रसादितन्मात्रांचें उपलक्षण समजावयाचें.) ( आणि ज्या वेळेस त्या तिघांत रजोगुण प्रधान असतो त्या वेळेस त्या तिघांचा वाणी इत्यादि पंचकर्मेंद्रियरूप एक परिणाम होतो. ) ( याप्रमाणें हा त्रिगुणांचा सूक्ष्म परिणाम सांगितला; आतां स्थूल परिणाम सांगतात,–) पृथ्वीत्वाशीं सजातीय जीं शब्दादि पंचतन्मात्रें त्यांपासून स्थूलपृथ्वीचा जो अत्यंत सूक्ष्म भाग तो एक परिणाम होतो. त्या पृथ्वीपरमाणूचे तन्मात्र अवयव असतात. ते अनेक पृथ्वीपरमाणू मिळून त्यांचा पृथ्वी, गाय, वृक्ष, पर्वत याप्रमाणें एक परिणाम होतो. याचप्रमाणें जल इत्यादि अन्यभूतांविषयीं सुद्धां, जलत्व इत्यादिकांशीं सजातीय जीं पंचतन्मात्रें त्यांस घेऊन जल इत्यादि एक परिणाम होतो असें उपपादन करावें. (सारांश, शब्दतन्मात्र व अहंकार यांपासून आकाशाणु ( आकाशाचा परम सूक्ष्म भाग ) होतो; ते सूक्ष्म भाग अनेक मिळाले ह्मणजे महाकाश होतें. शब्दतन्मात्र, स्पर्शतन्मात्र व अहंकार यांपासून वायुपरमाणु होतो व ते अनेक मिळाले ह्मणजे महावायु होतो. शब्द, स्पर्श व रूप हीं तीन तन्मात्रें व अहंकार यांपासून तेजःपरमाणु व ते अनेक मिळून महातेज होतें. शब्द, स्पर्श, रूप व रस हीं चार तन्मात्रें व अहंकार यांपासून जलपरमाणु व ते अनेक मिळून महाजल होतें. आणि शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हीं पांच तन्मात्रें व अहंकार यांपासून पृथ्वीपरमाणु व ते अनेक मिळून स्थूल पृथ्वी होते. येथें अहंकारशब्दानें तामस अहंकार घ्यावयाचा. ) शब्दज्ञानानुपाती असून वस्तुशून्य अशा प्रकारचें जें समाधिपादांत अप्रमाणकोटींत विकल्पज्ञान सांगितलें; त्यास विज्ञान ह्मणतात. या विज्ञानमताचा स्वीकार करणारा ह्मणजे सर्व प्रपंच शशशृंग, वंध्यापुत्र इत्यादिवत् केवल कल्पनामात्र आहे असें मानणाऱ्या विज्ञानवाद्यास उद्देशून भाष्यकार सांगतात कीं, 'ज्या वेळेस विज्ञान ( विकल्प ज्ञान ) असतें त्या वेळेस अर्थ ( वस्तु ) नसतो; परंतु स्वप्न, भ्रांति वगैरे वेळीं अर्थ नसतांना सुद्धां ज्ञान असतें ( ह्मणजे विषयावांचूनच स्वप्नादिसमयीं ज्ञान असतें, ) त्या एका ज्ञानानेंच सर्व व्यवहाराची उपपत्ति होत असतां स्वप्नादिकांप्रमाणें जाग्रदवस्थेंतील पदार्थ सुद्धां केवल कल्पनामात्र ( भासमात्र ) आहेत; ( ज्ञानाशिवाय

पृथक् वस्तु कांहीं नाहीं. ) ' अशा युक्तीनें जे ( बौद्ध वगैरे ) वस्तूचें स्वरूप अगदींच झांकून ठेवितात ह्मणजे सर्व वस्तू वस्तुतः ज्ञानपरिकल्पनामात्र ह्मणजे स्वप्नांतील विषयाप्रमाणें अगदींच खोट्या आहेत असें ह्मणतात; तेच ( विज्ञानवादी वगैरेच ) तसे ( खोटे ) आहेत. कारण, ह्या सर्व वस्तु आपल्या माहात्म्यानें ( प्रधानादिकांच्या संबंधानेंच ) उत्पन्न झाल्या आहेत; आणि वस्तुस्वरूप प्रत्यक्षप्रमाणानें त्यांनीं ग्रहण केलें आहे असें असतां स्वप्नज्ञानरूप दृष्टांताच्या जोरावर जो ते वस्तुस्वरूपाचा अपलाप करितात; तें त्यांचें बोलणें विश्वासाला पात्र कसें होईल ? ह्मणजे त्यांचें बोलणें केवल अपलापाचें आहे. ( कारण, स्वप्नदृष्टांतानें जर त्यांनीं जाग्रज्ज्ञानाच्या विषयाचा अलाप केला तर त्यांना अभिप्रेत जें यत्किंचित् ज्ञान त्याचा विषय तरी ते प्रामाणिक खरा कसा मानतील ? ह्मणून तेच नास्तिक आहेत; वस्तु खोटी नाहीं. ) ॥ १४ ॥

आतां विज्ञानवादावर दुसरें दूषण सांगतात,—

## वस्तुसाम्ये चित्तभेदात्तयोर्विभक्तः पन्थाः ॥ १५ ॥

**सूत्रार्थः**—एकाच वस्तूविषयीं अनेक चित्तांच्या अनेक भावना होतात ह्मणून पदार्थाचें ज्ञान व पदार्थ या दोहोंचें स्वरूप जाणण्याचे मार्ग अगदीं निरनिराळे आहेत.

**भाष्यम्**—बहुचित्तावलम्बनीभूतमेकं वस्तु साधारणं तत्खलु नैकचित्तपरिकल्पितं नाऽप्यनेकचित्तपरिकल्प्यं किंतु स्वप्रतिष्ठम् । कथम् । वस्तुसाम्ये चित्तभेदाद्धर्मापेक्षं चित्तस्य वस्तुसाम्येऽपि सुखज्ञानं भवत्यधर्मापेक्षं तत एव दुःखज्ञानमविद्यापेक्षं तत एव मूढज्ञानं सम्यग्दर्शनापेक्षं तत एव माध्यस्थ्यज्ञानमिति कस्य तच्चित्तेन परिकल्पितम् । न चान्यचित्तपरिकल्पितेनार्थेनान्यस्य चित्तोपरागो युक्तः । तस्माद्वस्तुज्ञानयोर्ग्राह्यग्रहणभेदभिन्नयोर्विभक्तः पन्था नाऽनयोः सङ्करगन्धोऽप्यस्तीति । सांख्यपक्षे पुनर्वस्तु त्रिगुणं चलं च गुणवृत्तमिति धर्मादिनिमित्तापेक्षं चित्तैरभिसंबद्ध्यते । निमित्तानुरूपस्य च प्रत्ययस्योत्पद्यमानस्य तेन तेनात्मना हेतुर्भवति । केचिदाहुर्ज्ञानसहभूरेवार्थो भोग्यत्वात्सुखादिवदिति । त एतया द्वारा साधारणत्वं बाधमानाः पूर्वोत्तरेषु क्षणेषु वस्तुरूपमेवापह्नुवते ॥ १५ ॥

**भाष्यार्थः**—एक वस्तु अनेक चित्तांमध्यें सारख्या रीतीनें विषय होते ह्मणून ती एका चित्तानें कल्पित नाहीं व अनेक चित्तांनींही कल्पिलेली नाहीं; तर चित्तावांचून स्वतांच स्थित आहे. कशावरून ह्मणाल तर, 'वस्तु तर एकच असतें परंतु तिच्याविषयीं अनेकांची अनेकप्रकारची भावना ( बुद्धि ) होते ह्मणून. ती भावना अशी,—स्त्री एकच खरी, परंतु तिच्याविषयीं धर्मनिमित्तानें नवऱ्यास सुखकारक अशी भावना होते; अधर्मनिमित्तानें तिच्यापासूनच सवतीस दुःखकारक अशी भावना होते. अविवेकामुळें तिच्याविषयीं

इच्छा करणाऱ्या परपुरुषास ती प्राप्त न झाल्यामुळें खेदकारक अशी भावना होते; व चांगला विचार केल्यामुळें वैराग्यशील पुरुषास तिच्याविषयीं उपेक्षाबुद्धि उत्पन्न होते. आतां जर चित्ताहून शिवाय पदार्थ नसता व सर्व पदार्थ बुद्धिकल्पितच असते तर कोणत्या चित्तानें पदार्थ कल्पिला समजावयाचा? ( जर अमुक चित्तानें पदार्थ कल्पिलेला मानिला तर त्याबद्दल प्रीति दुसऱ्या चित्तास असणार नाहीं; कारण, ) एकाच्या चित्तानें कल्पिलेल्या वस्तूबद्दल दुसऱ्याच्या चित्ताची प्रीति असणें हें कोणत्याही रीतीनें योग्य होऊं शकणार नाहीं. याकरितां पदार्थ व तत्संबंधी ज्ञान हे दोन, एक ग्राह्य व एक ग्रहण अशा भिन्न भिन्न धर्मांमुळें अगदींच भिन्न असल्यामुळें त्यांचा मार्ग अगदींच वेगळा आहे; त्यांचा परस्परांचा एकत्वाबद्दल कांहींच संबंध नाहीं. आणि दुसरें असें कीं, सांख्यमतांत वस्तु त्रिगुणात्मक ( सुखदुःखमोहात्मक ) व चित्त चलस्वभाव असल्यामुळें धर्मादिनिमित्तवशानें सुखादिकांकरितांच चित्तांशीं वस्तूचा संबंध होतो; ( ज्ञानाचा होत नाहीं. ) तसेंच धर्मादिनिमित्तास अनुसरून असणारा व पुढें उत्पन्न होणारा जो सुख, दुःख इत्यादिरूप प्रत्यय ( अनुभव ) त्याप्रत सुखादिरूपत्वेंकरूनच वस्तु कारण होते; (ह्मणून ज्ञानाहून शिवाय वस्तु भिन्न आहे.) कोणी असें ह्मणतात कीं, (ज्ञानाहून भिन्न अर्थ (वस्तु) मानिती तो माना परंतु तो, ज्ञान आहे तेथपर्यंतच माना; इतर वेळीं असतो असें मानण्यास प्रमाण नाहीं. ) याविषयीं अनुमान असें करितां येतें कीं, 'अर्थ हा ज्ञानसमकालिकच असतो; ' कशावरून तर, 'तो उपभोगाचें साधन आहे ह्मणून.' यास दृष्टांत, 'सुख, दुःख इत्यादि.' ( आतां हा दृष्टांत त्यांच्याच मतानें आहे, आमच्या मतानें नाहीं; कारण, आमच्या मतांत सुखाचें सुद्धां विषयाच्या ठिकाणीं स्थिरत्व होतें. उभयमतें दृष्टांत ह्मटला ह्मणजे राग, द्वेष इत्यादि होय. ) या अनुमानावरून जो ते अन्यपुरुषसाधारण ( अन्यपुरुषांनाही ज्याचें ज्ञान होत आहे असा ) विषयाचा निषेध करितात, त्यामुळें ज्ञानाच्या पूर्वकालीं व उत्तरकालीं असणाऱ्या वस्तुस्वरूपाचा ते केवल अपलाप करितात ॥ १५ ॥

आतां तो त्यांचा केवल अपलापच आहे, असें पुनः विस्तारानें सांगतात,—

## न चैकचित्ततन्त्रं वस्तु तदप्रमाणकं तदा किं स्यात् ॥ १६ ॥

**सूत्रार्थः**—पदार्थ हे (चित्ताहून भिन्न व स्वतंत्र आहेत,) एकचित्ताधीन (एका चित्ताचें कार्य ) नाहींत; कारण, जर ते एका चित्ताचें कार्य ह्मणावें तर जेव्हां चित्त दुसऱ्या पदार्थावर जातें तेव्हां पहिल्या पदार्थाचा नाश होतो कीं काय? ( तर तो होत **नाहीं,** ह्मणून पदार्थ हे चित्ताहून भिन्न असून स्वतंत्र आहेत. )

**भाष्यम्**—एकचित्ततन्त्रं चेद्वस्तु स्यात्तदा चित्ते व्यग्रे निरुद्धे वाऽस्वरूपमेव तेनापरामृष्टमन्यस्याविषयीभूतमप्रमाणकमगृहीतस्वभावकं केनाचित्तदानीं किं तत्स्या-

त्संबध्यमानं वा पुनश्चित्तेन कुत उत्पद्येत । ये चास्यानुपस्थिता भागास्ते चास्य न स्युरेवं नास्ति पृष्ठमित्युदरमपि न गृह्येत । तस्मात्स्वतन्त्रोऽर्थः सर्वपुरुषसाधारणः, स्वतन्त्राणि च चित्तानि प्रतिपुरुषं प्रवर्तन्ते । तयोः सम्बन्धादुपलब्धिः पुरुषस्य भोग इति ॥ १६ ॥

**भाष्यार्थः**—जरी एकचित्ताधीन ( एका चित्ताचें कार्य ) घट इत्यादि वस्तू असतील तर तें चित्त जेव्हां पट इत्यादि वस्तूंत निमग्न असेल किंवा निरुद्ध ( समाधियुक्त ) असेल त्या वेळेस वस्तु स्वरूपरहितच असल्यामुळें त्या वेळेस काय असणार? ( अर्थात् कांहींएक नसणार. ) कारण, त्या वेळेस त्या चित्ताचा त्या वस्तूशीं कांहीं संबंधच नसणार; व इतर चित्ताचा तर ती विषय नसल्यामुळें अप्रमाणक ह्मणजे कोणालाच ग्रहण केली जाणार नाहीं अशी होणार. अथवा जरी तिचा दुसऱ्या चित्ताशीं संबंध असला तथापि तिची पुनः उत्पत्ति कशी होणार? ( कारण, एका चित्ताच्या अधीन वस्तु असून ती पुनः तें चित्त असणार तेथपर्यंतच असणार, पुढें नाहीं. ) आणिक दुसरें असें कीं, वस्तूचे जे भाग एका वेळीं दिसण्याजोगे नसतील त्यांची उत्पत्ति मुळींच होणार नाहीं. असेंच पाठ दिसत नाहीं ह्मणून पाठ नाहीं असें कदाचित् मानिलें परंतु पाठीवांचून पोट असूं शकत नाहीं, ह्मणून पोट सुद्धां त्या वेळेस दिसणार नाहीं ! त्याकरितां सर्वपुरुषसाधारण अशी वस्तु स्वतंत्र व प्रत्येक पुरुषागणित चित्तेंही स्वतंत्रत्वेंकरून प्रवृत्त होतात. ( त्या परस्परांचा कार्यकारणभाव संबंध कांहीं नाहीं. ) त्या वेळेस चित्त व वस्तु या दोघांचा संबंध झाल्यामुळें जें ज्ञान होतें तोच पुरुषाला भोग होय ॥ १६ ॥

आतां सिद्धांतांत चित्त हें प्रकृतीसारखें सर्वव्यापी आहे ह्मणून सर्व वेळीं सर्ववस्तूंचें ज्ञान व्हावें; परंतु तें होत नाहीं याचें समाधान सांगतात,—

## तदुपरागापेक्षित्वाच्चित्तस्य वस्तु ज्ञाताज्ञातम् ॥ १७ ॥

**सूत्रार्थः**—चित्ताला पदार्थाचें ज्ञान होण्याला कारण पदार्थाचें प्रतिबिंब आहे. त्यांत ज्याचें प्रतिबिंब चित्तांत उमटतें त्या पदार्थाचें ज्ञान चित्ताला होतें; आणि ज्याचें प्रतिबिंब चित्तांत उमटत नाहीं त्या पदार्थाचें ज्ञान चित्तास होत नाहीं.

**भाष्यम्**—अयस्कान्तमणिकल्पा विषया अयःसधर्मकं चित्तमभिसंबध्योपरञ्जयन्ति, येन च विषयेणोपरक्तं चित्तं स विषयो ज्ञातस्ततोऽन्यः पुनरज्ञातः । वस्तुनो ज्ञाताज्ञातस्वरूपत्वात्परिणामि चित्तम् ॥ ' यस्य तु तदेव चित्तं विषयस्तस्य ' ॥ १७ ॥

**भाष्यार्थः**—विषय हे लोहचुंबकाप्रमाणें जागचे जागीं राहून (चित्तास) आकर्षण करणारे आहेत; व चित्ताचा स्वभाव लोखंडाप्रमाणें ओढला जाण्याचा आहे. विषय हे चित्ताला

आपल्याजवळ ओढून घेऊन त्याला आपल्या आकाराचें बनवितात. त्यांत ज्या विषयानें त्याला ओढून आपला आकार त्याच्यांत उमटविला आहे तो त्या चित्ताचा ज्ञात विषय होतो; आणि ज्या विषयानें त्याला न ओढून घेतल्यामुळें आपला आकार त्याच्यांत उमटविला नाहीं तो त्या चित्ताचा अज्ञात विषय होतो. याप्रमाणें ज्ञातविषय व अज्ञातविषय असे दोन स्वभाव चित्ताचे झाल्यामुळें चित्त हें परिणामी आहे ॥ १७ ॥

आतां ज्या पुरुषाचा ( आत्म्याचा ) असलें परिणामी चित्त विषय आहे तर तो पुरुषही परिणामी असेल अशा शंकेचें समाधान सांगतात,–

## सदा ज्ञाताश्चित्तवृत्तयस्तत्प्रभोः पुरुषस्यापरिणामित्वात् ॥ १८ ॥

**सूत्रार्थः**–आत्मा अपरिणामी असल्यामुळें त्याला नेहमीं चित्तवृत्तींचें ज्ञान आहे.

**भाष्यम्**–यदि चित्तवत्प्रभुरपि पुरुषः परिणमेत ततस्तद्विषयाश्चित्तवृत्तयः शब्दादिविषयवज्ज्ञाताज्ञाताः स्युः । सदाज्ञातत्वं तु मनसस्तत्प्रभोः पुरुषस्यापरिणामित्वमनुमापयति ॥ 'स्यादाशङ्का चित्तमेव स्वाभासं विषयाभासं च वैनाशिकानां चित्तात्मवादिनां भविष्यत्यग्निवत्' ॥ १८ ॥

**भाष्यार्थः**–जर चित्ताप्रमाणेंच पुरुषाचा सुद्धां विषयाकार परिणाम होईल तर तद्विषयक ज्या चित्तवृत्ती त्या शब्द इत्यादि विषयांप्रमाणें ज्ञात व अज्ञात अशा होऊं शकतील; परंतु अंतःकरणाचा साक्षी जो आत्मा त्याला मनोरूप विषय नेहमी ज्ञात असल्यामुळें पुरुष हा अपरिणामी आहे असें अनुमान होतें ॥ १८ ॥

आतां अग्नीप्रमाणें चित्तच आपलें व दुसऱ्याचें प्रकाशक होईल, मग चित्ताहून वेगळा अपरिणामी असा आत्मा मानण्याची गरज ती काय? अशी दृढ शंका, जे चित्तालाच आत्मा मानणारे वैनाशिक ( बौद्ध ) त्यांना येईल; तिचें समाधान सांगतात,–

## न तत्स्वाभासं दृश्यत्वात् ॥ १९ ॥

**सूत्रार्थः**–तें चित्त दृश्य असल्यामुळें स्वतः प्रकाशित नाहीं.

**भाष्यम्**–यथेतराणीन्द्रियाणि शब्दादयश्च दृश्यत्वान्न स्वाभासानि तथा मनोऽपि प्रत्येतव्यम् । न चाग्निरत्र दृष्टान्तः । न ह्यग्निरात्मस्वरूपमप्रकाशं प्रकाशयति प्रकाशश्चायं प्रकाश्यप्रकाशकसंयोगे दृष्टो न च स्वरूपमात्रेऽस्ति संयोगः । किञ्च स्वाभासं चित्तमित्यग्राह्यमेव कस्यचिदिति शब्दार्थः । तद्यथा । स्वात्मप्रतिष्ठमाकाशं न परप्रतिष्ठमित्यर्थः । स्वबुद्धिप्रचारप्रतिसंवेदनात्सत्त्वानां प्रवृत्तिर्दृश्यते 'क्रुद्धोऽहं भीतोऽहममुत्र मे रागोऽमुत्र मे क्रोधः' इत्येतत्स्वबुद्धेरग्रहणे न युक्तमिति ॥ १९ ॥

**भाष्यार्थः**–जशीं दुसरीं इंद्रियें व शब्द इत्यादि विषय हे दृश्य असल्यामुळें

आपले प्रकाशक होत नाहींत; तसें मन ( चित्त ) सुद्धां दृश्य असल्यामुळें आपला प्रकाश करूं शकत नाहीं असें समजावें. याविषयीं अग्नीचा जो दृष्टांत दिला आहे तो बरोबर नाहीं कारण, अग्नि ह्मणजे आपलें स्वरूप अप्रकाशित आहे तें प्रकाशित करितो असें नाहीं; तर तो स्वप्रकाश आहे व प्रकाश ह्मटला ह्मणजे क्रिया आहे; ती प्रकाशरूप क्रिया प्रकाश्य ( प्रकाशानें प्रकाशित होणारी वस्तु ) व प्रकाशक ( वस्तूला प्रकाशित करणारा ) या दोहोंचा संयोग ( संबंध ) झाला असतां दृष्ट आहे. संबंधही भेदाश्रय असतो, अभेदाश्रय कधींही असत नाहीं. आणिक दुसरें असें कीं, कोणी एकाच्या मतानें चित्त हें स्वाभास ह्मणजे अग्राह्य असाच स्वाभासशब्दाचा अर्थ संभवतो; जसें आकाश स्वात्मप्रतिष्ठ (आपल्याच ठिकाणीं राहणारें ) आहे ह्मणजे परप्रतिष्ठ ( दुसऱ्याच्या ठिकाणीं राहणारें ) नाहीं असा अर्थ होतो त्याप्रमाणें; परंतु आपल्या चित्तवृत्तीच्या अनुभवावरून क्रोधादिकांच्या त्याग वगैरे करितां प्राण्यांची प्रवृत्ति दिसते, ह्मणजे ' मी रागावलों आहें, मी भ्यालों आहें, त्या वस्तूवर माझा प्रेम आहे, त्या वस्तूविषयीं माझा क्रोध आहे ' इत्यादि; यावरून बुद्धीला अग्राह्यत्व मानणें बरोबर नाहीं; तर बुद्धीला ग्राह्यत्वच अवश्य मानिलें पाहिजे ॥ १९ ॥

आतां चित्ताला स्वाभासत्व मानणाऱ्या क्षणिकवाद्याचें मत घेऊनच त्यावर दुसरें दूषण सांगतात,–

## एकसमये चोभयानवधारणम् ॥ २० ॥

**सूत्रार्थः**–चित्ताला आपलें स्वतांचें व पदार्थाचें ज्ञान एका वेळीं होणें संभवत नाहीं ( ह्मणून त्याच्या प्रकाशाकरितां आत्मा अवश्य असला पाहिजे).

**भाष्यम्–न चैकस्मिन् क्षणे स्वपररूपावधारणं युक्तम् । क्षणिकवादिनो यद्भवनं सैव क्रिया, तदेव च कारकमित्यभ्युपगमः ॥ ' स्यान्मतिः स्वरसनिरुद्धं चित्तश्चित्तान्तरेण समनन्तरेण गृह्यत इति ' ॥ २० ॥**

**भाष्यार्थः**–( आणिक असें कीं, ज्ञानाच्या उत्पत्तिकालींच तूं अर्थाची ( वस्तूची ) उत्पत्ति मानिली आहेस; त्यांत ) ज्ञान व अर्थ ह्या दोघांच्या रूपाचें अवधारण ( निश्चय ) एका कालींच करितां येत नाहीं; कारण, तुझ्या मतांत जी वस्तूची उत्पत्ति तीच क्रिया व तेंच कर्ता, कर्म इत्यादि कारक असा सिद्धांत आहे; तो अगदीं युक्तिविरुद्ध आहे. त्याकारितां चित्त नेहमीं ग्राह्यच आहे, अग्राह्य नाहीं ॥ २० ॥

चित्त स्वाभास आहे असा तुझ्या मताचा आह्मीं स्वीकार केला असता, कीं जर एका चित्ताचा नाश होत असतां त्यानंतर पुढें पुढें तत्काल उत्पन्न होणाऱ्या अन्यचित्तानें पहिल्या चित्ताचें ग्रहण होतें तर; परंतु असें मुळींच मानितां येत नाहीं. याविषयीं आतां दूषण सांगतात,–

## चित्तान्तरदृश्ये बुद्धेरतिप्रसङ्गः स्मृतिसङ्करश्च ॥ २१ ॥

**सूत्रार्थः**—एका बुद्धीच्या प्रकाशाकरितां दुसरी बुद्धि, असें मानिलें असतां अनंतावधि बुद्धी मानाव्या लागून त्या योगानें अनेक प्रकारच्या ज्ञानाचें एकाच वेळीं स्मरण झाल्यामुळें कोणताही एक निश्चय होणार नाहीं.

**भाष्यम्—अथ चित्तं ते चित्तान्तरेण गृह्येत बुद्धिः केन गृह्यते । साऽप्यन्यया साऽप्यन्ययेत्यतिप्रसङ्गः स्मृतिसङ्करश्च । यावन्तो बुद्धिबुद्धीनामनुभवास्तावत्यः स्मृतयः प्राप्नुवन्ति तत्संकराच्चैकस्मृत्यनवधारणं च स्यादिति । एवं बुद्धिप्रतिसंवेदिनं पुरुषमपलपद्भिर्वैनाशिकैः सर्वमेवाकुलीकृतं ते तु भोक्तृस्वरूपं यत्र क्वचन कल्पयन्तो न न्यायेन संगच्छन्ते । केचित्सत्वमात्रमपि परिकल्प्यास्ति स सत्वो य एतान् पञ्चस्कन्धान्निःक्षिप्यान्यांश्च प्रतिसंदधातीत्युक्त्वा तत एव पुनस्त्रस्यन्ति । तथा स्कन्धानां महन्निर्वेदाय विरागायानुत्पादाय प्रशान्तये गुरोरन्तिके ब्रह्मचर्य्यं चरिष्यामीत्युक्त्वा सत्वस्य पुनः सत्वमेवापह्नुवते । सांख्ययोगादयस्तु प्रवादाः स्वशब्देन पुरुषमेव स्वामिनं चित्तस्य भोक्तारमुपयन्तीति ॥ ॥ २१ ॥ ' कथम् ' ॥**

**भाष्यार्थः**—आतां तुझ्या मतांत जर एका चित्ताचा दुसऱ्या चित्तानें प्रकाश होतो असें आहे तर त्या चित्ताला प्रकाशित कोण करणार ? आतां त्याचें प्रकाशक आणखी तिसरें चित्त मानलें तर त्याचेंही प्रकाशक चवथें चित्त मानावें लागेल. पुनः त्याला पांचवें. याप्रमाणें चित्तें अनेक मानावीं लागून शेवटीं चित्ताची समाप्ति ह्मणून कधींच होणार नाहीं; हा एक दोष; आणि दुसरा दोष, स्मृतींचाही सर्व गोंधळ होऊन जाईल. कारण. जितके बुद्धींच्या बुद्धींचे अनुभव तितक्या स्मृती एकदम उपस्थित होतील; नंतर सर्व स्मृतींचा गोंधळ झाल्यामुळें एका स्मृतीचा सुद्धां निश्चय करितां येणार नाहीं. याप्रमाणें बुद्धिसाक्षी पुरुषाचा अपलाप करणाऱ्या क्षणिकवादी बौद्धांनीं बंधमोक्ष, धर्माधर्म इत्यादि सर्व व्यवस्था मोडून टाकिली. आणि त्यांनीं भोक्तृस्वरूपाची कोठें तरी कल्पना केली यामुळें तें सर्व त्यांचें न्यायविरुद्ध आहे. कितीएक विज्ञानवादी क्षणिकविज्ञानरूप सत्व मात्र ह्मणजे चित्तमात्र स्वीकारून ( त्यालाच मोक्ष मानितात ). तो सत्वविशेष असा आहे कीं. जो ह्या सांसारिक पांच स्कंधांना सोडून देऊन अन्य पंचस्कंधांप्रत युक्त होऊन अनुभवितो; असें बोलून त्यांपासूनच पुनः त्रास पावतात. ( विज्ञान ( विषयानुभव ), वेदना ( दुःख ), संज्ञा वं रूप ( शब्द व अर्थ ) व संस्कार ( वासना ), याप्रमाणें चित्ताच्याच पांच शाखा ( भेद ) आहेत.) तसेच कोणीएक शून्यवादी ' स्कंधांबद्दल मोठें वैराग्य प्राप्त व्हावें व पुनः जन्म प्राप्त होऊं नये ह्मणून, मी जीवन्मुक्त अशा गुरूजवळ ब्रह्मचर्य ( साक्षात्का-

रापर्यंत ब्रह्माभ्यास ) करीन; ' असें बोलून शिष्य झालेले नास्तिक गुरूच्या उपदेशावरून सत्वाच्या ( अहंशब्दार्थाच्या ) ही सत्तेचा अपलाप करितात ( शून्यवादी होतात). आमच्या मतांत तर हा न्यायविरोध नाहीं; कारण, सांख्य, योग, ब्रह्ममीमांसा इत्यादि वादांत स्वशब्दानें चित्त, स्वामिशब्दानें पुरुष व पुरुषच चित्ताचा भोक्ता असें मानिलें आहे ॥२१॥

आतां कूटस्थ म्हणजे निष्क्रिय साक्षीच्या चित्ताशीं क्रियापूर्वक संबंधाचा असंभव असल्यामुळें त्या साक्षीनें तें चित्त कसें जाणलें जाईल? याचें समाधान सांगतात,–

## चितेरप्रतिसंक्रमायास्तदाकारापत्तौ स्वबुद्धिसंवेदनम् ॥ २२ ॥

**सूत्रार्थः**–आत्मा हा अगदीं संचाररहित आहे खरा तथापि त्याची छाया ( प्रतिबिंब ) बुद्धींत पडून तिला ( छायेला ) बुद्धीचा आकार प्राप्त झाल्यामुळें चितीस आपल्या भोग्य बुद्धीचें ज्ञान होतें.

**भाष्यम्–अपरिणामिनी हि भोक्तृशक्तिरप्रतिसंक्रमा च परिणामिन्यर्थे प्रतिसंक्रान्ते च तद्वृत्तिमनुपतति तस्याश्च प्राप्तचैतन्योपग्रहस्वरूपाया बुद्धिवृत्तेरनुकारिमात्रतया बुद्धिवृत्त्यविशिष्टा हि ज्ञानवृत्तिराख्यायते। तथा चोक्तम् । 'न पातालं न च विवरं गिरीणां नैवान्धकारं कुक्षयो नोदधीनाम् ॥ गुहा यस्यां निहितं ब्रह्म शाश्वतं बुद्धिवृत्तिमविशिष्टां कवयो वेदयन्ते' इति । अतश्चैतदभ्युपगम्यते ॥ २२ ॥**

**भाष्यार्थः**–पुरुषशक्ति ही परिणामरहितच आहे म्हणून तिला गति नाहीं; म्हणजे ती बुद्धीप्रमाणें विषय ग्रहण करण्यास कोठें संचार करीत नाहीं; तर वृत्तिसरूपपरिणामी जो अर्थ त्यामध्यें चिति प्रतिबिंबरूपानें संचार करीत आहेशी होऊन बुद्धिवृत्तीप्रत चेतनासारखी करिते. प्राप्त आहे चैतन्यप्रतिबिंब जिनें अशा बुद्धिवृत्तीच्या प्रतिबिंबाला केवल आधारमात्र असल्यामुळें त्या चितीची सुद्धां वृत्ति बुद्धिवृत्तीशीं अगदीं एक आहे असा व्यवहार होतो. असें आगमांत सांगितलेंही आहे कीं, ' गुहाहितं गह्वरेष्ठं पुराणम् ' इत्यादि श्रुतिस्मृतींमध्यें ज्या गुहेंत शाश्वत ब्रह्म अंश अंशी अशा अभेदानें राहिलें आहे असें सांगितलें आहे तेथें गुहाशब्दानें पाताल, पर्वतांची गुहा, अंधकार किंवा समुद्रांच्या कुक्षी ह्यांपैकीं कांहींएक घ्यावयाचें नाहीं; तर ब्रह्मवृत्तींत प्रतिबिंबित झालेली जी बुद्धिवृत्ति तिजप्रतच गुहा पंडित समजतात. याकरितां पुढील सूत्रांत सांगितल्याप्रमाणें आम्ही अंगीकार करितों ॥२२॥

आतां क्षणिकवाद्यांस जो चित्तच आत्मा असा भ्रम होतो त्याचें कारण सांगतात,–

## द्रष्टृदृश्योपरक्तं चित्तं सर्वार्थम् ॥ २३ ॥

**सूत्रार्थः**–ज्यामुळें चित्त द्रष्टा व दृश्य यांच्या प्रतिबिंबानें प्रतिबिंबित होऊन सर्वआकारांचें भासतें म्हणून त्यास सर्वार्थ असें म्हणतात.

**भाष्यम्**–मनो हि मन्तव्येनार्थेनोपरक्तं तत्स्वयं च विषयत्वाद्विषयिणा पुरुषेणात्मीयया वृत्त्याभिसम्बद्धम् । तदेतच्चित्तमेव द्रष्टृदृश्योपरक्तं विषयविषयिनिर्भासं चेतनाचेतनस्वरूपापन्नं विषयात्मकमिवाचेतनं चेतनमिव स्फटिकमणिकल्पं सर्वार्थमित्युच्यते । तदनेन चित्तसारूप्येण भ्रान्ताः केचित्तदेव चेतनमित्याहुः । अपरे चित्तमात्रमेवेदं सर्वं, नास्ति खल्वयं गवादिर्घटादिश्च सकारणो लोक इति । अनुकम्पनीयास्ते । कस्मात् । अस्ति हि तेषां भ्रान्तिबीजं सर्वरूपाकारनिर्भासं चित्तमिति । समाधिप्रज्ञायां प्रज्ञेयोऽर्थः प्रतिबिम्बीभूतस्तस्यालम्बनीभूतत्वादन्यः । स चेदर्थश्चित्तमात्रं स्यात्कथं प्रज्ञयैव प्रज्ञारूपमवधार्येत । तस्मात्प्रतिबिम्बीभूतोऽर्थः प्रज्ञायां येनावधार्यते स पुरुष इति । एवं ग्रहीतृग्रहणग्राह्यस्वरूपचित्तभेदात्त्रयमप्येतज्जातितः प्रविभजन्ते ते सम्यग्दर्शिनस्तैराधिगतः पुरुषः ॥ 'कुतश्चैतत्'॥ २३ ॥

**भाष्यार्थः**–चित्त हें बाह्य अर्थाचें मनन करूं लागलें असतां तदाकार ( विषयाकार ) होतें; व तें स्वतःही पुरुषाचा विषय असल्यामुळें स्वकीय जी चैतन्यलक्षणवृत्ति तिनें युक्त जो पुरुष त्या विषयी पुरुषानें सुद्धां संबद्ध होतें ह्मणजे पुरुषाकार होतें. याप्रमाणें हें चित्तच विषयाकार व पुरुषाकार होतें; ह्मणजे शब्दादिविषयरूपानें व विषयी जो पुरुष तद्रूपानें भासतें. याचें कारण, तें चेतनाचेतनाकार होतें ह्मणजे तें विषयात्मक असून सुद्धां अविषयात्मकासारखें व अचेतन असूनही चेतनाप्रमाणें भासतें. यास दृष्टांत स्फटिकमणि; तो जसा एकच असतो परंतु जपापुष्प व इंद्रनीलमणि इत्यादिकांच्या सांनिध्यानें त्या त्या रूपाचा भासतो; त्याप्रमाणें चित्त सर्वाकार होतें ह्मणून त्याला सर्वार्थ असें ह्मणतात. ' सर्वार्थ ' या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, चेतन व अचेतन ह्या सर्व वस्तु आहेत अर्थ ह्मणजे विषय ज्याचा तें सर्वार्थ होय. ज्या वेळेस चित्त आत्म्याच्या प्रतिबिंबानें चेतनस्वरूप भासतें त्या वेळचें तें चित्ताचें चेतनतुल्य स्वरूप पाहून भ्रांत झालेले कोणीएक चित्तातिरिक्त चेतन न मानणारे वैनाशिक चित्तासच आत्मा समजूं लागले. आणि दुसरे विज्ञानवादी हें सर्व चित्तमात्र ( कल्पनामात्र ) आहे; गाय इत्यादि चेतन पदार्थ, व घट इत्यादि अचेतन पदार्थ हे खरोखर कांहींएक नाहींत; असें प्रतिपादन करितात. त्याबद्दल त्यांना क्षमा केली पाहिजे; कारण, ते जे याप्रमाणें भ्रमानें ह्मणतात त्या त्यांच्या भ्रमास सर्वाकार चित्त भासतें हें मुख्य कारण आहे. आतां त्यांच्यावर दया करून त्यांचा भ्रम दूर होण्याकरितां असा उपदेश केला पाहिजे कीं, जीमध्यें आत्मसाक्षात्कार होतो अशा समाधिप्रज्ञेंत उत्तमरीतीनें जाणला जाणारा जो अर्थ तो चित्तांत प्रतिबिंबित झालेला असतो आणि चित्त हें त्या वेळेस प्रतिबिंबास आश्रय असतें ह्मणून तो अर्थ चित्ताहून अन्य असला पाहिजे. कारण, तो अर्थ जर चित्तमात्र असेल तर प्रज्ञेनेंच प्रज्ञेचें ग्रहण कसें होईल? (कारण,

कर्मकर्तृविरोध येईल. ) यकरितां प्रतिबिंबित झालेला अर्थ समाधिप्रज्ञेंत ज्यानें जाणला जातो तोच पुरुष समजावा. याप्रमाणें ग्रहीता, ग्रहण व ग्राह्य हे तीन स्वभावतांच विजातीय आहेत् असा जे विवेक करितात तेच खरोखर आत्मवेत्ते, आणि त्यांनाच पुरुष-प्राप्ति झाली असें समजावें ॥ २३ ॥

आतां चित्ताहून शिवाय पुरुष आहे.याला दुसरें कारण सांगतात,-.

## तदसंख्येयवासनाभिश्चित्रमपि परार्थं संहत्यकारित्वात् ॥२४॥

**सूत्रार्थः**—तें चित्त सर्वप्रकारचे व्यवहार करितें ह्मणून सांगितलें खरें, परंतु तें सर्व व्यवहार असंख्य वासनांद्वारा करितें, स्वतंत्रपणानें नाहीं. ह्मणून तें सुद्धां दुसऱ्याकरितां आहे; कशावरून तर, जे पुष्कळ मिळून एक कार्य करितात ( एकेक स्वतंत्र करीत नाहींत ह्मणून ) ते परार्थ असतात.

**भाष्यम्**—तदेतच्चित्तमसंख्येयाभिर्वासनाभिरेव चित्रीकृतमपि परार्थं परस्य भोगापवर्गार्थं न स्वार्थं संहत्यकारित्वाद्गृहवत्संहतकारिणा चित्तेन न स्वार्थेन भवितव्यम् । न सुखचित्तं सुखार्थं न ज्ञानचित्तं ज्ञानार्थमुभयमप्येतत्परार्थम् । यश्च भोगेनापवर्गेण चार्थेनार्थवान् पुरुषः स एव परो न परः सामान्यमात्रम् । यत्तु किंचित्परं सामान्यमात्रं स्वरूपेणोदाहरेद्वैनाशिकस्तत्सर्वं संहत्यकारित्वात्परार्थमेव स्यात् । यस्त्वसौ विशेषः स न संहत्यकारी पुरुष इति ॥ २४ ॥

**भाष्यार्थः**—जें पूर्वी सर्वार्थ चित्त ह्मणून सांगितलें तें हें चित्त असंख्यात वासनांनीं नानाप्रकारचें झालें असूनही तें परार्थ ह्मणजे दुसऱ्याच्या सुखादिसाक्षात्काराकरितां आहे; आपल्याकरितां नव्हे; कारण, तें दुसऱ्याची मदत घेऊन कार्य करणारें आहे ह्मणून. त्याला दृष्टांत घर; पहा घर हें शयन इत्यादि कार्य आस्तरण, शरीर इत्यादि दुसऱ्याच्या मदतीनें करितें, ह्मणून तें परार्थ असतें; त्याप्रमाणें चित्त सुद्धां दुसऱ्याची मदत घेऊन कार्य करणारें असल्यामुळें स्वार्थ होऊं शकत नाहीं. पहा ! जें भोगयोग्य चित्त तें कोठें चित्ताच्या भोगाकरितां असत नाहीं; व जें मोक्षयोग्य चित्त तें चित्ताच्या मोक्षाकरितां असत नाहीं. तर चित्ताच्या ठिकाणीं भोग व मोक्ष हे दोनही पदार्थ आहेत. आतां हे भोग व मोक्षरूप संपूर्ण अर्थ ज्या पुरुषाकरितां आहेत तोच येथें परशब्दानें घ्यावयाचा; कोणत्यातरी कारणानें ज्याला भोक्तृत्व आलें आहे असा सामान्य कोणीतरी पर घ्यावयाचा नाहीं. आतां आत्मस्वरूपेंकरून चित्ताला यत्किंचित् भोक्तृत्व आहे ह्मणून परशब्दानें चित्त घ्यावें असें वैनाशिक ( क्षणिकवादी ) ह्मणेल; परंतु सर्व दुसऱ्याची मदत घेऊन कार्य करणारें असल्यामुळें तें परार्थच आहे; स्वार्थ नाहीं. आतां जो

विशेष ह्मणजे पुरुषसंज्ञक अर आहे तो साधनापूर्वी असल्यामुळें त्याला संहत्यकारी ह्मणजे परार्थ ह्मणतां येत नाहीं ॥ २४ ॥

आतां मोक्षाचें वर्णन करणार त्यांत मोक्षाला योग्य अधिकारी कोण, तें प्रथम सांगतात,—

## विशेषदर्शिन आत्मभावभावनानिवृत्तिः ॥ २५ ॥

**सूत्रार्थः**—बुद्धिसत्व व पुरुष हे दोन्ने भिन्न आहेत असा जो विशेष जाणतो त्याचा चित्तच आत्मा ह्मणजे कर्ता, भोक्ता, ज्ञाता आहे असा अभिमान दूर होतो.

**भाष्यम्—यथा प्रावृषि तृणाङ्कुरस्योद्भेदेन तद्बीजसत्ताऽनुमीयते। तथा मोक्षमार्गश्रवणेन यस्य रोमहर्षाश्रुपातौ दृश्येते तत्राप्यस्ति विशेषदर्शनबीजमपवर्गभागीयं कर्माभिनिर्वर्तितमित्यनुमीयते। तस्यात्मभावभावना स्वाभाविकी प्रवर्तते। यस्या अभावादिदमुक्तम्। 'स्वभावं मुक्त्वा दोषाद्येषां पूर्वपक्षे रुचिर्भवत्यरुचिश्च निर्णये भवति'। तत्रात्मभावभावना 'कोऽहमासं कथमहमासं, किंस्विदिदं कथंस्विदिदं, के भविष्यामः कथं भविष्यामः' इति। सा तु विशेषदर्शनान्निवर्तते कुतः चित्तस्यैष विचित्रः परिणामः पुरुषस्त्वसत्यामविद्यायां शुद्धश्चित्तधर्मैरपरामृष्ट इति ततोऽस्यात्मभावभावना कुशलस्य निवर्तते इति ॥ २५ ॥**

**भाष्यार्थः**—जशी पावसाळ्यांत गवताच्या अंकुराची उत्पत्ति झाली ह्मणजे त्याचें बीज पूर्वी तेथें होतें असें अनुमान होतें; त्याप्रमाणें मोक्षप्राप्तीचें ज्ञान ऐकून ज्याच्या शरीरावर आनंदानें रोमांच उभे राहतात व डोळ्यांतून आनंदाश्रु चालतात त्या पुरुषाच्या ठिकाणीं सुद्धां पूर्वीचें शुभकर्मापासून उत्पन्न झालेलें असें मोक्षप्राप्तीसंबंधी तत्त्वदर्शनबीज असावें असें अनुमान होतें. आणि त्या पुरुषास आत्मभावभावना ह्या जन्मांत कांहीं अभ्यास केल्यावांचूनंच सहज रीतीनें होऊं लागते. जी भावना नसल्यामुळें कशी स्थिति होते याविषयीं पूर्वीच्या आचार्यांनीं ह्मटलें आहे कीं, 'दोषांमुळें आत्मभाव सोडून देऊन ज्यांची परलोक नाहीं वगैरे पूर्वपक्षावर श्रद्धा बसते; आणि तत्त्वनिर्णयावर ज्यांची बिलकुल श्रद्धा नसते.' आतां ती आत्मभावभावना अशी, 'मी पूर्वी कोण होतों व कसा होतों; व हल्लीं जें माझें स्वरूप आहे तें काय देह आहे ? किंवा मन इत्यादिक आहे ? व हें स्वरूप माझ्या कोणत्या प्रकारच्या पातकानें अथवा पुण्यानें राहिलें आहे ? व पुढें आह्मी कोण होणार व कसे होणार ?' इत्यादि विचार ज्या तत्त्वदर्शनांत असतो त्याला आत्मभावभावना ह्मणतात. ती आत्मभावभावना तत्त्वदर्शी पुरुषाची निवृत्त होते; कारण, हा भावरूप विचित्र परिणाम आत्म्याचा नाहीं तर चित्ताचाच आहे; ( कारण, चित्तधर्म जी अविद्या तीपासून हा परिणाम होत असतो. आणि पुरुष तर, अविद्येच्या ठिकाणीं त्याचा

कांहींच संबंध नसल्यामुळें शुद्ध ( पुण्यपापवर्जित ) व चित्तधर्म जे जन्ममरण, सुखदुःख इत्यादि त्यांनीं अगदीं अलिप्त ( रहित ) असतो; ह्मणून ती आत्मभावभावना विवेकी पुरुषाची विशेषदर्शनानें दूर होते ॥ २५ ॥

आतां तत्त्वजिज्ञासूचें विशेषदर्शनानंतर चित्त कसें होतें तें सांगतात,–

## तदा विवेकनिम्नं कैवल्यप्राग्भारं चित्तम् ॥ २६ ॥

**सूत्रार्थः**–जें चित्त विषयसुखच मुख्य फल मानीत होतें तें, आंतां तो चित्ताचा अभिमान दूर झाल्यावर कैवल्यफलाविषयीं तत्पर होतें.

**भाष्यम्**–तदानीं यदस्य चित्तं विषयप्राग्भारमज्ञाननिम्नमासीत्तदस्याऽन्यथा भवति कैवल्यप्राग्भारं विवेकजज्ञाननिम्नमिति ॥ २६ ॥

**भाष्यार्थः**–पुरुषाचें जें चित्त पूर्वीं विषयाभिमुख ( विषयासक्त ) व अज्ञानमार्गांत संचार करणारें होतें तें विशेषदर्शन झाल्यानंतर त्याच्या उलट होतें ह्मणजे कैवल्याभिमुख ( कैवल्यच मुख्य फल आहे असें पक्कें समजून ) व विवेकजज्ञान ह्मणजे धर्ममेघध्यान त्याविषयीं तत्पर होतें ॥ २६ ॥

आतां अशा चित्तांत सुद्धां मध्यें मध्यें व्युत्थानवृत्ती उत्पन्न होत असतात, त्याच कारण सांगतात,–

## तच्छिद्रेषु प्रत्ययान्तराणि संस्कारेभ्यः ॥ २७ ॥

**सूत्रार्थः**–चित्त समाधींत तत्पर झालें असतां तेथें मध्यें मध्यें जागृतअवस्थेंत झालेल्या संस्कारांच्या योगानें जागृतअवस्थेप्रमाणें अनेक अनुभव येतात. ( तीं समाधीम विघ्नें समजावीं. )

**भाष्यम्**–प्रत्ययविवेकनिम्नस्य सत्वपुरुषान्यताख्यातिमात्रप्रवाहिणश्चित्तस्य तच्छिद्रेषु प्रत्ययान्तराण्यस्मीति वा ममेति वा जानामीति वा न जानामीति वा। कुतः क्षीयमाणबीजेभ्यः पूर्वसंस्कारेभ्य इति ॥ २७ ॥

**भाष्यार्थः**–प्रत्ययविवेकनिम्न ह्मणजे बुद्धि व पुरुष यांच्या भेदज्ञानाविषयीं केवळ तत्पर अशा चित्ताच्या स्थानांत मध्यें मध्यें ' मी व माझें, मी जाणतों व जाणत नाहीं; अशा प्रकारचे ( जागृतअवस्थेप्रमाणें अनेक दुसरे ( अनुभव ) येत असतात. ते समाधीला विघ्न करणारे आहेत ह्मणून त्यांच्या नाशाविषयीं प्रयत्न अवश्य करावा. आतां ते ) प्रत्यय उत्पन्न होण्याचें कारण असें कीं, प्रत्येक दिवशीं क्षीण ( नष्ट ) होणारे जे पूर्वीं व्युत्थानअवस्थेंत घडलेले संस्कार त्यांपासून ते प्रकट होत असतात ॥ २७ ॥

आतां संस्कारांचा नाश होण्याचा उपाय सांगतात,–

## हानमेषां क्लेशवदुक्तम् ॥ २८ ॥

**सूत्रार्थः**—पूर्वी ( सा० २ सू० १०।११ त ) अविद्यादिक्लेशांचा नाश करण्याकरितां जो उपाय सांगितला, त्याच उपायानें या संस्कारांचाही नाश होईल. ( ह्मणून तो उपाय अवश्य करावा. )

**भाष्यम्—यथा क्लेशा दग्धबीजभावा न प्ररोहसमर्था भवन्ति तथा ज्ञानाग्निना दग्धबीजभावः पूर्वसंस्कारो न प्रत्ययप्रसूर्भवति । ज्ञानसंस्कारास्तु चित्ताधिकारसमाप्तिमनु शेरत इति न चिन्त्यन्ते ॥ २८ ॥**

**भाष्यार्थः**—जसे. संप्रज्ञातयोग्याच्या व्युत्थानदशेंत घडलेल्या संस्कारांपासून उत्पन्न झालेले अविद्या, अस्मिता इत्यादि क्लेश जळालेल्या बीजांप्रमाणें होऊन संस्काररूप अंकुरांप्रत उत्पन्न करूं शकत नाहींत; त्याप्रमाणें पूर्वीचे संस्कार सुद्धां, संप्रज्ञाताच्या परंपरेपासून उत्पन्न झालेला जो निष्ठारूप ज्ञानाग्नि त्यानें जळालेल्या बीजांप्रमाणें झाल्यामुळें प्रत्ययांप्रत उत्पन्न करूं शकत नाहींत. आतां तत्त्वज्ञानसंस्कार मात्र चित्ताचें कार्य समाप्त होईपर्यंत तसेच राहतात; ( नंतर चित्ताचें कार्य समाप्त झालें ह्मणजे चित्ताबरोबरच त्यांचा आपोआप नाश होतो ) ह्मणून त्यांच्याबद्दल विचार करीत नाहीं. ( आतां लवकर ज्याला मुक्त होण्याची इच्छा असेल त्याच्या तत्त्वज्ञानसंस्कारांचा असंप्रज्ञातानें सुद्धां नाश करावयास सांगितला आहे. ) ॥ २८ ॥

आतां सांगितलेल्या संस्कारनाशाचा प्रकार सांगतात,—

## प्रसंख्यानेऽप्यकुसीदस्य सर्वथा विवेकख्यातेर्धर्ममेघः समाधिः॥२९॥

**सूत्रार्थः**—प्रसंख्यान ह्मणजे विवेकख्याति, त्याविषयीं सुद्धां जो इच्छा करीत नाहीं त्याला नेहमीं विवेकख्यातीचाच उदय झाल्यामुळें धर्ममेघनांवाचा समाधि सिद्ध होतो.

**भाष्यम्—यदाऽयं ब्राह्मणः प्रसंख्यानेऽप्यकुसीदस्ततोऽपि न किंचित्प्रार्थयते, तत्राऽपि विरक्तस्य सर्वथा विवेकख्यातिरेव भवतीति संस्कारबीजक्षयान्नाऽस्य प्रत्ययान्तराण्युत्पद्यन्ते तदाऽस्य धर्ममेघो नाम समाधिर्भवति ॥ २९ ॥**

**भाष्यार्थः**—बुद्धिसत्व ( चित्त ) व आत्मा या दोघांचें स्पष्टरीतीनें भेदज्ञान होणें, याला प्रसंख्यान ह्मणतात. ( हीच विवेकख्याति होय.) ज्या वेळेस हा योगी प्रसंख्यानाविषयीं सुद्धां इच्छा करीत नाहीं ह्मणजे त्याविषयीं सुद्धां विरक्त होतो; आणि सर्वथा ( सर्वप्रकारांनीं ) सत्व व पुरुष यांचें भेदज्ञानच होतें. आतां सर्वथा ह्मणजे संस्कारबीजांचा नाश झाल्यामुळें चित्तामध्यें दुसरे प्रत्यय उत्पन्न होत नाहींत; त्या वेळेस योग्याचा धर्ममेघ नांवाचा समाधि होतो. ( क्लेश, कर्म इत्यादिकांना समूळ उखडून टाकिल्यामुळें जो केवळ धर्माप्रत वर्षतो, त्याला धर्ममेघ ह्मणतात ) ॥ २९ ॥

आतां याप्रमाणें समाधि सिद्ध झाल्यापासून फल काय तें सांगतात,—

## ततः क्लेशकर्मनिवृत्तिः ॥ ३० ॥

**सूत्रार्थः**—धर्ममेघसमाधि सिद्ध झाल्यामुळें वासनांसहित अविद्यादि पांच क्लेशांची अगदीं निवृत्ति होते.

**भाष्यम्**—तल्लाभादविद्यादयः क्लेशा समूलकाषं कषिता भवन्ति । कुशलाकुशलाश्च कर्माशयाः समूलघातं हता भवन्ति । क्लेशकर्मनिवृत्तौ जीवन्नेव विद्वान् विमुक्तो भवति । कस्मात् । यस्माद्विपर्ययो भवस्य कारणं, नहि क्षीणविपर्ययः कश्चित्केनचित् क्वचिज्जातो दृश्यते इति ॥ ३० ॥

**भाष्यार्थः**—धर्ममेघ समाधीचा लाभ झाल्यामुळें अविद्या, अस्मिता इत्यादि क्लेश समूळ नाहींसे होतात; कुशलाकुशलरूप कर्मांच्या विपाकापासून उत्पन्न होणाऱ्या वासना समूळ नाहींशा होतात. याप्रमाणें क्लेश व कर्म यांची निवृत्ति झाली असतां योगी जीवंत असतांना मुक्त ( जीवन्मुक्त ) होतो. ( ही गौण मुक्ति होय. ) याचें कारण असें की, संसाराला मूळ कारण अविद्या आहे; तिचा एकदां समूळ नाश झाल्यावर मग कोणी उत्पन्न झालेला असा कोठेंही कोणाच्या पाहण्यांत नाहीं ॥ ३० ॥

आतां दुसरी मुक्ति प्राप्त होण्याचा प्रकार सांगतात,—

## तदा सर्वावरणमलापेतस्य ज्ञानं स्याज्ज्ञेयमल्पम् ॥ ३१ ॥

**सूत्रार्थः**—त्या वेळेस अविद्या इत्यादि चित्तमलाचा नाश झाल्याकारणानें ज्ञान हें अनंत होऊन ज्ञेय हें अगदीं अल्प (थोडें) होतें.

**भाष्यम्**—सर्वैः क्लेशकर्मावरणैर्विमुक्तस्य ज्ञानस्यानन्त्यं भवति तमसाऽभिभूतमावृतज्ञानसत्वं क्वचिदेव रजसा प्रवर्तितमुद्घाटितं ग्रहणसमर्थं भवति । तत्र यदा सर्वैरावरणमलैरपगतमलं भवति तदा भवत्यस्यानन्त्यं ज्ञानस्याऽऽनन्त्याज्ज्ञेयमल्पं संपद्यते । यथाकाशे खद्योतः । यत्रेदमुक्तम् । 'अन्धो मणिमविध्यत्तमनङ्गुलिरवावयत्, अग्रीवस्तं प्रत्यमुञ्चत्तमजिह्वोऽभ्यपूजयत्' इति ॥ ३१ ॥

**भाष्यार्थः**—ज्ञानाचा क्लेश, कर्म इत्यादि झांकून टाकणारा मल सर्व दूर झाल्यानंतर तें ( ज्ञान ) स्वभावतः अपरिमित होतें. ज्ञानसत्व हें तमोगुणानें एकदा अभिभूत ह्मणजे आच्छादून गेलें असतां ज्या वेळेस तें रजोगुणानें क्वचित् प्रवृत्त होतें त्या वेळेस तें विषय ग्रहण करण्यास समर्थ होतें. त्यांत जेव्हां सर्व मल दूर होऊन स्वच्छ होतें त्या वेळेस ज्ञान अनंत होतें; ज्ञान अनंत ( अपरिमित ) झाल्यावर मग ज्ञेय अगदीं अल्प होतें. यास दृष्टांत, जसा आकाशांत काजवा त्याप्रमाणें. ज्या सर्वज्ञत्वाविषयीं बौद्धांनीं असंभव दाखविण्याकरितां

थट्टेनें चार दृष्टांत येणेंप्रमाणें दिले आहेत; ते असे, ' आंधळ्यानें मण्यास भोंक पाडिलें; त्या मण्यास ज्याच्या हातांस बोटें नाहींत अशा पुरुषानें दोऱ्यांत ओंविलें; तो दोऱ्यांत ओंवले-ला मणि ज्याला कंठ नाहीं अशा पुरुषानें गळ्यांत बांधिला; व त्या कंठभूषणाची स्तुति ज्याला जीभ नाहीं अशा पुरुषानें केली' ॥ ३१ ॥

आतां तिसरी मुख्य मुक्ति सांगतात,-

## ततः कृतार्थानां परिणामक्रमसमाप्तिर्गुणानाम् ॥ ३२ ॥

**सूत्रार्थः**-त्यानंतर गुणांचें सर्व कार्य आटोपल्यामुळें पुढच्या सूत्रांत सांगावयाचा जो परिणामक्रम त्याचा अगदीं शेवट होतो.

**भाष्यम्**-तस्य धर्ममेघस्योदयात्कृतार्थानां परिणामक्रमः परिसमाप्यते । न हि कृतभोगापवर्गाः परिसमाप्तक्रमाः क्षणमप्यवस्थातुमुत्सहन्ते ॥' अथ कोऽयं क्रमो नामेति ' ॥ ३२ ॥

**भाष्यार्थः**-त्या धर्ममेघसमाधीचा उदय झाल्यानंतर गुण कृतार्थ होऊन त्यांचा पुढच्या सूत्रांत सांगावयाचा जो परिणामक्रम तो अगदीं समाप्त होतो; कारण, एकदा कां त्यांनीं पुरुषाचें भोग व मोक्षरूप कार्य करून त्यांचा क्रम समाप्त झाला ह्मणजे मग ते ( गुण ) एक क्षणभर सुद्धां राहण्याविषयीं उत्सुक होत नाहींत ॥ ३२ ॥

आतां तो क्रम कशाला ह्मणतात तें सांगतात,-

## क्षणप्रतियोगी परिणामापरान्तनिर्ग्राह्यः क्रमः ॥ ३३ ॥

**सूत्रार्थः**-एका क्षणांत एका परिणामाचें अवसान होऊन त्या क्षणाच्या अव्य-वहित दुसऱ्या क्षणीं जो परिणाम, अशा परिणामांच्या परंपरेस क्रम ह्मणतात.

**भाष्यम्**-क्षणानन्तर्यात्मा । परिणामस्यापरान्तेनाऽवसानेन गृह्यते क्रमः । न ह्यननुभूतक्रमक्षणा पुराणता वस्त्रस्यान्ते भवति । नित्येषु च क्रमो दृष्टः । द्वयी चेयं नित्यता, कूटस्थनित्यता परिणामनित्यता च । तत्र कूटस्थनित्यता पुरुषस्य, परिणामनि-त्यता गुणानाम् । यस्मिन् परिणम्यमाने तत्त्वं न विहन्यते तन्नित्यम् । उभयस्य च तत्त्वानभिघातान्नित्यत्वम् । तत्र गुणधर्मेषु बुद्ध्यादिषु परिणामापरान्तनिर्ग्राह्यः क्रमो लब्धपर्यवसानो नित्येषु धर्मिषु गुणेष्वलब्धपर्यवसानः । कूटस्थनित्येषु स्वरूपमात्र-प्रतिष्ठेषु मुक्तपुरुषेषु स्वरूपास्तिता क्रमेणैवाऽनुभूयत इति । तत्राप्यलब्धपर्यवसानः शब्दपृष्ठेनास्तिक्रियामुपादाय कल्पित इति । अथास्य संसारस्य स्थित्या गत्या च गुणेषु वर्तमानस्याऽस्ति क्रमसमाप्तिर्न वेति । अवचनीयमेतत् । कथम् । अस्ति प्रश्न एका-न्तवचनीयः सर्वो जातो मरिष्यतीति ओंभो इति । अथ सर्वो मृत्वा जनिष्यत

इति विभज्यवचनीयमेतत्। प्रत्युदितख्यातिः क्षीणतृष्णः कुशलो न जनिष्यते, इतरस्तु जनिष्यते। तथा मनुष्यजातिः श्रेयसी न वा श्रेयसीत्येवं परिपृष्टे विभज्यवचनीयः प्रश्नः। पशूनधिकृत्य श्रेयसी, देवानृषींश्चाधिकृत्य नेति। अयं त्ववचनीयः प्रश्नः संसारोऽयमन्तवानथानन्त इति। कुशलस्यास्ति संसारक्रमपरिसमाप्तिर्नेतरस्येति। अन्यतरावधारणे दोषः। तस्माद्व्याकरणीय एवायं प्रश्न इति॥ 'गुणाधिकारक्रमसमाप्तौ कैवल्यमुक्तन्तत्स्वरूपमवधार्यते' ॥ ३३ ॥

**भाष्यार्थः**—एका क्षणानंतर जो दुसरा अव्यवहित क्षण, याप्रमाणें जी परंपरा तीस क्रम ह्मणतात. त्यांत परिणामाचा क्रम अपरांत ह्मणजे अवसानकाल त्यानें समजण्यांत येतो. कारण, वस्त्राला कितीही जपून ठेविलें तरी जो कांहीं कालानें त्यांला जुनेपणा येतो तो मध्यें क्रमानें असणाऱ्या क्षणांचा अनुभव घेतल्यावांचून येणें संभवत नाहीं; ह्मणून नित्यवस्तूच्या ठिकाणीं सुद्धां प्रत्येक क्षणीं क्रमानें परिणाम होत असतो, असें सहज अनुमान होतें. नित्यत्व दोन प्रकारचें; कूटस्थनित्यत्व व परिणामनित्यत्व. त्यांत कूटस्थनित्यत्व पुरुषाला व परिणामनित्यत्व गुणांना आहे. जें परिणाम पावत असतांना सुद्धां ज्याच्या स्वरूपाचा नाश होत नाहीं त्याला नित्य ह्मणतात. हें नित्यत्व गुण व पुरुष या दोघांच्याही ठिकाणीं आहे; कारण, दोघांच्याही स्वरूपाचा नाश होत नाहीं. त्यांत गुणांचे धर्म जे बुद्धि ( महान् ) इत्यादि, त्यांच्या ठिकाणचा क्रम परिणामाच्या अवसानकालीं निश्चित होतो. हा लब्धपर्यवसान ( विनाशी ) क्रम होय. आणि नित्य जे धर्मी गुण त्यांच्या ठिकाणीं अलब्धपर्यवसान ( अविनाशी ) क्रम आहे. कूटस्थनित्य व स्वरूपमात्राच्याच ठिकाणीं प्रतिष्ठित असणारे मुक्त पुरुष त्यांच्या ठिकाणीं जी स्वरूपास्तिता ती तत्तत्क्षणमात्र असते व तो क्रम पुरुषांच्या ठिकाणीं सुद्धां असतो; ( कारण, 'या वेळेस राहून पुढेंही राहीन,' असा व्यवहार होतो. ) त्या ठिकाणीं सुद्धां क्रम अलब्धपर्यसान ( नित्य) असतो. तो क्रम अस्तिनामक क्रियेला घेऊनच शब्दानुसारी व्यवहारकर्त्यानें कल्पिलेला असतो. आतां अशी शंका करितात कीं, 'सृष्टि व प्रलयरूप प्रवाहानें गुणांच्या ठिकाणीं वर्तमान असणाऱ्या या संसाराच्या क्रमाची कधीं समाप्ति आहे किंवा नाहीं? याचें समाधान सांगतात कीं, जे तूं हे दोन प्रश्न केलेस हे सामान्यरीतीचे असल्यामुळें यांचें उत्तर एकदम सांगण्यास मुळींच योग्य नाहीं; कारण, प्रश्न ह्मणजे प्रथम अशा रीतीनें केला पाहिजे कीं, "जो उत्पन्न झाला तो सर्व मरणार काय ? ' यावर प्रतिवचन, ( उत्तर ) ' होय. ' आतां दुसरा प्रकार असा, 'सर्व मरून पुनः उत्पन्न होणार काय?' याचें उत्तर एक सामान्यरीतीनें देतां येत नाहीं; तर कांहीं विभाग करून सांगितलें पाहिजे. ह्मणजे ज्यांला विवेकख्याति उत्पन्न झाली आहे, ज्याचा आशापाश सर्व सुटला

आहे असला कुशल ( पुण्यवान् ) पुरुष उत्पन्न होणार नाहीं; व याहून इतर ( पापी ) पुरुष पुनः उत्पन्न होईल. तसाच प्रश्न करण्याचा दुसरा प्रकार असा, ' मनुष्यजन्म हा उत्तम आहे किंवा नाही? ' 'आहे?' असा प्रश्न केला असतां हा प्रश्न एकदम सामान्यरीतीनें उत्तर सांगण्याजोगा नाहीं; तर विभाग करून सांगण्याजोगा आहे. म्हणजे मनुष्यजन्म पशूंपेक्षां उत्तम आहे व देवांपेक्षा उत्तम नाही. आतां जो हा ' संसाराची समाप्ति आहे किंवा नाहीं? ' असा सामान्यरीतीनें प्रश्न केल्यास हा एका उत्तरानें समाधान होण्याजोगा नव्हे; कारण, त्याबद्दल पुण्यवान् पुरुषाच्या संसारक्रमाची समाप्ति होते व त्याहून इतरांची होत नाहीं; अशीं दोन वेगवेगळालीं उत्तरें आहेत. आतां दोन प्रश्नांपैकीं एकानेंच ' होय ' किंवा ' नाहीं ' असें सामान्य उत्तर द्यावें तर तिकडूनही दोष येतो; याकरितां असा विभाग करूनच प्रश्न व उत्तर दिलें पाहिजे ॥ ३३ ॥

आतां गुणांच्या परिणामक्रमाची समाप्ति आली असतां मोक्ष होतो म्हणून सांगितलें, तर तो मोक्ष कसा आहे त्याचें स्वरूप सांगतात.--

## पुरुषार्थशून्यानां गुणानां प्रतिप्रसवः कैवल्यं स्वरूपप्रतिष्ठा वा चितिशक्तिरिति ॥ ३४ ॥

**सूत्रार्थः**--सत्वादि गुणांना पुरुषाचें कांहीं काम न उरल्यामुळें जो त्यांचा आपापल्या कारणांत लय, अथवा जें पुरुषाचें केवळ आपल्या स्वरूपानें राहणें, याला कैवल्य ( मोक्ष ) म्हणतात.

**भाष्यम्**--**कृतभोगापवर्गाणां पुरुषार्थशून्यानां यः प्रतिप्रसवः कार्यकारणात्मनां गुणानां तत्कैवल्यं स्वरूपप्रतिष्ठा पुनर्बुद्धिसत्वानभिसम्बन्धात्पुरुषस्य चितिशक्तिरेव केवला, तस्याः सदा तथैवावस्थानं कैवल्यमिति ॥ ३४ ॥**

**भाष्यार्थः**-- पुरुषाचें भोग व अपवर्ग ( मोक्ष ) रूप कार्य पुरें केल्यामुळें ज्यांच्या पुरुषाचें कोणतेंही कार्य उरलें नाहीं अशा गुणांचा कार्यकारणात्मक स्वकारण जें प्रधान त्याच्या ठिकाणीं जो लय त्यालाच कैवल्य (मोक्ष) म्हणतात; अथवा तीच चितिशक्तीची स्वरूपप्रतिष्ठा होय; कारण, त्या वेळेस पुरुषाला बुद्धिसत्वाचा कांहींच संबंध नसल्यामुळें केवळ चितिशक्तिच असते. याप्रमाणेंच चितिशक्तीनें जें नेहमीं स्वरूपानें राहणें हाच पुरुषास मोक्ष होय ॥ ३४ ॥

## इति श्रीवेदव्यासकृतभाष्यसहिते टिप्पण्यादियुत-भाषान्तरोपेते च पातञ्जले सांख्यप्रवचने योगशास्त्रे कैवल्यपादः सम्पूर्णः ॥ ४ ॥